[ इचलकरंजी ग्रंथमाला पुस्तक ७ वें ]

# अलंकार-मंजूषा

लेखिका

कु. बाळूबाई अनंत खरे, बी. ए.



१९३१

किंमत ३॥ ।.

हें पुस्तक

पुणें पेठ भांबुर्डा घ. नं. ९३६।२ येथें आर्यभूषण छापखान्यांत **अनंत विनायक पटवर्धन** यांनीं छापिलें, व **रा. रा. सदाशिव विष्णु चौधरी** सेक्रेटरी **इचलकरंजी** ग्रंथमाला यांनीं लॉ कॉलेज पुणें नं. ४ येथें प्रसिद्ध केलें.

# अलंकार-मंजूषेवरील कांहीं अभिप्राय

**Mr. N. C. Kelkar writes :—**

" I have great pleasure in stating my view, that the work does to the writer immense credit for industry, intelligence and acumen. The thesis exhaustively deals with the important departments of Alankars or figures of speech, and must have cost the writer an amount of patient labour over at least two years, and what is more, the true method of research seems to have been well understood by the researcher."

---

**श्री. चिंतामणराव वैद्य लिहितातः—**" मीं हें पुस्तक समग्र वाचून पाहिलें. या प्रबंधांत लेखिकेचें प्राविण्य फारच प्रशंसनीय दृष्टोत्पत्तीस येतें. अलंकारशास्त्राचा फार खोल अभ्यास त्यांनीं केला असून अलंकारांच्या लक्षणांची फारच सूक्ष्म विवेचना या निबंधांत त्यांनीं केली आहे.

# लेखिकेचे चार शब्द.



'अलंकार-मंजूषा' हा निबंध १९२८ सालीं इंडियन वुइमेन्स युनिव्हर्सिटीच्या शेवटच्या परीक्षेसाठीं लिहिला होता. त्यांत फेरफार व सुधारणा करून तो आज वाचकांपुढें ठेवीत आहें.

'पुराणमित्येव न साधु सर्वं' म्हणून जुनें तें सर्व त्याज्य असें समजण्याचें कारण नाहीं. पेशवाईतील अंगरखे अगर वस्त्रें आपण वापरीत नसलों तरी समाजाच्या अगर राष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें या दृष्टीनें त्यांना कितीतरी महत्त्व आहे व तें महत्त्व ओळखूनच इतिहास संशोधक मंडळें या पुराणवस्तूंचा संग्रह मोठ्या परिश्रमानें करून ठेवतात. आज काय तर अमुक जागेंत उकरीत असतां जुन्या इमारतीचा अवशेष सांपडला, उद्यां पांच हजार वर्षांपूर्वीचें नाणें सांपडलें अशा रीतीनें जुन्या बहुमूल्य गोष्टींचें कौतुकानें म्हणून जतन केलें जातें. तशीच जुन्या अलंकारसंभाराची स्थिति आहे. वेरूळच्या लेण्यासारखीं लेणीं पोखरण्यांत आज कोणी आयुष्य व मनुष्य खर्ची घालणार नसला तरी जुन्या कलेबद्दल अभिमान वाटणार नाहीं अगर ती केवळ स्मृतिशेष करून टाकावी असेंहि कोणी म्हणणार नाहीं. उलट या इतिहास संशोधनाच्या साम्राज्यांत कांहीं वस्तूंकडे पाहून मनुष्य आश्चर्यानें स्तंभित होतो व तिचें कौतुक म्हणून जतन करतो.

जुन्या युगाचा इतिहास ज्या अनेक साधनांनीं रक्षण करावयाचा त्यांपैकींच जुनीं शास्त्रें हेंहि एक साधन आहे. जुन्यांत नित्य नवा बदल होतो तसाच जुन्या शास्त्रांतही बदल न होणें हें अशक्यच आहे. नव्या काळाला तीं एकपरीनें निरुपयोगी होत असलीं तरी, त्यानें जुन्याची किंमत कमी होत नाहीं. त्यालाही ऐतिहासिक मोल भरपूर आहे, म्हणूनच त्यांकडे आस्थेनें पहावयाचें व त्यांची जपणूक करावयाची. त्यांना शक्य तर नवयुगाला साजेशीं करतां आल्यास करावयाची. अलंकारांचें याच दृष्टीनें संशोधन व परीक्षण व्हावें म्हणून ही अलंकारमंजूषा वाचकांपुढें ठेविली आहे.

श्री. तात्यासाहेब केळकर व श्री. नानासाहेब वैद्य यांनीं प्रस्तुत लेखिकेच्या विनंतीवरून आपला अमूल्य वेळ खर्चून हा निबंध वाचून पाहिला, व त्यावर कांहीं महत्त्वाच्या सूचना तसेंच अभिप्राय देऊन लेखिकेला हा निबंध छापण्याचे कामीं उत्तेजन दिलें. त्यांच्या या मदतीबद्दल लेखिका त्यांची अत्यंत आभारी आहे. **श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर** यांच्या ग्रंथमालानिधींतून मदत मिळाली नसती तर ही अलंकारमंजूषा जनदृष्टीपुढें आणतांच आली नसती. अर्थात् त्यांच्या बहुमोल मदतीचे कोणत्या शब्दांत आभार मानावयाचे हें कळत नाहीं. गुरुवर्य प्रो. दिवेकर यांनीं अनेक कामें असतां व परदेशीं जाण्याची गडबड असतांही वेळ काढून या पुस्तकाबाबत अनेक सूचना केल्या म्हणून त्यांची व आर्यभूषण छापखान्याच्या चालकांनीं ग्रंथ छापून दिल्याबद्दल त्यांचीहि लेखिका आभारी आहे.

# अनुक्रमाणिका.



## प्रस्तुत निबंधांत उपयोग केलेल्या ग्रंथांचे संक्षेप



| | ग्रंथ | कर्ता | संक्षेप |
|---|---|---|---|
| १ | काव्यालंकार | भामह | भा. लं. |
| २ | काव्यादर्श | दण्डी | का. द. |
| ३ | अलंकारसारसंग्रह | उद्भट | का. सा. सं. |
| ४ | काव्यालंकारसूत्र | वामन | का. लं. सू. |
| ५ | वक्रोक्ति-जीवित | कुन्तक ( ल. ) | व. जी. |
| ६ | काव्यालंकार | रुद्रट | का. लं. |
| ७ | काव्यप्रकाश | मम्मट | का. प्र. |
| ८ | अलंकारसर्वस्व | रुय्यक | अ. स. |
| ९ | वाग्भटालंकार | वाग्भट | |
| १० | काव्यानुशासन | हेमचंद्र | का. नु. |
| ११ | एकावली | विद्याधर | ए. |
| १२ | प्रतापरुद्र यशोभूषण | विद्यानाथ | |
| १३ | काव्यानुशासन | वाग्भट | |
| १४ | साहित्यदर्पण | विश्वनाथ | सा. द. |
| १५ | कुवलयानंद | अप्पय्यदीक्षित | कु. |
| १ | अग्निपुराण | द्वैपायन | अ. पु. |
| २ | नाट्यशास्त्र | भरत | ना. शा. |
| ३ | भट्टीकाव्य | भट्टी. | |
| ४ | मैत्र्युपनिषद् | | |
| ५ | निरुक्त | यास्क | |
| ६ | सरस्वतीकंठाभरण | भोज | स. कं. भ. |
| ७ | चंद्रालोक | जयदेव | चं. लो. |
| 8 | Sanskrit Poetics | Mr. S. K. Day. | |
| 9 | History and significance of Upama–Mr. Sowani | | |
| १० | वनविहार | साधुदास | सा. व. वि |
| ११ | रुक्मिणहिरण | सामराज | रु. ह. |
| १२ | केशवसुतांची कविता | केशवसुत | के. |
| १३ | निरंजन माधवाची " | निरंजनमाधव | नि. मा. |
| १४ | श्रीमज्जयसिंह | | श्री. ज. |

| | | |
|---|---|---|
| १५ करुणाष्टक | रामदास | |
| १६ नवनीत | | न. नी. |
| १७ यशवंतराय | खरे | य. रा. |
| १८ काव्यकुसुमांजलि | | का. कु. |
| १९ गंगालहरी. | | |
| २० कवनरत्नहार | सांखळकर | क. र. हा |
| २१ बालकविची कविता | बालकवि | बा. क. |
| २२ वाग्वैजयंती | गडकरी | वा. वै. |
| २३ कांहीं तरी | गोखले | |
| २४ मुक्तेश्वर | | मु. |
| आदिपर्व–सभापर्व वनपर्व | | |
| विराटपर्व–रामायण. | | |
| २५ विठ्ठल | | |
| २६ भामिनीविलास | लेले | भा. वि. |
| २७ मेघदूत | " | |
| २८ काव्यमंजरी | सांखळकर | का. म. |
| २९ केकावली | मोरोपंत | के. |
| ३० पद्यरत्नसमुच्चय | | प. र. स. |
| ३१ विक्रमोर्वशीय | | वि. व. |
| ३२ मुद्राराक्षस | | मु. रा. |
| ३३ केनोपनिषद् | | |
| ३४ कठोपनिषद् | | क. उ. |
| ३५ अलंकारचंद्रिका | | |
| ३६ रघुवंश | | र. |
| ३७ वामन | | वा. |
| ३८ मोरोपंत | | मो. |
| आर्याभारत १–२–३ | | |
| कृष्णविजय | | कृ. वि. |
| मोरोपंती वेंचे | | मो. वे. |
| ३९ काव्यदोहन | | का. दो. |
| ४० ज्ञानेश्वरी | | ज्ञा. |
| ४१ शुक्लयजुः संहिता | | शु. किंवा शु. य. वे. स. |
| ४२ सिद्धान्तकौमुदी | | सि. कौ. |
| ३३ ध्वन्यालोक | | |

# कांहीं चुकांची दुरुस्ती.

[ चुका पुष्कळ राहिल्या आहेत परंतु कांहींचीच दुरुस्ती पुढें दिली आहे ]

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३३ | १४ | रक्तपूरें | रुक्तपूरें |
| ४३ | १७ | संदुष्ट | संदष्ट |
| ६२ | २० | शब्द्बाण | शब्द् बाण |
| ६६ | १९ | मानली आहे | मानली नाहीं |
| ७८ | १० | ज्ञानाद् | ज्ञाताद् |
| ९० | ७ | मेधाविनो | मेधावि नो |
| ९१ | ४ | भूयसामुद्दिष्टानाम् | भूयसामुपादिष्टानाम् |
| ९४ | टीप | ५ का. प्र. | ६ का. प्र. |
| ,, | ,, | १—२—३—४ | १—२—३—४—५ |
| ९४ | शेवटची ओळ | सोऽपि | सोऽपि |
| ,, | २६ | राहे | राहे |
| ९९ | १६ | पुडें | पुढें |
| १२८ | शेवटीं | पुन | पुनः |
| १५५ | २० | विषम | विशेष |
| २८२ | २४ | वलक्षण्य | वैलक्षण्य |
| २८३ | ८ | यांना यक्त | यांनीं युक्त |
| २८४ | १२ | धमलसोपमा | धर्मलुप्तोपमा. |

# अलंकार-मंजूषा

## प्रकरण १ लें

### थोडा पूर्वेतिहास

#### प्राचीन अलंकारशास्त्रकर्ते

१. प्रस्तुत निबंध हा अलंकारकर्त्यांच्या कालाची चर्चा करण्याकरितां लिहिलेला नाहीं. अलंकारांच्या व्याख्यांचाच मुख्यतः विचार या निबंधांत करावयाचा आहे. कालाबद्दल चर्चा करणारे अनेक विद्वद्वर्य संशोधक असतां सामान्य मनुष्यानें त्या चर्चेंत भाग न घेणेंच बरें.

'अलंकारशास्त्र' या शब्दाचा इतिहास पाहूं गेलें तर तो निश्चित अमुक एका व्यक्तीच्या लेखनांतून उद्भवला असें सांगतां येणार नाही. अलंकार हा शास्त्र या दृष्टीनें शब्द पुढें कधीं आला तें सांगतां आलें नाहीं तरी एवढें निश्चित आहे कीं, वाङ्मय परिपक्व होऊन त्यांत अलंकार दिसल्यानंतरच अलंकारशास्त्र बनलें. भाषेनंतर भाषेचें शास्त्र बनत असतें. वाङ्मय हें गद्य, पद्य व मिश्र स्वरूपाचें असतें. वाङ्मयांतील या तिन्ही प्रकारांना नटविण्यास अलंकारांची जरूर असते. पण त्यांतही अलंकार म्हटल्याबरोबर काव्य ध्यानांत येतें. काव्य किंवा पद्य व गद्य यांत लेखणी कसोटीला कोठें लागते तर गद्यांत. 'गद्यं कवीनां निकषं वदन्ति' असें गद्याबद्दल म्हटलेलें आढळतें तर पद्य हें भाषेच्या, वाङ्मयाच्या आरंभापासून आहे. वाङ्मयांतिल पद्याचाच भाग आधीं निर्माण झाला. वेद हें पद्य—काव्य—होय. गद्य-पद्याची परिपक्वता झाली तेव्हां त्यांत भाषासौंदर्य दिसलें व नंतर शास्त्रज्ञांनीं भाषा-शास्त्र व काव्यशास्त्र निर्माण केलें. वेदांमध्यें अनुप्रास, यमक, रूपक, उपमा, व्यति-रेक, अतिशयोक्ति, श्लेष, इत्यादि अलंकारांचीं उदाहरणें मिळतात. पण अलंका-रांना हे अमुक अलंकार असें नांव मात्र तेव्हां मिळालेलें नव्हतें. विशिष्ट अर्थ-विशेषाचा अगर भाषाविशेषाचा न कळतां पुनः पुनः उपयोग झाल्यानंतर अर्थ-विशेषाच्या अगर भाषाविशेषाच्या स्वरूपाकडे लक्ष जाऊन त्या स्वरूपावरून अलंकारांना निरनिराळीं नांवें दिलीं गेलीं व शास्त्र बनत गेलें. इ. स. पूर्वी होऊन गेलेल्या संस्कृत काव्यग्रंथांत सुंदर अर्थविशेष व भाषाविशेष हे

सर्वत्र कांहीं विशिष्ट तऱ्हेनें पुनः पुनः आलेले व सर्वत्र विखुरलेले स्पष्टपणें आढळून येतात. रामायण, महाभारत इत्यादि ग्रंथ पाहिले असतां, विशेषतः रामायण पाहिलें असतां त्यांत अत्यंत मनोरम अलंकार आढळतात. यावरून विशिष्ट अलंकारिक काव्यरचनेला त्यावेळीं बहर आला होता. अर्थात् अलंकारशास्त्राची कळी दृग्गोचर होण्यास योग्य अवसर प्राप्त झाला.

२. अलंकारशास्त्राला अस्फुटतेनें सुरवात कोणीं केली हें पाहतां सर्वांत वयोवृद्ध उपमेकडे लक्ष जातें; व गार्ग्य, यास्क, काश्यप वगैरे लोकांची स्मृति होते. असो. अलंकारशास्त्राचा इतिहास देतांना अलंकारकर्त्यांचा इतिहास व अलंकारांचा इतिहास असे दोन भाग पाडून, विवेचन करावयाचें योजिलें आहे. इतिहास हा सत्यानें परिपूरित असल्यानें त्यांत दुमत होऊं नये पण तो कालाच्या उदरांत गडप झाल्यानें व सत्याच्या ठिकाणीं सत्य न सांपडल्यानें, दुमत होतें. अलंकारकर्त्यांच्या कालमानाचे बाबतींत विद्वान् लोकांत मतभेद आहे. प्रस्तुत प्रकरण लिहित असतां श्री. काणे यांची साहित्यदर्पणाला जोडलेली अत्यंत महत्त्वाची प्रस्तावना व सुशील कुमार दे यांचा Sanskrit Poetics हा ग्रंथ, यांचा उपयोग केला आहे.

३. अलंकारशास्त्र हें भरतापूर्वींच माहीत असावें पण आपणांस त्याची माहिती भरतापासून दिसते म्हणून प्रथम भरत हाच माहितीच्या दृष्टीनें पहिला म्हणून समजूं. भरतानें नाट्यशास्त्र लिहिलें. नाटकाला अंगभूत असणाऱ्या सर्व गोष्टींची चर्चा करीत असतां त्यांत वृत्ती, काव्यगुण, काव्यदोष, रस, विभाव, अनुभाव वगैरे व अलंकार इत्यादि गोष्टींचेंही त्यानें वर्णन केलें आहे. कित्येकांच्या मतें भरत हा नाट्यशास्त्राचा कर्ता नसून दुसरीच व्यक्ति असावी. असा मतभेद असला तरी आपण भरताचेंच नाट्यशास्त्र आहे असें समजल्यास हरकत नाहीं. नाट्यशास्त्रांत इतर लोकांच्या ग्रंथांचा उल्लेख केला असला तरी सर्वसंग्राहक नाट्यशास्त्र भरतानेंच लिहिलें असण्याचा संभव आहे. ( या बाबतींत निर्णय देण्याचें काम विद्वान् लोक करतीलच. ) आपली मुख्य दृष्टि अलंकारांपुरती आहे. नाट्यशास्त्राचा काल इ. स. पू. ३०० असावा.

४. भरतानंतर भामहाकडे वळण्यापूर्वीं भामहानें स्वमुखानेंच उल्लेख केलेल्या मेधावीकडे लक्ष दिलें पाहिजे. भामहानें मेधावीचा दोन वेळां उल्लेख केला आहे.

'संख्यानमिति मेधाविनोत्प्रेक्षाभिहिता क्वचित्'

तसेंच 'त एव उपमादोषाः सप्त मेधाविनोदिताः'

यावरून भामहानें मेधावीचा ग्रंथ पाहिलेला असला पाहिजे. भामहानें मेधावीचा त्याचप्रमाणें आणखीही कित्येकांचा उल्लेख केलेला आहेः—अश्मक वंश ( १·३३ ), अच्युतोत्तरकार रामशर्मा ( २·१९+५८ ), कणभक्ष ( ५·१७ ), न्यास

(६·३६), सालातुरीय–पाणिनि ( ६·६२+६३ ), राजमित्र ( २·४५, ३·१० ) शाखा-वर्धन (२·४७). भामहानें यांच्या ग्रंथांतून अवतरणेंच घेतलीं नसलीं तरी त्यानें या ग्रंथाचा उपयोग केला आहे असें उघड दिसतें. आतां यानंतर भामहाकडे वळूं.

भामहानें काव्यालंकार नांवाचा ग्रंथ लिहिला. अलंकारशास्त्राचा सर्व मार्ग अवलोकन करीत असतां, पहिलें विश्रांतिस्थान भरताचें नाट्यशास्त्र व दुसरें भामहाचा काव्यालंकार. भामहाच्या पूर्वी अलंकारांची बरीच वाढ झाली असली पाहिजे. भरताचे चार अलंकार पाहिल्यानंतर भामहाचे एकंदर ३८ अलंकार आपणांस पहावयास मिळतात. अर्थात् मध्यें पुष्कळच सुवर्णकार कलाकौशल्य दाखविणारे झाले असले पाहिजेत. उत्प्रेक्षेसारखा महत्त्वाचा अलंकारही भामहा-पूर्वींच घडविण्यांत आला होता. भामहामध्यें अलंकारशाखेचा पुरस्कार दिसतो. त्यानें वक्रोक्ति हें काव्यजीवित असाच जवळ जवळ उल्लेख करून वक्रोक्तिरहित असणारे हेतु, सूक्ष्म व लेश हे अलंकार मानले नाहींत. भामहाच्या लेखनांतून त्याच्यापूर्वींच रस, वक्रोक्ति इत्यादिकांचा विचार झालेला दिसत असला तरी अजूनपर्यंत काव्याचें जीवित कोणतें हें कोणीच ठर-विलेलें नव्हतें. भामहानें वक्रोक्ति ही अत्यंत आवडती म्हटली तरी तिची खास शाखा म्हणून त्यानें निर्माण केली नाहीं. 'शब्दार्थौ सहितं काव्यम्' असें म्हणण्यांत भामहाच्या वेळीं काव्याचें शरीर कोणतें हेंच ठरत होतें, असें दिसतें. अलंकार या शब्दांचा कोणत्या अर्थीं स्वीकार करावयाचा हें काव्य–जीवित ठरविल्यानंतर ठरविलेलें दिसतें. काव्याला नटविणारे ते सर्व अलंकार असें गृहीत असल्यानें भामहानें काव्याच्या सर्वांगीण विवेचनग्रंथाला काव्यालंकार असें नांव दिलें आहे. शब्दालंकार व अर्थालंकार हे दोन पारिभा-षिक शब्द यावेळीं उच्चारलेले नाहींत. भरत 'शब्दाभ्यासं तु यमकं' म्हणतो, भामह पदविन्यास व वर्णविन्यास हे शब्द वापरतो पण शब्दालंकार व अर्थालंकार असे शब्द त्यानें वापरले नाहींत.

५. भामहाच्या कालाबद्दल बराच मतभेद आहे. दण्डी आधीं कीं भामह आधीं, हा मोठाच वादाचा प्रश्न होऊन बसलेला आहे. या बाबतींत सामान्य माणसानें न बोलणेंच इष्ट असलें तरी दोन्ही ग्रंथ वाचतां असा संशय येतो कीं, भामहानंतर दण्डी किंवा दण्डीनंतर भामह नसून दण्डी–भामह हे समकालीन असावे. भट्टि इ. स. नंतर ५०० ते ६५० च्या सुमारास झाला असावा. भट्टीनें भामह अगर दण्डीचा उल्लेख केलेला नाहीं. त्यांच्या पूर्वी झालेल्या ग्रंथांचा तो आधार घेत असावा. भामह व दण्डी एकमेकांना खंडून टाकण्याचा प्रयत्न करतात हा जो संशय येतो त्याबरून कित्येक भामहाला दण्डीच्या आधीं अगर नंतर घालतात. पण त्या दोघांत दिसणारीं सारखीं पदें, चरणार्धें अगर चरण हीं पाहतां असें वाटतें कीं, भामह हा निराळ्या

मताचा पुरस्कर्ता असून दण्डी हा निराळ्या मताचा पुरस्कर्ता असावा. भामहानें व दण्डीनें सारखेच ग्रंथ अवलोकनांत घेतल्यानें त्या दोघांत कांहीं ठिकाणीं साम्य दिसतें. वस्तुतः ते दोघे एकमेकांवर वाक्प्रहार करीत नसून त्या कालीं प्रचलित असणाऱ्या दोन विरोधी मतांवर परस्पर प्रहार करीत असावेत. भामह व दण्डी यांनीं मानलेले अलंकार पाहतां असें दिसतें कीं, त्यांच्या अलंकारांच्या संख्येंतही कालमानाप्रमाणें पडणारी तफावत दिसत नाहीं. भामह एकूण अडतीस अलंकार विचारांत घेतो व दण्डी सदतीस अलंकारांचें वर्णन करतो. भामहानें स्वभावोक्ति त्याज्य मानली. दण्डी स्वभावोक्ति व वक्रोक्ति या दोहोंवर वाङ्मय अधिष्ठित आहे असें म्हणतो. हेतु, सूक्ष्म, लव हे भामहाला वक्रोक्तीच्या आवडीमुळें नकोसे वाटतात. दण्डी त्यांना सोडीत नाहीं. यावरून तत्कालीन असणाऱ्या ज्या दोन मनःप्रवृत्ति त्यांचें प्रातिनिधिकत्व या दोघांनीं घेतलें आहे व त्यामुळें त्या दोघांनी सारख्याच अलंकारांचा उल्लेख करून त्यांपैकीं कांहीं त्याज्य व कांहीं ग्राह्य मानले आहेत असें वाटतें. भामहाच्या अडतीस अलंकारांतील उपमारूपक व उत्प्रेक्षावयव हे अलंकार संसृष्टींतच जाणारे असल्यानें, तसेंच उपमेयोपमा हा दण्डीनें जो उपमा-भेद मानला आहे तो भामहानें स्वतंत्र अलंकार मानला असल्यानें, वस्तुतः दोघांची अलंकारांची संख्या सारखीच आहे असें दिसेल. भामह व दण्डी हे एकमेकांचे ग्रंथ पाहून त्यावर टीका करीत नाहींत. दोघांच्या आवडी भिन्न स्वरूपाच्या असल्यानें आवडीप्रमाणें ग्रंथ लिहून आपल्या नावडत्या मतावर त्यांनीं आघात केले.

६. अग्निपुराणाचा रा. काणे यांनीं ठरविलेला काल पाहिला असतां, त्यांतून आणखीही एक पुरावा मिळतो. अग्निपुराणांत शब्दालंकार व अर्थालंकार यांच्या व्याख्या देत असतां त्यांतील पुष्कळ व्याख्या या भामह व दण्डी या दोघांच्याच व्याख्या असाव्यात अशा दिसतात. भरताच्या उपमेचाही त्यांत विस्तार आहे. भरत–भामह–दण्डी हें त्रिकूट अग्निपुराणानें सहाय्याला घेतलें असें दिसतें. अग्निपुराणानें रूपकाची व्याख्या स्वतःची न देतां दण्डी–भामहाच्या दोन व्याख्या दिल्या आहेत. यावरून प्रचलित असलेल्या सर्वांचा निष्कर्ष काढणाऱ्या अग्निपुराणानेंही दोन मतांचें प्रातिनिधिकत्व आपल्या ग्रंथांत दिलें असावें असा भास होतो. भामह–दण्डीचा अलंकारवर्णनाचा क्रम सर्वस्वीं एक नसला तरी बहुतांशीं एकसारखाच आहे असें दिसतें. तेव्हां भामहदण्डींनीं परस्परांवर टीका केली असा आरोप न करतां ते समकालीन असून आपापल्या मतांचा पुरस्कार करून न पसंत पडणारीं, पण त्यावेळीं प्रचलित असणारीं मतें खंडून टाकीत आहेत असें म्हणावेंसें वाटतें. असो.

या विषयावर अधिक चर्चा न करितां पुढें जाणें इष्ट आहे. भामहाचा काल रा. काणे यांच्या शब्दांत असा ठरतो. " Therefore Bhamaha flourished after about 500 A. C. and if he is later than

धर्मकीर्ति then after 600 " आणि दण्डीचा काल विद्वद्वर्यांच्या मतें सहावें शतक असा ठरतो.

७. दण्डीनें काव्यादर्श हा ग्रंथ लिहिला आहे. त्यानें दुसरा व तिसरा परिच्छेद हा अलंकारांसाठीं लिहिला आहे; व अनुप्रास हा प्रथम परिच्छेदांत थोडा वर्णिला आहे. दण्डीनें ' काव्यशोभाकरान् धर्मानलंकारान् प्रचक्षते ' असें म्हणून अलंकाराची व्याख्या केली आहे. पण शब्दालंकार व अर्थालंकार हे विभाग हेतु-पुरस्सर असे पाडलेले दिसत नाहींत. भामहानें अलंकारवर्णनांत स्वकिारलेला क्रम पाहतां जणुं काय त्यानें अलंकार ज्या मार्गानें वाढीस लागले त्यांतील निरनिराळे टप्पे दाखविले आहेत, असें वाटतें. दण्डीनें असे विभाग पाडले नाहींत पण त्याचा क्रम मात्र बहुतांशीं भामहासारखाच आहे.

८. भामह–दण्डीनंतर भामहाचा पुरस्कार करणारा उद्भट होय. अलंकारांचा विचार करतांना ज्यांच्या ग्रंथांचा महत्त्वानें विचार करावयास पाहिजे त्यांपैकीं उद्भट हा एक आहे. उद्भटानें अलंकारसारसंग्रह हा ग्रंथ अलंकारांवर लिहिला आहे. त्याच्या ग्रंथाच्या नांवावरून त्यानें अलंकारसाराचा संग्रह केला आहे हें स्पष्ट आहे. उद्भटाच्या वेळेपर्यंत अलंकारशास्त्र चांगलेंच वाढीस लागलेलें दिसतें. रसां-विषयीं भामह–दण्डी–उद्भट यांना माहिती होती, पण त्यांनीं अलंकारांचा पक्ष इतका पुढें आणला कीं, रसांतूनही रसवत् हा निराळा अलंकार निर्माण करून अलंकारांचेंच महत्त्व स्थापित केलें. उद्भटानें त्याच्या अलंकारवर्णनाचा क्रम ह भामहासारखाच ठेविला आहे. त्यानें भामहाचे यमक, उपमारूपक व उत्प्रेक्षावयव हे अलंकार आपल्या ग्रंथांतून कमी केले व पुनरुक्तवदाभास, दृष्टान्त हे नवीन अलंकार सांगितले. उद्भटाच्या व्याख्या या बऱ्याच घटलेल्या आहेत. जगन्नाथा-पर्यंत सर्व लोक त्याच्या व्याख्या महत्त्वाच्या समजतात.

' भामह विवरण ' या नांवाचा त्यानें एक ग्रंथ लिहिला आहे. भामहावरून त्यानें आपला संग्रह केला असला तरी त्यानें भामहाला मागें टाकण्याइतक्या सफाईनें आपला ग्रंथ लिहिला. उद्भटानें अलंकारांचें सूक्ष्म निरीक्षण करून विशिष्ट तत्त्वें काढलीं तीं पुढील अलंकारशास्त्रज्ञांना आदरणीय व अनुपेक्षणयि अशीं वाटलीं, म्हणून त्यांवर साधकबाधक चर्चा उद्भटानंतर झालेली दिसते. श्लेषासंबंधीं व उपमेसंबंधीं त्यानें केलेलें विवरण हें पुढील लोकांनीं प्रामुख्यानें विचारांत घेतलेलें दिसतें. उद्भटाचा काल इ. स. ८०० च्या सुमारास धरला जातो. उल्लेखनीय वामन हा कित्येकांच्या मतें उद्भटाचा समकालीन असावा.

९. वामनानें काव्यालंकारसूत्र नांवाचा ग्रंथ लिहिला. त्यानें हा सूत्रपद्धतीवरच रचला आहे. वामनाच्या ग्रंथांत ' रीतिरात्मा काव्यस्य ' हें मत ठांसून पुढें मांडलें आहे. अजूनपर्यंत काव्याचा आत्मा कोणता हा वाद सुरू झाला नव्हता.

वामनानें वक्रोक्ति अर्थालंकाराचे सद्गंत घेतली आणि गुण व अलंकार यांमध्यें फरक दाखविला. वामनानें उपमाप्रपंच म्हणून सर्व अलंकारांचें विवेचन केलें आहे, विरोध व विभावना सोडल्यास त्याच्या व्याख्या उपमाप्रपंच या नांवाला शोभणाऱ्या आहेत. एका दृष्टीनें हें अलंकारांचें वर्गीकरण होय.

१०. रुद्रटानें अलंकारांचें वर्गीकरण करण्याचें फारच महत्त्वाचें काम केलें त्या वर्गीकरणाबरहुकूम वागण्यांत कित्येक ठिकाणीं सदोषता आलेली आहे ती आपण अलंकारवर्गीकरण या प्रकरणांत पाहूं. रुद्रटानें रसांचें विवेचन केलें आहे, तरी तो अलंकारांच्याच पक्षाचा पुरस्कर्ता आहे. वामनानें रीतींना आत्मा केलें, पण हा त्यांबद्दल विशेष काळजी वहातांना दिसत नाहीं. त्यानें भामह--दण्डीपेक्षां अधिक अलंकार वर्णिले आहेत. रुद्रटाला अलंकारशास्त्रांत महत्त्वाचें स्थान आहे. रुद्रटाच्या व्याख्यांपैकीं कांहीं इतक्या पूर्णत्वाला गेलेल्या दिसतात कीं, त्यानंतर अलंकारशास्त्रज्ञांनीं त्या शब्दमात्र भेदानेंच स्विकारलेल्या आहेत. रुद्रटाचा काल इ. स. ८००–८५० चे दरम्यान समजला जातो.

११. यानंतर प्रामुख्यानें बरीच खळबळ निर्माण करणारा ध्वन्यालोक हा ग्रंथ होय. ध्वन्यालोकाची किंमत अलंकारशास्त्रांत फार मोठी समजली जाते. ध्वन्यालोकांत सविस्तर विवेचन व मार्मिकपणा दिसून येतो. या ग्रंथांचा कर्ता कोणता याबद्दल मतभेद आहे. कित्येक सहृदय हा ध्वन्यालोकाचा कर्ता समजतात. कित्येक आनन्दवर्धनाला त्याचें श्रेय देतात. ध्वनिस्वरूप हें स्पष्टपणें कोणाला अजून कळलें नसलें तरी दण्डी 'प्रतीयमान' हा शब्द उच्चारतांना दिसतो त्यावरून ध्वनिस्वरूपाची किंचिन्मात्र कल्पना पूर्वी होती पण ध्वनिकारांनीं ती स्पष्टपणें पुढें मांडली. व 'काव्यस्यात्मा ध्वनिः' असें स्वच्छ म्हटलें. ध्वनीचें काव्यांत किती महत्त्व आहे, ध्वनि म्हणजे काय, वाच्यार्थ व प्रतीयमानार्थाचें विवेचन इत्यादि गोष्टी ध्वन्यालोकांत स्पष्टपणें सांगितल्या आहेत. ध्वन्यालोकाचा अलंकारशास्त्रावर फारच मोठा परिणाम झालेला आहे. अलंकारशास्त्राच्या प्रथमावस्थेंत शब्दालंकाराला फारच महत्त्व दिल्यासारखें वाटत होतें. काव्यांत ध्वनि हा महत्त्वाचा जेव्हां वाटला तेव्हांपासून यमक, भेद, चित्र वगैरे सारखें शब्दजाल मागें पडलेलें दिसतें.

१२. यानंतर राजशेखरानें लिहिलेली काव्यममिांसा. हींत रस, गुण, अलंकार यांचें प्रत्यक्ष विवेचन विशेषसें दिसत नाहीं. राजशेखराचा काल १० व्या शतकांतलि पूर्वार्ध समजला जातो. यानंतर मध्यंतरीं अलंकारांचें दृष्टीनें विशेष महत्त्व नसणारे असे मुकुलभट्ट, भट्टतौत व भट्टनायक इ० ग्रंथकर्त्यांचे ग्रंथ झाले.

१३. भामहानें वक्रोक्तीचें महत्त्व गाइलें होतें. पण वक्रोक्ति हेंच काव्यजीवित म्हणून सांगणारा कुन्तक इ. स. ९२५ ते १०२५चे सुमारास होऊन गेला. यानें

ध्वनि वगैरेंना कमी महत्त्व देऊन काव्यांत वक्रोक्तीचें प्राधान्य दाखविलें. पण ध्वनि हाच सर्वांच्या कानांत गुणगुणत राहिला.

धनंजयानें दशरूपांत रसविवेचन केलें आहे. अलंकार या दृष्टीनें त्याला महत्त्व नाहीं. राजानकमहिमभट्ट यानें ध्वनि-सिद्धांताला हाणून पाडण्यासाठीं व्यक्तिविवेक लिहिला. याचा काल इ. स. १०२० ते ११६० हा समजतात.

सरस्वतीकंठाभरणाचा रचनाकाल १०३० ते १०५० समजला जातो. सरस्वतीकंठाभरणाकडे पाहिल्यास भोजानें सर्वसंग्राहक असा हा ग्रंथ लिहिला असावा असें दिसतें. त्यानें दंडीच्या ग्रंथांतून बराच भाग घेतलेला दिसतो व एकंदर ग्रंथ पाहतां तो बराच मोठा आहे. त्यानें शब्दालंकार, अर्थालंकार व उभयालंकार असे वर्ग पाडून त्यांचें विवेचन केलें आहे. या प्रत्येक वर्गात चोवीस अलंकारांचें वर्णन आहे.

१४. यानंतरचा मम्मटाचा काव्यप्रकाश हा अत्यंत मान्य असा ग्रंथ झालेला आहे. मम्मटानें त्याच्यापूर्वीं झालेल्या निरनिराळ्या काव्यविचारांचें मंथन करून आपला ग्रंथ लिहिला आहे. मम्मटाच्या ग्रंथांत सविस्तर पण घटलेली अशी रचना आहे. उद्भट, भामह, वामन, ध्वन्यालोककार, अभिनवगुप्त इत्यादिकांच्या ग्रंथांवर त्याचा काव्यप्रकाश अधिष्ठित असूनही त्यानें आपल्या ग्रंथांत नाविन्य आणलें आहे. त्यानें स्वतंत्रपणें विचार केल्यानें वरील ग्रंथकारांपासून घेतलेल्या विचारांचेंही साधकबाधकत्व त्यानें पाहिलें आहे. उद्भट-रुद्रटावर त्यानें अनेक ठिकाणीं टीका केली आहे. मम्मटाच्या काव्यप्रकाशाचे बाबतींतही ग्रंथकर्तृत्वाबद्दल मतभिन्नत्व आहेः—( १ ) भरतानें कारिका लिहून मम्मटानें त्यावर टीका केली असें कांहीं म्हणतात. ( २ ) कारिका व वृत्ति, दोन्ही मम्मटाच्याच असें कित्येक म्हणतात. ( ३ ) मम्मटानें सर्व कारिका लिहिल्या व वृत्ति मात्र परिकर अलंकारापर्यंतच लिहिली. पुढील वृत्ति मम्मटानें लिहिलेली नाहीं असें कांहीं म्हणतात. पण एकंदर काव्यप्रकाश पाहतां त्याला अलंकारशास्त्रामध्यें प्रमुख स्थान देण्याजोगें त्यांत विवेचन केलेलें दिसतें. हा ग्रंथ इ. स. १०५० ते ११५० चे दरम्यान बहुधा झाला असावा.

१५. अलंकारसर्वस्वकार रुय्यक याचा ग्रंथही बहुमान्य आहे. विश्वनाथ, विद्याधर हे बहुतांशीं रुय्यकाचेंच अनुकरण करितात. मम्मटापेक्षां यानें अधिक अलंकार मानले आहेत. हा ध्वनिसिद्धांताचा कट्टा पुरस्कर्ता आहे. भामह, उद्भट, वामन, रुद्रट यांचीं वचनें पाहून तीं थोडक्यांत त्यानें दिलीं आहेत. रुय्यकानंतर त्याचें अनुकरण पुष्कळांनीं केलेलें आहे.

काव्यप्रकाश व अलंकारसर्वस्व यांत कित्येक ठिकाणीं पुष्कळ साम्य आहे. उदाहरणें व व्याख्या हीं दोन्हीही पुष्कळ ठिकाणीं एकसारखींच आहेत.

अलंकारसर्वस्वावरील वृत्तीच्या कर्त्याबद्दल वाद आहे. ती वृत्ति मङ्खकानें लिहिली असावी असें कित्येक म्हणतात. अलंकारसर्वस्वाचा रचनाकाल ११३५-११५५ चे सुमारास असावा.

१६. वाग्भटालंकारकर्ता वाग्भट हा बाराव्या शतकाच्या प्रथमार्धांत होऊन गेला. याचीं उदाहरणें स्वकृत आहेत. याचा ग्रंथ अगदीं लहान आहे. काव्यानुशासनकार हेमचंद्र इ. स. १०८८ ते ११७२ या कालांत होऊन गेला. यानें स्वतंत्रबुद्धीनें रचना केलेली नाहीं. चन्द्रालोककार जयदेव याचा ग्रंथ सामान्य ग्रंथ आहे. त्यानें स्वकृत उदाहरणें दिलीं आहेत, व शंभर अलंकार विवेचिले आहेत. यानंतर अलंकारांवर लिहिणारे विद्याधर, विद्यानाथ व काव्यानुशासनकार वाग्भट हे होत. विद्याधरानें व विद्यानाथानें अलंकारसर्वस्व व काव्यप्रकाश यांचें अनुयायित्व स्वीकारलें आहे. विशेषतः अलंकारसर्वस्वाकडेच दोघांचाही ओढा अधिक आहे. वाग्भटाची विवेचनाची पद्धति वामनाच्या वळणावर गेलेली आहे. त्यानें सूत्रमय ग्रंथ लिहिला आहे. विद्याधरानें नरसिंहराजाचें व विद्यानाथानें प्रतापरुद्रदेवाचें वर्णन करीत असतांना त्याबरोबरच आपलें काव्यविवेचन केलें आहे. विद्यानाथ १३ व्या शतकाचे शेवटीं अगर १४ व्या शतकाचे आरंभीं व विद्याधर हा १४ व्या शतकांतील आहे. वाग्भटही १४ व्या शतकांतील असावा.

१७. यानंतर महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे विश्वनाथ (इ.स.१३०० ते १३८४) अप्पय्य दीक्षित (इ. स. १६२० ते १६६०) व जगन्नाथ (इ. स. १६२० ते १६६०) यांचे आहेत. साहित्यदर्पणांत विश्वनाथानें रुय्यकाचें अनुकरण केलेलें दिसतें. अप्पय्य दीक्षितानें चित्रमीमांसा व कुवलयानंद हे दोन ग्रंथ लिहिले. जगन्नाथाचा रसगंगाधर हा ग्रंथ अत्यंत निर्भीडपणें लिहिलेला, स्वतंत्र मताचा असा आहे. त्यानें सर्वांवर टीकास्त्र सोडलेलें आढळतें. जगन्नाथाची भाषा ही फारच उच्च दर्जाची वाटते. त्याची टीका कित्येक वेळां योग्य तर कित्येक ठिकाणीं पक्षपाताची वाटते. रुय्यक व अप्पय्यदीक्षित या दोघांवर त्यानें आपलें टीकास्त्र फारच जोरानें चालविलें आहे. जगन्नाथ व अप्पय्य दीक्षित हे समकालीन असून ते सतराव्या शतकांत होऊन गेले. असो.

१८. त्यानंतर अच्युतराय वल्लभ यानें साहित्यसार या नांवाचा ग्रंथ १८५६ सालीं प्रसिद्ध केला. संस्कृतमध्यें अलंकारशास्त्रावर ग्रंथ असा हा शेवटचाच होय. २० व्या शतकांत मराठींत गणेशशास्त्री लेले यांचें साहित्यशास्त्र, राजारामशास्त्री भागवत यांची अलंकारमीमांसा, लक्ष्मणशास्त्री लेले यांचा अलंकारप्रकाश, रा. भिडे यांचे अलंकारनिरूपण हे ग्रंथ झाले आहेत. याशिवायहि अलंकारचंद्रिका, रसनिरूपण, अलंकार दर्पण इत्यादि कांहीं ग्रंथ मराठी भाषेंत लिहिले गेले आहेत. येथपर्यंत आपण थोडक्यांत अलंकारकर्त्यांचा इतिहास पाहिला. आतां अलंकाराचा

## थोडा पूर्वेतिहास

इतिहास पाहण्यापूर्वी रस, अलंकार, रीति, वक्रोक्ति व ध्वनि हे पक्ष कसे निर्माण झाले तें पाहूं:—

### रससिद्धांत

**१९ रससिद्धांतः**—काव्यामध्यें रसाचा भाग फारच मोठा आहे. रसनिष्पत्तीचा मनुष्याच्या भावनांशीं संबंध असल्यानें मनुष्याला आवडतें जें काव्य त्यांत रसाला महत्त्व अधिक आहे. रसाचें महत्त्व हें भरतापूर्वींच ज्ञात असलें तरी आपणांस माहीत असणारें जें नाट्यशास्त्र त्यांतच रसविवेचन आपणांस प्रथम पहावयास मिळतें. विभाव, अनुभाव व व्यभिचारीभाव यांच्या संयोगानें रसनिष्पत्ति होते. नाट्यशास्त्रांत रसाचें महत्त्व दाखविण्याकरितां भरतानें रसांचें सांगोपांग विवेचन केलें आहे. नाटकांत शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स व अद्भुत या अष्ट रसांना महत्त्व आहे. शान्त हा नववा रस नाट्यशास्त्र मानीत नाहीं. कारण नाट्यांत अभिनय हा अवश्य असल्यानें तो शान्तरसाला प्रतिकूल होईल. रुद्रटानें या नऊ रसांच्या जोडीला प्रेयान् हा दहावा रस सांगितला आहे. या शिवाय आणखी अनेक रस निर्माण करण्याकडे प्रवृत्ति आहे, पण ते सर्व नवरसांतच सामावतात असेंही कित्येक म्हणतात. नाटकांत रसनिष्पत्ति ही श्रोत्यांचे ठिकाणीं होत असते. नाटकांत गद्यपद्याची संमिश्रता असते व तेथें रसनिष्पत्तीला अधिक महत्त्व आहे. रस–निष्पत्ति म्हणजे स्थायीभाव पूर्णत्वाला पोहोंचून त्यांचा उद्रेक होणें अर्थात् काव्य हें हृदयस्पर्शी असेल तेव्हांच तें खरें काव्य. रसनिष्पत्तीशिवाय हृदयस्पर्शी काव्य होणार नाहीं. म्हणून काव्याला 'रसात्मकं' म्हणणें हें योग्यच आहे. भरताचे वेळीं हा रससिद्धांत निर्माण झाला. मध्यंतरीं त्याला जोम नव्हता. रुद्रटानें रसविवेचन करून रसाचें महत्त्व दाखविलें, पण अलंकारांचेंच प्रातिनिधिकत्व त्याला द्यावेंसें वाटलें. मम्मट, विश्वनाथ व जगन्नाथ यांनीं रसविवेचन बरेंच केलें. विशेषतः मम्मटापेक्षांही जगन्नाथानें रसांचें विवेचन फारच मार्मिकपणें केलें आहे.

रसांचें विवेचन हें नाट्यशास्त्रापुरतेंच असल्यानें रसांचीच व्यापक आवृत्ति म्हणजे ध्वनिसिद्धांत होय. ध्वनिसिद्धांतानें काव्याचा व नाटकाचा ताबा घेतला. रसाला काव्यापेक्षां नाटकांत अधिक थारा आहे. ध्वनिकारांनीं रस हा ध्वनीच्या अंतर्गत आहे असें मानलें आहे. मम्मट, रुय्यक, वगैरे पुढील लोकांनींही ध्वनिसिद्धांताचें महत्त्व मान्य केलें आहे, व ध्वन्यंतर्गत म्हणून रसाचें विवेचन केलें आहे. रसाच्या निष्पत्तीला कारणीभूत असणाऱ्या ज्या गोष्टी आहेत, त्यांचेंही थोडक्यांत विवेचन करूं.

मनांत सूक्ष्मरूपानें असणारी वासना बलवान् करण्यास, तिची आस्वाद योग्यता पटविण्यास कारण होणाऱ्या गोष्टींना विभाव असें म्हणतात. याचे दोन प्रकार आहेत.

ज्या कारणांचा आश्रय करून एखादी चित्तवृत्ति उत्पन्न होते, त्या कारण होणाऱ्या गोष्टींना आलंबन विभाव म्हणतात. रत्यादि भावनांचा संचार झाल्यावर ज्या कारणांनी त्यांना पुष्टि मिळते ते उद्दीपनविभाव होत. एखादी चित्तवृत्ति स्थिर होऊन तिच्यामुळें निर्माण होणाऱ्या कायिक, वाचिक अगर मानसिक व्यापारास अनुभाव म्हणतात व या व्यापारांच्या उत्पत्तीस सहाय्यभूत होणारे जे भाव त्यांना सहकारी अथवा व्यभिचारिभाव म्हणतात. विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव यांनीं जी स्थिर अगर उत्कट होणारी भावना तिला स्थायिभाव म्हणतात. स्थिर अगर उत्कट असणारी भावना अथवा चित्तवृत्ति हिचा उद्रेक झाला म्हणजे रसनिष्पत्ति होते. यावरून रसाचा आविर्भाव हा नाटकांत अधिक असणार, हें उघड आहे. नाटकाचा हेतूच रसोत्पादन हा असतो.

स्पष्ट रसोत्पादनाला एखादें चार ओळींचें पद्य पुरत नाहीं. त्याला दीर्घलेखनाची जरूर असते. काव्याचा अगदीं लहानसा भाग म्हणजे श्लोक घेतला तर त्यांत रस हा ध्वनित होईल, पण स्पष्टपणें पहावयास मिळणार नाहीं. रस हा उक्त नसतोच. तो ध्वनितच व्हावयाचा असतो. एकंदरींत रसाला पोटांत घेणारें असें ध्वनिस्वरूप असल्यानें काव्यासाठीं ध्वनिसिद्धांत पुढें आला.

## ध्वनिसिद्धांत

२०. ध्वनिकारानें व्यंग्यार्थाचे रसादि, अलंकार आणि वस्तु असे तीन प्रकार केले. पहिल्या प्रकारांत नवरस आहेत, त्याचप्रमाणें विभाव, भाव, आभास इ० त्यांत समावेशिले आहेत. वस्तुध्वनि म्हणजे ज्या शब्दांचा वाच्यार्थ निराळा होईल अशा शब्दांनीं वस्तुकथन करणें. अलंकारध्वनि म्हणजे व्यंग्यार्थानें अशी काल्पनिक गोष्ट सूचित होणें कीं जिला शब्दस्वरूप दिल्यास तो एक अलंकार होऊं शकेल. ध्वन्यालोकानें काव्याचे तीन भेद केले. ध्वनिकाव्य, गुणीभूतव्यंग आणि चित्र. चित्रकाव्यांत सर्व शब्दालंकार व अर्थालंकार यांचा समावेश ध्वनिकारानें केला आहे. ध्वनिकाव्य म्हणजे उत्तम काव्य हें तत्त्व यापुढें मान्य झालें; पण मध्यंतरीं त्या तत्त्वावर बराच वाद झाला. ध्वनिसिद्धांत मागें टाकण्याचाही प्रयत्न पुष्कळांनीं केला आहे. ध्वनिकारांनीं वृत्ति ह्या शब्दाश्रयी आहेत व त्या रसात्म्यावर अवलंबून असतात असें म्हटलें आहे. म्हणजे वामनाचें 'रीतिरात्मा काव्यस्य' हें म्हणणें अगदींच क्षुल्लक गणलें गेलें. अशा तऱ्हेनें रस व ध्वनि यांचा पक्ष पाहिल्यावर अलंकाराचा पक्ष उचलून धरणाऱ्या शास्त्रज्ञांकडे वळूं.

२१. रसाचें महत्त्व माहीत असतां, रस अमान्य न करतां भामह, दण्डी, उद्भट, रुद्रट यांनीं अलंकारांवर विशेष भर दिलेला आहे, भामहानें भाविक अलंकार हा प्रबन्धगुण मानला आहे व दण्डीनें गुणांना अलंकार म्हटलें आहे. यावरून त्यानें गुण व अलंकार यांत फरक मानलेला दिसत नाहीं. भामह—दण्डी ध्वनि हा काव्यात्मा

समजत नाहींत. त्यांनीं वक्रोक्ति-अतिशयोक्ति हिची अलंकारक्षेत्रांत महत्त्वाची भूमिका मानली आहे. जरी पुढें ध्वनि हा आत्मा मानला गेला व अलंकार हा काव्यांतील प्रधानभाग म्हणून गणला नाहीं तरीही अलंकारविवेचन करतानां मम्मटासारख्या शास्त्रज्ञांनीं आपली लेखणी इतर विषयविवेचनापेक्षां अधिक चालविलेली आहे. भामह, दण्डी, उद्भट व रुद्रट यांजकडे अलंकार–विवेचनाच्या दृष्टीनें पाहतां अलंकारांची चढती कमान असून अलंकारांत उत्तरोत्तर घटना झालेली दिसते.

## रीतिपक्ष व वक्रोक्तिपक्ष

**१२.** वामन हाच प्रामुख्यानें रतिचा पुरस्कर्ता दिसतो. यानें ' रीतिरात्मा काव्यस्य ' असें म्हणून रीतींना काव्याचा आत्माच केलें. यानें वैदर्भी, गौडीया आणि पाञ्चाली अशा तीन रीती सांगितल्या. यांपैकीं वैदर्भी ही दशगुणा, गौडीया द्विगुणा व पांचाली द्विगुणा सांगितली आहे. हे दशगुण म्हणजे ओज, प्रसाद, श्लेष, समता, माधुर्य, समाधि, सौकुमार्य, उदारता, अर्थव्यक्ति व कान्ति हे होत. ओज व कान्ति हे गुण विशेषतः गौडीयेंत व माधुर्य–सौकुमार्य हे पांचालींत असतात. वामनाच्या पक्षानें अलंकार गौण मानले आहेत, व गुणांना प्राधान्य दिलें आहे. पण ध्वनिकारांनीं गुणांपेक्षां महत्तम गोष्ट रस आहे असें सांगितल्यानें वामनाचा रीतीचा पक्ष कमजोर झाला. गुणांचा समावेश रसांत आहे, या दृष्टीनें गुणांचें महत्व कमी झालें. पण पुढें जरी रीति हा काव्यात्मा गणलेला नाहीं तरी त्यांचें विवेचन सर्वांनीं केलें आहे.

कुन्तलाचा वक्रोक्ति–जीवित पक्ष हा अलंकारांना प्रधान मानणाऱ्या पक्षांतून निर्माण झालेला आहे. अलंकारांनाच जेथें गौण स्थान तेथें वक्रोक्ति ही जीवित म्हणून कोण मानणार ? भामहानें वक्रोक्तीचा पुरस्कार केला पण पुढें ती शब्दालंकार अगर अर्थालंकार या सदरांत घातली गेली.

एकंदरींत हे सर्व पक्ष पाहतां असें दिसतें कीं, ध्वनिसिद्धांत व रससिद्धांतच पुढें बहुमान्य झालेले आहेत. हें रसध्वनींचें अल्प विवेचन येथेंच पुरें करून प्रस्तुत निबंधांतील मुख्य अंग अलंकारांचें असल्यानें आतां अलंकारांचा इतिहास पुढील प्रकरणांत पाहूं.

---

# प्रकरण २ रें

## थोडा पूर्वेतिहास

### अलंकारांचा इतिहास

**२३.** येथें अलंकारांचा इतिहास म्हणजे अलंकारांची वाढ कशी झाली हें पहावयाचें आहे. पूर्वी सांगितलेंच आहे कीं वेदांपासूनही अलंकारिक रचनेची काव्यग्रंथांत भरपूर वाढ झालेली होती. केवळ विशिष्ट रचना झाली असतां अमूक अलंकार होतो असें म्हणून त्या त्या विशिष्ट रचनापद्धतीचें नामाभिधान केवळ व्हावयाचें राहिलें होतें. दुसऱ्या अगर चवथ्या शतकांत काव्यशास्त्राची बरीच वाढ झालेली असावी असें त्या काळच्या शिलालेखांवरून दिसतें.

निघण्टूनें वैदिक उपमाप्रकार एकत्रित केलेले आहेत. गार्ग्य, यास्क यांचें उपमेचें विवेचन पाहतां अर्वाचीन उपमाभेदांपेक्षां पूर्वी असणारे उपमाभेद कसे निराळे होते हें दिसून येतें. उपमेचें संपूर्ण विवेचन पुढें केलेंच असल्यानें ते भेद येथें देण्याचें कारण नाहीं. उपमा हा सर्वांत प्राचीन अलंकार होय एवढें या अत्यंत प्राचीन ग्रंथकर्त्यांच्या विवेचनावरून दिसून येतें.

वेदांतसूत्रांत 'अत एव चोपमा सूर्यकादिवत्' (३, २, १८) आणि 'आनुमानिकमप्येकेषां शरीररूपकविन्यस्तगृहीतेर्दर्शयाति च' (१·४·१) असें म्हणून उपमा व रूपक या दोन अलंकारांचा उल्लेख केला आहे. तिसऱ्या शतकाच्या सुमारास झालेला अश्वघोषाचा बुद्धचरित हा ग्रंथ पहातां अनुप्रासरचना सहेतुक केलेली त्यांत आढळते. (५·८७) तसेंच यथासंख्याचींही उदाहरणें त्यांत आढळतात. (५·४२; ९·१६)

**२४.** इ. स. ३०० चे पूर्वी झालेला 'नाट्यशास्त्र' हा ग्रंथ होय. नाट्यशास्त्रांत उपमा, रूपक, दीपक व यमक हे चार अलंकार पहावयास मिळतात. अलंकार या दृष्टीनें सुरवात प्रथम कोणत्या अलंकाराची झाली असें पाहिलें असतां, शब्दालंकाराचे आधीं अर्थालंकार सुरू झालेले दिसतात. या चार अलंकारांहून जास्त अलंकार प्रारंभीं माहीत असले तरी आहेत तेवढेच अर्थालंकार गृहीत धरल्यास असें दिसेल कीं, दोन गोष्टींना तुलनेसाठीं जवळ आणावयाचें, नंतर तुलना करतां करतां त्यांचें तादृूप्य दाखवावयाचें असें मनांत येऊन उपमेंतून हे अलंकार निर्माण झाले आहेत.

सादृश्य म्हटल्यावर त्यांत जेवढे प्रकार पाडतां येतील तेवढे मानण्यास सुरवात झाली व त्या सादृश्य प्रकारांना आणखी रंग चढवून सादृश्याहून किंचित् विभिन्न भासणारे अलंकार निर्माण झाले. भामहानें एकंदर अडतीस अलंकार मानले ते असेः—अनुप्रास, यमक, रूपक, दीपक, उपमा, आक्षेप, अर्थांतरन्यास, व्यतिरेक, विभावना, समासोक्ति, प्रेय, रसवत्, ऊर्जस्वि, पर्यायोक्त, समाहित, उदात्त ( दोन प्रकार ), श्लिष्ट, अपह्नुति, विशेषोक्ति, विरोध, तुल्ययोगिता, अप्रस्तुतप्रशंसा, व्याजस्तुति, निदर्शना, उपमारूपक, उपमेयोपमा, सहोक्ति, परिवृत्ति, ससंदेह, अनन्वय, उत्प्रेक्षावयव, संसृष्टि, भाविक आणि आशी ( अन्यमतें ). यांपैकीं उत्प्रेक्षावयव व उपमारूपक हे उघडपणें संसृष्टि होत असल्यानें हे दोन्ही अलंकार येथेंच विश्रान्ति पावले. भामहानें हेतु, सूक्ष्म, लव, स्वभावोक्ति यांचा उल्लेख केला पण ते व्याख्यारूपानें दिले नाहींत. दण्डीनें त्या चारी अलंकारांना अलंकार म्हणून मान दिला. म्हणजे भामहांतून संसृष्टीमुळें दोन अलंकार गळले. दण्डीनें ती वाण चार अलंकारांनी भरून काढली. भामहामध्यें यमक, अनुप्रास या शब्दालंकारांची पूर्ण किंबहुना अवास्तव वाढ झालेली नाहीं, पण दण्डीनें यमक, अनुप्रासाच्या जोडीला चित्रकाव्याचेंही वर्णन केलें आहे. अर्थालंकारांपैकीं दीपकाच्या अंतर्गत असणारा आवृत्ति हा अलंकार दण्डीनें स्वतंत्र मानून वर्णिला आहे. एकूण यावेळीं अर्थालंकारांची संख्या पस्तीसांपर्यंत आली. दण्डीचा लेश अलंकार तोच मम्मटाचा व्याजोक्ति अलंकार आहे असें दिसेल.

३५. उद्भटानें भामहाच्याच अलंकारांचा स्वीकार केलेला दिसत असला तरी त्यानें यमक, उपमारूपक व उत्प्रेक्षावयव हे भामहानें मानलेले अलंकार विवेचिले नाहींत व पुनरुक्तवदाभास, काव्यलिङ्ग, दृष्टान्त व संकर या चार अलंकारांची त्यानें भर टाकली. दण्डीचा हेत्वलंकार उद्भटाच्या काव्यलिङ्गांत येतो असें दिसून येईल. उद्भटाचे वेळीं उपमेचें स्वरूप भेदांचे बाबतींत पालटलें. भामहानें व्याकरणावरून दोन उपमाभेद केले व शिवाय प्रतिवस्तूपमा मानिली. पण उद्भटानें व्याकरणावरून उपमेचे भेद वाढविले. दण्डीच्या भेदांत व्याकरणाचा संबंध नाहीं. असो. दण्डीच्या वेळीं अर्थालंकारांची संख्या पस्तीसांपर्यंत आली ती उद्भटानें एकुणचाळीसांवर नेली.

वामनानें आपल्या अलंकारांचें उपमाप्रपंच या नांवाखालीं विवेचन केलें. त्यांत त्यानें अठ्ठावीस अलंकार वर्णिले आहेत. आशी, प्रेयस्वत्, रसवत्, ऊर्जस्वि, समाहित, भाविक, उदात्त हे अलंकार त्यानें वर्णिले नाहींत. पण आणखी ज्या दोन अलंकारांची भर घातली ते व्याजोक्ति व वक्रोक्ति हे होत. वक्रोक्ति ही वामनानें प्रथमतः अर्थालंकारांत आणली. भामह वक्रोक्ति व अतिशयोक्ति यांत विशेष फरक समजत नव्हता. वक्रोक्ति ही सुंदर उक्ति एवढीच त्यानें कल्पना [illegible] पण

तिची व्याप्ति त्यानें अलंकारक्षेत्रभर मानलेली होती. वामनानें अलंकार थोडे मानले तरी नवीन दोहोंची भर घातल्यानें एकेचाळीसाइतकी अलंकारसंख्या यावेळीं वाढली. हे अर्थालंकार होत. शब्दालंकारांत फरक म्हणजे भामहानें उल्लेखिलेला लाटानुप्रास उद्भटानें साक्षेपानें वर्णन केला. वामनानें लाटानुप्रास हा उद्भटाप्रमाणें स्वतंत्र अलंकार तर दिला नाहींच, पण त्याचा उल्लेखही केला नाहीं.

१६. रुद्रटानें शब्दालंकारांत वक्रोक्ति, अनुप्रास, यमक श्लेष व चित्र इतके अलंकार घालून त्यांचें सविस्तर विवेचन केलें आहे. उद्भटानें मानलेला काव्यलिङ्ग यानें सांगितला नाहीं. त्याचप्रमाणें प्रेयस्वत् रसवत्, ऊर्जस्वि, पर्यायोक्त, समाहित, उदात्त, विशेषोक्ति तुल्ययोगिता, निदर्शना, भाविक, व्याजस्तुति हे अलंकार त्याच्यापूर्वी मानलेले असतां यानें सांगितले नाहींत, यांपैकीं पर्यायोक्त व व्याजस्तुति जरी त्यानें मानली नाहीं तरी त्यांऐवजीं पर्याय व व्याजश्लेष हे केवळ नांवें बदललेले पण वस्तुतः तेच असणारे अलंकार त्यानें मानले आहेत. यानें अलंकारांमध्यें भर मात्र फारच मोठी घातली. रुद्रटानें मानलेल्या या नवीन अलंकारांपैकीं कांहीं थोडे पुढें मानले गेले नाहींत. समुच्चय, पर्याय, अनुमान, परिकर, परिसंख्या, कारणमाला, अन्योन्य, उत्तम, सार, असंगति, विषय, अधिक, प्रत्यनीक, मीलित, एकावली, स्मरण, भ्रांतिमान्, प्रतीप, विशेष, तग्दुण, साम्य, व्याघात, भाव, अवसर, मत, उभयन्यास ( वस्तुतः प्रतिवस्तूपमाच. ), अन्योक्ति ( अप्रस्तुत प्रशंसा ), पूर्व, पिहित, अविशेषश्लेष, विरोधश्लेष, अधिकश्लेष, वक्रश्लेष, व्याजश्लेष, उक्तिश्लेष, असंभवश्लेष. यांपैकीं शेवटीं दिलेले अर्थश्लेषाचे १० भेद आहेत. पण वास्तव, औपम्य व अतिशय या सदरांत त्यानें स्वतंत्र मानलेले अलंकार घातले आहेत तसेंच श्लेष विभागांत स्वतंत्र अलंकार म्हणून ते दहा भेद मानले आहेत तरीहि त्यांपैकीं व्याजश्लेष हा इतरांच्या मतें व्याजस्तुतीच आहे व त्याचे इतर भेद श्लेषविद्ध असणारा असा दुसरा अलंकार अगर प्रत्यक्ष श्लेषच असल्यामुळें ते पुढें स्वतंत्र अलंकार म्हणून मानले गेले नाहींत. तेव्हां हे दहा भेद सोडून बाकीचे अधिक नवीन मानलेले अलंकार पाहतां त्यांपैकीं कांहीं पुढें मानिले गेले नाहींत व कांहीं नांवानेंच फक्त नवीन म्हणून निराळे पण वस्तुतः दुसऱ्यांनीं पूर्वी मानलेले असे आहेत. त्यांचें विवेचन पुढें व्याख्यांची चर्चा करतांना येईल. पण जे पुढें मान्य ग्रंथकारांनीं विवेचनांत घेतले नाहींत त्यांचा शेवट येथेंच केला पाहिजे. रुद्रटाचा मत हा एक अलंकार यांपैकींच आहे. त्याची व्याख्या अशीः—

तन्मतमिति यत्रोक्त्वा वक्तान्यमतेन सिद्धमुपमेयम् ।
ब्रूयादथोपमानं तथा विशिष्टं स्वमतसिद्धम् ॥[1]

दुसऱ्यांकडून उपमेय म्हणून ठरलेली गोष्ट सांगून स्वमतानें ती उपमान म्हणून सांगणें म्हणजे 'मत' अलंकार होय. पण येथें उघडपणें उपमेयाला उपमानाच्या

---

१ का. लं. ८.६९

ठिकाणीं ठेवल्यानें प्रतीप अगर व्यतिरेक होईल. अर्थात् हा अलंकार पुढें मानला गेला नाहीं. दुसरा अलंकार 'साम्य' हा होय. त्याची व्याख्या रुद्रटानें पुढील-प्रमाणें दिली आहे.

अर्थक्रियया यस्मिन्नुपमानस्यैति साम्यमुपमेयम् ।
तत्सामान्यगुणादिककारणया तद्भवेत्साम्यम् ॥

"दोन गोष्टींत गुणक्रियादि रूप असणाऱ्या साधारण धर्मामुळें निर्माण होणाऱ्या अर्थक्रियेनें उपमानोपमेयांत साम्य दाखविलें म्हणजे साम्य अलंकार होतो." पण या अलंकारांत सामान्य गुण दाखविणें हीच मुख्य गोष्ट असल्यानें उपमेहून त्यांत विशेष वैचित्र्य नाहीं. या दृष्टीनें हा अलंकार पुढें मान्य केला गेला नसावा. पिहित या नांवाचा अलंकार पुढें क्वचित् मानला आहे पण रुद्रटाचा पिहित निराळ्या स्वरूपाचा असून तो पिहित अलंकार कोणी मानलेला नाहीं. त्याची व्याख्या,

यत्रातिप्रबलतया गुणः समानाधिकरणमसमानम् ।
अर्थान्तरं पिदध्यादाविर्भूतमपि तत्पिहितम् ॥

"अति प्रबलतेमुळें एका ठिकाणचा एक गुण त्याच ठिकाणचा असमान असणारा असा जो दुसरा अर्थ तो प्रगट झाला असतांही त्यांस झांकून टाकतो तेव्हां पिहित अलंकार होतो." हा अलंकार या स्वरूपांत पुढें मानला गेला नाहीं. कदाचित् यासारखेच पण किंचित् फरक असणारे अलंकार असल्यानें याकडे दुर्लक्ष केलें असावें.

तेव्हां हे तीन अलंकार पुढें मान्य केलेले दिसत नाहींत. यानें अवसर नांवाचा मानलेला अलंकार हा पुढील शास्त्रज्ञांचा उदात्त अलंकार होईल. उभयन्यास व अन्योक्ति हे पूर्वीं मानलेले पण नाममात्र निराळे अलंकार आहेत. यानें सत्तावीस नवीन अलंकार मानले.

२७. भोजानें सरस्वतीकंठाभरणांत, अर्थालंकार, शब्दालंकार व उभयालंकार या तीन वर्गांत प्रत्येकीं चोवीस अलंकार दिले. व अर्थालंकार व उभयालंकार या वर्गांत घातलेले अलंकार इतरांच्या ग्रंथांत अर्थालंकार या नांवाखालींच सांगितले. अर्थालंकार या सदरांत अहेतु, संभव, भेद, वितर्क, प्रत्यक्ष, उपमान, आगम, अर्थापत्ति, अभाव, हे रुद्रटाहून अधिक असे अलंकार घातले आहेत. यांपैकीं अर्थापत्ति हा अलंकार पुढें मान्य केला गेला आहे. बाकी अलंकार मानले गेले नाहींत तरी येथपर्यंत अलंकारांची संख्या सत्त्याहत्तर झाली. भोजाच्या हेत्वलंकारांत पुढील शास्त्रज्ञांच्या मतें इतर अलंकार येतील. याचा वितर्क तो इतरांचा संदेहच होईल. जैमिनीच्या षट्प्रमाणांवरून त्यानें प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, इत्यादि अलं-

---

१ का. लं. ८-१०५
२ का. लं. ९-५०

कार सांगितले. अनुमान व अर्थापत्ति हे बहुतेकांनीं मानले आहेत. भोजाचा ग्रंथ तत्कालीन सर्वसंग्राहक असल्यामुळें कांहीं अलंकार निर्माण होऊन लवकरच कसे नाहींसे झाले हें दिसतें.

**२८.** यानंतर काव्यप्रकाश पाहतां मम्मटाला निष्कारण भरतीला आलेले असे जे कांहीं अलंकार वाटले ते त्यानें मानले नाहींत उग्भटानें अर्थालंकारांत घातलेला पुनरुक्तवदाभास यानें शब्दालंकारांत घातलेला आहे. प्रेय, रसवत् व ऊर्जस्वि ह्यांचें त्यानें अलंकार म्हणून विवेचन केलें नाहीं. समाहित हा अलंकार मानला नाहीं पण समाधि अलंकार मानला. समाहित व समाधि यांचे कोणी कसे अर्थ केले तें पुढें व्याख्यापरीक्षणाचे वेळीं येईलच. यानें सम हा नवीन अलंकार सांगितला आहे व भोजानें षड्प्रमाणांवरून मानलेल्या अलंकारांपैकीं अनुमान अलंकार मानला आहे. अर्थापत्ति तो मानीत नाहीं. रुद्रटाचे साम्य, पूर्व, पिहित, भाव, मत हे अलंकार मम्मटानें मानले नाहींत. रुद्रटाचा अवसर मानला नाहीं पण तत्सम उदात्त हा पूर्वीचा अलंकार मम्मटानें सांगितला. एकूण सम, समाधि, सामान्य, अतद्गुण, विनोक्ति या नवीन अलंकारांचीं नांवें मम्मटानें दाखल केलीं. भोजानें सांगितलेले नवीन अलंकार यानें घेतले नाहींत. व पुनरुक्तवदाभास शब्दालंकारांत घातला म्हणून एकंदर ६१ अलंकार अर्थालंकारांचे सदरांत मम्मटानें दिले.

**२९.** रुय्यकानें परिणाम, उल्लेख, विचित्र, मालादीपक, विकल्प, या स्वतंत्र अलंकारांचें विवेचन केलें आहे. मालादीपक हा स्वतंत्र अलंकार मानला म्हणून तो या सदरांत दिला. वस्तुतः तो यापूर्वीच दीपकभेद म्हणून आलेला आहे. रुय्यकानें रसवत्, प्रेय, ऊर्जस्वि, समाहित यांच्या जोडीस भावोदय, संधि, शबलता हे तीन अलंकार दिल्यानें रुय्यकापर्यंत एकंदर नव्वद अलंकार झाले. पण त्यानें स्वतः ७६ अर्थालंकार दिले आहेत. मम्मटानें मानलेले अलंकार स्वतःचे नवीन कल्पिलेले आठ अलंकार, व जुन्यांपैकीं प्रेय, रसवत्, ऊर्जस्वि, समाहित, अर्थापत्ति, इ. अलंकार त्यानें वर्णिले आहेत.

**३०.** वाग्भटालंकारकर्त्या वाग्भटानें चित्र, वक्रोक्ति, अनुप्रास यमक, हे शब्दालंकार मानून अर्थालंकार ३५ वर्णिले आहेत. यानें नवीन अलंकारनिर्मिति केली नाहीं.

हेमचंद्रानें अनुप्रास, यमक, श्लेष, वक्रोक्ति व पुनरुक्तवदाभास हे ६ शब्दालंकार दिले. यानें अर्थालंकार २९ दिले आहेत. हेमचंद्रानें दीपक व तुल्ययोगिता हे अलंकार दीपक या अलंकारांतच समावेशिले. यानें परावृत्ति हा एक अलंकार मानून त्याची व्याख्या 'पर्यायविनिमयौ परावृत्तिः' अशी केली आहे. म्हणजे पर्याय आणि परिवृत्ति अलंकारांचें एकत्रीकरण याच्या परावृत्तींत झालें. संकर व संसृष्टि हे दोन्ही अलंकार त्यानें संकर या नांवानें वर्णिले आहेत. मम्मटाप्रमाणेंच त्यानें रसवत्, प्रेय, उर्जस्वि, समाहित, भावोदय, संधि

शबलता हे अलंकार दिले नाहींत. याची 'इष्टार्थसिद्ध्यै दृष्टान्तो निदर्शनम्' ही व्याख्या भोजाच्या निदर्शनाच्या वळणावर गेली आहे. भोजाच्या निदर्शनांत ज्याप्रमाणें दृष्टान्त, प्रतिवस्तूपमा व निदर्शना येतात त्याचप्रमाणें हेमचंद्राच्या निदर्शनांतही येतात. रुद्रटाप्रमाणेंच त्यानें जाति हें स्वभावोक्तीसाठीं व अन्योक्ति हें अप्रस्तुतप्रशंसेसाठीं नांव वापरलें आहे.

३०. यानंतर जयदेवाचा चंद्रालोक पाहतां त्यानें शब्दालंकारांत अनुप्रास, यमक, चित्र व पुनरुक्तवदाभास हे अलंकार सांगितले. अर्थालंकारांत वस्तुतः यानें ८६ अलंकार दिले आहेत. पण उपमाभेद, रूपकभेद इ० निराळ्या तऱ्हेनें त्यानें काल्पिले. आतांपर्यंत नसलेले असे पुढील अलंकार यानें दिले आहेत: उन्मीलित, परिकरांकुर, प्रौढोक्ति, प्रहर्षण, विषादन, हुंकृति, उदारसार, उल्लास, विकस्वर, पूर्वरूप, अनुगुण, अवज्ञा, पिहित ( रुद्रटाहून निराळा ), भाविकच्छवि, अत्युक्ति. म्हणजे एकंदर १०४ अलंकार आतांपर्यंत निर्माण झाले. यानें मानलेली प्रौढोक्ति ही अतिशयोक्ति होण्याचाच संभव आहे. त्याची प्रौढोक्तीची व्याख्या:—

'प्रौढोक्तिस्तदशक्तस्य तच्छक्तत्वावकल्पनम्[1] ।

या अलंकाराची जगन्नाथानें केलेली व्याख्या अशीः—

"कस्मिंश्चिदर्थे किंचिद्धर्मकृतातिशयप्रतिपिपादयिषया
प्रसिद्धतद्धर्मवता संसर्गस्योद्भावनं प्रौढोक्तिः[2] ।

पण या दोन्ही व्याख्या पाहतां त्यांत अतिशयच असल्यानें प्रौढोक्ति म्हणजे अतिशयोक्ति म्हणणें युक्त होईल. परिकरांकुराबद्दल परिकरप्रकरणीं विवेचन केलें आहे. याचा संभावना अलंकार हा 'यद्यर्थी' अतिशयोक्तिभेद आहे. प्रहर्षण व विषादन हे अनुक्रमें समाधि व विषम या अलंकारांत समावेशितां येतील. हुंकृति हा दृष्टान्तांतर्गत आहे. विकस्वराबद्दल पुढें विवेचन केलें आहे. उदारसार अलंकारांत, उपमेयनिष्ठ गुण उपमाननिष्ठ गुणाच्या अपेक्षेनें आधिक्यानें सांगितला गेल्यामुळें तो गुण भिन्न असतांही अभिन्न वाटतो. याला उदारसार म्हणतात असें जयदेव म्हणतो, पण त्यांत प्रतीपाची छटा असल्यानें तो निराळा न मानणें युक्त. उल्लास अलंकारांत एकाच्या मोठेपणामुळें त्याच्या ठिकाणीं असणारा दोष दुसऱ्या ठिकाणीं दाखविला जातो. याच्या पूर्वरूप अलंकारांत अतद्गुण व अनुगुणांत अतिशय असून अत्युक्ति ही अतिशयोक्तिच होईल. असो. यांपैकीं न मानतां येण्याजोगे कांहीं अलंकार पुढें सांगितले आहेत. पण यांत एक गोष्ट दिसून येते ती हीं कीं, असलेल्या अलंकारांत अगदीं क्षुल्लक फरकानें निराळा अलंकार मानण्याची प्रवृत्ति अधिक आहे. जयदेवाचा चंद्रालोक हा ग्रंथ सुकरत्वानें सर्व अलंकारांची माहिती देणारा

१ चं. लो. ५
२ र. गं. ४९७

आहे. यानें रस व भाव यांवर अधिष्ठित असणारे अलंकार दिले आहेत; पण त्यांच्या पुढें दिलेल्या 'अन्य मतें' या टीपेमुळें त्याला स्वतःला ते अलंकार मान्य नव्हते असें दिसतें.

३१. विद्याधर व विद्यानाथ यांनीं रुय्यकानें मानलेले सर्व अलंकार व शिवाय परिकरांकुर अलंकार दिला आहे, तो जयदेवानें सांगितला आहे. निश्चय हा अलंकार विश्वनाथानें व प्रश्नोत्तरिका विद्याधरानें दिली आहे.

काव्यानुशासनकार वाग्भट यानें ६० अलंकार दिले. यानें अन्य व अपर या नांवाचे मानलेले अलंकार वस्तुतः समुच्चयभेद होत. रुद्रटानें केलेले समुच्चयभेद असेच आहेतसें दिसेल. पूर्व, पिहित, मत, लेश, उभयन्यास, भाव हे अलंकार रुद्रटानें मानले आहेत तसेच यानेंही मानलेले दिसतात. आशी हा अलंकार रुद्रट, वामन, मम्मट वगैरे कोणी मानीत नाहीं. भट्टि, दण्डी यांनीं तो मानलेला आहे. या वाग्भटानें आपलें अलंकारविवेचन रुद्रटाच्या धर्तीवर केलेलें दिसतें.

अप्पय्यदीक्षितानें कुवलयानंदांत अव्वलपासून अखेरपर्यंत जेवढे अलंकार झाले तेवढ्यांचें विवेचन केलें आहे. ललित, मिथ्याध्यवसिति, अनुज्ञा, मुद्रा, विशेषक, गूढोक्ति, निवृत्तोक्ति, युक्ति, लोकोक्ति, छेकोक्ति, निरुक्ति, असम, प्रतिषेध, विधि, इतके नवीन अलंकार अप्पय्यदीक्षितानें दिले; यांपैकीं सर्व अलंकारांत स्पष्टपणें इतर अलंकारांचें प्रतिबिंब दिसत असल्यानें ते स्वतंत्र अलंकार मानण्याचें कारण दिसत नाहीं. पण मुद्रा हा अलंकार नाटकांत पूर्वीं अनेक ठिकाणीं वापरला जात असल्यानें तो स्वतंत्र मानल्यास बाध येणार नाहीं. 'सूच्यार्थसूचनं मुद्रा प्रकृतार्थपरैः पदैः"— प्रकृत पदांनीं सूचनीय अर्थ सूचित केला असेल तेव्हां मुद्रालंकारहोतो. जगन्नाथानें 'उदाहरण' नांवाचा अलंकार सांगितला आहे. अलंकारसंख्या जगन्नाथापर्यंत एकशेंवसिांपर्यंत गेली असें म्हणण्यास हरकत नाहीं. गार्ग्य मुनींना आपल्या उपमेनंतर इतके अलंकार निघतील ही कल्पनाही नसेल ! जगन्नाथानें 'नेति' 'नेति' करीतही सत्तरांपर्यंत अलंकार मानले. अशारीतीनें काव्यदेवीला सर्वस्व खर्च करून अलंकार घालणें न आवडल्यानें अलीकडे ती अगदीं सुधारणावादी झालेली दिसते.

३२. पुढें अलंकार पहात असतां आपणांस अलंकारांचें क्षेत्र केवळ बुद्धिवादानें उगाच वाढविलें आहे असें दिसून येईल. वस्तुतः इतके अलंकार पाहिजेतच काय हा मोठा प्रश्न आहे. एवढेंच नव्हे, तर मुद्दाम सूक्ष्म भेद करून त्यायोगें अलंकार स्वतंत्र मानूं नये असेंच कोणासही वाटेल. कारण कित्येक अलंकार दुसऱ्या अलंकारांत सामावून जातील व तसें ते सामावून टाकणें इष्ट होईल असें म्हणणें अस्थानीं नाहीं.

---

१ कु. १३७

इंग्रजी वाङ्मयाकडे दृष्टि फेंकल्यास त्यांत आपल्या वाङ्मयाइतकी अलंकारांची रेलचेल दिसणार नाहीं. भामहानें पुरस्कार केलेला, रुद्रटानें जोरास आणलेला अलंकारवर्ग, रसाचें महत्त्व कळल्यावरही शास्त्रज्ञांना नाहींसा करतां आला नाहीं. वाङ्मयांत अलंकारांनीं एके काळीं जवळ जवळ सार्वभौमत्व मिळविलें होतें, तें नष्ट झाल्यानें अलीकडील काव्यांत त्या अलंकारांचा मागमूसही लागत नाहीं. मुख्य अलंकार आपली स्थानें राखून आहेत.

एकंदरींत उपमेचें एक रोप एवढ्या अलंकारशास्त्रांच्या विस्ताराला कारणीभूत नसलें तरी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंधानें एका रोपट्यावर अनेक कलमें होऊन झाड निराळें, फळें निराळीं, इतकें अद्भुत रूपांतर झालें. प्रस्तुत प्रकरण हें अलंकारांच्या वाढीचा इतिहास सांगण्यासाठीं लिहिलें आहे. त्यांत अगदींच नामधारी अलंकार पुढें येणारे नसल्यानें याच प्रकरणांत त्यांबद्दल विचार करून त्यांना पूर्ण विराम दिला आहे. पुढें केल्या जाणाऱ्या अलंकारचर्चेसाठीं सर्व अलंकारकर्त्यांचे अलंकार घ्यावयाचे नसून प्रमुख अलंकारकर्त्यांच्या अलंकारांवर विचार करावयाचें ठरविलें आहे. भरत, भामह, दण्डी, उद्भट, वामन, रुद्रट, मम्मट, रुय्यक, विद्याधर, विश्वनाथ, अप्पय्यदीक्षित व जगन्नाथ एवढ्याच शास्त्रज्ञांचीं मतें आपण पाहूं. प्रसंगोपात्त अगदींच निराळें मत असणारे शास्त्रज्ञ असल्यास ते काय म्हणतात तें विचारांत घेऊं. पण आपण या प्रकरणांत पाहिलें आहे त्यावरून आपणांस असें दिसतें कीं, अनुयायित्वानें मतमंडन करणारे बरेचसे अलंकारकर्ते झाले आहेत. तेव्हां त्यांनीं ज्यांचें अनुयायित्व पत्करलें तेच ग्रंथकार आपण पाहिले, म्हणजे त्यांत सर्वांचीं मतें येतीलच. शास्त्र हें शास्त्रच असल्यानें सामान्यतः सर्वांचेंच मत सारखें असणार; तरीही कांहीं कांहीं विशेष मतभेद हे असतातच असें आपणांस दिसून येतें. ध्वनिकारासारख्यांचा रस व ध्वनि या संबंधींचा विशेष महत्त्वाचा विचार चाललेला असल्यानें अलंकारांच्या व्याख्यांची चर्चा करण्यासाठीं त्यांचा तादृश उपयोग होणार नाहीं. वरील यादींत विद्याधर हाही सर्वस्वीं अनुयायी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण त्यानें अलंकारशास्त्राची वाढ झाल्यानंतर ग्रंथ लिहिला असल्यानें त्याला कदाचित् विशेष सुधारणा करावीशी वाटत नसेल. असो. भरत, भामह वगैरे जे शास्त्रज्ञ आपण विचारांत घेणार त्यांनीं कोणकोणते अलंकार मानले ते ग्रंथाचे शेवटीं परिशिष्टांत दिले आहेत. त्या तक्त्यांत जेथें फुली असेल तेथें त्या शास्त्रकारानें तो अलंकार मानला नाहीं असें समजावयाचें. प्रस्तुत निबंध हा अलंकारांच्या व्याख्यांची चर्चा करण्यासाठींच लिहिलेला असल्यानें या प्रकरणीं साहित्यशास्त्राचें सांगोपांग वर्णन करण्याचें कारण नाहीं. येथपर्यंत प्राचीन अलंकारकर्ते व अलंकार यांचा थोडका इतिहास आपण पाहिला. आतां या अलंकारांची व्यवस्था प्राचीन अलंकारकर्त्यांनीं कशी लाविली हें पहावयाचें आहे, तें पुढील प्रकरणीं पाहूं.

---

# प्रकरण ३ रें



## अलंकारांची वर्गवारी

**३३.** थोडका कारभार हातीं असतां एक मनुष्य आपलीं कामें यथायोग्य रीतीनें पार पाडतो, पण कामें जसजशीं अधिक वाढतात तसतशी अनेक माणसें मदतीस घेऊन कामाचे विभाग प्रत्येकाकडे सोंपवून द्यावे लागतात. व जो तो मनुष्य आपल्या विभागाबद्दल जबाबदार असतो. अलंकारांचे बाबतींत आपणांस असेंच दिसतें. प्रथमतः चारच अलंकार असल्यानें त्यांच्यावर जास्त शिस्त राखण्याची जरूर नव्हती. पण पुढें पुढें अलंकार वाढूं लागल्यावर विशिष्ट अलंकारांना विशिष्ट क्षेत्र नेमून दिलें गेलें व अलंकारविभाग पाडले.

भामह अगर दण्डी यांनीं विशिष्ट धोरणानें अलंकारांचे वर्ग पाडावयाचें मनांत आणलें नाही कारण त्यावेळीं अलंकारांची संख्या थोडी होती. भामहानें दोन परिच्छेदांत मिळून शब्दालंकार व अर्थालंकार वर्णिले आहेत. अमुक एका कारणाकरतां दोन परिच्छेद असें मात्र त्यांत दिसत नाही; तसेंच दण्डीचेंही. दण्डीनें केवळ यमक व चित्रकाव्य यांना एक अध्याय व इतर अलंकारांना एक अध्याय दिला. या इतर अलंकारांतच सर्व अर्थालंकारांचा समावेश केलेला आहे. उद्भटानें एकंदर सहा वर्ग पाडले आहेत पण ते शास्त्रोक्त नसून भामहाच्याच दीर्घ परिच्छेदांचे विभाग आहेत. भामहानें केलेल्या पहिल्या परिच्छेदांत जेवढे अलंकार येतात तेवढ्यांचे तीन वर्ग व दुसऱ्या परिच्छेदांत येणाऱ्या अलंकारांचे तीन वर्ग उद्भटानें केले. पण अलंकारांच्या विवेचनाचा त्याचा क्रम मात्र भामहाप्रमाणेंच आहे.

**३४.** वामनाच्या सूत्रांकडे पाहिल्यास त्यानें मानलेले सर्व अलंकार तो उपमाप्रपंचांत दाखल करतो. केवळ उपमा व उपमादोष यांसाठीं त्यानें एक अध्याय लिहिला, केवळ शब्दालंकारांसाठीं एक अध्याय व उपमाप्रपंचाकरितां एक अध्याय त्यानें लिहिला आहे. वामनानें विरोध, विभावना इ. विरोधगर्भ म्हणून म्हटले जाणारे अलंकार विरोधगर्भ न मानतां उपमाप्रपंचांतच घातले आहेत. वामनाची विशेषोक्ति ही रूपकासारखी असल्यानें ती उपमाप्रपंचांत येऊं शकते. वामनाची परिवृत्ति पाहतां तिच्या उदाहरणांत विनिमय करणाऱ्या वस्तूंमध्यें साधर्म्य राखल्यानें त्याची परिवृत्ति उपमेला बाधक होऊं शकत नाहीं. व्याजोक्तींत सदृशधर्मीय वस्तूंचेंच निगूहन होतें, क्रमालंकारांत उपमानोपमेय संबंध असतो. या दृष्टीनें वामनानें ज्या तऱ्हेनें हे अलंकार वर्णिले त्या तऱ्हेमुळें त्यानें सर्व अलंकार उपमाप्रपं-

चांत घातले तरी कोठेंही बाध येत नाहीं. आक्षेप अलंकार हा वामनानें प्रतीपासारखाच विवेचिल्यामुळें तो उपमाप्रपंचांत जाऊं शकतो. राहतां राहिलेले विरोध व विभावना हे दोन अलंकार त्यानें असे वर्णिले आहेत कीं, ते त्याच्याही वर्णनाप्रमाणें उपमेंत राहूं शकत नाहींत. वामनाचे हातून न कळत सादृश्यगर्भ अलंकारांची वर्गवारी झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. ती अपरिपक्क आहे, पण नवीन आहे.

३५. यानंतर शास्त्रीयरीत्या हेतुपुरस्सर अलंकारांची वर्गवारी करणारा रुद्रटच पहिला होय. त्यानें अलंकारांचें विवेचन करतांना शब्दालंकार निराळे वर्णून अर्थालंकारांचे वास्तव, औपम्य, अतिशय व श्लेष असे चार मुख्य वर्ग कल्पिले. हे भेद पाहून दण्डीच्या ' भिन्नं द्विधा स्वभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम् ' या उक्तीची आठवण होते. वास्तव व अतिशय म्हणजे स्वभावोक्ति व वक्रोक्ति होय. 'श्लेषः सर्वासु पुष्णाति ' या दण्डीच्या वचनाची सत्यता रुद्रटाच्या श्लेषविभागांत पटते. दण्डीनें सहजगत्या स्वभावोक्ति, वक्रोक्ति व श्लेष यासंबंधीं काढलेले उद्गार जणूं मार्मिकासारखे लक्षांत ठेवून रुद्रटानें त्या दाखल्यावर त्या तिघांना व औपम्याला दाखल्यावांचून केवळ त्याच्याच कार्यक्षमतेकडे बघून आपल्या अलंकारसाम्राज्याचें प्रधानत्व दिलें. या चौघांकडे जीं खातीं नेमून दिलीं त्यांत कांहीं बाबतीत दोन अगर तिन्ही प्रधानांचें मत रुद्रटाला घ्यावेंसें वाटल्यावरून त्यानें ते अलंकार तिघांकडे परीक्षणाकरतां पाठविले. ते अलंकार कोणते हें बघण्यासाठीं त्यानें पाडलेले चारी वर्ग आपण पाहूं.

**वास्तवः**—सहोक्ति, समुच्चय, जाति, यथासंख्य, भाव, वास्तव, पर्याय, विषम, अनुमान, दीपक, परिकर, परिवृत्ति, परिसंख्या, हेतु, कारणमाला, व्यतिरेक, अन्योन्य, उत्तर, सार, सूक्ष्म, लेश, अवसर, मीलित, एकावली.

**औपम्यः**—उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, अपह्नुति, संशय, औपम्य, समासोक्ति, मत, उत्तर, अन्योक्ति, प्रतीप, अर्थांतरन्यास, उभयन्यास, भ्रांतिमान्, आक्षेप, प्रत्यनीक, दृष्टांत, पूर्व, सहोक्ति, समुच्चय, साम्य, स्मरण.

**अतिशयः**—पूर्व, विशेष, उत्प्रेक्षा, विभावना, तद्गुण, अतिशय, अधिक, विरोध, विषम, असंगति, पिहित, व्याघात, हेतु.

**श्लेषः**—अविशेष०, विरोध, अधिक, वक्रोक्ति, व्याजोक्ति, श्लेष, असंभव, अवयव०, तत्त्व०, विरोधाभास०.

ही वर्गवारी पाहिली असतां असें दिसतें कीं रुद्रटानें प्रथम प्रयत्न या दृष्टीनें फारच मोठी कामगिरी केली आहे. त्याची वर्गवारी पुढील वर्ग करणारांना मार्गदर्शक झालेली आहे. वर दिलेल्या सदरांत पुढील अलंकार दोन्ही अगर तिन्ही वर्गांतही येऊं शकतील. सहोक्ति ही वास्तव्य व औपम्य यांत आली आहे त्याचप्रमाणें समुच्चय व उत्तर हे अलंकारही दोन्ही वर्गांत आले आहेत. उत्प्रेक्षा ही

औपम्य व अतिशय यांत समाविष्ट होते. विषय व हेतु हे वास्तव व अतिशय या दोन्ही सद्रांत आले आहेत.

३६. वास्तवाची व्याख्या असें सांगते कीं वास्तवांत वस्तुस्वरूप कथन असतें; त्यांत वैपरीत्य, श्लिष्टता, अतिशय व औपम्य हीं नसून पुष्टार्थता असते. रुद्रटाच्या वास्तवाच्या या व्याख्येला त्याचे अलंकार उतरतात किंवा नाहीं, हें पाहिलें पाहिजे.

सहोक्तींत अतिशयाचेंच प्राबल्य आहे, हें सहोक्तीच्या विवेचनावरून दिसून येईल. व हें रुद्रटालाही जाणवत असल्यामुळें त्यानें सहोक्ति ही अतिशयालंकारांत पुनः वर्णिली आहे. रुद्रटाची अतिशयाची व्याख्या पाहतांही रुद्रटाची वास्तव सहोक्ति ही अतिशयांतच जाणें योग्य असें वाटतें. त्याची अतिशयाची व्याख्याः—

यत्रार्थधर्मनियमः प्रसिद्धिबाधाद्विपर्ययं याति ।
कश्चित् क्वचिदतिलोकं स स्यादित्यतिशयस्तस्य ॥

वास्तवालंकारांत अनुमान वर्णिला आहे. त्याचा दुसरा भेद व भाविक अलंकार हे सारखे आहेत. भाविकांतही वास्तव नसल्यानें हा अनुमानभेद वास्तवाचे सद्रांत राहणार नाहीं. परिवृत्तींत वास्तव असलें तरी अत्युक्ति आहेच. ' दत्वा दर्शनमेते मत्प्राणा वरतनु त्वया क्रीताः ' असें म्हणण्यानें परिवृत्तींत अतिशय आला हें स्पष्ट झालें. व्यतिरेकांत वस्तुस्वरूपकथन नसून औपम्यभाव हाच महत्त्वाचा आहे तेव्हां व्यतिरेक वास्तवांत घालणें युक्त वाटत नाहीं. रुद्रटानें उत्तरालंकाराचें वास्तव व औपम्य या दोहोंत विवेचन केलें आहे; पण त्या अलंकाराचें दोन ठिकाणीं वर्णन करण्याइतकें त्यांत वैचित्र्य नाहीं. दुसऱ्या उत्तरांत प्रश्नोत्तरें अधिक आहेत या दृष्टीनें तो वास्तव अगर औपम्य या कोणत्याच सद्रांत नीट बसत नाहीं. रुद्रटाचा सूक्ष्म इतरांहून निराळा आहे तो वास्तवांत राहण्यास हरकत नाहीं. लेश अलंकारांतील एका भेदांत अतिशय आहे या दृष्टीनें तो अतिशयांतच जाणें युक्त होईल. एकंदरींत सहोक्ति, अनुमान, व्यतिरेक, लेश व उत्तर हे अलंकार वास्तवांत योग्यपणें वास्तव्य करूं शकत नाहींत.

३७. औपम्यांतील समुच्चय हा दीपक अलंकारासारखा आहे. उत्तरांत औपम्य नाहीं; म्हणून औपम्यालंकारांत हे अलंकार राहात नाहींत. व्यतिरेक औपम्यांत यावयास पाहिजे. श्लेषासंबंधीं सांगावयाचें तें एवढेंच की श्लेष हा स्वतंत्र विभाग न मानणें इष्ट आहे. त्याचें विवेचनच त्याचें सर्वगामित्व दाखवीत आहे. तेव्हां दण्डीच्या वचनाप्रमाणें ' श्लेषः सर्वासु पुष्णाति ' असें म्हणून त्याला स्वतंत्र विभाग न देतां स्वतंत्रपणें एकटाच राहूं देणें योग्य होईल. श्लेष हा केव्हां प्रधान मानावयाचा व केव्हां संकीर्ण समजावयाचा हे प्रश्न पुढें विचारांत घेतले आहेत. पण श्लेष हा स्वतंत्र विभाग कल्पूं नये एवढें मात्र खरें.

या रीतीनें वर्गवारी करतांना दुसरा प्रश्न हा येतो की औपम्यांत अतिशयोक्ति असतेच. त्यांत तरी वास्तवज्ञान कोठें असतें? पण अतिशयोक्तींत अतिशय असतो आणि उपमेयाचें निगरण असतें म्हणजे उपमेय हें उपमानानें गिळून टाकलेलें असतें, तसें औपम्यांत नसतें. हा फारच मोठा फरक दोहोंत आहे. या दिङ्मात्र विवेचनावरून एवढें दिसून येतें कीं, रुद्रटानें वर्गवारी केली ती पुरेशी अगर समाधानकारक नव्हती. त्यांत आकांक्षा शिल्लकच राहात होती. अर्थात् प्रारंभींच कोश करणाऱ्या डॉ. जान्सनला, त्यानें केलेल्या कोशांत दोष राहिले एवढ्या समजुतीवर कमी महत्त्व देणें चुकीचें होईल तसेंच रुद्रटानें थोडी सदोष कां होईना पण शिस्त घालून दिली. तीमुळेंच पुढील अलंकारकर्त्यांना फायदा मिळून वर्गवारींतील दोष काढण्याला मार्ग मिळाला. रुद्रटानें सीमा आंखल्या त्यांतून योग्य चाकोरी पाडण्याचें काम पुढें झालें.

३८. परंतु हें रुद्रटाचें वळण मम्मटानें गिरविलेलें दिसत नाहीं. एका अलंकारांतून दुसरा अलंकार सहजपणें वर्णन करणें युक्त असें समजून त्यानें अलंकारांचें विवेचन केलेलें दिसतें. मात्र त्यानें स्वमुखानें 'विशिष्ट वर्गवारी' असें बोलून दाखविलेलें नाहीं.

यानंतर रुय्यकानें केलेली वर्गवारी पाहतां ती महत्त्वाची आहे व तीच पुढें स्वीकारली गेली. रुद्रटाच्या अलंकारवर्गवारींत दिसणारे दोष कशामुळें निर्माण झाले हें रुय्यकानें ओळखून त्याप्रमाणें शक्य तोंवर काळजी घेतली आहे. कांही अलंकार असे दिसतात कीं ते एकाच विशिष्ट सदरांत घालणें योग्य दिसत नाहीं. याच समजुतीनें रुद्रटाचे कांही अलंकार दोन सदरांत आले. असेंच कांहीं थोड्या अलंकारांचे बाबतींत रुय्यकाचेंही झालें आहे असें दिसतें. प्रथम आपण रुय्यकानें केलेली वर्गवारी पाहूं:—

( १ ) सादृश्यगर्भ ( २ ) विरोधगर्भ ( ३ ) शृंखलाबन्ध ( ४ ) तर्कन्यायमूल ( ५ ) वाक्यन्यायमूल व ( ६ ) लोकन्यायमूल ( ७ ) गूढार्थप्रतीति मूल.

रुय्यकानें हे मुख्य सात वर्ग केले. सादृश्यगर्भ या वर्गाचे उपवर्ग भेदाभेद प्राधान्य, अभेद प्राधान्य व गम्यौपम्याश्रय असे पाडून त्यांपैकीं अभेदप्राधान्य व गम्यौपम्याश्रय यांचे पुनः पोटवर्ग पाडले आहेत. अभेदप्राधान्यांत आरोपमूल अभेदप्राधान्य व अध्यवसायमूल अभेदप्राधान्य असे दोन वर्ग पाडले. गम्यौपम्याश्रयाचे पदार्थगत, वाक्यार्थगत, भेदप्रधान, विशेषणविच्छित्त्याश्रय, विशेष्य-विशेषण विच्छित्ति–आश्रय असे भेद करून त्यांवर अधिष्ठित कांहीं अलंकार दिले आहेत. या सदरांत कोणते अलंकार घातले आहेत हें परिशिष्ट २ मधील अलंकारांच्या वर्गीकरणाच्या कोष्टकांत दिसेलच.

३९. रुय्यकानें अतिशयोक्ति ही सादृश्यगर्भ व विरोधगर्भ या दोन सदरांत घातली आहे. याचें कारण त्यानें कार्यकारणपौर्वापर्यविपर्ययानें होणारी अतिशयोक्ति मानली आहे. हिचें योग्यायोग्यत्व व अतिशयोक्ति ही अभेदप्राधान्यांतच जाणें कां इष्ट आहे

याचें कारणही अतिशयोक्तिप्रकरणीं सांगितलें आहे. अतिशयोक्तीशिवाय सादृश्य गर्भातील भेदाभेदप्रधान व अभेदप्रधान यांबद्दल कांहीं म्हणण्यासारखें नाहीं. पण सादृश्यगर्भातील गम्यौपम्याश्रयाबद्दल थोडी साशंकता वाटते. तुल्ययोगिता व दीपक हे अलंकार पदार्थगत या उपवर्गांत घातले आहेत. वस्तुतः तुल्ययोगिता व दीपक यांच्या व्याख्यांत जेवढा फरक राखला जातो तेवढा उदाहरणांत राखला जात नाहीं. या दृष्टीनें तुल्ययोगिता व दीपक हे अलंकार एक करणें युक्त. याबद्दल पुढें विस्तार केलाच आहे. दीपक व तुल्ययोगिता या दोहोंत अनेकांचें एकत्र गुंफन हेंच वैशिष्ट्य आहे. त्यांत औपम्य असलें तरीही गुंफनांतच वैशिष्ट्य आहे. मालादीपक अलंकारांत औपम्य असूनही तो ज्याप्रमाणें त्यांतील श्रृंखलेकरितां वेगळा काढून शृंखलाबंधांत घातला त्याचप्रमाणें दीपकालाही तुल्ययोगितेसह गम्यौपम्यांतून काढावा असें वाटतें. कारण कारकदीपकांत औपम्यभाव राहात नाहीं. दीपक, तुल्ययोगिता हीं व्यवहारांत भिन्न नाहींत. त्यांत माला असणें हेंच वैशिष्ट्य आहे. तेव्हां शृंखलाबन्ध न म्हणतां मालाबन्ध असें म्हणून त्यांत दीपक, तुल्ययोगिता अलंकार घालावे म्हणजे मालादीपकाला दीपकापासून फार लांब राहावें लागणार नाहीं. हें दीपक–तुल्ययोगितेसंबंधीं झालें. व्यतिरेक व प्रतीप यांत फरक एवढाच असतो कीं व्यतिरेकांत उपमेयाचें आधिक्य शब्दांत सांगतात. उपमेयाची श्रेष्ठता पटविणें ही गोष्ट दोन्ही अलंकारांत सामान्यत्वानें असते पण प्रतीपांत उपमेयाचें आधिक्य शब्द नसतें, इतका दोन अलंकारांत फरक आहे. या दृष्टीनें व्यतिरेक हा प्रतीपाचा अगदीं जवळचा नातेवाईक असल्यानें त्याला व प्रतीपाला एकाच घरांत राहूं देणें इष्ट; किंबहुना दोन्ही अलंकार एकत्र करणें इष्ट आहे. एकत्र न केले तरीही प्रतीप हा सादृश्यगर्भांतच आणला पाहिजे. रुय्यकानें प्रतीप लोकन्यायमूलांत घातला आहे. प्रतीपांत सादृश्य—औपम्य यांनाच महत्त्व आहे या दृष्टीनें तो अगदीं साहजिकपणेंच सादृश्यांत येतो. पर्यायोक्त, व्याजस्तुति व आक्षेप हे पाहिजे तर सादृश्यांतून काढून लोकन्यायमूलांत घालावे. पर्यायोक्त हा गम्यमान प्रस्तावागत म्हणूनच केवळ सादृश्यांत घातला आहे त्यापेक्षां तो लोकन्यायमूलांत जास्त शोभेल. व्याजस्तुति ही गम्यत्वविच्छित्तिप्रस्तावामुळें गम्यौपम्यांत घातली आहे पण वस्तुतः तींत औपम्याचा विशेष नाहीं. आक्षेप हा वामनाच्या आक्षेपाच्या स्वरूपांत पुढें मान्य केला असता तर तो औपम्याचे सदरांत घालणें इष्ट झालें असतें; पण केवळ गम्यत्वाकरतां तो गम्यौपम्याश्रयांत घातला आहे. तेव्हां पर्यायोक्त, व्याजस्तुति व आक्षेप या तिघांना काढून, प्रतीप हा निराळा मानणेंच झाल्यास त्याला गम्यौपम्याश्रयांत जागा करून द्यावी.

४०. रुय्यकाचा दुसरा मुख्य वर्ग विरोधगर्भाचा होय. त्यांतही सम व अन्योन्य हे बिचारे समभावानें, सहकारित्वानें रहात असतांही त्यांना विरोधाचे वर्गांत

घातले; कारण ते विषमाशीं विरोधी आहेत. वास्तविक सम व अन्योन्य ह्यांत विरोध-भाव मुळींच नाहीं तेव्हां ते विरोधगर्भांतून काढणें इष्ट होईल.

४१. शृंखलाबन्धमूल हा तिसरा अलंकारवर्ग आहे. यांत कारणमाला, एकावली, मालादीपक व सार हे अलंकार आहेत. सार अलंकार शृंखलाबंधांत घालूं नये असें जगन्नाथाचें मत आहे. सार अलंकार हा एकविषयत्वानें व अनेकविषयत्वानें होत असल्यामुळें त्यांत शृंखलेचें सौंदर्य नाहीं. त्यांत उत्तरोत्तर उत्कर्ष असणें हेंच वैशिष्ट्य आहे, शृंखला गुंफणें हें नाहीं. वस्तुतः शृंखलाबन्ध मूल असें न म्हणतां माला-बन्धमूल असें म्हणावें. शृंखलेंत एकांतएक दुवे असतात पण सर्व दुव्यांचा प्रत्यक्ष संबंध एकाशीं येत नाहीं. मालेंत सूत्र असल्यानें सूत्राचा सर्वांशीं संबंध येतो, व शृंखलेप्रमाणें अप्रत्यक्षपणेंही प्रत्येकाचा संबंध एकमेकांशीं असतो. तेव्हां मालाबन्ध-मूल वर्ग असें नांव देऊन त्यांत कारणमाला, एकावली, दीपक, तुल्ययोगिता, मालादीपक, सार हे अलंकार घालावे.

काव्यन्यायमूलांतील अलंकार पाहिले तर त्यांपैकीं कांहीं शृंखलाबन्ध हें नांव बदलून मालाबन्ध हें नांव दिल्यास त्या सदरांत येऊं शकतील. यथासंख्यांत प्रथम ज्या क्रमानें विशिष्ट गोष्टी देतात त्याच क्रमानें त्या गोष्टीशी संबंधी असणाऱ्या गोष्टीही देतात व त्या अलंकारांत अनेक गोष्टी असण्यांतच वैचित्र्य आहे. म्हणजे यथासंख्यांत विशिष्ट गोष्टींची एक माला व तत्संबंधी गोष्टींची एक माला असते. समुच्चय हा गुच्छासारखा मालेंत शोभेल, कारण त्यांत एक गोष्ट सिद्ध करण्यास अनेक गोष्टी एकत्र येतात. व त्या, त्या एका गोष्टीशीं संबद्ध होतात. परिसंख्या अलंकारांत प्रश्नोत्तरें अधिक असण्यांतच जास्त सौंदर्य असतें. पर्यायांत एक वस्तु क्रमानें अनेक ठिकाणीं असते यामुळें या अलंकारांत अनेक-त्वामध्येंच सौंदर्य आहे. अर्थात् समुच्चय, परिसंख्या, पर्याय यांत स्वतःचें त्यांचें वैशिष्ट्य आहेच, पण शिवाय अनेकत्वांत जास्त सौंदर्य आहे, या दृष्टीनें ते मालाबंधांत येतील. वतुस्तः काव्यन्यायमूल या सदरांत तरी अधिक वैशिष्ट्य काय आहे ! काव्यन्याय हा अलंकारांत सर्वच ठिकाणीं आहे. तेव्हां काव्यन्यायांतून हे अलंकार काढून मालाबन्धांत घालावे व उरलेले अलंकार लोकन्यायमूलांत घालून काव्यन्यायमूल वर्ग काढून टाकावा असें वाटतें.

४२. लोकन्यायमूलांतील प्रतीप हा अलंकार सादृश्यगर्भांत आणि विकल्प हा दर्शनी विरोधामुळें विरोधगर्भांत घालावा. अतद्गुण हा गुणग्राही नसल्यानें विरोधांत जाईल. तेव्हां विरोधगर्भांतील सम व अन्योन्य तसेंच लोकन्यायमूलांतील मीलित, सामान्य, तद्गुण, परिवृत्ति, अर्थापत्ति, समाधि हे अलंकार लोकन्यायमूलांत घालावे. लोकन्यायमूलांतही काव्यन्याय आहेच. कविप्रतिभेशिवाय कोणताच अलंकार नाहीं. पण रम्यत्वाकरितां काव्यन्यायमूल हें सदर पाडणेंच झाल्यास लोकन्यायमूल हें सदर काढून आतांच वर सांगितलेले अलंकार त्या सदरीं घालावे.

तर्कन्यायमूल, गूढार्थप्रतीतिमूल अगर संश्लेषमूल या सदरांत आलेल्या अलंका-रांबद्दल विशेष लिहिण्याजोगें नाहीं. गूढार्थप्रतीतिमूल अलंकारांतील वैशिष्ट्य म्हणजे गूढ अर्थ समजणें, हें आहे. या दृष्टीनें उदात्त अलंकार त्यांत येऊं शकत नाहीं, पण तो स्वभावोक्ति व भाविक यांचा विरोधी म्हणून गूढार्थप्रतीतिमूलांत घातला आहे. उदात्तांत वर्ण्य वस्तूचें गौण अंग म्हणून महापुरुष अगर महदैश्वर्य यांचें वर्णन असतें; तें सूक्ष्मपणें उठावदार होतें म्हणूनही कदाचित् हा अलंकार गूढार्थ-प्रतीति-मूलांत आला असेल.

४३. रुय्यकानंतर त्यानें केलेलें वर्गीकरणच मान्य झालेलें दिसतें. जगन्ना-थानें अलंकारांचा वर्णनक्रम रुय्यकाप्रमाणेंच ठेवला आहे. त्यानें आपला अर्थान्त-रन्यास काव्यलिंगानंतर वर्णिला असून काव्यलिङ्ग, अर्थान्तरन्यास व अनुमान हे क्रमानें दिले आहेत. यावरून हेतूला महत्त्व देऊन हेतूचेच निरनिराळे प्रकार दर्शविणारे हे अलंकार असल्यानें त्यानें ते एकापाठोपाठ वर्णिलेले दिसतात. त्यानें रुय्यक विश्वनाथाप्रमाणें वर्गवारी शब्दांत सांगितली नाहीं. ‘ विरोधमूला-लंकार ’ व ‘ शृंखलामूलालंकार ’ एवढे दोन शब्द त्यानें उच्चारले पण बाकीचे वर्ग त्यानें बोलून दाखविले नाहींत. वर्णनक्रम पाहतां त्याला रुय्यकाची वर्गवारी पसंत असावी असें दिसतें. अलंकारांच्या क्रमांत हेतुपुरस्सर फरक असा फक्त अर्थान्तरन्यासाचे बाबतींतच त्यानें केलेला दिसतो. विश्वनाथानें रुय्य-काचीच वर्गवारी स्वीकारली असून विद्याधरानेंही रुय्यकाचें अनुकरण केलें आहे. विश्वनाथ अलंकारांचें वर्णन करीत असतां त्या त्या सदरांतच असणाऱ्या अलंका-रांचा क्रम पालटतांना दिसतो; पण वर्गांचे बाबतींत त्याचें रुय्यकाशीं पटतें. अप्प-य्यदीक्षितानें वर्गवारी सांगितली नसली तरी त्यानें स्वीकारलेला क्रम पहातां तो वर्गवारीप्रमाणेंच अलंकारविवेचन करतो, असें वाटतें. त्यानें जगन्नाथाप्रमाणेंच अर्थान्तरन्यास काव्यलिङ्गानंतर वर्णिला आहे. प्रतीप अलंकार तो उपमेनंतर लवकरच विवेचनांत घेतो. याशिवाय किंचित् वर्णनक्रम पालटलेला असला तरी तो विशेष हेतूनें असेल असें वाटत नाहीं. असो. रुय्यकाची वर्गवारी सर्वमान्य ठरत असल्यानें व रुद्रटाच्या शिथिल असणाऱ्या रचनेंत त्यानें दृढता आणल्यानें त्याची विभागणी महत्त्वाची ठरते.

४४. प्रस्तुत निबंधांत शब्दालंकार, उभयालंकार, अर्थालंकार व रसालंकार असे वर्ग पाडले आहेत. वक्रोक्ति ही श्लेषावरही अधिष्ठित असते, व श्लेष हा शब्दश्लेष व अर्थश्लेष अशा दोन्हीं स्वरूपाचा असतो, म्हणून वक्रोक्ति व श्लेष हे दोन्ही उभयालंकारांत घातले आहेत. पुनरुक्तवदाभासामध्यें शब्द व अर्थ या दोहोंचें सारखें महत्त्व असल्यानें, त्याला उभयालंकाराच्या सदरांत घेतला आहे. अर्थालंकारविवेचन करीत असतां इतर ग्रंथांत आढळणारा क्रम पालटला आहे.

प्रथम लोकन्यायमूल, तर्कन्यायमूल, काव्यन्यायमूल, शृंखलाबन्धमूल, विरोधगर्भ व सर्वांत शेवटीं सादृश्यगर्भमूल या क्रमानें अर्थालंकारविवेचन केलें आहे. या अलंकारमंजूषेंत एकांत एक असलेलीं पांच पुडें उघडलीं आहेत व नंतर सादृश्यगर्भाचा व्याप मोठा व महत्त्वाचा असल्यानें सादृश्यगर्भालंकार पाहिले. नंतर अलंकारमंजूषेवर संसृष्टि व संकर हे नक्षीप्रमाणें शोभा देतात म्हणून ते अलंकार पाहून 'रसात्मकं काव्यम्' या उक्तिला मान देऊन रसालंकार शेवटीं विचारांत घेतले आहेत. गूढार्थप्रतीतिमूल अलंकारांपैकीं रसवत्, प्रेय, ऊर्जस्वि, भावोदय, भावसन्धि व भावशबलता हे रसालंकार समजून त्यांचें निराळें सदर केलें. कारण त्यांत भाव व रस यांना प्राधान्य आहे. अर्थालंकारांचे वर्णनांतील मुख्य सदरांची आलटापालट केली असली तरी शक्य तों त्या त्या सदरांतच त्या त्या अलंकारांचें वर्णन करून रुय्यकाची वर्गवारी अनुकारिली आहे. मात्र अतिशयोक्ति वस्तुतः अभेदांत येते तरी टीका या दृष्टीनें ती विरोधगर्भातच घेतली आहे. रुय्यकानें अलंकारांचें केलेलें वर्गीकरण कोष्टकाच्या रूपांत पाहून दुसरें कोष्टक कसें होऊं शकेल हें परिशिष्ट २ मध्यें सुचविलें आहे.

---

# प्रकरण ४ थें

## शब्दालंकार.

### १ यमक.

१. या अलंकाराच्या सद्यःस्थितींत माहितीं असलेल्या व्याख्यांत अगदीं आरंभींची व्याख्या भरताचीच सांपडते, पण याचा अर्थ तत्पूर्वी यमक नव्हतेंच, असा नव्हे कारण भरतानें केवळ अलंकारशास्त्रावर म्हणून नाट्यशास्त्र लिहिलें नाहीं. नाट्यशास्त्र लिहीत असतां ओघानें नाटकांत आढळणारे अलंकार कोणते हे सांगण्यासाठींच त्यानें 'उपमा दीपकं चैव रूपकं यमकस्तथा' असें म्हटलें आहे. यानंतर तो असेंही म्हणतो कीं इतर अलंकार असले तर ते काव्य वगैरेवरून वघून घ्यावेत. म्हणजेच इतर काव्याचीं पुस्तकें अस्तित्वांत असून त्यांत 'यमका' संबंधीं विचार झालेला असला पाहिजे. असंख्य बारीक बारीक प्रवाह एकत्र होऊन 'नदी' ही संज्ञा प्राप्त होते, तद्वतच 'यमक' या शब्दाची निरनिराळ्या प्रकारें पूर्व तयारी होत होतीच, फक्त 'यमक' हा शब्द उच्चारण्यास कोणी तरी पाहिजे होतें असें म्हटल्यास हरकत नाहीं. लहान मुलाला 'गाणें' कळत नसलें तरी त्यास गाण्याची रुचि असते तद्वतच यमकाची रुचि ही भाषेच्या अत्यंत बालपणापासून म्हणजे ऋक्, यजुः इत्यादि वेदांतही दिसते. त्यावेळीं त्या लोकांनीं 'यमक' हा शब्द वापरला नसला तरी पुनर्वाद हा त्यांच्या कानांना रुचकर लागत असल्यानेंच त्या विशिष्ट अर्थी दुसरा शब्द असतां मुद्दाम 'पुनर्वाद' होईल अशी वर्णरचना केलेली आढळतेः—

धूर्रसि धूर्व धूर्वन्तं योऽस्मान्धूर्वति तं धूर्वयं वयं धूर्वामः[1]

यांत 'धूर्व' या दोन अक्षरांचा पुनर्वाद हा बुद्धिपुरःसर केलेला दिसतो, व यावरून या अभ्यासाची गोडी तत्कालीन कवींच्या कानांना असली पाहिजे असें वाटतें. अशा तऱ्हेचीं कित्येक उदाहरणें वेदांत आढळतात.

२. यमक या शब्दाची व्युत्पत्ति पाहूं गेल्यास 'यम् – ओढणें' 'ताणणें' यावरून यमक म्हणजे ज्यांत शब्द पुनः ओढले आहेत अगर ताणले आहेत तें यमक ही सांगितलेली स्थिति लक्षांत घेऊन अगदीं पहिली म्हणून उपस्थित असलेली ही भरताची व्याख्या विचारांत घेऊं.

---

१ शु. य. वे. सं. १·८

'शब्दाभ्यासं तु यमकं पादादिषु विकल्पितम्'[1]

अशी भरताची व्याख्या आहे. हें यमकाचें अगदीं प्राथमिक स्वरूप आपल्याला दिसतें. रानटी अवस्थेंतून परिस्थितीच्या आघातानें जसा मनुष्य सुधारला तद्वतच ही व्याख्या पुढें हळुहळू रेखीव होत गेली. व्याख्येंतील 'अभ्यास' हा शब्द व्याकरणशास्त्रांतून उचललेला आहे. पाणिनि अभ्यासाची 'पूर्वोऽभ्यासः'[2] अशी व्याख्या करतो. म्हणजे आधींचा अगर प्रारंभींचा तो अभ्यास व 'उभे अभ्यस्तम्'[3] म्हणजे पहिला व दुसरा या दोहोंना 'अभ्यस्त' म्हणावें असें पाणिनि म्हणतो. 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' या न्यायानें साहजिकच रूढीनें 'अभ्यास याचा अर्थ द्विरुक्त, पुनरुक्त' असा झाला. अर्थातच 'शब्दाभ्यासं तु यमकम्' इ. म्हटल्यानें चरणाच्या आरंभीं, मध्यें अगर शेवटीं शब्द पुनरावृत्त होणें याला यमक म्हणावें अशी व्याख्या झाली. उः—

> देवं[4] देवं वोऽवसे देवं देवमभिष्टये ।
> देवं देवं हुवेम वाजसातये गृणन्तो देव्या धिया ॥

भरताच्या व्याख्येनें शंकांना अवसर मिळून कित्येकांना असें वाटलें कीं शब्द हा एकाक्षरी असेल अगर अनेकाक्षरीही असेल. अशा स्थितींत एकाक्षरी शब्दाची आवृत्ति कितपत गोड लागेल ! म्हणून व्याख्येंत पालट झाला; व या 'शब्दाला' कांहीं व्यवस्थित स्वरूप असावें असें वाटूं लागलें. त्याचा परिणाम असा झाला कीं 'शब्द' या शब्दाला दोन फांटे फुटले. एक अनुप्रासाकडे व एक यमकाकडे वळला. कारण पुनरावृत्त एक अक्षर व पुनरावृत्त अनेक अक्षरें यांपैकीं प्रत्येकाचें रुचिरत्व निराळें आहे. ह्या दोन फांट्यांशिवाय यालाच आणखी एक फांटा फुटण्याच्या मार्गाला लागला. तो कोणता तें पुढें पाहूं.

३. भरताच्या 'शब्दाभ्यासा,वर नाखूष असलेला भामह फेर दुरुस्ती सुचवूं लागला. त्यानें केलेली व्याख्या.—

> 'तुल्यश्रुतीनां भिन्नानामभिधेयैः परस्परम् ।
> वर्णानां यः पुनर्वादो यमकं तन्निगद्यते ॥

शब्दांत एक अगर अनेक अक्षरें असतील. पण एकाक्षरी यमक भामहाला पसंत नसल्यानें 'वर्णानां' असें म्हणून वर्ण या शब्दाचें त्यानें बहुवचन घातलें. अर्थात् भामहाच्या यमकाला (१) तीन अगर अधिक वर्ण (२) तुल्यश्रुति असून (३) अर्थानें भिन्न असले पाहिजेत, अशा वर्णांचा पुनर्वाद अगर पुनरावृत्ति म्हणजे यमक अशी व्याख्या भामहानें केली. यावरून भामहाला यमक साधण्यास

---

१ ना. शा. १६·५९. २ सिं. कौ. ६·१·४. ३ सिं. कौ. ६·१·५.
४ शु. य. वे. सं. ३३·९१. ५ भा. लं २-१७

तीन गोष्टी पाहिजे होत्या. भरतानें पुनरुक्त शब्दांचा भिन्न अर्थ असावा, असें म्हटलें नव्हतें. पण तोच तोच अर्थ चर्वण केलेला भामहाला न आवडल्यानें त्यानें भिन्नार्थी हें पद मुद्दाम घातलें.

४. दण्डीनें भामहाची व्याख्या पाहिलीच नसेल अशी कल्पना करूं, कारण भामह दण्डी हे समकालीन असण्याचा संभव आहे. दण्डीलाही 'शब्दाभ्यास' हा शब्द नको असल्यानें त्यानें,

अव्यपेतव्यपेतात्मा याऽऽवृत्तिर्वर्णसंहतेः ।
यमकं तच्च पादानामादिमध्यान्तगोचरम् ॥

असें म्हटलें. दण्डीला यमक हें विशेष मधुर वाटत नव्हतें, हें पुढील ओळींवरून स्पष्ट आहे.

आवृत्तिमेव संघातगोचरां यमकं विदुः ।
तत्तु नैकान्तमधुरमतः पश्चाद्विधास्यते ॥

संघातगोचरा आवृत्तीला प्राचीन लोक यमक म्हणतात, पण तें इतकेसें मधुर नसल्यानें त्याचा विचार लांबणीवर टाकूं' असें तो म्हणतो. यावरूनही भामहाचें नांव अगर त्याची व्याख्या यांशीं दण्डीचा संबंध असावासें दिसत नाहीं. पण त्याला असें वाटलें असावें कीं हा शब्दालंकार खरा, पण शब्द कशाला ? शब्द म्हटलें कीं अर्थ पाहिजेच. काव्यलक्ष्मीचा शब्दालंकार हा दिखाऊ दागिना असून अर्थालंकार हें आंतून स्फुरणारें, शोभिवंत दिसणारें सौंदर्य आहे; तेव्हां या यमकाला अर्थाची अथवा सबंध शब्दाची जरूर नसून सहज जातां जातां 'वर्णसंहति' म्हणजे दोन अगर जास्त वर्णांचा समूह, इतर वर्णांनीं अंतरित किंवा अनन्तरित कसाही असला तरी त्याची आवृत्ति म्हणजे यमक होय. दण्डीचा भर फक्त 'वर्णसंहति' व 'अव्यपेतव्यपेतात्मा' यांवर होता. संहति ही दोन अगर अधिक वर्णांची होणार. एकाक्षरी शब्दाची आवृत्ति त्याला श्रुतिमनोहर वाटत नसल्यानें त्यानें हा शब्द घातला. वर्णसमूह हा एका शब्दांतच नको तर ते वर्ण दोन शब्दांत कां अर्धे अर्धे असतना, पण ते तुल्यश्रुति असून समुदायांत असले व त्यांची पुनरावृत्ति झाली म्हणजे यमक झालें, असें दण्डीचें मन दिसतें. एकूण दण्डी 'भिन्नार्थी' या शब्दाकडे लक्ष देत नाहीं.

५. उद्भटानें 'यमक' संज्ञा दिलेला अलंकार मानलेला नाही. वामनाच्या सर्वच व्याख्या सुटसुटीत सूत्रमय अशा आढळतात.त्यानें यमकाच्या आसनाची अनिश्चलता पाहून त्याच्या पूर्वीच्या अलंकारशास्त्रज्ञांना जें पाहिजे होतें तें सर्व मंथन करून

---

१ का. द. १.६१ २ का. द. १.६१

आपल्या व्याख्येंत आणलें. भरताला पाहिजे असणारा 'शब्द' व भामहाला पाहिजे असणारा भिन्नार्थी वर्णसमूह ही दोन्हीं त्यानें आपल्या व्याख्येंत आणलीं:-

'पदमनेकार्थमक्षरं वाऽऽवृत्तं स्थाननियमे यमकम्[1]'

'भिन्नार्थी पद अथवा अक्षर नियमित स्थलीं आवृत्त होईल तेव्हां यमक म्हणावें.' पण याच्या या व्याख्येनें पुनः एकाक्षरी शब्द आलाच. तेव्हां या नीरस वाटूं लागलेल्या व्याख्येला कोणी मान दिला नाहीं. यानंतर सशास्त्र अलंकार वर्ग पाडणाऱ्या रुद्रटानें भामहाची व्याख्याच पण तत्समान शब्द वापरून आपलीशी करून घेतली.

तुल्यश्रुतिक्रमाणामन्यार्थानां मिथस्तु वर्णानाम् ।
पुनरावृत्तिर्यमकं प्रायश्छंदांसि विषयोऽस्य[2] ॥

'वर्णानां' या शब्दानें तीन अथवा त्यांहून जास्त वर्ण यानें सांगितले. तीन अथवा तिहींहून अधिक वर्ण, तुल्यश्रुति, व भिन्नार्थी असल्यास यमक म्हणावें असें हा म्हणतो. मम्मट,

अर्थे सत्यर्थभिन्नानां वर्णानां या पुनः श्रुतिः । यमकम्[3]

'अर्थे सति' हें पद मम्मटानें कां घातलें हें काव्यप्रकाशाच्या वृत्तींतच सांगितलें आहे. भिन्नार्थी वर्णसमूह

आवृत्त झाला असतां एकामध्यें अर्थ असेल तर दुसरा निरर्थक असेल म्हणून 'अर्थे सति' हें पद वापरलें आहे. पण त्याची व्याख्या मात्र पुनः पूर्ववत् झाली. अजूनपर्यंत पाहिलें असतां भामहाचीच व्याख्या मान्य आहे. यापुढें शाब्दिक फेरफारापेक्षां व्याख्यांत फरक झाला नाहीं. रुय्यकाची व्याख्याः—

स्वरव्यंजनसमुदायपौनरुक्त्यं यमकम्[4]

वर्ण या शब्दाची फोड करून 'स्वरव्यंजनसमुदाय' हा शब्द त्यानें घातला. मात्र हा भिन्नार्थ वगैरे कांहींच म्हणत नाहीं. जयदेव, विद्याधर व विश्वनाथ यांच्या व्याख्या पाहिल्या तर विश्वनाथ मम्मटाचें वळण गिरवितो व विद्याधर आणि जयदेव रुय्यकाकडेच पहातात.

जयदेवः—आवृत्तवर्णस्तबकं स्तबकन्दाकुरं कवेः । यमकम्[5] ।
विद्याधरः—इदमेव स्वरसहितं व्यंजनसमुदायमाश्रितं यमकम्[6] ॥
विश्वनाथः—सत्यर्थे पृथगर्थायाः स्वरव्यंजनसंहतेः ।
क्रमेण तेनैवावृत्तिर्यमकं विनिगद्यते[7] ॥

---

१ का. लं. सू. ४-१-१. २ का. लं. ३-१. ३ का. प्र. ९-११७. ४ अ. सू ६. ५ चं. लो. ५-८. ६ प्र. ७४. ७ सा. द. १०-८

६. आतां यापुढें यमकाच्या इतर मुखांचा विचार करूं. भरताचें यमक दशानन आहे तर भामहाचें पंचानन आहे. दण्डी व रुद्रटानें तर आपल्या यमकाला सर्वभक्षकाप्रमाणें विविधमुख केलें आहे. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, दण्डी व रुद्रट यांच्या यमकांचा सर्वच गोंधळ झाला आहे. व घरांतील रामरगाड्याचा जितका वीट येऊं लागेल तेवढाच दण्डीरुद्रटाच्या यमकाच्या घोंटाळ्याचा वीट येऊं लागतो. इतका अवास्तव पसारा झाला आहे. तेव्हां हा यमकविस्तार कसा आहे तें पाहूं.

भरतानें यमकाचे दहा भेद केलः—( १ ) पादान्त० ( २ ) काञ्ची० ( ३ ) समुद्र० ( ४ ) विक्रान्त० ( ५ ) चक्रवाल० ( ६ ) संदष्ट० ( ७ ) पादादि० ( ८ ) आम्रेडित० ( ९ ) चतुर्व्यवसित० ( १० ) माला०

हे भरतानें केलेले दहा भेद भामहाला वैचित्र्यपूर्ण वाटले नाहींत म्हणून त्यानें,

संदष्टकसमुद्गादेरत्रैवान्तर्गतिर्मता ।
आदौ मध्यान्तयोर्वा स्या ( दि ) ति पञ्चैव तद्यथा ॥[1]

असें ह्मटलें; व ( १ ) पादादि० ( २ ) मध्यान्त० ( ३ ) पादाभ्यास० ( ४ ) आवली० ( ५ ) समस्तपाद० असे पांचच यमकभेद मानले. आतां याच्या यमक-भेदांचीं उदाहरणें पाहून यानें कोणत्या भेदांना फांटा दिला व कोणचे भेद कोणत्या भेदांत सामावून टाकले हें पाहूं. उदाहरणें शक्य तोंवर मराठींतच घेऊं. कारण स्वभाषेंतील उदाहरणें अधिक पटतात.

१ सर्व चरणांच्या शेवटीं सम अक्षरें असणें याला पादान्त यमक म्हणावें असें भरत म्हणतो. आतां याचें उदाहरण पाहिलें तर त्यांत तीन तीन अक्षरांची पुनरावृत्ति दिसते. फक्त एकाच अक्षराची आवृत्ति दिसत नाहीं.

दुंदुभि नभांत बहुसाल झडताती । पुष्पताति रामशिरिं रम्य पडताती ।
विद्धतनु दैत्य समरांत रडताती । गृध्र अवलोकुनि तयांस उडताती ॥[2]

हें उदाहरण भरताच्या पादान्तयमकाचें होईल. भामहाच्या समस्तपाद यमकांत व भरताच्या पादान्त यमकांत फरक नाहीं. निदान उदाहरणांत तरी तो दिसत नाहीं. कारण भामहाला तीन अगर अधिक अक्षरांची पुनरावृत्ति पाहिजे आहे ती भरताच्या उदाहरणांत आहे.; भरताला तीन अगर त्याहून अधिक अक्षरांची पुनरावृत्ति नको असली तरी तो उदाहरण मात्र तीन सम अक्षरांच्या आवृत्तीचेंच देत आहे.

२ चरणाच्या आरंभीं व शेवटीं दोन दोन सम पदें आलीं असतां काञ्चीयमक होतें. पुढील उदाहरण भरताच्या काञ्चीयमकाचें होईलः—

---

१ भा. लं. २–१०    २ सा. व. बि. ९६२

द्विजां, द्विजां, मान्य मान्य–काम काम–हरा हरा ।
सुरासुरास वासवा रमारमा सहा सहा ॥

यांत चरणारंभीं व अन्तीं समपदांची जोडी आहे. भामहाच्या आवलीयमकाचें उदाहरणही असेंच आहे.

( ३ ) पहिले दोन चरण अनुक्रमें तिसऱ्या व चवथ्यांत आवृत्त होणें याला समुद्र म्हणतात. भरताच्या समुद्राचें उदाहरणः—[1]

अनलें-समीहित साधी राया, वारा महीवरा, कामा ।
अनलस मीहि तसा, धीरा ! यावा रामही, वरा कां मा ॥

भामहाच्या पादाभ्यासयमकांत चतुर्व्यवसित, समुद्र व विक्रान्त हे भरताचे तीनही यमकभेद येऊं शकतील असें पुढें दिसेलः—

( ४ ) भरताचें विक्रान्तयमक म्हणजे एकाआड एक अशा दोन चरणांत साम्य असणें.

पाँहिला प्राशिता दैत्य–चक्रायु धरणी–तळीं ।[2]
भरिता रक्त–पूरें जो चक्रायुध रणीं तळीं ॥

हें विक्रांताचें उदाहरण होईल. भामहानें पादाभ्यासाचें उदाहरण विक्रान्तासारखेंच दिलें आहे. पण पादाभ्यास या मोघम शब्दानें व त्याची व्याख्या न करण्यानें समुद्रालाही तो या सदरांत घालीत असावा.

( ५ ) भरताच्या चतुर्व्यवसिताचें उदाहरण भामहाच्या पादाभ्यासाचें होईल.

करी[4] रवातें हल, तीर--यानें, करीर वातें हलती रयानें ।
करीर वातेह लती रयानें, करी रवातें हल तीर यानें ॥

( ६ ) भरताचें चक्रवालयमक म्हणजे चक्राप्रमाणें आहे. त्यांत एका चरणाचा आरंभ तो दुसऱ्याचा शेवट असतो. त्याचें उदाहरण,

मगें[5] प्रल्हादातें म्हणाति अवघे ' भक्तपरमा
रमा ब्रह्मा कीं न स्वकृत विभुकोपा उपरमा, ।
रमाकांता ये ना तुजविण दया दैत्यशमना,
मनाच्या विश्रामा त्वरित करिं गा ! क्रोधशमना' ॥

भामहाचें आवलीयमक म्हणजे कोणताही वर्णसमूह कोठेंही पुनः आवृत्त होणें. याचें उदाहरण देतांना भामह आपल्या यमकाच्या व्याख्येपासून सुटल्याचा भास होऊं लागतो. उदाहरणार्थ,

---

१ सा. द. वि. १३.४८ २ मो. वेंचे पान, १५८ ३ मो. अंबरीषाख्यान ४८
४ सा. द. वि. १३-५२ ५ वामन–नृहरिदर्पण १२४

सिता[1]सिताक्षीं सुपयोधराधरां ।
सुसम्मदां व्यक्तमदां ललामदाम् ॥
घनाघनानील घनाघनालकां ।
प्रियामिमामुत्सुकयन्ति यन्ति च ॥

यांत यमकाला लागणारीं तीन अक्षरें जाऊन कित्येक ठिकाणीं दोन अक्षरांचा वर्णसमूह आवृत्त झाला आहे. याचें हें उदाहरण पाहिलें म्हणजे त्यांत भरताचे काञ्ची व चक्रवाल हे यमकभेद डोकावतांना दिसतात. कारण भरतानें चक्रवालयमकाचें उदाहरण देतांना शुद्ध चक्रवालयमकाचा नियम न राखतां भामहाच्या आवलीयमकाप्रमाणेंच शेवटीं एक पद पुनः आवृत्त केलें आहेः—

शैलो[2] यथा शत्रुभिराहता हता ।
हताश्च भूयोऽप्यनुपुङ्गवैः खगैः ॥

भामहानें 'सितासिताक्षीं सुपयोधराधरां' हा चरण तर भरताच्या काञ्चीयमकाच्या व्याख्येप्रमाणेंच दिला आहे असें दिसतें.

(७) भरताचें पादादियमक व भामहाचें पादादियमक यांत फरक आहे. भरताला सर्व चरणांच्या आरंभीं तेंच अक्षर आवृत्त व्हावयास पाहिजे, व भामहाला प्रत्येक चरणाच्या आरंभीं स्वतंत्र वर्णसंहतीचें यमक पाहिजे असें त्याच्या उदाहरणावरून दिसतें. भरताचें पादादियमक पुढील उदाहरणावरून समजण्यासारखें आहेः—

नारायणा ! म्हणुनि एक सुतासि बाहे,
नारायणाख्य नर अन्य तथापि पाहे
'नारायणा' म्हणति लौकिकही प्रवाहीं,
नाराय[3]णाक्षिविषय क्षण होति तेही, ॥

या उदाहरणांत चरणारंभीं यमक साधलें आहे. भामहाचें उदाहरण मूळ मराठी कवितेंत फरक करून पुढीलप्रमाणें होईलः—

अमळा[4]–कमळा–केली–भवना भव–नाशना ।
पावना पावनाशीं या रक्ष या रक्ष यादवा ॥

यांतील 'अ' हें पहिल्या ओळींतील आद्याक्षर बाधक आहे. त्याऐवजीं 'क' हें अक्षर असेल तर हें उदाहरण हुबेहुब भामहाच्या पादादियमकाचें होऊं शकलें.

(८) आम्रेडितयमक म्हणजे शेवटीं दोन वेळां एकच पद उच्चारिलें जाणें:-

म्हणत[5]से मम कर्म पहा पहा । वृषलिपासुनि वार दहा दहा ।
उपजलों उदरांत अहा ! अहा ! पतित मी पतितांत महा महा ! ॥

---

१ भा. लं. २-१४ २ ना. शा. १६.७२ ३ वामन–नामसुधा १.१०
४ मो. अंबरीषाख्यान २.३.१३ ५ वामन–नामसुधा २. ३. १३.

( १० ) भरताचें मालायमक म्हणजेच पुढील अनुप्रासाचें स्वरूप होय. एक व्यंजन नाना स्वरांनीं युक्त असणें म्हणजे मालायमक. अनुप्रासांतही आपणांस हेंच आढळतें. मालायमकाचें उदाहरणः—

लीलोल्लोलीं लीललोल लीलेलेला ललालिला ।
लोल-ललि-ललाऽलीलाऽली लालाला ललालि ले ॥

या एकंदर विवेचनावरून असें आढळून येतें कीं

१ भामहाचें पादाभ्यास यमक=भरताचें समुद्ग, विक्रान्त व चतुर्व्यवसित यमक.

२ भामहाचें आवली यमक = भरताचें काञ्ची व चक्रवाल यमक.

३ भामहाचें पादान्त यमक = भरताचें समस्तपाद यमक.

४ भामहाचें पादादि यमक = भरताचे पादादि यमक.

एकूण भरताचे सात यमकभेद हे भामहाच्या चार यमकभेदांबरोबर आहेत. भरताचें मालायमक म्हणजे अनुप्रास. राहतां राहिलें भामहाचें मध्यान्त यमक व भरताचें संदष्ट व आम्रेडित यमक. यांची सांगड मात्र नीट घालतां येत नाहीं.

७. यापुढें दण्डीचें यमक पाहण्यापूर्वीं वामनाचें यमक पाहूं. कारण उद्भटानें यमक उल्लेखिलें नाहीं व वामनानें भेद केले आहेत पण त्याला यमकासंबंधीं फारशी आस्था नाहीं. वामनानें केलेले भेद असेः–

( १ ) पादान्त यमकः—एका चरणाची पुनः आवृत्ति होणें. ( २ ) एकाच चरणांत, ( ३ ) दोन चरणांत, ( ४ ) एक सोडून एका चरणांत, आदि, मध्यें व अन्तीं यमक साधणें. ( ५ ) चारही चरणांत आदि, मध्यें व अन्तीं यमक साधणें.

हे पद-यमकाचे भेद तसेच अक्षर-यमकाचे दोन भेद होतातः एकाक्षरी यमक व अनेकाक्षरी यमक. वामन उदाहरणें देण्याच्या भानगडींत पडला नाहीं.

दण्डीला यमक आवडत नसतांही त्यानें त्यावर जवळ जवळ एक परिच्छेद खर्च केला आहे. अग्निपुराणाचा काल कोणता यासंबंधीं विद्वज्जनांत मतभेद आहे; पण अग्निपुराण हें दण्डीच्या आधीं होतें असें म्हटलें तर अग्निपुराणांतील यमकभेदांचें बाहुल्य व दण्डीचें भेदबाहुल्य यांत साम्य आहे; पण अग्निपुराणापेक्षां दण्डीच्या भेदांची संख्या पुष्कळच अधिक झाली आहे. पुराण हा ग्रंथ अलंकारांचा अधिकृत ग्रंथ धरतां येत नसल्यानें तत्संबंधीं विवेचन न करितां दण्डीच्या भेदांकडे वळूं. त्यानें मुख्य तीन भेद मानलेः—१ अव्यपेत, २ व्यपेत ३ अव्यपेत-व्यपेत. यांपैकीं प्रथम अव्यपेतयमकाचे पोटभेद उदाहरणांसह पाहूं. अव्यपेतयमक म्हणजे दुसऱ्या कोणत्याही वर्णांनीं न दुरावलेलें यमक. अव्यपेत पादादि यमकाचे

---

१ सा. द. वि. १३-४३,

एकपादादि, द्विपादादि, त्रिपादादि, चतुष्पादादि असे चार मुख्य भेद पडून पुनः एकपदादि यमकाचे पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या अगर चौथ्या चरणांत यमक साधणें यावरून चार भेद पडतात. त्यांचीं क्रमानें उदाहरणें घेऊं:--

प्रथम चरणांतः—'हा ! हंसा ! हा हंसा !' ऐसें बोलोनियां हृदीं रडला,
स्वकरें समूळ जिह्वा उपडुनि डिंभक मरोनियां पडला. ॥[1]

द्वितीय चरणांतः—दशास्य गेल्यावरि दे मुद्रा, मुद्राशि होय ती ।
चित्तीं कपि म्हणे, हर्षी सनकादिक हो यती ॥[2]

तृतीय चरणांतः—यत्नें समस्तीं भूतीं परिचर्येचा, नृपा ! मनुष्याचा, ।
बहु बहुमान करावा, शूर करितसे जसा धनुष्याचा, ।[3]

चतुर्थ चरणांतः—वांचेला व्यक्षर 'शिव' हें येतां नाम, शमळ ताप सरे, ।
त्या निंदिसि हा ! मूढा ! 'शिव शिव' चि म्हणोनि
अम्मळता पसरे ॥[4]

हीं चारही उदाहरणें एकपादादि अव्यपेत यमकाचीं झालीं. त्यांतील यमक साधणारे वर्ण दुसऱ्या वर्णांनीं अंतरित अगर दुरावलेले नाहीत. द्विपादादि अव्यपेत-यमकाचे सहा भेद असेः—

(१) प्रथम व द्वितीय चरण यांच्या आरंभीं यमकः—
मारीच मारचि मृगास रानीं । लंकेश लंकेश वधी शरांनीं ॥[5]
वाळीस वारीच सख्यास पाळी । गातां सदा त्यास भजे कपाळी ॥

(२) प्रथम व तृतीय चरणारंभीं यमकः--
झुळझुळत्या[6] वाऱ्यावर त्यांचीं पानें हलतांनाहीं ।
गुणगुणती तें गाणें, त्यांना छंदाचि दुसरा नाहीं ॥

(३) प्रथम व चतुर्थ चरणारंभीं यमकः—
तो[7] गुरु तो गुरुनंदन तो कृप तो कर्ण तो पितामह रे ।
यांहीं धेनु वळाव्या शिव शिव गोपाळ राम कृष्ण हरे ॥

(४) द्वितीय व तृतीय चरणारंभीं यमकः--
परि[8] तव गानांतून, अले, थबथबला हा भाव गळेः—।
गडुगुडु गुडु गुडु ! भान नसे सृष्टि अहा गुडु मधुर असे ॥

(५) तृतीय व चतुर्थ चरणारंभीं:-(फरक[9] करून)

---

१ मो. अ. रा, ७७.    २ मो. अनु. रा. ७७.    ३ मो. मंत्रभागवत ११-५५
४ मो. वेचे १३३-२३    ५ मु. रामायण    ६ वाग्वै० २११-११
७ मो. विराटपर्व ४-७७    ८ के. सुत    ९ मे. दू. उ. मे, ७

गंगातीरीं सुरतरुतळीं वाहतां थंड वारे।
कन्या देवार्थित विहरती जेथ नानाप्रकारें ॥
जेव्हां जेव्हां लिकविति करीं स्वर्णवाळूंत रत्नें।
कोणी कोणी मग चहुंकडे शोधिती त्यांस यत्नें ॥[1]

(६) द्वितीय व चतुर्थ चरणारंभीं यमकः--
हा देव ही प्रीति कर्तव्य आशा तशा कल्पना भावना कामना
आहेत आहेत, आहे तयांचा ळळा सारखा सारखा मन्मना।
भावें बसोनी तया संनिधानीं सुखानें मुखानें तुला संकटा
आव्हान आव्हान देतों तुला हें नसें सांगतों मी नसें एकटा ॥[2]

द्विपादादि अव्यपेतयमकाचे हे सहा भेद झाले. त्रिपादादि यमकाचे चार भेद होतात. उदाहरणें:—

(१) प्रथम, द्वितीय व तृतीय चरणारंभीं यमकः--
करकर बहुसाल खाय दाढा, थरथर ओष्ठहि पावती विकंपा
गरगर फिरवी विलोचनातें झडकर जात विवेक पूर्ण लोपा[3]

(२) प्रथम, द्वितीय व चतुर्थ चरणारंभीं यमकः--
चम चम चम नाचे काय विद्युल्लता ही
कड कड कड शब्दें नाद कोंदूनि राही;।
घसरुनि पडते ही वाटतें मस्तकांत
खचित खचित आलों मृत्युच्या मी मुखांत !।

(३) प्रथम, तृतीय व चतुर्थ चरणारंभी यमकः- (मूळांत फरक करून)
घडि घडि हरि ऐसें बोलतां काय होतें !
हरि म्हणातिहि कोणी नावडे शब्द मातें।
हरि हरि म्हणताती हेळणेनें तथापि
जधिं जधिं म्हणती तो होय निष्पाप पापी ॥[4]

(४) द्वितीय, तृतीय व चतुर्थ चरणारंभीं यमकः--
अवजड परिजारें डोलकाठीहि हाले,
कर कर कर ऐसा सारखा शब्द चाले !
तट तट तट जाती दोरखंडें तुटोनी
शिव शिव ! हृदयींचा धीर जाई सुटोनी ॥[5]

चतुर्थपादादि अव्यपेताचा फक्त एकच प्रकार होतोः--

---

१ फां० त. ८७ पान · २ सा. व. बि. १०·५२ ३ प. र. स. पान २२·२७.
४ वामन-नामसुधा २.२.४१ ५ प. र. स. २०·१०

(१) जलजलसद्रम्यमुखी नवनवनीतापरीस मृदुला हे।
शिव ! शिव ! मजविण भीरु न वनवसती दुःख भोगणें लाहे ॥

अशा रीतीनें आतांपर्यंत यमकाच्या मुख्य तीन भेदांपैकीं अव्यपेतयमकाच्या पादादि अव्यपेतयमक या पोटभेदाचें विवेचन झालें. याशिवाय मध्य, अन्त, आदिमध्य, आद्यन्त, मध्यान्त व आदिमध्यान्त असे सहा मिळून अव्यपेतयमकाचे मुख्य उपभेद सात होतात. पादादि यमकाप्रमाणेंच इतर सहा उपभेदांचे प्रत्येकीं १५ भेद पडतात. एकूण अव्यपेतयमकाचे नव्वद भेद होतात व त्या सर्वांत पूर्वीच्या उदाहरणाप्रमाणेंच यमक साधणारे वर्ण हे दुसऱ्या वर्णांनीं अंतरित नसतात. ते वर्ण एका पाठोपाठ लागलेच येतात.

८. यानंतर दुसरा यमकाचा मुख्य भेद व्यपेतयमक हा होय. व्यपेत याचा अर्थ दुसऱ्या वर्णांनीं दुरावलेलें, एका पाठोपाठ वर्ण येऊन लगेच न साधलेलें यमक; अर्थात् यांत आदिमध्यान्त यमकत्व असल्यानें अव्यपेतयमकाप्रमाणें एकपाद-यमक यांत संभवत नाहीं. द्विपादादि व त्रिपादादि व्यपेतयमकांत प्रत्येक चरणांतील यमकें स्वतंत्र नसून एकच असतात. या दोन भेदांचे अनुक्रमें सहा व चार असे भेद पडतात. व्यपेत चतुष्पादयमकाचे मात्र चार भेद पडतात. व्यपेतयमक-भेदाचीं उदाहरणें:—

(१) द्विपादादियमक; प्रथम व तृतीय चरणारंभीं:—

सव्वांशें[१] सरिता धरूनि उदरीं तृष्णा सवें जातसे,
साठांची गणती करूनि पुरती तीमाजि भीमा वसे;
सव्वाशें सरिता जियेसि भिडती ते तुंगभद्रा मिळे
पन्नासां सरिसी हयग्रिव नदी गर्भी जिच्या मीसळे ॥

(२) द्विपादादि यमक; द्वितीय व चतुर्थ चरणारंभीं:—

जैसा[२] वर्ततो लोक कल्याणकारी
जगीं वर्तती सर्वही त्या प्रकारीं;
वदे तो सदाचार शास्त्रार्थ जैसे,
जगीं वर्तती सर्वही लोक तैसे ॥

(३) द्विपादादि यमक. प्रथम व द्वितीय चरणारंभीं:—

सुर[३] समस्त इच्या वरनिश्चयें। सु-रस मत्त असें वदले स्वयें।
नळ-वराशिं वरोनि सुखी असें। तुज नको जन कोण म्हणे असें ॥

(४) द्विपादादि यमक; तृतीय व चतुर्थ चरणारंभीं:—

---

१ मो. केंचे. २ वामन-शुकरंभासंवाद १.
३ वामन-नामसुधा २'१'७' ४ नवनीत-नलदमयंती-आख्यान २१२

[1]साध्यांही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे;
नित्याच्या अवलोकनें परि किती होती जगीं आंधळे ।
रांगोळी बघुनी इतःपर तरी होणें तयीं शाहणे ।
रांगोळी बघुनीच केशवसुना हें आठवे बोलणें ॥

( ५ ) द्विपादादि यमक; द्वितीय व तृतीय चरणारंभीं:—

[2]बुडें बुडवि सागरीं तरि, सुकर्णधाराविना;
सहाय नसतां स्वयें परतटासि ती दाविना,
सहाय भगवज्जना तव सुकीर्ति जेव्हां करी ।
तयींच उतरी भवोदधितटीं जनां लौकरी ॥

( ६ ) द्विपादादि यमक; प्रथम व चतुर्थ चरणारंभीं:—

[3]हा दयभारवि तो जगभारवि जेंवि नभा रवि सारवि भाला,
या अइसा बहु मान न मानववल्लभि हा यजमान विभाला ।
ओळख तूं कुरुवल्लभ हा बहु दुर्लभ कीं जगतींतहि राजे
हा दयमानस सर्व समानस मानवशे जगतींत हिरा जे ॥

हे द्विपादादि व्यपेतयमकाचे सहा भेद झाले. त्रिपादादि व्यपेतयमकाचे चार भेद होतात. ( १ ) प्रथम, द्वितीय व तृतीय चरणारंभीं:—

[4]नारांसि जो आश्रय या प्रकारें नारायणा आश्रय तेंचि नारें ।
नारांसि जो आश्रय ईश झाला, तो जीव कीं आश्रय हे जयाला ॥

( २ ) प्रथम, द्वितीय व चतुर्थ चरणारंभीं:—

[5]कवी देवांचें रूपकर्ते । कवी ऋषींचें महत्त्व वर्णिते ।
नामशास्त्रांचें सामर्थ्य ते । कवी वाखाणती ॥

( २ ) प्रथम, द्वितीय व चतुर्थ चरणारंभीं:—

[6]हरी आठवीला जरी दुष्ट चित्तीं । हरी पापमूळा कुमार्गप्रवृत्ती ।
कळोनी जरी आठवीजे मुरारी । हरी पातकें तो अशीं या प्रकारीं ॥

( ३ ) द्वितीय, तृतीय व चतुर्थ चरणारंभीं:—

[7]मित्रांसां ग्लानि देतो जरि अमृतरसालागिं हा चांद वीतो ।
साधू तैसा कसा, जो सुखवुनि सकळ प्राणियां नांदवीतो ।
साधूंच्या दर्शनानें अ–शिव तिथि अशी सर्वथा आढळेना ।
साधूंचें तेज रात्रंदिन समाचि न तें सोडुनी त्यां ढळेना ॥

---

१ वाग्वे पा. ६६·१. २ मो. केका ११७ ३ वामन–विराटपर्व ८·४६
४ ,, वामन–नामसुधा २·२·४१ ५ प. र. स. ६ वामन–नामसुधा १-१-३८
७ मो. अंबरीषाख्यान ७८

( ४ ) प्रथम, तृतीय व चतुर्थ चरणारंभीं:--

दशरथ नृप त्याला कंकणें आणि चोळी
भृगुवर, लपतां तो, हस्त सक्रोध चोळी ।
दशरथसुत जिंकी राम तैशास वाटे
दशमुख विजयाचें काय आश्चर्य वाटे ? ॥[1]

चतुष्पादादि यमक.( १ ) प्रथम-द्वितीय व तृतीय-चतुर्थ चरणारंभीं:--

कुशल वचन ऐकतांचि ऐसें । कुशलव मुष्टिधर द्विजेन्द्र गेला ।
रुचिरवदन बालकद्वयाच्या । रुचिरवसंग्रहणें प्रहृष्ट झाला ॥[2]

( २ ) प्रथम-तृतीय व द्वितीय-चतुर्थ चरणारंभीं:--

किति मैल अंतर राहिलें अपुल्यांत सद्गुणसुंदरी ।
किती मास अन्तर जाहलें अपुल्यांत यौवनमंजरी ॥[3]

( ३ ) प्रथम-चतुर्थ व द्वितीय-तृतीय चरणारंभीं.

कोण तूं गा ! कोठील कवणियाचा ?
कुठें आहे तव वास वसायाचा ?
कुठें केला अभ्यास गायनाचा ?
कोण झाला गुरुराय तुज तयाचा ?[4]

( ४ ) प्रथम-द्वितीय व तृतीय चतुर्थ-चरणारंभीं:--

कृष्णरूपचि जया जग सारें, कृष्ण त्यास मग सार असारें,
कृष्णवर्णहि तिघां सविशेषीं कृष्ण शब्द अत एव विशेषीं ॥[5]

वर सांगितल्याप्रमाणें व्यपेतयमकाचे एकंदर चौदा भेद झाले; व अव्यपेता-प्रमाणें याचेही मध्य, अन्त इत्यादि भेद पडतात.

९. आतांपर्यंत अव्यपेत व व्यपेत म्हणजे अंतरित व अनन्तरित हे दोन मुख्य यमकभेद झाले. यानंतर तिसरा मुख्य भेद म्हणजे अव्यपेतव्यपेत यमक हा होय. यांचे अकरा भेद होतात. ( १ ) सर्वपाद मध्ययमक ( २ ) सर्वपाद मध्यव्यपेतरूप ( ३ ) पादान्त ( ४ ) पादान्त अव्यपेतव्यपेत ( ५ ) पादमध्यान्त व्यपेत ( ६ ) आदिमध्यव्यपेत ( ७ ) पादादिमध्य अव्यपेतव्यपेत ( ८ ) आद्यन्त एकरूप व्यपेत ( ९ ) पादाद्यन्तीं अव्यपेतव्यपेत ( १० ) आदिमध्यान्तीं एकरूपव्यपेत व ( ११ ) चारी चरणांत आदिमध्यान्त अव्यपेतव्यपेत. वर सांगितलेले मुख्य तीन भेद दिल्यावर दण्डीनें आणखी सात मुख्य भेद दिले आहेत. म्हणजे दण्डीचे यमकाचे मुख्य भेद दहा होतात:—

( ४ ) भरताच्या चक्रवालयमकासारखेंच याचें सन्दष्टयमक आहे.

---

१ वामन-भरतभाव ११२ २ वामन-कुशलव्याख्यान ५-२४ ३ उषा--सद्गुणमंजरी.
४ का. बो. चंद्रशेखरकृत कुंजकूजन ८ ५ वामन-हरिविलास. १-२ ६

(५) भरताच्या समुद्गयमकाप्रमाणें दण्डीचें अर्धाभ्यास समुद्ग आहे. यांत चरण-द्वयांची पुनरावृत्ति होते व त्यावरून तीन उपभेद होतातः (१) एका श्लोकांत प्रथम–तृतीय व द्वितीय–चतुर्थ चरण सारखे असणें:—

सुरसाधरावरी ते शिवा सकुतुका गिरिशजा या हो।
सुरसाधरा वरीते शिवास, कुतुका गिरीशजाया हो॥

(२) एका श्लोकांत प्रथम–द्वितीय व तृतीय–चतुर्थ चरण सारखे:—

हरिते[2] सन्नगमंडन मानस। हरित–सन्नग–मंडन मानस।
सुरस–सारस–सार–समाकुला। सुरससार ससारस माकुला॥

(३) एका श्लोकांत प्रथम–चतुर्थ व द्वितीय–तृतीय चरण सारखेः—

पायाँ[3] नमी देइन वंश सारा
न या वयामाजि भला जना दे।
न यावया मा जिभ लाज ना दे
पा या न मी दे इनवंशसारा॥

१०. याप्रमाणें अर्धाभ्यास समुद्गाचे तीन उपभेद झाले. यानंतर सहावा प्रकार जो पादाभ्यास यमक त्याचेही दहा भेद होतात ते असे:—

(१) प्रथम व तृतीय हे चरण सारखेः—

पुंडरीका[4]! क्षमा केली त्वां वैकुंठाधिका सदा।
पुंडरीकाक्ष माकेलीस्थाना त्वां नाठवी कदा॥

(२) तृतीय व चतुर्थ हे चरण सारखेः—(फरक करून)

इहे[5] सुके फुलली कुसुमावली। अजनिं वा जनिं वा न कळे भली
न करितां सुरमस्तकमंडना। न करितां सुरमस्तकमंडना॥

(३) द्वितीय व चतुर्थ हे चरण सारखेः—

कपींस[6] स्वर्ग रुचला न पुष्पकविमानसा।
त्वद्यश प्रिय नाकींचें न पुष्प कविमानसा॥

(४) प्रथम व द्वितीय हे चरण सारखेः—

कान्ताऽऽरवा[7] सरसदानकरी नरा जी
कांतारवास–रस–दा न करी न राजी।
कस्तूरिकाहरिणपंक्ति सुखें विहारा
या पर्वतीं करितसे धृतभृंगभारा॥

---

१—२ का. दो. हिमालयवर्णन  ३ आनंदतनय (फरक करून)
४ मोरोपंत  ५ का. दो. हिमालयवर्णन  ६ मोरोपंत
७ का. दो. हिमालयवर्णन

(५) द्वितीय व तृतीय चरण सारखेः—(फरक करून)

ऐकोनि या नगवरीं हरिशब्द कानें
राजी वसे वन–वशा–गजराज यांची
राजीवसेवनवशा गजरा जयांची
तुंडावली करितसे पळतां भयानें

(६) प्रथम व चतुर्थ हे चरण सारखेः—(फरक करून)

कांताऽऽखा सरसदानकरी नरा जी।
कस्तूरिका हरिणपंक्ति सुखें विहारा ॥
या पर्वतीं करितसे धृतभृंगभारा।
कांता रवास–रस–दा न करी न राजी ॥

येथपर्यंत दोन दोन चरणांतच साम्य दाखविलें. याशिवाय (७) प्रथम, द्वितीय व तृतीय चरण सारखे असतात.

(८) द्वितीय, तृतीय व चतुर्थ हे चरण सारखे असतात.

(९) प्रथम, तृतीय व चतुर्थ हे चरण सारखे असतात.

(१०) प्रथम, द्वितीय व चतुर्थ हे चरण सारखे असतात.

**११.** असे पादाभ्यासयमकाचे दहा भेद झाले. यानंतर सातवा मुख्य यमक प्रकार म्हणजे महायमक. यांत एका चरणाची सर्व चरणांत आवृत्ति होते. उः—

धरा[३] धराया महती समान। धराधरा या मह तीसमान।
धरा धरायामहतीस मान। धराधरा या महती समा न ॥

(८) श्लोकाभ्यास यमक. यांत एकाच श्लोकाची पुनः आवृत्ति होते.

(९) परयमक. यांत एका चरणार्धाची सर्व चरणांत आवृत्ति होते, असा बाध उदाहरणावरून होतो; कारण व्याख्येंत नुसतेंच 'अभ्यास' म्हटलें आहे. याचे व्यपेत, अव्यपेत, अव्यपेतव्यपेत हे प्रकार होतात.

(१०) प्रतिलोमयमक. यांत एका चरणार्धाचा दुसऱ्या चरणांत व्युत्क्रम झालेला असतो. याचे (१) पाद (२) अर्ध (३) श्लोक असे तीन भेद होतात. आतां श्लोकाभ्यास व प्रतिलोम यांचीं उदाहरणें पाहूं. श्लोकाभ्यासः—

साधुंनी पवना योगी रमे पद्मनिषेवणीं।
पव मानजन ध्यात माधवास वसे वनीं ॥
साधु–नीप–वनाऽयोगी रमे पद्मनिषेवणीं।
पवमान जनध्यात माधवाऽसव–सेवनीं ॥

---

१ कां. दो. हिमालयवर्णन २–३ का. दो. हिमालयवर्णन. ४ सा. द. वि. १३°४५.४६

पादप्रतिलोमः— यामताश कृतायासा सा याता कृशता मया ।
रमणारकता तेऽस्तु स्तुतेताकरणामर ॥

अर्धप्रतिलोमः— नवभान जळीं राम देखे या दक्ष सारसा ।
सारसाक्ष दया-खेदें मराली जनभावन ॥

श्लोकप्रतिलोमः- विहंगा विट आणीं हा पातांना ललनाजन ।
विरहें नव जे ते न लतांना तरु मारती ॥
तीर मारुत ना ताल, न तेजें वन हें रवि ।
न जना ललना तापीं-हाणी, आटवि, गाहवि ॥

याप्रमाणें दण्डीचा यमकभेदांचा प्रचंड विस्तार आहे.

१२. रुद्रटानें तर या विस्ताराचा आणखी विस्तार केलेला दिसतो. प्रथमतः रुद्रटानें ( १ ) समस्तपाद आणि ( २ ) एकदेशज हे दोन भेद सांगितले. त्यांपैकी समस्तपादाचे उपभेद असेः—

( १ ) मुखः प्रथम व द्वितीय चरण सारखे असणें.
( २ ) संदंश : प्रथम व तृतीय चरण सारखे असणें.
( ३ ) आवृत्ति : प्रथम व चतुर्थ चरण सारखे असणें.
( ४ ) गर्भयमक : द्वितीय व तृतीय चरण सारखे असणें.
( ५ ) संतुष्टः द्वितीय व चतुर्थ चरण सारखे असणें.
( ६ ) पुच्छ : तृतीय व चतुर्थ चरण सारखे असणें.
( ७ ) पंक्ति : चारी चरण सारखे असणें.
( ८ ) परिवृत्ति : गर्भ व आवृत्ति यमक एकत्र असणें.
( ९ ) युग्मक : मुख व पुच्छ यमक एकत्र असणें.
(१०) समुद्गक : श्लोकार्धाची दुसऱ्या श्लोकार्धांत आवृत्ति होणें.
(११) महायमकः सर्व श्लोक दुसऱ्या श्लोकांत आवृत्त होणें.

रुद्रटाचे समस्तपादयमकाचे हे अकरा भेद दण्डीच्या अर्धसमुद्ग व पादाभ्यास यमकाच्या भेदासारखेच आहेत. दण्डीचें महायमक तें रुद्रटाचें पङ्क्तियमक आहे. रुद्रटाचें महायमक तें दण्डीचें श्लोकाभ्यास यमक व रुद्रटाचें समुद्गयमक दण्डीच्या अर्धसमुद्गांतील एक भेद होईल.

एकदेशज हा जो दुसरा यमकप्रकार त्याचे रुद्रटानें वीस भेद केले आहेत. एका चरणाचे दोन अथवा तीन भाग करून त्याची आवृत्ति होणें याला एकदेशज म्हणतात. चरण द्विधा केले असतां चरणाच्या प्रथमार्धाच्या आवृत्तीनें दहा भेद व त्रिधा केले असतांही दहा भेद एकूण वीस भेद होतात.

---

१ का. द. ३.७४ २ सा. व. वि. १३·३० ३ सा. व. वि. १३. ३९-४०

**१३.** तिसरा यमक प्रकार अन्तादियमक हा असून त्याचा अर्थ प्रथम व तृतीय चरणांच्या अंत्यार्धाची दुसऱ्या व चवथ्या चरणांत आरंभीं आवृत्ति होणें. याचे व्यस्त, समस्त होण्यानें तीन भेद होतातः(१)प्रथम चरणाचें अन्त्यार्ध दुसऱ्या चरणाच्या आरंभीं आवृत्त होणें. ( २ ) तृतीय चरणाचें अन्त्यार्ध चतुर्थ चरणाच्या आरंभीं येणें. ( ३ ) प्रथम चरणाचें अन्त्यार्ध दुसऱ्या चरणाच्या आरंभीं व तृतीय चरणाचें अन्त्यार्ध चतुर्थ चरणाच्या आरंभीं येणें. अन्तादीचा चौथा यमकभेद मध्ययमक हा होय. यांत दुसऱ्या चरणाचें अन्त्यार्ध तिसऱ्या चरणाच्या आरंभीं येतें. याचा पांचवा भेद वंशयमक. यांत प्रथम चरणाचें अन्त्यार्ध दुसऱ्या चरणाच्या आरंभीं, दुसऱ्याचें अन्त्यार्ध तिसऱ्याच्या आरंभीं व तिसऱ्याचें अन्त्यार्ध चौथ्याच्या आरंभीं असतें. रुद्रटाचें वंशयमक हें चक्रवालयमकच होय. तसेंच त्याचें चक्रकवंश म्हणजे वंशयमकच पण यांत शेवटच्या चरणाचा अन्त्यार्ध हा प्रथम चरणारंभीं असतो. याप्रमाणें अन्तादि यमकाचे सहा भेद होतात.

**१४.** आद्यन्तक यमकः--यांत पहिल्या चरणांतील आद्यर्ध दुसऱ्या चरणाच्या शेवटीं किंवा तिसऱ्या चरणांतील आद्यर्ध चौथ्या चरणाच्या शेवटीं येतें. या यमकभेदाचे अन्तादि यमकाप्रमाणें सहा भेद होतात.

अर्धप्रवृत्तिः— प्रथम चरणांतील अन्त्यार्ध द्वितीय चरणारंभीं असणें, प्रथम चरणांतील आद्यर्ध द्वितीय चरणांतीं असणें व याचप्रमाणें पुढील चरणांत संबंध असणें यास अर्धप्रवृत्ति म्हणतात.

पादसमुद्गयमकः—एकच चरणार्ध त्याच चरणार्धांत आवृत्त होणें. ही स्थिति ( १ ) सर्व चरणांत ( २ ) प्रथम व तृतीय चरणांत ( ३ ) द्वितीय व चतुर्थ चरणांत असते. या यमकभेदाचे अंतरित, अनन्तरित, व्यस्त, समस्त, यावरून पंधरा भेद होतात. मालायमकः—याचे तीन भेद होतातः—

( १ ) चरणाचा आदि चतुर्थांश तदनंतर पुनः आवृत्त होणें.

( २ ) चरणाचा उपांत्य चतुर्थांश चरणांतीं पुनः येणें. व

( ३ ) या दोन्ही भेदांतील स्थिति एकाच श्लोकांत असणें.

काञ्चीयमकः—( १ ) चरणाचे चार भाग केल्यास दुसरा भाग तिसऱ्यांत अशा रीतीनें सर्व चरणांत आवृत्ति होणें ( २ ) चरणाचा आदि चतुर्थांश त्याच चरणांतीं येणें. ( ३ ) वरील दोन्ही स्थिति एकाच श्लोकांत असणें, हे तिन्ही काञ्चीयमकाचे प्रकार होत.

**१४.** एका चरणाचे आदि, मध्य व अन्त असे तीन भाग करून त्यांची इतरत्र आवृत्ति होण्यानें प्रत्येकीं दहा भेद होतात. त्यांचे पुनः अन्तादि यमक साधून सहा, आद्यन्त यमकामुळें सहा व अर्धावृत्ति यमक मिळून तेरा भेद होतात. याशिवाय प्रत्येक चरणांत आदिमध्य, आद्यन्त व मध्यान्त अशीं यमकें होतात. रुद्रट

म्हणतो हे नियत देशावयवाचे प्रकार झाले. अनियतदेशावयवावरूनही असंख्य भेद होतील. दण्डीनें चरणाचा चतुर्थांश, अष्टमांश इत्यादि गणित न सांगतां भेद केले. रुद्रटानें गणिती भाषा वापरूनच भेद केले. त्यानें यमकाचा अगदींच कीस काढला आहे. रुद्रटापर्यंत या यमकांचा इतका गोंधळ झाला आहे कीं त्यानंतर या यमक-भेदांना प्रतिष्ठित अलंकारकर्त्यांनीं मान दिला नाहीं. मम्मटानें 'पादतद्भागवृत्ति तद्यात्यनेकताम्' असें म्हणून काम भागविलें आहे. काव्यप्रकाशाच्या वृत्तीत भेदकथनाचा निव्वळ आव आणला आहे.

रुय्यकानें तर (१) भिन्नार्थत्व (२) अनर्थकत्व (३) एकाचें अनर्थकत्व दुसऱ्याचें सार्थकत्व, असेच तीन भेद केले. पाठीमागच्या यमकाच्या अंदाधुंदींत काव्यरसाला फांटाच मिळून कांहीं अनर्थकत्वही आलें आहे असें दिसल्यावरून रुय्यकानें हे भेद केले असावे. ऊंस गोड लागला म्हणून मुळासकट खाल्ला तर मुळाला लागलेली घाण पोटांत जाऊन ऊंस नकोसा होईल, तद्वत् यमकप्रकार गोड लागल्यानें हवा तेवढा कोरल्याचा परिणाम म्हणजे त्या यमकांत नीरसपणा आला. विद्यानाथानें आदि, मध्य व अन्त हे तीनच भेद सांगून व विश्वनाथानें रुय्यकाची कांस धरून यमकाकडे कानाडोळा केला. अशा रीतीनें यमकाकडे वळलेली लोकांची फाजील प्रवृत्ति नाहींशी होऊन पुनः यमकास त्याला योग्य इतकेंच स्थान अलंकारांत मिळालें.

## २ अनुप्रास.

१५. भरतानें यमकाचीं दहा रोपें लावलीं त्यांपैकीं मालायमकावर अनुप्रासाचें कलम जोरानें वाढलें. त्याचा कर्णांना लागणारा कोमलपणा इतका आनन्ददायक झाला कीं भामहानें त्याला सवता सुभा देऊन त्याचें नांव 'अनुप्रास' हें ठेविलें. प्रास् ह्मणजे फेंकणें यावरून अनुप्रास 'पुनः पुनः एकाचीच फेंक' असा अर्थ झाला. कारंज्यांतून एकच पाणी, पण सूर्यकिरण मिसळल्यानें नानाविध रंगाचे तुषार, त्यांतूनच दिसतात त्याचप्रमाणें एकच व्यंजन पण विविध रूपांत नटल्यानें विशेष माधुरी येणें यालाच अनुप्रास ह्मणावयाचें. भामहाची अनुप्रासाची व्याख्या, 'सरूपवर्णविन्यासमनुप्रासं प्रचक्षते'[1] अशी आहे. सारख्या वर्णांची जुळणी अथवा न्यास ह्मणजे अनुप्रास. भामहानें वर्णांचा न्यास करतांना काय धोरण ठेविलें पाहिजे हें कांहींच सांगितलें नाहीं. पण त्याच्या उदाहरणावरून मात्र त्याला वर्णस्थान कळलें होतें पण तें व्याख्येंत स्पष्ट करतां आलें नाहीं. भाम-हाच्या अनुप्रासाचें उदाहरण पुढील होऊं शकेलः—

---

१ भा. लं. २·२५

पीतां मरंद उदरं-भर बंभराचें ।
जें होय सुंदरहि मंदिर इंदिरेचें ॥

दण्डीनें अनुप्रासांतील मर्म ओळखून अशी व्याख्या केली:—

वर्णा[2]वृत्तिरनुप्रासः पादेषु च पदेषु च ।
पूर्वानुभवसंस्कारबोधिनी यद्यदूरता ॥

'चरणांत अगर पदांत पूर्वीचा वर्ण कानांत गुणगुणतो आहे तोंच पुनः त्याची आवृत्ति करणें.' ही गोष्ट दण्डीनें भामहापेक्षां अधिक घातली. 'सरूपवर्णविन्यास' हा जो भामहाचा शब्द त्याचा उलगडा दण्डीनें अधिक केला आहे. सरूपवर्ण म्हणजे सवर्ण. 'तुल्या[3]ऽऽस्यप्रयत्नं सवर्णम्' या दृष्टीनें एकाच वर्गातील वर्ण हे सवर्ण होत. एकाच स्थानाहून निघणारे वर्ण हे सवर्ण होत. दण्डी म्हणतो कीं सरूपानुप्रास हा वैदर्भीयांना प्रिय आहे व अनुप्रासाची उत्पत्ति गौड देशांत आहे. गौडांना सरूपानुप्रास इतका प्रिय नाहीं. वैदर्भीयांना एकाच वर्गातील अथवा एकाच स्थानाहून निघणाऱ्या वर्णांचा न्यास आवडतो तर गौडीयांना एकच वर्ण पण पूर्वानुभवसंस्कारबोधि असा पाहिजे. दण्डीची व्याख्या गौडीयांच्या आवडीची आहे.

१६. उद्भटानें [4]सरूपव्यंजनन्यासं तिसृष्वेतासु वृत्तिषु ।
पृथक्पृथगनुप्रासमुशन्ति कवयः सदा ॥

अशी व्याख्या केली. परुषा, उपनागरिका व कोमला या वृत्तींत सदृशरूपी व्यंजनांचा पृथक् पृथक् निर्देश असणें याला अनुप्रास म्हणावें असें उद्भट सांगतो. स्वर जवळ जवळ आले असतां त्यांचा संधि होतो म्हणून उद्भटानें 'सरूप व्यंजन' असें पद घातलें व 'वर्ण' या शब्दानें स्वरांचाही समावेश होऊन येणारी अतिव्याप्ति टाळली.

वामनानें 'शेषः [5]सरूपोऽनुप्रासः' असें म्हटलें आहे. शेष म्हणजे एकार्थी अगर अनेकार्थी पद किंवा स्थान अनियत असणारें अक्षर या पदांचें किंवा सदृशत्व असलें म्हणजे अनुप्रास म्हणावें. पण वामनानें यमकाची व्याख्या करतांना दोन दगडींवर हात ठेविल्यानें तो अनुप्रासांत थोडा घसरला आहे. याच्या अनुप्रासाचीं उदाहरणें यमकाप्रमाणेंच वाटूं लागतात.

'[6]एकद्वित्रांतरितं व्यञ्जनमविवक्षितस्वरं बहुशः ।
आवर्त्यते निरन्तरमथवा यदसावनुप्रासः ॥

१७. रुद्रटानें अनुप्रासाची ही व्याख्या केली आहे. दण्डीच्या 'पूर्वानुभवसंस्कारबोधिनी अदूरता' असें म्हणण्यांत शंकाकुशंकांना अवसर मिळत होता. अनुभवसंस्कार हा सर्वांचा सारखा नसणार.कोणाला आपण पाळण्यांत पडून,रडून रडून,आईचा

---

१ नवनीत नलदमयंती ३२  २ का. द. १-५५  ३ सि. कौ.  ४ का. सा. सं. १-७
५ का. लं. सू. ४.१.८  ६ का. लं. २.१८

कसा छळ केला हेंही आठवेल; तर कोणाला आपल्या नांवाचीही स्मृती रहाणार नाहीं. वर्णसंबंधीं आठवणीच्या अशाच पेंचांत रसिक सांपडूं नये म्हणून ' एक अथवा दोन वर्णांच्या अंतरानें कोणत्याही स्वरानें युक्त व्यंजन पुष्कळदां आवृत्त झालें अथवा निरन्तर आवृत्त झालें तर अनुप्रास होतो ' असें म्हणून ' पूर्वानुभवसंस्कारा'चें छापील माप रुद्रटानें केलें.

मम्मटानें 'वर्णसाम्यमनुप्रासः ' अशा शब्दांनीं व्याख्या उरकून घेतली; पण ' वर्ण ' या शब्दानें स्वर व व्यंजन दोन्हींही सूचित होऊन भामहदण्डींवर आलेला अतिव्याप्तीचा दोष यांत पुनः येतो. रुय्यक व विद्यानाथ यांनीं अनुप्रासाची व्याख्या न करतां त्याच्या पोटभेदांची व्याख्या करूनच हात मोकळे केले. विश्वनाथानें ' अनुप्रासः शब्दसाम्यं, वैषम्येपि स्वरस्य यत् ' असें म्हणून ' वर्ण ', ' व्यंजन ' या शब्दांची उचलबांगडी व ' शब्दाची ' स्थापना यापेक्षां विशेष पालट केला नाहीं. यमकाप्रमाणेंच अनुप्रासाचें खरें माप रुद्रटाच्या वेळेपर्यंत ठरत आलें. तारुण्यांत विचारांची वाढ व वार्धक्यांत विचारांचा कायमपणा येतो तद्वत् यमक—अनुप्रासांचें तारुण्य रुद्रटापर्यंत होतें. पुढें त्यांच्यांत स्थैर्य आलें. अनुप्रासाच्या उदाहरणाच्या बाबतींत चूकभूल होण्याचा विशेषसा संभव नाहीं. सर्वांचें अनुप्रासाचें उदाहरण वर प्रारंभीं दाखविलेल्या उदाहरणासारखेंच असणार. आतां या अनुप्रासाच्या उपभेदांचा विचार करूं:—

**१८.** भरताचें मालायमक तोच अनुप्रास धरला तर आम्रेडित यमकांतही पुढील एका अनुप्रासभेदाची छटा दिसते. भरताच्या आम्रेडिताचें उदाहरण मागील यमक प्रकरणांत, ' म्हणतसे मम कर्म पहा पहा, ' इ. दिलें आहे, तेंच भामहाच्या लाटानुप्रासाचें होईल. व मालायमक भामहाचा ग्राम्यानुप्रास होईल. संदष्ट यमकही भामहाचा लाटानुप्रास होऊं शकेल. भामहानें ग्राम्यानुप्रास व लाटानुप्रास हे दोनच प्रकार केले आहेत. दण्डीनें अनुप्रासाचे भेद केले नाहींत यावरूनही भामहानंतर दण्डी असता तर कदाचित् त्यानें भामहाचे भेद घेऊन आणखी आपले दोन-चार भेद घातले असते असें वाटतें.त्यानें फक्त जातां जातां दाक्षिणात्यांना काठिन्य अथवा शैथिल्य ज्या अनुप्रासरचनेंत असेल ती रचना आवडत नाहीं असें सांगितलें आहे. दण्डीनें अनुप्रासाचा विचार न करण्याचें कारण आणखीही एक संभवनीय आहे. यमकाचे इतके भेद केल्यानंतर अनुप्रासभेदाला वाव मिळणेंही कदाचित् अशक्य झालें असेल.

**१९.** आतां उद्भटाकडे वळलें असतां असें दिसून येईल कीं, त्यानें यमकाला फांटा दिला खरा,पण आवडता जिन्नस वाढायला आणला असतां नजरचुकीनें किंवा इतर कारणांनीं ' नको ' म्हटल्यावर निरनिराळ्या युक्त्यांनीं तो पदार्थ आपल्या पानांत येईल असें करावें तद्वत् उद्भटाची स्थिति झाली असावी. म्हणून

---

१ का. प्र. ९·१०४ २ सा. द. १०·३

त्यानें अनुप्रासाभोंवतीं घिरट्या घालून शेवटीं यमकापैकीं थोडा भाग आपलासा केला. यानें १ छेकानुप्रास २ परुषावृत्तिसंश्रयी ३ उपनागरिकासंश्रयी ४ ग्राम्यावृत्तिसंश्रयी ५ लाटानुप्रास असे पांच भेद केले. लाटानुप्रासाचे पुनः पांच उपभेद झाले.




१०. छेकानुप्रासांत दोन दोन स्वरव्यंजनांचा सुसदृश उच्चार होतो या दृष्टीनें हें यमकच पण छेकानुप्रासांत स्थान यमकासारखें निश्चित नसतें व तोच वर्णसमूह नसतो. केवळ सदृश भासणाऱ्या वर्णसमूहाचा पुनरुच्चार छेकानुप्रासांत होतो. दण्डीनें वैदर्भीयांना कर्णमधुर वाटणारा अनुप्रास किंचित् अशाच रीतीनें वर्णिला आहे. परुषावृत्तिसंश्रयी अनुप्रास म्हणजे शकार, षकार, रेफसंयोग, ट वर्ग इ. वर्णव्यवहार ज्यांत आहे असा अनुप्रास. उदाहरणः—

[1]शोण-गिरिः-मुख-बाण प्राणभृद्दीड्यार्क-सूनुच्या अमळा ।

उपनागरिकावृत्तींत, त्याच वर्णांनीं जोडाक्षर होणें व अनुनासिकें ज्यांत आहेत अशा पहिल्या २५ व्यंजनांपैकीं कोणतींही संयुक्त असणें अशी स्थिति असते. या वृत्तीचा आश्रय घेणारा अनुप्रास तो उपनागरिकावृत्तिसंश्रयी होय. उदाहरणः—

[2]हे मंद-मंद-पद सुंदर कुंद-दंती
चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दंती ॥

ग्राम्यानुप्रासाचें उदाहरण भामहाच्या ग्राम्यानुप्रासाचें होईल किंवा दुसऱ्या शब्दांत भरताच्या मालायमकाचें होईल. त्याचें उदाहरण 'लोलोल्लोलीं' इ. यमकप्रकरणीं दिलेंच आहे. यानंतर लाटानुप्रासाकडे पाहिल्यास उद्भटानें यमकाची तहान या प्रकारांत पूर्ण भागविल्यासारखी दिसते. याचा लाटानुप्रास म्हणजे अर्थ विशेष निराळा नसतांही तात्पर्यभेदानें शब्द अथवा पद यांची पुनरुक्ति होय. लाटानुप्रासाचे पांच भेद वर सांगितले आहेत. आतां त्यांचीं उदाहरणें पाहूं:—

१ मो. कर्णपर्व २०५. २ नवनीत—नळदमयंती ८४.

१ दोन स्वतंत्र पदांत येणाराः—

रीम राम असा भासे जानकी जानकी सती ।

२ स्वतंत्र चरणांत येणाराः-- ( फेरक करून )

आजि यथामति अज्ञ कवी करी
विदितवर्ण-नगोचित-वर्णन ।
सरस वा रस-वारित तें जरी
विदित वर्णन गोचित वर्णन ॥

३ एका स्वतंत्र पदानें व एका अवलंबी शब्दानें होणाराः—

कमला कमलाकांताचित्तहारि सुहासिनी ।

४ दोन स्वतंत्र पदांत अवलंबी शब्दांनीं होणाराः—

धराकन्या जगत्पद्मा पद्माक्षी कंबुकंधरा ।

५ एकाच सामासिक पदांत अवलंबून असणाऱ्या दोन शब्दांनी होणाराः—

म्हणे श्रीरामरमणी रमणीसदृशा प्रिया ।

या उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं यांचें यमकांशीं बरेंच साम्य आहे. व उद्भटानें यमकाची हौस अनुप्रासांत पुरविली आहे. वामनाचा मात्र अनुप्रासयमकांच्या खेंचाखेंचींत अगदा गोंधळ झाला आहे, आणि दोघांनाही तो संभाळूं पहात आहे असें वाटतें. यमकाचे जसे आदिमध्यान्त भेद तसेच त्यानें अनुप्रासाचेही केले आहेत. ते भेद पाहिले तर त्यांचीं उदाहरणें अगदीं यमकासारखीं वाटतात. याचें कारण एकच कीं यमक हें अक्षरावृत्ति किंवा पदावृत्ति यामुळें होतें असें त्यानें म्हटलें आहे.

२१. रुद्रटानें आपला व्याप बराच पसरला आहे. त्यानें एकंदर पांच वृत्ति मानल्याः मधुरा, प्रौढा, परुषा, ललिता व भद्रा या वृत्तींचा आश्रय घेणारे निरनिराळे अनुप्रास त्यानें सांगितले. मधुरावृत्तिसंश्रयी अनुप्रासः—क, च, ट, त, प यांच्याबरोबर वर्गान्त असणें, लकाराशीं लकार युक्त असणें, रेफ व णकार ऱ्हस्व स्वरांनीं अंतरित असणें, हीं या अनुप्रासाचीं लक्षणें आहेत. रुद्रट म्हणतो कीं रेफ व णकार हे युक्तीनें दोन किंवा तीन वेळच घालावे व वर्ग्य पांचांहून अधिक वेळां घालूं नये, नाहींतर माधुर्यभंग होईल.

प्रौढावृत्ति संश्रयी अनुप्रासः— क, च, त, प हे वर्ग्य, यकार, व णकार, हे शिरोभागीं रेफांनीं संयुक्त असणें, ककार व तकार यापुढें रेफ येणें यामुळें हा अनुप्रास होतो.

---

१ स्वकृत. २ का. दो. हिमालयवर्णन. ३-४-५ मोरोपंतांत जवळ जवळ सर्व फरक करून.

परुषावृत्तिसंश्रयी अनुप्रासः–सर्व तऱ्हेच्या वर्णापुढें सकार येणें, त्याचप्रमाणें र, ण, यांचा त्यांच्याशीं संयोग असणें, हकार, श, ष इत्यादिकांचा उपयोग असणें, यायोगें हा अनुप्रास होतो. रुद्रट ह्मणतो या वृत्तीचा आश्रय करूं नये, केल्यास हकार सोडावा.

ललितावृत्तिसंश्रयी अनुप्रासांत, घ, ध, भ, रेफ, सकार हे लघु असतात व लकार दुसऱ्या वर्णाशीं संयुक्त नसतो. भद्रावृत्तिसंश्रयी अनुप्रासांत वरील चार प्रकारच्या अनुप्रासांतून उरलेले वर्ण असतात. या प्रत्येक वृत्तींत अनेक वर्णाबद्दल सांगितलें असलें तरी त्यामुळें अनुप्रासास एकवर्णाश्रयी म्हणण्याला दोष येत नाहीं. कारण त्यामुळें अनेक अनुप्रास साधून उलट सौंदर्यवृद्धि होईल असें रुद्रट म्हणतो.

**२२.** मम्मटानें अनुप्रासाचे दोन भेद केलेः छेकानुप्रास व वृत्त्यनुप्रास. छेकानुप्रासांत अनेक व्यंजनसमूहांचें एकवार सादृश्य असतें व वृत्त्यनुप्रासांत एक किंवा अनेक व्यंजनसमूहांचें दोन अगर अधिक वेळां सादृश्य दिसतें. यानंतर उपनागरिका, परुषा व कोमला या वृत्ति सांगून त्यानें लाटानुप्रास सांगितला.[१] (१) अनेक पदांनीं (२) एकपदानें (३) समासांत (४) समासेतर ठिकाणीं (५) समासांत अगर समासेतर ठिकाणीं, एका प्रातिपदिकाचें ( पदाचें नव्हे ) साम्य असणें, अशा पांच स्थितींवरून मम्मटानें लाटानुप्रासाचे पांच भेद केले.

रुय्यकानें छेकानुप्रास व वृत्त्यनुप्रास सांगून उद्भट व मम्मट यांच्याप्रमाणें लाटानुप्रास हा स्वतंत्र मानला आहे. विद्याधरही यांहून जास्त भेद मानीत नाहीं. रुय्यकानें उपनागरिकेला मध्यमा असें म्हटलें आहे. याच्या छेकानुप्रासांत व मम्मटाच्या छेकानुप्रासांत फरक आहे. मम्मटानें उदाहरण जरी दोनच व्यंजनसमूहांचें सादृश्य दाखवून दिलें आहे. तरी व्याख्येंत 'अनेक' असा शब्द घातला आहे व टीपेंतही दोन व्यंजनसमूह असा उल्लेख केला नाहीं. रुय्यकानें ' सङ्ख्यानियमे पूर्वं छेकानुप्रासः ' अशी व्याख्या करून टीकेंत, दोन व्यंजनांच्याच समूहांत परस्पर सादृश्य असणारे पुष्कळ व्यंजनसमूह असणें म्हणजे छेकानुप्रास असें म्हटलें आहे.

**२३.** या एकंदर प्रकारावरून आपणांस असें दिसून येईल कीं यमकाचें क्षेत्र आदि मध्य व अन्त इतकें आकुंचित करून, बाकी येणारा सर्व मुद्देमाल अनुप्रासाच्या खातीं जमा करून टाकण्याकडे प्रवृत्ति आहे. झालें हें एका अर्थी बरोबर आहे; कारण दण्डी–रुद्रटासारखे आणखी कोणी गणिती अलंकारकर्ते असते तर त्यांनीं मति गुंग होऊन जाईल इतके प्रकार केले असते. केवळ यमकें जुळविण्याच्या नादीं लागल्यानें पुढें पुढें काव्याचा आत्मा नाहींसा होऊन शृंगारिलेलें मढें जसें दिसावें तशी कविता दिसली असती, म्हणून यमक व अनुप्रास यांकडे शास्त्रज्ञांची प्रवृत्ति कमी झाली हें योग्यच झालें.

---

१ अ. सू. ४.

# ३ पुनरुक्तवदाभास

२४. जुन्या नव्याच्या घर्षणांत कांहीं उपपक्ष निघूं लागतात. तद्वतच यमक अनुप्रासाच्या घासाघिशींतून पुनरुक्तवदाभास बाहेर पडला. याचा उत्पादक उद्भट होय. उद्भटापूर्वी भामहानें व दण्डीनेंही सहज असें म्हटलेलें आढळतें कीं,

[१]अनुकम्पाद्यतिशयो यदि कश्चिद्विवक्षते ।
न दोषः पुनरुक्तोऽपि प्रत्युतेयं अलंक्रिया ॥

भावनांचा अतिशय दाखविण्यासाठीं पुनरुक्ति झाल्यास तो दोष न होतां उलट अलंकारच होईल. पण भामहदण्डीची ही सूचक अलंक्रिया व उद्भटाचा पुनरुक्तवदाभास यांत अंतर आहे. पुनरुक्तिमध्यें तोच शब्द त्याच अर्थी पुनः येतो तर पुनरुक्तवदाभासांत दोन शब्द निरनिराळे दिसतात पण अर्थ सारखाच आहे असा आभास होतो. उद्भटाकडे या अलंकाराचें जनकत्व दिलें तरी दण्डीनें हा अलंकार सूचित केला आहे असें वाटतें.

उद्भटः-पुन[२]रुक्तवदाभासमभिन्नवस्तिवबोद्भासि भिन्नरूपपदम् ॥

भिन्न रूप असणाऱ्या दोन पदांचा अर्थ एकच भासतो तेव्हां पुनरुक्तवदाभास अलंकार होतो. या अलंकाराला पुढें फारसा मान मिळाला नाहीं तरी त्याला काढून टाकण्याचें धैर्य कोणास झालेलें दिसत नाहीं.

मम्मटः—पुनरु[३]क्तवदाभासो विभिन्नाकारशब्दगा । एकार्थतेव
रुद्रटः—आमु[४]खावभासनं पुनरुक्तवदाभासम ॥
विद्याधरः—पुन[५]रुक्तवदाभासो भवति प्रमुखावभासनं द्वेधा ।

या सर्व व्याख्यांत शब्दांच्या आलटापालटीपेक्षां अधिक कांहीं झालेलें दिसत नाहीं. सभङ्ग शब्द, अभङ्ग शब्द व शब्दार्थ असे याचेही तीन भेद पुढें पाडले पण त्यांत विशेष असें कांहींच नाहीं.

पुनरुक्तवदाभासाचें उदाहरणः—

[६]जाय तो रडत दाटत कंठ प्राप्त होय मजला दशकंठ
पद्मिनी उपडुनी गज हस्तीं ने तसा उचलुनी मज हस्तीं ।

येथें सकृन् दर्शनीं गज व हस्ती या शब्दांचे स्वरूप पाहतां त्यांचा एकच अर्थ असेल असा भास होतो म्हणून हा पुनरुक्तवदाभास झाला.

---

१ का. द. ४-१४. २ का. सा. सं. पान २. ३ का. प्र. ९'१२२ ४का. लं. १४'३
५ ए.७'१ ६ वामन

## ४ चित्र.

१५. चित्र या शब्दानेंच या अलंकाराच्या अर्थावर चांगला प्रकाश पडतो. शब्दालंकारांत प्रथम यमक हा एकच अलंकार असतां, अनुप्रासाचे व यमकाचे असंख्य भेद निर्माण झाले. याचा परिणाम पुढें असा झाला कीं अर्थहीनता जास्त वाढत गेली. अर्थहीनता आल्याबरोबर पुष्कळांना चरणांतील हा अनेक प्रकारचा सारखवटपणा पाहून या शब्दांस अनेक आकार देतां येतील असें वाटूं लागलें. अर्थाची माती झाल्यावर त्या मातीचें कांहींही बनवितां येईल. त्या मातीचा गोळा मनाजोगा वाटेल तेथें ठेवावा. कधीं गणपति बनेल तर कधीं माकड बनेल. तद्वतच शब्दालंकारांत एकदां अर्थहानि सहन होऊं लागल्यावर कित्येकांनीं शब्दांचा चिखल बनवून मनाला वाटेल तो पदार्थ तयार करण्यास सुरवात केली.

या चित्रकाव्याचा आद्यनिदर्शकही दण्डीच. यानें गोमूत्रिका, अर्धभ्रम, सर्वतोभद्र, प्रहेलिका हे प्रकार मानले पण त्यानें 'चित्र' असा शब्द वापरला नाहीं किंवा 'वर उल्लेखिलेले बंध आणखीही कांहीं बंधनें वाढवतील' असेंही म्हटलें नाहीं. रुद्रटानें

भङ्ग्यंतरकृततत्क्रमवर्णनिमित्तानि वस्तुरूपाणि ।
सांकानि विचित्राणि च रच्यंते यत्र तच्चित्रम् ॥[1]

अशी चित्राची व्याख्या केली व चक्र, खड्ग, मुसल, धनुष्य, बाण, शक्ति इत्यादि भेद होतील असें म्हणून दिङ्मात्रदर्शनासाठीं लांचलचक उदाहरणेंही दिली आहेत. उद्भटानें अलंकारांचीं खेळणीं करून त्यांची किंमत कमी केली नाहीं. वामन तर वैराग्यासारखा सर्वच व्याख्यांचा संसार सुटसुटीत करूं पहातो. मग त्याला हे बाहुल्यांचे दागिने पसंत असणें शक्य कसें ?

मम्मटानें 'तच्चित्रं[2] यत्र वर्णानां खड्गाद्याकृतिहेतुता' असें म्हणून कांहीं भेद दाखविले आहेत; पण काव्यप्रकाशाच्या वृत्तींत 'संभविनोऽप्यन्ये प्रभेदाः शक्तिमात्रप्रकाशका न तु काव्यरूपतां दधतीति न प्रदर्श्यन्ते' असें म्हणून हा काव्याचा खेळखंडोबा आहे असें स्पष्ट दिग्दर्शित केलें आहे.

रुय्यकः— वर्णानां[3] खड्गाद्याकृतिहेतुत्वे चित्रम्
जयदेवः—काव्यवित्प्रवरैश्चित्रं[4] खड्गबन्धादि लक्ष्यते

विद्याधर हा टीकेंत स्वरचित्र हें बंधनशैथिल्य आहे तें अलंकार म्हणून स्वीकारलें नाहीं तरी चालेल असें म्हणतो. रुय्यकानें बंधाची उदाहरणें दिलीं नसलीं, तरी त्याला चित्र हा शब्दालंकार विशेष वाटतो; कारण त्यानें त्याचें मंडन केलें आहे. पुढील लोकांनीं गतानुगतिकत्व पत्करून चित्राला मान्यता दिली आहे. या चित्रालंकाराचीं उदाहरणें अनेक तऱ्हांचीं आहेत किंवा होऊं शकतील पण केवळ निदर्शन म्हणून आपण एकच उदाहरण घेऊन या अलंकाराबद्दलचा विचार पुरे करूं.

---

१ का. अ. ५.१. २ का. प्र. ९-१२१ ३ अ. स. १० ४ चं. लो. ५-९

पुढील उदाहरण अम्लानपंकजमालेचें आहेः—

द्विरदरद रणीं करकर करती । उरगरयरवें शर थरथरती ।
स्थिरचर हरणातुर झर पुरता ॥ हरहर ! धरणीवर तर परता ॥ सा. व. वि. १३·५३



# प्रकरण ५ वें

## उभयालंकार

### १ श्लेष.

१. श्लेष हा अलंकार असा आहे कीं त्याची शब्दालंकारांत गणना करावी कीं अर्थालंकारांत करावी, यासंबंधीं अलंकारशास्त्रांत बराच मतभेद झालेला आहे. श्लेष हा शब्द प्रथमतः मुळींच प्रचारांत नसून श्लिष्ट हा शब्द प्रचारांत होता. श्लेष म्हणजे चिकटणें, जुळणें, जोडणें. यावरून ज्यांत जुळण्याचा गुण आहे तो श्लिष्ट असा अर्थ होईल. ओघानेंच ज्यांत शैथिल्य नाहीं तो श्लिष्ट असा अर्थ झाला. भामहानें प्रथमतः श्लिष्टाची व्याख्या केली पण त्यानें श्लिष्टांवर फारसा भर दिलेला नाहीं. त्याची व्याख्याः—

उपमानेन यत्तत्त्वमुपमेयस्य साध्यते ।
गुणक्रियाभ्यां नाम्ना च श्लिष्टं तदभिधीयते[1] ॥

गुण, क्रिया व नांव यांत उपमान व उपमेयाचा एकरूपपणा साधन असेल तेव्हां श्लिष्ट अलंकार म्हणतात, पण नुसती एवढीच व्याख्या दिल्यानें रूपक व श्लिष्ट यांत कांहींच भेद उरणार नाहीं असें वाटून भामह म्हणतोः—

लक्षणं रूपकेऽपीदं लक्ष्यते काममत्र तु ।
इष्टः प्रयोगो युगपदुपमानोपमेययोः[2] ॥

म्हणजे रूपकांत श्लिष्टासारखीच स्थिति दिसली तरी श्लिष्टांत उपमान व उपमेय यांच्यांत एकाच वेळीं स्थानभेद होऊं शकतो म्हणजे मनाप्रमाणें कोणतेंही उपमान व कोणतेंही उपमेय गणितां येतें. याचें उदाहरण भामहाच्या म्हणण्याप्रमाणें असें देतां येईलः--

मित्रांग[3]-स्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधु ।
लोचन-पद्मापासुनि गळती प्रेमाश्रूंचे बिंदु ॥

यांत लोचन कसे तर पद्मासारखे असेंही म्हणतां येईल, किंवा लोचन हेंच पद्म असेंही म्हणतां येईल. रूपकांत उपमेय व उपमान यांच्या स्थानांची अशी आलटापालट करतां येणें शक्य नाहीं. भामहानें श्लेषाची व्याख्या डळमळीत ठेवली असें वाटतें, पण दण्डीनें,

---

१ भा. लं. ३.१४ २ भा. लं. ३.१५ ३ नवनीत-पृथुकोपाख्यान २५

श्लिष्टमिष्टमनेकार्थमेकरूपान्वितं वचः ।
तदभिन्नपदं भिन्नपदप्रायमिति द्विधा ॥

असें म्हणून अनेकार्थी व एकरूपी असणारें जें पद त्याला श्लिष्ट ह्मणावें अशी व्याख्या केली. रूपकांत दोन्हीं पदें म्हणजे उपमान व उपमेय हीं दोन्हीही उक्त असतात, तशीच श्लिष्टांत ठेविल्यानें भामहाच्या व्याख्येनें झालेला घोंटाळा दण्डीनें आपल्या व्याख्येंत नाहींसा केला. दण्डीनें श्लिष्ट हा शब्द काव्यांतील दशगुणांपैकीं एक या अर्थीही वापरला आहे व त्याच्या व्याख्येंत 'श्लिष्टमस्पृष्ट-शैथिल्यम्' म्हणजे ज्यांत शैथिल्य नाहीं तो श्लिष्ट होय असें दण्डीनें म्हटलें आहे. पण श्लिष्टालंकाराची व्याख्या त्यानें अर्थालंकारांतच दिली आहे, हें लक्षांत घेतलें पाहिजे.

१. उद्भटानें श्लिष्टाची व्याख्या अधिक कोरून रेखीव केलीः—

एकप्रयत्नोच्चार्याणां तच्छायां चैव बिभ्रताम् ।
स्वरितादिगुणैर्भिन्नैर्बन्धः श्लिष्टमिहोच्यते ॥

( १ ) एकसारखाच उच्चार होणाऱ्या पण अर्थानें भिन्न असणाऱ्या शब्दांचा मिलाफ व ( २ ) ज्यांचा उच्चार सारखा आहे असें वाटतें पण स्वर, प्रयत्न इत्यादींनीं ज्यांत वस्तुतः फरक असतो अशा शब्दांचा मिलाफ, या प्रकारांस श्लिष्ट ह्मणावें असें उद्भट ह्मणतो. पहिल्या प्रकाराचें उदाहरणः—

³आर्येला मानियले बहु पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला ।
खळचि न मानिति तैसें, बहु दूषण सज्जनीच मत्कृतिला ।।

दुसऱ्या प्रकाराचें उदाहरणः—

⁴म्हणोनि कवितासुता तुज समर्पितों, साजरी
नसे बहु तशी गुणी कनकपीतवासा जरी ।
तरी न इतरा वरी हरि करीं इला किंकरी;
मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त जैसा करी ॥

पहिल्या उदाहरणांत 'आर्या' शब्दाचे सम उच्चार करूनही 'स्त्री' व 'आर्या-छंद' असे दोन अर्थ होतात. दुसऱ्या उदाहरणांत 'निजात्मजा–आग्रह' व 'निजात्मजा–ग्रह' अशीं दोन तऱ्हेचीं पदें पडूं शकतील. त्यामुळें 'निजात्मजेच्या आग्रहापासून मुक्त' व 'निजात्मजा हाच ग्रह त्यापासून मुक्त' असे दोन अर्थ होतील. यांत वस्तुतः स्वरितानें भेद असतांही तो भासत नाहीं पण अर्थ निराळा होतो.

---

१ का. द. २.३१० २ का. सा. सं. ४-५० ३ मो. सभापर्व ५-११५
४ मो. केकावली. ३३

३. वामनानें प्रथमच श्लेष हा शब्द प्रचारांत आणला. 'घटना श्लेषः' 'मसृणत्वं श्लेषः' 'सधर्मेषु तन्त्रप्रयोगे श्लेषः' अशा श्लेष या शब्दाच्या निरनिराळ्या तीन व्याख्या निरनिराळ्या काव्यांगांसाठीं त्यानें केल्या आहेत. (१) 'घटना श्लेषः' म्हणजे रचनेंत कौटिल्य नसणें. हा अर्थगुणांपैकीं एक गुण आहे त्यासाठीं श्लेष हा शब्द वापरला आहे. (२) 'मसृणत्वं श्लेषः' पुष्कळ पदें असतांही तीं एकाच पदासारखीं वाटावींत इतकी सन्धींत स्निग्धता असणें हा काव्यगुण होय. त्या काव्यगुणासाठीं श्लेष हा शब्द वापरला आहे. (३) उपमेयाचे ठिकाणीं असणारे गुण, क्रिया, शब्दरूप जे धर्म त्यांच्याशीं एकरूप असा उपमानाचा संबंध असणें याला श्लेष असें म्हणावें हें सांगण्यासाठीं अर्थालंकार प्रकरणांत श्लेष हा अलंकार त्यानें सांगितला आहे. वामनाची व भामहाची व्याख्या शब्दशः निराळी असली तरी अर्थानें एकच आहे.

४. रुद्रटानें शास्त्रीय रीत्या अर्थालंकारांचे चार वर्ग केले त्यांपैकीं एक अलंकारवर्ग श्लेषावर अधिष्ठित आहे. शिवाय शब्दालंकारांत तो शब्दश्लेष देतोः--

वक्तुं समर्थमर्थं सुश्लिष्टाक्लिष्टविविधपदसंधि ।<br>युगपदनेकं वाक्यं यत्र विधीयेन स श्लेषः ॥

यानें स्पष्टच अशी व्याख्या केली कीं, निरनिराळा पदसंधि सुश्लिष्ट व अक्लिष्ट असा असून तो एकाहून अधिक अर्थ निर्माण करीत असेल तर तो श्लेष होईल. यावरून यानें शब्दश्लेष हा पदसंधीवर अधिष्ठित आहे म्हणून तो शब्दालंकार असें म्हटलें आहे. यानंतर रुद्रटानें,

यत्रैकमनेकार्थैर्वाक्यं रचितं पदैरनेकस्मिन् ।<br>अर्थे कुरुते निश्चयमर्थश्लेषः स विज्ञेयः ॥

अशी अर्थश्लेषाची व्याख्या केली आहे. 'अनेकार्थी असणाऱ्या पदांनीं रचलेलें एक वाक्य अनेक अर्थ सांगेल तेव्हां अर्थश्लेष होतो.' असें सांगून त्यावर अधिष्ठित असे अलंकार त्यानें दिले आहेत. एकंदरींत रुद्रटानें श्लेष हा शब्दालंकार व अर्थालंकार अशा दोन तऱ्हांनीं वर्णिला आहे.

५. वामनादिकांनीं श्लेष हा अर्थगुण व काव्यगुण मानला आहे. पण मम्मटानें त्याला विरोध केला आहे. तो माधुर्य, ओज व प्रसाद हे तीनच गुण मानतो. मम्मटानें श्लेष हा शब्दालंकार व अर्थालंकार अशा दोन प्रकरणांत सांगितला आहे. त्याची शब्दश्लेषाची व्याख्याः--

---

१ का. सू. ३-२-४ २ का. सू. ३-१-११ ३ का. सू. ४-३-७<br>४ कां. लं. ४-१ ५ का. लं. १०-१

वाच्यभेदेन भिन्ना यद् युगपद्भाषणस्पृशः ।
श्लिष्यन्ति शब्दाः श्लेषोऽसावक्षरादिभिरष्टधा ॥

'अर्थानें भिन्न असणारे शब्द एकदम उच्चारल्यामुळें निराळ्या स्वरूपाला प्राप्त होत असतील तेव्हां शब्दश्लेष होतो.'

'श्लेषः[2] स वाक्य एकस्मिन् यत्रानेकार्थता भवेत्'

म्हणजे एकाच वाक्यांत अनेक अर्थ जेव्हां होतील तेव्हां श्लेष म्हणतात ही मम्मटाची अर्थश्लेषाची व्याख्या होय. उद्भटाच्या श्लेषाचीं दोन्हीं उदाहरणें विशेषतः दुसरें उदाहरण मम्मटाच्या शब्दश्लेषाचें होईल. अर्थश्लेषाचें उदाहरण पुढें घेऊं.

'विशेषस्यापि साम्ये द्वयोर्वोपदाने श्लेषः[3]'

रुय्यक श्लेषाची व्याख्या अशी करतो. विशेषणांतच केवळ नव्हे तर विशेष्यांतही साम्य असल्यास श्लेष होतो असें रुय्यक म्हणतो. विद्याधर 'विशेष्यविशेषणसाम्यं स श्लेषः[4]' असें म्हणून रुय्यकाचेंच अनुकरण करतो.

६. विश्वनाथ 'श्लिष्टैः पदैरनेकार्थाभिधाने श्लेष[5] इष्यते' अशी शब्दश्लेषाची व्याख्या करतो व 'शब्दैः स्वभावादेकार्थैः श्लेषोऽनेकार्थवाचनात्[6]' अशी अर्थश्लेषाची व्याख्या करतो. 'स्वभावात्' या पदानें विश्वनाथानें शब्दश्लेष व अर्थश्लेष यांतील फरक स्पष्ट केला. स्वभावतः एकाच अर्थी असणारे शब्द जेव्हां स्पष्टपणें अनेक अर्थ निर्माण करतात तेव्हां अर्थश्लेष होतो. शब्दश्लेषांत, विशिष्ट शब्दाला महत्त्व असतें. तो शब्द नसून तदर्थी दुसरा शब्द घातला तर लगेच श्लेष नाहींसा होतो. अर्थश्लेषांत शब्दाला महत्त्व नसून अर्थाला असल्यानें विशिष्ट शब्द पालटून त्याच अर्थी दुसरा शब्द घातला तरी अर्थश्लेष कायम राहातो. विशिष्ट शब्द तदर्थी शब्द घालून कसाही पालटला तरी त्याचा स्वभावतः अर्थ एकच असतो म्हणून 'स्वभावादेकार्थैः' हे शब्द शब्दश्लेष व अर्थश्लेष यांत फरक दाखविण्यास महत्त्वाचे आहेत. याच्या व्याख्येंत मम्मटाचें अनुकरण दिसतें.

अप्पय्यदीक्षितः—— 'नानार्थसंश्रयः श्लेषो[7] वर्ण्यावर्ण्योभयाश्रितः'
जगन्नाथः—— 'श्रुत्यैकयानेकार्थप्रतिपादनं श्लेषः[8]'

अप्पयदीक्षित व जगन्नाथ हे शब्दश्लेष व अर्थश्लेष असे निराळे भेद मानून त्यांच्या व्याख्या करीत बसले नाहींत. अप्पय्यदीक्षित श्लेष हा अर्थालंकार असाच स्वतःचा अभिप्राय देतो. जगन्नाथानें वामनाप्रमाणें श्लेष हा काव्यगुण मानला आहे. असो. येथपर्यंत मूळ व्याख्या पाहिल्यावर आतां श्लेषभेदासंबंधीं विचार करूं:——

---

१ का. प्र. ९-११९ २ का. प्र. १०-१४७ ३ अ. सू. ३३ ४ ए. ८-२६
५ सा. द. १०-११ ६ सा. द. १०-५८ ७ कु. (२६) ६४ ८ र. गं. ३०९

७. दण्डीनें भिन्नपद व भिन्नपदप्राय असे दोन भेद मानले आहेत. त्यांचीं उदाहरणें अनुक्रमें उद्भटाच्या अर्थश्लेष व शब्दश्लेष यांसारखींच होतील. यावरून दण्डीनें अर्थश्लेष व शब्दश्लेष असे शब्द वापरले नसले तरी उद्भटाला ते शब्द वापरण्याची स्फूर्ति दण्डीमुळेंच झाली असण्याचा संभव आहे. उद्भटानें श्लेषाचे अर्थश्लेष व शब्दश्लेष हे दोन भेद केले आहेत. मम्मट त्याच दोन भेदांना अनुक्रमें अभङ्गश्लेष व सभङ्गश्लेष असें ह्मणतो; पण हे दोन्हीही भेद तो उद्भटाप्रमाणें अर्थालंकारांत न घालतां शब्दालंकारांत घालतो. मम्मटाच्या मतें 'काव्यमार्गे स्वरो न गण्यते' म्हणजे काव्यांत स्वर, प्रयत्न इत्यादिकांना महत्त्व देऊं नये; तर उलट पक्षी स्वरितांनीं निराळा शब्द निराळ्याच अर्थी निर्माण होतो म्हणून उद्भट त्या दोन्ही भेदांना अर्थालंकारांत घालतो. मम्मट म्हणतो कीं,

अर्थश्लेषस्य[1] तु स विषयः यत्र शब्दपरिवर्तनेऽपि न श्लेषत्वखण्डना ॥

एका शब्दाऐवजीं त्याच अर्थी दुसरा शब्द घातला तरीही श्लेषहानि होत नसेल तर त्यास अर्थश्लेष समजून अर्थालंकारांत त्याची गणना होते. पण श्लेषहानि होत असेल तर मात्र तो श्लेष शब्दावलंबी अर्थात् शब्दश्लेष व म्हणून शब्दालंकारांत मोडेल. 'सम उच्चार' व 'स्वरितादींनीं भिन्न उच्चार' यांकडेच उद्भट लक्ष देतो. मम्मट शब्दाचें स्थान कितपत निश्चित आहे हें पाहून, शब्दालंकार व अर्थालंकार यांत भेद करून शब्दश्लेष व अर्थश्लेष निराळे करतो. एकंदरींत शब्दालंकार व अर्थालंकार म्हणजे काय या मुळांतच दोघांचा मतभेद आहे. या दृष्टीनें पाहिलें असतां उद्भटाच्या श्लेषभेदांशीं मम्मटाचे श्लेषभेद जुळतात पण मम्मट अर्थालंकारांत घालण्यासाठीं निराळाच श्लेष मानतो. त्यांत शब्दाला महत्त्व नसून अर्थाला महत्त्व आहे. तदर्थी निराळा शब्द घालूनही श्लेषहानि होत नाहीं असा श्लेष त्यानें अर्थालंकारांत घातला. मम्मटाचें अभङ्गश्लेषाचें उदाहरण असें होईलः—

मित्रांप्तां[3] म्लानि देतो जरि अमृतरसालागिं हा चांद वीतो

यांत 'मित्र+आप्तां' अशाच पदें पाडून एकदां 'सूर्य-कमळें' आणि एकदां 'मित्र व आप्त' असे दोन अर्थ होतात.

मम्मटानें सभङ्गश्लेषाचे (१) वर्ण (२) पद (३) लिङ्ग (४) भाषा (५) प्रकृति (६) प्रत्यय (७) विभक्ति व (८) वचन असे आठ भेद केले आहेत. वर्णश्लेषाचें उदाहरणः—

पुँढतीं[4] दुष्ट जातांना महा मेळीं जनांचिया।
सुरम्यनगरीं, रामा दिव्यधामा विलोकती ॥

---

१ का. प्र. ५-९ २ का. प्र. पान ५२० ३ नवनीत-नलदमयंती ७८
४ मुक्तेश्वर. (फरकानें)

सुरम्य अशा नगरांत जनांच्या महामेळ्यांत पुढें जात असतां दुष्ट दिव्य-कांति रामाला **किंवा स्त्रियांना** पहातात. यांत राम व रामा यांच्या द्वितीयेनें ते शब्द आकारान्तच राहून अर्थ निराळा होतो.

( २ ) पदश्लेष म्हणजे एका शब्दाचीं भिन्न पदें पाडलीं असतां दोन अर्थ होणें याचें उदाहरण, उद्भटाच्या दुसऱ्या भेदाचें, ' मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त ' हें होऊं शकेल.

( ३ ) लिङ्गश्लेषः—वर्णश्लेषाचें उदाहरण देतांना ' रामा ' यांतील ' आ ' हा वर्ण द्वितीया दाखवित असून, अकारान्ताची किंवा आकारान्ताची विभक्ति एकच झाल्यानें तो ज्याप्रमाणें वर्णश्लेष होत आहे त्याचप्रमाणें ' राम ' शब्द पुलिंगी व ' रामा ' हा शब्द स्त्रीलिंगी असल्यानें तो लिङ्गश्लेषही होत आहे. याशिवाय त्यांत ( ४ ) वचनश्लेषही होत आहे. कारण ' रामा ' म्हणजे स्त्री किंवा स्त्रिया असाही अर्थ होत असल्यानें एकवचनी व अनेकवचनीं असे दोन्ही अर्थ निर्माण होतात.

विभक्तिश्लेषः—[1]प्रसिद्ध तुमचे महासदय पाय जीवांकडे—
चुकी म्हणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे

याचा 'अहो महासदय, तुमचे पाय जीवांकडे वांकडे होतील काय?' असा अर्थ केल्यास महासदय हें संबोधन होईल; ' अहो, तुमचे अत्यंत दयावंत असे चरण जीवांकडे वांकडे होतील काय ' असा अर्थ केल्यास विशेष्याची जी प्रथमा विभक्ति तीच महासदय या शब्दाचीही होईल. म्हणून हा विभक्तिश्लेष होतो.

प्रकृतिश्लेषः—[2]अयं सर्वाणि शास्त्राणि हृदि ज्ञेषु च वक्ष्यति ॥

यांत वक्ष्यति क्रियापदाचे वह् व वच् या दोन धातूंवरून ' धारण करील ' व 'सांगेल' असे स्वभावतःच दोन अर्थ असल्यानें हा प्रकृतिश्लेष झाला. याचप्रमाणें भाषाश्लेष व प्रत्ययश्लेष यांचींही उदाहरणें होतील. वर्णश्लेषाचे उदाहरणांतील 'सुरम्य नगरी ' या पदापुढील स्वल्पविराम काढून त्याऐवजीं तें विरामचिन्ह पहिल्या ओळीच्या शेवटीं ठेविल्यास, 'जनांच्या महामेळ्यांत दुष्ट पुढें जात असतां स्त्रिया दिव्यकांति असणाऱ्या रामाला पाहतात' असा अर्थ होऊन रामा शब्दाचा आ प्रत्यय द्वितीयेचा होईल. दिव्यकांति हें स्त्रियांचें विशेषण केल्यास तोच शब्द प्रथमेचा होऊन हें उदाहरण प्रत्यय श्लेषाचें होईल.

८. उद्भटाप्रमाणेंच, रुय्यकाच्या मतें अर्थश्लेष व शब्दश्लेष हे अर्थालंकारच आहेत. त्यानें ( १ ) प्रस्तुत ( २ ) अप्रस्तुत ( ३ ) प्रस्तुताप्रस्तुत असे तीन तऱ्हेचे अर्थ निष्पन्न होण्यावरून श्लेषाचे तीन भेद केले आहेत.

---

१ मो केका २ का. प्र. १७७.

( १ ) दोन्ही प्रस्तुतार्थ देणारा श्लेषः--

तीं शीतळोपचारीं जागी झाली हळूच मग बोले ।

औषध नलगे मजला परिसुनि जननी बरें म्हणुनि डोले ॥[1]

यांत 'नल हेंच औषध' व 'औषध न लगे,' असें म्हटलें तरी दोन्ही प्रस्तुनार्थच आहेत. म्हणून हा दोन्ही प्रस्तुतार्थ असणारा श्लेष झाला.

( २ ) कवी तव यशःकथा नव सुधानवद्या पिती[2]

या ठिकाणीं 'सुधा' हें अमृत अगर चुना यांपैकीं कोणत्याही अर्थी उपमानच होतें म्हणून हा दोन्ही अप्राकरणिक अर्थ सुचविणारा दुसरा श्लेष प्रकार होईल.

( ३ ) संपूर्ण ते समज यास्तव दक्षिणाशा ।

पाप्यांस दण्ड धरितो करितो विनाशा ।

देहीं जया मिरविते घन-कांति भारी ।

हा पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥[3]

येथें प्रस्तुतार्थ 'नल' असतांही 'यम' असा अप्रस्तुत अर्थ निघतो, म्हणून हा उभयश्लेष होय.

९. विद्याधरानें रुय्यकाचेंच अनुकरण केलें पण फक्त उभयश्लेष तो मानीत नाहीं.

किं चास्मिन् वाच्यत्वं विशेष्ययोस्तुल्ययोरेव ॥[4]

म्हणजे दोन्ही तुल्य विशेष्यें वाच्य असतात म्हणून उभयश्लेष संभवनीय नाहीं, असें विद्याधराचें मत आहे. विश्वनाथानें मम्मटाप्रमाणेंच सर्व भेद मानले आहेत, पण शब्दश्लेषाचे सभङ्ग, अभङ्ग येवढे मम्मटाप्रमाणें मुख्य असे दोनच भेद न मानतां हा उभयश्लेष हाही मुख्य प्रकार मानतो. सभङ्गाचे मम्मटाप्रमाणेंच आठ भेद तो करतो. अप्पय्यदीक्षितानें रुय्यकाप्रमाणें श्लेषभेद मानले आहेत व तो ते सर्व अर्थालंकारांत घालतो.

जगन्नाथानें ( १ ) अनेकधर्मपुरस्कारी ( २ ) एकधर्मपुरस्कारी असे दोन भेद केले आहेत. पुनः पहिल्या भेदाचे अनेक शब्दांनीं श्लेष निघणें व एकाच शब्दानें श्लेष निघणें असे दोन भेद होतात. यानें ( १ ) सभङ्ग ( २ ) अभङ्ग ( ३ ) शुद्ध हे इतरांनीं मानलेले भेद केले आहेत त्यांचे पुनः ( १ ) प्रस्तुत ( २ ) अप्रस्तुत (३) अप्रस्तुताप्रस्तुत असे तीन भेद होतात. पहिल्या दोन भेदांत 'विशेष्य' श्लिष्ट असून तिसऱ्यांत 'विशेषण' श्लिष्ट असतें. जगन्नाथही श्लेष-भेदांसह श्लेषाला अर्थालंकारांतच घालतो.

---

१ मो. केका. ५१ २ का. प्र. ३ नवनीत. नलदमयंती २०६. ४ ए. ८. २६.

एकंदरींत श्लेषाची शब्दालंकारांत व अर्थालंकारांत फारकत करणारा पहिला रुद्रट होय. व यासंबंधीं विवेचन पाहतां मम्मटाचें म्हणणें पुष्कळसें बरोबर दिसतें. मम्मट म्हणतो त्याप्रमाणेंच शब्दश्लेष असें म्हणावयाचें व अर्थालंकारांत त्यांची गणना करावयाची हें बरोबर वाटत नाहीं. कारण अशा रीतीनें पुष्कळच शब्दालंकार अर्थालंकारांत प्रवेश करूं लागतील. यानंतरचा मोठा वादाचा प्रश्न म्हणजे श्लेष हा अलंकारांशीं संकीर्ण असतां महत्त्वाचा कोणता अलंकार गणावा ?

१०. भामहानें श्लेष हा सहोक्ति, उपमा, हेतु इत्यादिकांत कसा येतो हें दाखविलें आहे. पण अशावेळीं श्लेष मुख्य मानावा कीं इतर अलंकार हें सांगितलें नाहीं. दण्डीही या बाबतींत मौनच धरतो. तरीही 'श्लेषः सर्वासु पुष्णाति' असें तो म्हणतो व इतर अलंकारांचे भेद मानतांना त्यानें श्लेषयुक्त निरनिराळे अलंकार सांगूनही त्या शिवाय स्वतंत्र शुद्ध श्लिष्टाची व्याख्या व उदाहरण दिलें आहे, यावरून इतर अलंकारांशी श्लेष संकीर्ण असतां तो श्लेषाला महत्त्व द्यावें असें म्हणत नसावा. उलट श्लेष हा सर्वांनाच माधुरी आणणारा आहे म्हणून प्रत्येक वेळीं श्लेषाचें महत्त्व गणण्याचें कारण नाहीं, असेंही त्याचें मत असण्याचा संभव आहे. पण हें केवळ अनुमान आहे या बाबतींत स्पष्ट लिहिणारा उद्भटच आहे. तो म्हणतो,

अलंकारान्तरगतां प्रतिभां जनयत्पदैः ।
द्विविधैरर्थशब्दोक्तिविशिष्टं तत्प्रतीयताम् ॥

म्हणजे उद्भटाच्या मतें श्लेष व इतर अलंकार यांच्या संकरांत श्लेष मुख्य गणावा. दण्डीच्या व्याख्यांतून पूर्वी सांगिलेला ध्वनि निघण्याचा संभव आहे असें मानल्यास दण्डीनें प्रथम शुद्ध श्लेष सांगितला. तसा ध्वनि निघत नाहीं असेंच समजणें झाल्यास शुद्ध श्लेष असूं शकतो आणि इतर अलंकारही शुद्ध असतात अशा स्थितींत हे दोन अलंकार एके ठिकाणीं आले असतां सङ्कर म्हणणेंच जास्त युक्त आहे, हें मम्मटानेंच प्रथम सांगितलें असें म्हणावें लागतें. रुय्यक विश्वनाथ इत्यादिकांना मम्मटाचें म्हणणें मान्य आहेसें त्यांच्या विवेचनावरून दिसतें.

११. जगन्नाथ म्हणतो की हा अलंकार सर्वांनाच नावीन्य आणितो. (१) शुद्ध श्लेष हा निराळा तसाच संकर निराळा असतो शिवाय श्लेष सर्व अलंकारांना थोडी फार माधुरी आणतोच अशा वेळीं श्लेषाला बिलकूल महत्त्व नसतें म्हणजे श्लेषाच्या या तिन्ही स्थिति असतात असें जगन्नाथाचें मत दिसतें. (१) शुद्धश्लेष (२) संकर व (३) दुसऱ्या एकाद्या अलंकारांत किंचित् प्रवेश मिळालेल्या श्लेषाचीं उदाहरणें पाहूं:—

---

१ का ह. २. ३६३ २ का. सा. सं. ४. ५१

(१) होतील नंदन-विलास जयास तो हा
आहे धनं-जयहि धर्महि जाणतो हा ।
रत्नाकरीं तुज वि-राजवितां विहारी
हा पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥

(२) लोकै-बंधू जो होय रवी-ऐसा
कुवलयाला जो सुखद चंद्र तैसा ।
सांग नोहे तो कुसुमचाप तैसा ।
निषधरायाशी तुल्यरूप ऐसा ॥

या ठिकाणीं उपमेला जितकें महत्त्व तितकेंच श्लेषाला आहे म्हणून हीं एकमेकांवर उपकारक आहेत. अशा स्थितींत उपमा व श्लेष यांचा हा संकर आहे.

(३) कथाँसुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती
शिशूंसि, जरठांसिही निरखितां रसें दाटती ।
दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती
स्ववत्समल भक्षितीं परि न सर्वथा वाटती ॥

येथें रस व स्ववत्स हे शब्द श्लिष्ट आहेत तरीही रूपकापुढें त्यांचें महत्त्व अगदींच नाहीं. त्या शब्दांमुळें अधिक माधुर्य आली तरी त्या योगें सभंगच श्लेष अलंकार मानण्याइतकें त्यांचें महत्त्व नाहीं. या ठिकाणीं रूपकच श्रेष्ठ गणलें पाहिजे.

## २ वक्रोक्ति



१९. रा. काणे यांनी साहित्यदर्पणाच्या प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणें वक्रोक्ति हा शब्दबाण इत्यादिकांच्या ग्रंथांतून आढळतो. वक्रोक्ति म्हणजे संदिग्ध अगर सुंदर उक्ति असा अर्थ आहे. भामहानें वक्रोक्ति हा अलंकार मानला नाहीं तरी वक्रोक्तीचा बहुतेक सर्व परिच्छेदांत त्यानें उल्लेख केला आहे. कारण वक्रोक्ति ही सर्व अलंकारांना व्यापून राहिली आहे असें मानण्याइतकी वक्रोक्ति त्याला प्रिय होती असें दिसतें. प्रथम परिच्छेदांत तो म्हणतो कीः—

न नितान्तादिमात्रेण जायते चारुता गिराम् ।
वक्राभिधेयशब्दोक्तिरिष्टा वाचामलंकृतिः ॥

म्हणजे वक्रोक्ति ही एक अलंकृतीच आहे असें तो मानतो इतकेंच नव्हे तर हेतु, सूक्ष्म व लेश इत्यादि अलंकार न मानण्याचें कारण त्यांत वक्रोक्ति नाहीं, असें तो म्हणतोः—

---

१-२ नवनीत—नलदमयंती २०८  ३ मो. केकावली ५८  ४ भा. लं. १.३६

हेतुश्च सूक्ष्मो लेशोऽथ नालंकारतया मता ।
समुदायाभिधानस्य वक्रोक्त्यनभिधानतः ॥
वाचां वक्रार्थशब्दोक्तिरलंकाराय कल्पते ॥[1]

त्याचप्रमाणें 'वक्रवाचां कवीनां ये प्रयोगं प्रति साधवः' असें म्हणून भामहानें अलंकारवृक्षाची जोपासना करणारी म्हणून वक्रोक्ति ओळखिली आहे.

इत्येवमादिरुदिता गुणातिशययोगतः । सर्वैवातिशयोक्तिस्तु ।[2]
सैषा सर्वैव वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते ।[3]
......कोऽलंकारोऽनया विना ॥[4]

या श्लोकांवरून भामहानें वक्रोक्ति व अतिशयोक्ति एकच धरिली आहे. निदान अतिशयोक्ति ही वक्रोक्ति म्हणजेच सुंदर उक्ति आहे व हिच्या योगें अर्थावर सुंदर प्रकाश पडतो व वक्रोक्तीवांचून अलंकार असणें शक्य नाहीं असें तो म्हणतो. हेतु, सूक्ष्म व वार्ता यांत वस्तुस्थिति दाखविली असल्यानें अतिशयोक्तीला वाव नसतो अर्थात् यांत वक्रोक्ति नाहीं म्हणून ते अलंकार यानें मानले नाहींत. यावरून भामहानें वक्रोक्ति किंवा अतिशयोक्ति यांना अलंकारांत मोठें प्राधान्य दिलें आहे.

श्लेषः सर्वासु पुष्णाति प्रायो वक्रोक्तिषु श्रियम् ।[5]
भिन्नं द्विधा स्वभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम् ॥

'वक्रोक्तीची शोभा श्लेष वाढवितो. व अखिल वाङ्मय हें स्वभावोक्ति व वक्रोक्ति यांवर अधिष्ठित आहे' असें दण्डी म्हणतो. पण वक्रोक्तीची व्याख्या दण्डीनें दिली नाहीं व तिला भामहाइतकें महत्त्वही तो देत नाहीं. भामहाच्या वक्रोक्तिपक्षाला कुन्तकानें पुढें पूर्णपणें जोरास आणलें.

१३. उद्भटानें वक्रोक्तीचा उल्लेखच केला नाहीं. वामनानें मात्र वक्रोक्ति हा अर्थालंकार धरून त्याची 'सादृश्याल्लक्षणा वक्रोक्तिः' म्हणजे 'सादृश्यावर लक्षणा अधिष्ठित असेल तेव्हां तीस वक्रोक्ति म्हणावें, अशी व्याख्या केली. लक्षणेनें असदृश अर्थोत्पत्ति होईल तेव्हां अर्थात् ती वक्रोक्ति होणार नाहीं. उदाहरणः—

प्रफुल्लसुमनें हातीं घेउनि लतिकांनीं रहावें ।[6]
मंद सुगंधित शीतल अनिलें वनिं संचारावें ॥

यांत हातीं घेणें ही क्रिया मनुष्याच्या ठिकाणीं संभवते; पण हातीं घेणें व धारण करणें यांत सादृश्य आहे म्हणून लक्षणेनें लतिका व स्त्री, सुमनें व मुलें यांत साम्य असल्यानें वामनाच्या मतें ही वक्रोक्ति होईल.

---

१ भा. लं. २.८६. २ भा. लं. ६.२३ ३ भा. लं. २.८४ ४ भा. लं. २.८५
५ का. द. २.३६२ ६ दत्तांची कविता

१४. रुद्रटानें वक्रोक्तीची शब्दालंकारांतच गणना केली आहे:--

वक्त्रा तदन्यथोक्तं व्याचष्टे चान्यथा तदुत्तरदः ॥
वचनं यत्पदभङ्गैर्ज्ञेया सा श्लेषवक्रोक्तिः ॥
विस्पष्टं क्रियमाणादक्लिष्टा स्वरविशेषतो भवति ।
अर्थान्तरप्रतीतिर्यत्रैषा काकुवक्रोक्तिः ॥

वामनापर्यंत वक्रोक्तीचा समजला गेलेला अर्थ रुद्रटानें बदलला. 'बोलणारानें एक बोलावें व उत्तर देणारानें निराळा अर्थ घ्यावा' अशा स्थितीला वक्र म्हणजे संदिग्धता अगर कुटिलता युक्त वचन म्हणावें असा यानें अर्थ केला. ही वक्रोक्ति पद-भङ्गानें झाल्यास श्लेष वक्रोक्ति व स्पष्ट वचन सांगत असतां केवळ उच्चाराच्या तऱ्हेनें सहज निराळा अर्थ प्रतीत होईल तेव्हां काकुवक्रोक्ति म्हणावें असें रुद्रट सांगतो.-- बाला गजाजिनाश्री पुनरपि पुसते माधवो कोणता तूं

कंदर्पाचा सखा जो कुसुमनिधिकृती क्षांतिला कीं वसंतू ।
हा काळो शारदेचा सुख करि सकळा नाहिं गेला हिमंतू
येथें येणें अकाळीं अवचित घडलें सांग पां कोण हेतू ॥

'दार उघड' म्हणून कृष्ण सत्यभामेस सांगत असतां ती त्याला नांव विचारते व तो तिला 'माधव' म्हणून सांगतो. येथें माधव म्हणजे लक्ष्मीपति असा अर्थ वास्तविक आहे पण ती निराळाच अर्थ घेते. येथें मा+धव अशी एकदां पदें पडतात व पुनः 'मधुसंबंधी' म्हणून माधव असें पद पडून ही पदभङ्गानें श्लेष साधणारी श्लेषवक्रोक्ति झाली.

यदुपति वचनांतीं बोलिली सत्यभामा ।
धरणिधर असा जो सांग तूं कोण आम्हां ॥
अगुण सगुण बोली पावला द्वैत जिव्हा ।
फणिधरवर शेषो येथ आलासि केव्हां ? ॥

या ठिकाणीं कृष्णानें मी धरणिधर आहें असें म्हणतांच सत्यभामा 'धरणिधर' म्हणजे 'फणिधरवर शेष' असा अर्थ करते; ही श्लेषवक्रोक्ति आहे पण यांत पदभङ्गानें श्लेष होत नसून हा अभङ्ग श्लेष आहे; अर्थातच ही अभङ्ग श्लेष-वक्रोक्ति आहे. हा प्रकार रुद्रटानें केला नाहीं. पण मम्मट त्याची व्याख्या अशी देतो,—यदुक्तमन्यथा वाक्यमन्यथान्येन योज्यते ।

श्लेषेण काक्वा वा ज्ञेया सा वक्रोक्तिस्तथा द्विधा ॥

---

१का. लं. २.१४ २का. लं २.१६. ३—४ वामन— सत्यभामाविनोद ४—८
७का प्र. ९ ७८.

१४. रुद्रटानें (१) श्लेष वक्रोक्ति व ( २ ) काकुवक्रोक्ति हे दोनच प्रकार मानले. मम्मटानें वरील उदाहरणाप्रमाणें या दोहोंत अभङ्गश्लेष वक्रोक्ति हा आणखी एक भेद घातला. काकुवक्रोक्तीचें उदाहरणः—

वाणीमध्यें वर्यि आहे द्विजांचें। बाहूमध्यें राहतें क्षत्रियांचें।
घेतां शस्त्रा जिंकिलें ब्राह्मणातें। झालें कर्म स्तुत्य हें ना नृपातें॥[1]

येथें शेवटच्या चरणानें शब्दोच्चारानुरूप प्रश्न व उत्तर हीं दोन्हीं मिळूं शकतात. यावरून आपल्याला असें स्पष्ट दिसतें कीं, भामहानें वक्रोक्तीचें महत्त्व गाइल्यावर मध्यंतरीं लक्ष घालणारा विशेष कोणी मिळाला नाहीं; पण रुद्रट व मम्मट यांच्यामध्यें वक्रोक्ति हेंच काव्यजीवित मानणारा कुन्तक होऊन गेला व त्यानें वक्रोक्तींतच सर्व अलंकार आहेत असें सांगितलें; तरी तो सिद्धांत मम्मटादींना रुचला नाहीं. मम्मटानें वक्रोक्ति हें जीवित तर राहोच पण तो अर्थालंकार म्हणूनही न मानतां केवळ शब्दालंकार मानला आहे व शब्दश्लेष शब्दालंकारांत गणण्याचें जें कारण तेंच वक्रोक्ति शब्दालंकारांत घालण्याचें आहे. कुन्तक वक्रोक्ति हें जीवित म्हणतो याचें कारण वक्रोक्तीची व्याख्या 'वैदग्ध्यभङ्गी भणितिः'[2]– 'सुंदर, वैचित्र्यपूर्ण बोल' अशी होती; व त्यामुळेंच सर्व अलंकारांना त्यानें वक्रतेची जोड लावली. उदाहरणार्थ यमक, अनुप्रास इत्यादिकांनाही तो वर्णविन्यासवक्रता, पदपूर्वार्धवक्रता, प्रकरणवक्रता अशींच नांवें देतो. साहजिकच या वक्रतेंत सर्व अलंकार लुप्त झाले आहेत. पण मम्मटांत हा वक्रतेचा व्यूह मुळींच उरला नाहीं याचें कारण वक्र याचा पालटलेला अर्थ त्यानें घेतला. त्या अर्थानें वक्रोक्तीची तेजी अगदींच उरत नाहीं म्हणून त्यानें वक्रोक्तीला शब्दालंकारांत गणलें.

१५. रुय्यकानें वक्रोक्ति हा अर्थालंकार मानला आहे याचें कारणही उघड आहे. ज्या न्यायानें त्याचा श्लेष हा अर्थालंकार होतो त्याच न्यायानें वक्रोक्ति हाही अर्थालंकार होईल. श्लेषाचे रुय्यकानें तीन भेद केले असल्यानें याच्या वक्रोक्तीचे चार भेद होतातः—( १ ) अभङ्ग श्लेष. ( २ ) पदभङ्ग श्लेष. ( ३ ) उभय श्लेष. ( ४ ) काकुवक्रोक्ति. वक्रोक्तीची रुय्यकाची व्याख्याः—

'अन्यथोक्तस्य वाक्यस्य काकुश्लेषाभ्यामन्यथा योजनम् वक्रोक्तिः'[3] म्हणजे मम्मटाप्रमाणेंच याची व्याख्या झाली.

विद्याधरः—वाक्यं[4] यदन्यथोक्तं केनाप्यन्येन योज्यतेऽपरथा।
तत् काकुश्लेषाभ्यां यदि वक्रोक्तिस्तदा स्फुरति॥

विश्वनाथः—अन्यस्यान्यार्थकं[5] वाक्यं अन्यथा योजयेद्यदि।
अन्यः श्लेषेण काक्वा वा सा वक्रोक्तिस्ततो द्विधा॥

---

१ वेणीसंहार-गडबोले. २ वक्रोक्तिजीवित १-११ ३ अ. सू. ७७ ४ ए. ८,७१
५ सा. द. १०.९

यानें श्लेषाचे तीन प्रकार केले असले तरी वक्रोक्ति दोनच प्रकारची केली:— १ श्लेष वक्रोक्ति व २ काकुवक्रोक्ति. अप्पय्यदीक्षिताची 'वक्रोक्तिः[१] श्लेष काकुभ्यामपरार्थप्रकल्पनम्' ही व्याख्याही अजूनपर्यंत चालत आलेलीच आहे. त्यानें रुय्यकाप्रमाणेंच चार भेद केले. ( १ ) विकृत श्लेष. ( २ ) अविकृत श्लेष. ( ३ ) अर्थश्लेष. ( ४ ) काकु.

१३. एस. के. दे. यांनीं Sanskrit Poetics या पुस्तकांत उल्लेखिल्याप्रमाणें आपणांस असें दिसून येईल कीं, आनन्दवर्धनानें ज्याप्रमाणें ध्वनिसिद्धांत ध्वनिकारांपासून घेऊन जोरानें पुढें आणला तद्वत् वक्रोक्ति या अलंकाराचें माहात्म्य भामहानें वर्णिल्यावर कुन्तकानें भामहाची अस्पष्ट विखुरलेली वक्रोक्ति स्पष्टपणें व जोरानें पुढें आणली. परंतु पाण्यावर अनेकविध तरंग येऊन विरून जातात तशीच ती विरून गेली; मात्र त्यामुळें अलंकारशास्त्रावर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. शेवटीं वक्रोक्ति ही मुख्य अलंकार अशी गणली न जातां तिचा अर्थच बदलला. रुय्यकानें तिला अर्थालंकार म्हणून मानतांना सांगितलें कीं,

'वक्रोक्तिशब्दश्चालंकारसामान्यवचनोऽपीह[२] अलंकारविशेषः संज्ञितः'

म्हणजे रुय्यकाला वक्रोक्ति हें अलंकारांत सामान्य तत्त्व आहे असें वाटतें; पण तो वक्रोक्ति अलंकाराची जी व्याख्या करतो ती प्रमाण धरली असतां सर्वसामान्य अलंकाराचे ठिकाणीं ती लागू पडणार नाहीं अगर संभवणार नाहीं. कुन्तकाची वक्रोक्ति व रुय्यकाची वक्रोक्ति अगदींच निराळी आहे. भामहानें वक्रोक्ति व अतिशयोक्ति निराळी मानली आहे, पण पुढें त्या दोन्ही अलंकारांत स्पष्टपणें भेद झाला आहे. विशेषाची व्याख्या देतांना मम्मट अतिशयोक्ति सर्व अलंकारांत आहे असें सांगून 'सैषा सर्वत्र वक्रोक्तिः' हें भामहाचें वचन उद्धृत करतो. पण तो अतिशयोक्ति ही वक्रोक्ति म्हणजे सुंदर उक्ति आहे या अर्थी वक्रोक्ति हा शब्द वापरतांना दिसतो.

---

१ कु. १५७ ( १२ ) २ अ. सू. २२० पान.

# प्रकरण ६ वें

## लोकन्यायमूल–अर्थालंकार.

### १ प्रत्यनीक.

१. आतांपर्यंत शब्दालंकार व उभयालंकार यांचें म्हणजे काव्यदेवीच्या बाह्य लेण्यांचें आपण परीक्षण केलें. आतां त्यांहून रमणिय असे अर्थालंकार पहावयाचे आहेत. प्रथमतः अर्थालंकार केवळ पंचवीस तीस मानले होते पण त्यांनाच अनेक फांद्या फुटून पुढें अलंकारांची वाढ शेंसवाशें पर्यंत झाली व त्यांचे वर्ग पाडले हें आपण पूर्वी पाहिलेंच आहे. सध्यां आपण लोकन्यायमूल या सदरांत मोडल्या जाणाऱ्या अलंकारांचा विचार करूं.

'प्रत्यनीक' या शब्दावरूनच या अलंकाराचें स्वरूप कळतें. प्रत्यनीक शब्दाच्या अर्थाबद्दल बराच घोंटाळा झाला असावासें वाटतें. प्रति+अनीक म्हणजे उलट+सैन्य. यावरून एकावर सूड घेतां येत नाहीं म्हणून त्याच्याच बाजूच्या असमर्थाशीं टक्कर द्यावयास जाणें व यायोगें तिरस्कार उत्पन्न होणें असा वास्तविक अर्थ पाहिजे. किंवा सैन्याचें प्रतिनिधित्व असाही दुसरा अर्थ होईल. वस्तुतः दण्डीनें हा शब्द प्रथमतः केवळ उपमावाचक शब्दांच्या यादींत घातलेला आहे. त्यानें अगर आरंभींच्या अलंकारशास्त्रज्ञांनीं या अलंकाराचा उल्लेख केलेला दिसत नाहीं. रुद्रट त्याची व्याख्या अशी करतोः—

> वक्तुमुपमेयमुत्तममुपमानं तज्जिगीषया यत्र
> तस्य विरोधीत्युक्त्या कल्पेत प्रत्यनीकं तत् ॥[१]

रुद्रटाच्या व्याख्येचा अर्थ असा कीं, उपमेय श्रेष्ठ दाखविण्यासाठीं उपमान हें उपमेयाला विरोधी असून तें त्याला जिंकूं बघत आहे, स्पर्धा करूं बघत आहे, अशी स्थिति कल्पिणें यास प्रत्यनीक म्हणावें. रुद्रटाच्या उदाहरणावरून मात्र त्याच्या व्याख्येचा बोध असा होतो कीं, उपमान हें उपमेयाचें श्रेष्ठत्व घेऊं पहात असतां तें अशक्य झाल्यामुळें जेव्हां उपमान हें उपमेयाशीं संबंधी असणाऱ्या वस्तूलाच पीडा देऊं लागतें तेव्हां प्रत्यनीक अलंकार होतो. मम्मटानें याच अर्थाची आपली व्याख्या केली आहे. मम्मटाची प्रत्यनकिाची व्याख्या—

> प्रतिपक्षमशक्तेन प्रतिकर्तुं तिरस्क्रिया ।
> या तदीयस्य तत्स्तुत्यै प्रत्यनीकं तदुच्यते ॥[२]

---

१ का. लं. ८.९२.  २ का. प्र. १०.१९६.

"प्रतिपक्ष हा प्रतिकार पावणें अशक्य असल्यानें प्रतिपक्षीयाशीं संबंधीं असणाऱ्या ज्या गोष्टी त्यांचा प्रतिकार केला असतां तो प्रतिकार उलट प्रतिपक्षाच्या स्तुतीलाच कारणीभूत होतो तेव्हां प्रत्यनीक अलंकार होतो."

रुय्यकः—प्रतिपक्षप्रतीकाराशक्तौ तदीय तिरस्कारः प्रत्यनीकम्[1] ॥

विद्याधरः—बालिनं जेतुमनीशः कोऽपि तदीयं रुशं तिरस्कुरुते ।
अन्यं कमपि जघन्यो यत्राहुः प्रत्यनीकमिदम्[2] ॥

विश्वनाथः—प्रत्यनीकमशक्तेन प्रतीकारो रिपोर्यदि ।
तदीयस्य तिरस्कारस्तस्यैवोत्कर्षसाधकः[3] ॥

अप्पय्यदीक्षितः—प्रत्यनीकं बलवतःशत्रोः पक्षे पराक्रमः[4] ।

जगन्नाथः—प्रतिपक्षसंबन्धिनस्तिरस्कृतिः प्रत्यनीकम्[5] ॥

२. या सर्व व्याख्या पाहतां शब्दभेदानें प्रत्येकानें मम्मटाचीच व्याख्या स्वीकारिली आहे. जगन्नाथाचा कल प्रत्यनीक न मानण्याकडे आहे. प्रतीयमान हेतूत्प्रेक्षा म्हणजेच प्रत्यनीक असें म्हणून तो पुढें असें विवेचन करतो कीं, प्रतीयमान हेतूत्प्रेक्षेंत हेतु संभाव्यमान व यांत निश्चीयमान असतो असें कित्येक म्हणतील पण प्रतीयमान हेतूत्प्रेक्षेंत संभावना स्फुट किंवा स्पष्ट नसते म्हणूनच प्रतीयमान म्हणतात; व प्रत्यनीकांतही हीच स्थिति असते. यासाठीच प्रत्यनीक व ही उत्प्रेक्षा एक म्हणण्यास हरकत नाहीं. जगन्नाथाच्या म्हणण्यांत बरेंच तथ्य वाटतें. प्रत्यनीक अलंकारांत संभावनेचा खेळ अधिक दिसतो. त्यांत 'कल्पनातरंग'च अधिक वठत असतात. या दृष्टीनें प्रत्यनीक हा उत्प्रेक्षेच्या व्याप्तांत स्थान मिळवूं शकेल. प्रत्यनीकाचें उदाहरणः—

रे रे[6] मना मम मनोभव-शासनाचें ।
मी सेवितों चरण युग्मसरोज साचें ।
संसारगार्ते मज पाडिसि बा जरी तूं ।
तों पुत्रशोक मग भोगिसि बा तरी तूं ॥

आपल्या दुर्बलतेचें खापर मनावर लादल्यानें येथें प्रत्यनीक अलंकार झाला.

## २ प्रतीप.

१. प्रतीप याचा वास्तविक अर्थ उलट असा आहे व यावरूनच 'प्रतीपालंकार' झाला आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें अलंकारांच्या वाढीच्या दोन कला दिसतात. एक भरतापासून उद्भटापर्यंत व दुसरी उद्भटापासून मम्मटापर्यंत. त्यानंतर झालेली

---

१ अ. सू. ६८ २ ए. ८.६१. ३ सा. द. १०.८६.८७. ४ कु. (५८) ११७.
५ र. गं. ४९३. ६ मं. मंगुळकर. भामिनी विलास.

वाढ कायम राहते व तींत भाषासौंदर्य वाढविण्यापेक्षां जास्त कांहीं होत नाहीं. पण ही स्थिति तीस पस्तीस अलंकारांचीच संभवते. कारण कांहीं अलंकार हे मम्मटानंतर वाढीस लागले. तोंपर्यंत त्यांचें अस्तित्वच अस्फुट अगर मुळींच नव्हतें. वर उल्लेखिलेल्या तीस पस्तीस अलंकारांसाठीं भामहापासून मम्मटापर्यंत जेवढीं रणें पडलीं तेवढीं मम्मटापासून वाढीस लागलेल्या अलंकारांत पडलेलीं नाहींत असें आढळून येईल. मम्मटापासून वाढूं लागलेले अलंकार हे पहिल्या अलंकारांतूनच प्रादुर्भूत झाले आहेत. प्रतीप हा अलंकार अशांपैकींच एक आहे. दण्डीनें उपमेचे अनेक भेद केले, त्यांपैकीं कांहींत प्रतीपाची छटा दिसते. उदाहरणार्थ त्याच्या विपर्यासोपमेच्या उदाहरणांत प्रतीप अलंकाराचें सौंदर्य दिसतें.

'त्वदाननमिवोन्निद्रमरविन्दमभूदिति'[1]

हें जें विपर्यासोपमेचें उदाहरण त्यानें दिलें आहे त्यांत उपमानाला उपमेयाच्या ठिकाणीं त्याचप्रमाणें उपमेयाला उपमानाच्या ठिकाणीं ठेविलें आहे. हा जो विपर्यास आहे तो उपमेयाचे शोभादायक गुण वाढविणारा असल्यामुळें यांत प्रतीपाची छटा आहे म्हटल्यास हरकत नाहीं. त्याचें प्रतिषेधोपमेचें उदाहरण, 'न जातु शक्तिरिन्दोस्ते मुखेन प्रतिगर्जितुम्'[2] तसेंच त्याची उत्प्रेक्षितोपमा, व प्रशंसोपमा यांतही प्रतीपाचा भास होतो.

४. वामनानें "उपमानाक्षेपश्चाक्षेपः"[3] ही आक्षेपाची केलेली व्याख्या पुढील लोकांच्या प्रतीपासारखी आहे. 'उपमेयाची शोभा वाढविण्यासाठीं उपमानाचें कैमर्थ्य दाखविणें याला आक्षेप म्हणतात' असें वामन म्हणतो. पण पुढें यालाच प्रतीप म्हणूं लागले. वामनाला आक्षेपाची कल्पना दण्डीच्या प्रतिषेधोपमेवरून सुचली असण्याचा संभव आहे. दण्डी प्रतिषेधोपमेचें जें उदाहरण देतो त्यांत जरी प्रतीपाची अगर व्यतिरेकाची छटा दिसली तरी आक्षेपाची केवळ कल्पना घेण्यास दण्डीची व्याख्या पुरेशी आहे. रुद्रटानें प्रतीपाची व्याख्या केली ती अशीः-

[4]यत्रानुकम्प्यते सममुपमाने निन्द्यते वापि ।
उपमेयमतिस्तोतुं दुरवस्थमिति प्रतीपं स्यात् ॥

ज्या ठिकाणीं दुरवस्थेतील उपमेय हें उपमानाच्या बरोबरीचें गणून उपमानाची निन्दा अगर अनुकम्पा केली जाते तेव्हां उपमेयाची उपमानापेक्षां जास्त स्तुति गाण्यासाठींच योजिलेल्या या अलंकारास प्रतीप म्हणावयाचें उः—

[5]नाडी–ज्ञान जयाचें सरोग–बंधू चतुष्पद गणावे ।
सुत तेजी–तुरगींचे नळसम सुंदर कदापि न म्हणावे ॥

---

१ का. द. २.१७. २ का. द. २.३४. ३ का. सू. ४.३.२७. ४ का. लं. ८.७७.
५ नवनीत. नलदमयंती ८

या ठिकाणीं अश्विनीकुमारांची केलेली निन्दा नळराजाच्या गुणाचें पारडें जड होण्यास कारणीभूत होते म्हणून हा प्रतीप अलंकार झाला.

५. रुद्रटानें उपमा, श्लेष, वास्तव व अतिशय हे मुख्य भेद कल्पून त्यांवर अधिष्ठित असलेल्या अलंकारांचें वर्णन केलें आहे व या चार मुख्य भेदांतून इतर अलंकार प्रादुर्भूत होतात असें त्यानें म्हटलें असून तें खरेंही आहे. प्रतीप हा अलंकार दण्डीच्या विपर्यासोपमेंत स्पष्ट कसा दिसतो हें सांगितलेंच आहे. यावरून असें दिसून येईल कीं साधर्म्यावर अधिष्ठित असलेल्या उपमेंत किंचिन्मात्र फरक केल्यानें त्या उपमेचें निराळ्या अलंकारांत रूपांतर होतें. अशाच थोडथोड्या फरकानें उपमावृक्ष बहरला आहे. या दृष्टीनें रुद्रटाच्या शास्त्रीय अलंकार विभागांना पुष्कळ महत्त्व आहे. उपमेपासूनच निघालेल्या या अलंकारांत पुढें पुढें इतकी तफावत होत जाते कीं उपमेचें व या अलंकारांचें, 'साधर्म्य' हें एकच गोत्र आहे किंवा नाहीं या विषयीं संशय वाटूं लागतो. बहुधा याच दृष्टीनें प्रतीप हा उपमाभेद न मानतां त्याला स्वतंत्र अलंकार गणलें असावें.

आक्षेप उपमानस्य प्रतीपमुपमेयता ।
तस्यैव यदि वा कल्प्या तिरस्कारनिबन्धना ॥[1]

अशी व्याख्या मम्मटानें केली. वामनाचे 'उपमानाक्षेप' हे शब्द त्यानें आपल्या व्याख्येच्या पूर्वार्धात मदतीला घेतले आहेत, व पुढील भाग रुद्रटापासून घेऊन आपली व्याख्या बनविली आहे. यामुळें रुद्रटाच्या व्याख्येच्या पूर्वार्धातील आदिभाग मम्मटाच्या 'आक्षेप उपमानस्य' एवढ्यांतच सामावला. उपमानावर तें उपमेयासारखें आहे असा आक्षेप घेतला जाईल अथवा उपमानाबद्दल तिरस्कार दाखविला जाईल तेव्हां तो प्रतीप होतो, असें मम्मट म्हणतो.

उदाहरणः— सुरराजें[2] मायेनें वधिले वृत्रादि बहुत मायावी ।
या सुमलिना मळवित्या अवलोकुनि लाज बहु तमा यावी ॥

स्वतः पापी असतां, दुसऱ्यांना मलिन करीत असणाऱ्या याच्या (दुर्योधनाच्या) कृष्ण हृदयाकडे पाहून अंधकाराला सुद्धां लाज वाटेल. यांत दुर्योधनाच्या हृदयाचा असीम कृष्णपणा वर्णिल्यानें उपमान जो 'तम' त्यावर आक्षेप आला, म्हणून हा प्रतीप अलंकार झाला.

धर्माला[3] गांठाया धांवे तो विप्र, कटक विसकटुन ।
वाटे तदेक विशिखाहुनि सिंधुजगरलगट कविस कटु न ॥

---

१ का. प्र. १०·२०१ २ मो. गदापर्व ३·३५ ३ मो. द्रोणपर्व १·१०४

या ठिकाणीं प्रत्यक्ष हालाहल विषसुद्धां कमी कटु असें म्हणून उपमानाला कमीपणा आल्यानें, उपमानाचा एक प्रकारें तिरस्कार अगर कैमर्थ्य दाखविलें आहे म्हणून हा प्रतीप अलंकार झाला. अशा रीतीनें उपमानाचें कैमर्थ्य दाखविणें व उपमानाला उपमेय कल्पिणें हे मम्मटानें मानलेले दोन भेद झाले. उपमानाचे ठिकाणीं अनादर उत्पन्न करणें हा मम्मटाच्या प्रतीपाचा तिसरा प्रकार आहे. त्याचें उदाहरणः—

जो[1] एकदिवसमात्र द्विज राहे निष्ककोटि तो लाहे ।
किति वनदधनद कीर्ति ?......... ॥

दुसऱ्या ओळींतील मेघ व कुबेर या उपमानांच्या कीर्तीसंबंधीं अनादर वाटतो. म्हणून हें प्रतीपाचें उदाहरण होईल. प्रतपािच्या चौथ्या प्रकारचें उदाहरण–

भूप[2] म्हणे, " आचार्या ! साधु तुम्हीं गुरु सुरांचिया तरुचे ।
हितहि तव वचन मजला, ओखद जैसें मुमूर्षुला न रुचे ॥

येथें कल्पतरूची व आचार्याची सदृशता सांगून शेवटीं तुमचें वचन मला मान्य नाहीं असें दुर्योधन म्हणतो म्हणून असदृश गोष्टीला उपमा दिल्यानें हा प्रतीपाचा चौथा प्रकार झाला.

रुय्यकानें मम्मटाप्रमाणें प्रतीपाचे चार प्रकार केले आहेत. त्याची व्याख्याः—

उपमानस्याक्षेप उपमेयताकल्पनं वा प्रतीपम्[3]

विद्याधरः— उपमानस्याक्षेप स्यादुपमेयत्वकल्पनं यत् ।
यत्र प्रतीपमेतद्विबुधैरभिधीयते[4] द्विविधम् ॥

विश्वनाथः— प्रसिद्धस्योपमानस्योपमेयत्वप्रकल्पनम् ।
निष्फलत्वाभिधानं वा प्रतीपमिति कथ्यते ॥
उक्त्वा चात्यन्तमुत्कर्षमत्युत्कृष्टस्य वस्तुनः ।
कल्पितेऽप्युपमानत्वे प्रतीपं[5] केचिदूचिरे ॥

अप्पय्यदीक्षितः–प्रतीपमुपमानस्योपमेयत्वप्रकल्पनम्[6] ॥
अन्योपमेयलाभेन वर्ण्यस्यानादरश्च तत् ॥
वर्ण्योपमेयलाभेन तथाऽन्यस्याप्यनादरः ॥
वर्ण्येनान्यस्योपमाया अनिष्पत्तिवचश्च तत् ॥
प्रतीपमुपमानस्य कैमर्थ्यमपि मन्वते ॥

६. विद्याधरानें प्रतीपाचे फक्त दोनच प्रकार केले आहेत. विश्वनाथानें स्वतःचे दोनच भेद सांगून मम्मटाचे दोन भेद घेतले म्हणजे तो मम्मटाचें चारी भेद मानतो. अप्पय्यदीक्षितानें प्रतीपाचे पांच भेद केले त्यावर जगन्नाथ म्हणतो,

'प्रसिद्धौपम्यवैपरीत्येन वर्ण्यमानमौपम्यमेकं प्रतीपम्[7]'

---

१ मो. शल्यपर्व १:३३ २ मो. द्रोणपर्व ६:६ ३ अ. सू. ६९ ४ ए. ८:६२
५ सा. द. १०८७–८८ ६ कु. (४) १३ ७ र. गं. ४९५

उपमानोपमेययोरन्यतरस्य किंचिद्गुणप्रयुक्तमद्वितीयतोत्कर्ष
परिहर्तुं द्वितीयप्रदर्शनेनोल्लासमानं सादृश्यमपरं द्विविधम् ।
उपमानस्य कैमर्थ्यं चतुर्थम्। सादृश्यविघटनं पञ्चमम् ॥

अशा रीतीनें स्वतःच्याच शब्दांत हे पांच भेद मांडल्यावर जगन्नाथ म्हणतो कीं यांपैकीं पहिले तीन भेद उपमेंत, चौथा आक्षेपांत व पांचवा व्यतिरेकांत समाविष्ट होतो. अशा स्थितींत वस्तुतः अलंकारांत भर टाकण्यास प्रतीप हा उगीच निराळा अलंकार कशाला पाहिजे ? फार तर चौथा प्रकार हा प्रतीप समजावा. बाकींचे चार प्रकार अनुक्रमें उपमेंत अगर व्यतिरेकांतच अन्तर्भूत करावे, किंबहुना ते त्यांत अंतर्भूत होतातच.

७. यावरूनच साधर्म्यांत फरक होत गेल्यावर प्रत्येक प्रकारच्या फरकांत निरनिराळें सौंदर्य कसें दिसूं लागलें व तें अतुल वाटल्यानें त्यास सवता सुभा कसा पाडून दिला गेला हें दिसतें. जगन्नाथाच्या म्हणण्यांत बरेंचसें तथ्य वाटतें. व्यतिरेक व प्रतीप यांतील फरक उपमेंतील साधर्म्याच्या फरकाइतका जाणवत नाहीं. त्यांत जशी प्रत्येक वेळीं निराळी चमत्कृति आहे तशी प्रतीपाच्या पंचम भेदांत व व्यतिरेकांत वाटत नाहीं. या दृष्टया हे दोन अलंकार वेगळे न मानतां प्रतीपाचा पांचवा भेद म्हणून व्यतिरेक मानणें इष्ट आहे. पहिले तीन प्रकार उपमेंत समावेशिले जावे असें मात्र वाटत नाहीं; कारण त्यामुळें दण्डीच्या उपमेप्रमाणें सर्वांच्याच उपमेनें क्षेत्र मर्यादेबाहेर वाढून साम्राज्य प्रमाणाबाहेर वाढल्यास होत जाणारी अंदाधुंदी होईल। असो. प्रतीपाचें एक उदाहरण घेऊन हें विवेचन संपवूं.

नेत्र इचें अतिचंचळ देखुनि घालिति मत्स्य जळीं शरिरासी ।
वर्तुळ आणि विशाळ विलोकुनी नित्य कुरंग फिरे वनवासी ॥
अंजनयुक्त सुसुंदर पाहुनि लज्जित खंज न लंघि दिशांसी ।
सूर्य-विकासिनि पद्मिनि नेत्रदळां पाहतां करि म्लान मुखासी ॥

## ३ मीलित.

८. लोकन्यायमूलक अलंकारांत वादाचा प्रश्न फारसा येत नाहीं. कारण ते सहजसौंदर्यावर अधिष्ठित आहेत. मीलित हा अलंकार यांपैकींच होय. मील्-मिळणें यावरून मीलित म्हणजे 'मिळालेलें' 'एकरूप झालेलें' असा अर्थ होईल. मीलित अलंकाराचें रुद्रटानें दिलेलें लक्षणः—

तन्मीलितमिति यस्मिन्समानचिन्हेन हर्षकोपादि ।
अपरेण तिरस्क्रियते नित्येनागंतुकेनापि ॥

---

१ अनंतकवि-सीतास्वयंवर ८ २ का. लं. ७·२०६

सहज नेहमींच्या अगर आकस्मिक घडणाऱ्या दुसऱ्या चिन्हांनीं जेव्हां हर्ष कोपादि लपविलीं जातात तेव्हां मीलित म्हणावें. रुद्रटानें मीलित अलंकाराचा वास्तव अलंकारांत समावेश केला आहे. कारण त्यांत 'वस्तुस्वरूप कथन' असतें.

'समेन लक्ष्मणा वस्तु वस्तुना यन्निगूह्यते ।
निजेनागन्तुना वापि तन्मीलितमिति स्मृतम् ॥[1]

रुद्रटाच्या व्याख्येहून मम्मटाची ही व्याख्या निराळी आहे. मम्मटानें 'वस्तु' हा शब्द वापरल्यानें त्यांत विकारच येतील असें नाहीं. पण त्याचीं दोन्हीं उदाहरणें मात्र मदनविकार व भय यांना अनुलक्षून आहेत. रुद्रटानें 'हर्षकोप' हा शब्द घातल्यानें व तदनुरूप उदाहरणें दिल्यानें त्याची व्याख्या स्पष्ट आहे, पण मम्मटाच्या केवळ उदाहरणांवरून त्याच्या व्याख्येंतील 'वस्तु' याचा अर्थ मनांतील विकाराच्या बाह्य छटा अगर लक्षणें असा होतो. रुय्यकानें 'वस्तुना, वस्त्वन्तरनिगूहनं मीलितम्[2]' अशी व्याख्या करून मीलिताचें निर्मीलित असें नामाभिधान केलें. यानें उदाहरणेंही मम्मटाचींच देऊन त्याचें पूर्ण अनुकरण केलें आहे.

विद्याधरः—स्वाभाविकमागन्तुकमथवा वस्त्वन्तरं तिरोधत्ते ।
यस्मिन् किंचन वस्तु ज्ञेयं तन्मीलितं द्विविधम्[3] ॥

विद्याधरानें उदाहरणें देतांना 'वस्तु' याचा विकारांचीं बाह्यलक्षणें हाच फक्त अर्थ न घेतां 'पदार्थ' असाही अर्थ घेतला आहे.

विश्वनाथः—मीलितं[4] वस्तुनो गुप्तिः केनचित्तुल्यलक्षणा ।
अप्पय्यदीक्षितः—मीलितं यदि सादृश्याद्भेद एव न लक्ष्यते ॥
जगन्नाथः—स्फुटमुपलभ्यमानस्य कस्यचिद्वस्तुनो लिङ्गैरति—साम्याद्भिन्नत्वेनागृह्यमाणानां वस्त्वन्तरलिङ्गानां स्वकरणाननुमापकत्वं मीलितम्[5] ॥

जगन्नाथानेंही व्याख्येंत जास्त स्पष्टपणा आणलेला दिसत नाहीं. स्पष्टपणें दिसणाऱ्या एकाद्या गोष्टीच्या बाह्य चिह्नांशीं दुसऱ्या वस्तूच्या बाह्य चिन्हांचें आत्यंतिक साम्य असून त्यांत त्या वस्तूचें स्वतंत्र अस्तित्व राहात नसेल तेव्हां त्यास मीलित म्हणावें असें जगन्नाथ म्हणतो. जगन्नाथाच्या 'लिङ्गैः' या शब्दानें व्याख्येंत थोडा स्पष्टपणा आला खरा पण त्यांतील 'वस्तु' हा शब्द कायमच राहिला. 'स्वकरणाननुमापकत्वं' या पदानें तद्गुण व सामान्य याचें त्यानें स्पष्ट निवारण केलें.

कोणीं[6] वणिग्जन विकी तुळितां तराजे ।
कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥
दोन्ही समान निरखी विकणार देतो ।
घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥

---

१ का. प्र. १०·१९७ · २ अ. सू. ७० ३ ए. ८.६३ ४ सा. द. १०·८९ ५ र. गं. ५१५. ५ कु. (७९) १४४ ६ नवनीत—नलदमयंती

यामध्यें भ्रान्तिमान् अलंकार नाहीं; कारण अलिनी ही कस्तूरिकाच असा भ्रम तेथें झालेला नाहीं. हा तद्गुण नव्हे, कारण अलिनीनें कस्तूरीचा गुण घेतला नाहीं. हा सामान्य अलंकार नव्हे कारण अलिनी ओळखूं आली नाहीं म्हणून हा मीलित अलंकार झाला.

## ४ सामान्य.



१. ज्याप्रमाणें दोन रंग एके ठिकाणीं मिसळीत असतां फरक ध्यानांत आला नाहीं तरी प्रत्येक थेंबाबरोबर एक निराळाच रंग होत असतो तद्वत् एका अलंकारांत केवळ सूक्ष्म नजरेनें लक्षांत येईल एवढा फरक केल्यास अगदीं स्वतंत्र, निराळा अलंकार होतो. सामान्य, तद्गुण, मीलित, अतद्गुण हे अलंकार अशांपैकींच होत. म्हणून आपण प्रथमतः सामान्य अलंकारच विचारांत घेऊं. रुद्रटाच्या तद्गुण अलंकाराचा प्रथम भेद हा सामान्य अलंकार आहेः—

यस्मिन्नेकगुणानामर्थानां योगलक्ष्यरूपाणाम् ।
संसर्गे नानात्वं न लक्ष्यते तद्गुणः[१] स इति ॥

एरवीं फरक असणाऱ्या पण गुणांत अभिन्न असणाऱ्या अशा अनेक वस्तु एकत्र आल्या असतां त्यांच्यांतील भेद न ओळखतां येणें यास तद्गुण म्हणावें असें रुद्रट म्हणतो. पण त्याची ही व्याख्या इतरांच्या सामान्याची होईल; तसेंच त्याचें उदाहरणही सामान्याचेंच आहे असें दिसतें.

नैवधौतधवलवसनाश्चान्द्रिकया सान्द्रया तिरोगमिताः ।
रमणभवनान्यशङ्कं[२] सर्पन्त्यभिसारिकाः सपदि ॥

यांत अभिसारिकांनीं चान्द्रिकेचा गुण घेतला नाहीं व त्यामुळें हा रुद्रटाचा तद्गुण अलंकार इतरांच्या मतें 'तद्गुण' होणार नाहीं. मम्मटानेंही हेंच नव्हे तरी याच अर्थाचें उदाहरण दिलें आहे व तें तो सामान्य अलंकाराचें म्हणून देतो. मम्मटानें 'सामान्या'ची व्याख्या अशी केलीः—

प्रस्तुतस्य यदन्येन गुणसाम्यविवक्षया ।
ऐकात्म्यं बध्यते योगात्तत्सामान्यमिति[३] स्मृतम् ॥

प्रस्तुत गोष्ट व अप्रस्तुत गोष्ट यांतील गुणांचें साम्य वर्णन करण्यासाठीं त्यांचें ऐक्य दाखविलें जातें तेव्हां सामान्य अलंकार म्हणावें असें मम्मट म्हणतो.

रुय्यकः—'प्रस्तुतस्यान्येन गुणसाम्यादैकात्म्यं सामान्यम्[४]'

---

१ का. लं. ९.२२. २ का. लं. ९.२३. ३ का. प्र. १०.२०२. ४ अ. सू. ७१.

विद्याधरः—साधारणगुणयोगाद्यत्र प्रकृतस्य वस्तु संवलितम् ।
न विभावयितुं शक्यं तत्सामान्यं समाख्यातम् ॥

विश्वनाथः—सामान्यं प्रकृतस्यान्यतादात्म्यं सदृशैर्गुणैः ॥

अप्पय्यदीक्षितः—सामान्यं यदि सादृश्याविशेषो नोपलक्ष्यते ।

जगन्नाथः—'प्रत्यक्षविषयस्यापि वस्तुनो बलवत्सजातीयग्रहणकृतं तद्भिन्नत्वेनाग्रहणं सामान्यम्'

या सर्व व्याख्यांचा अर्थ हाच कीं प्रकृत गोष्टीची अप्रकृत गोष्टीशीं गुणसाम्यानें सरूपता होणें. उदाहरणः—

वेणींत घालुनि फुलें मधुमालतीची
अंगासि लाउनि उटी हरिचंदनाची ।
नेसूनि शुभ्रपटही अभिसारिका या
ज्योत्स्नेंत निर्भयपणें निघती रमाया ॥

या उदाहरणांत अभिसारिका व ज्योत्स्ना यांच्यामध्यें शुभ्रपणा हा एक सामान्यत्वानें असणारा गुण दाखविला आहे. अभिसारिकांच्या शुभ्रपणामुळें त्या शुभ्र चांदण्यांत हिंडत असतांही दिसल्या नाहींत. या दोहोंच्या गुणैक्यानें सरूपता वर्णन केल्यामुळें हा सामान्य अलंकार झाला.

यावरून मीलित व सामान्य यांत फरक दृष्टोत्पत्तीस येतो तो हा कीं मीलितांत साधर्म्यामुळें दोन गोष्टींचा असा एकजीव होतो कीं त्या एकच आहेत असें वाटतें. 'सामान्यां'त दोन वस्तूंत साधर्म्य असलें तरी या दोन वस्तु आहेत हें ओळखूं येतें पण दोहोंपैकीं अमुक ही व अमुक ही असें सांगतां येत नाहीं.

## ५ तद्गुण.



१०. आतां मीलित व सामान्याप्रमाणेंच किंचित् भासणारा असा तद्गुण अलंकार विचारांत घेऊन त्याचें इतर अलंकारांशीं कसें वैषम्य आहे तें पाहूं. तद्गुणाची व्याख्या प्रथम रुद्रटानेंच केली असावी. त्याच्या व्याख्येंतील पहिला भेद हाच पुढील लोकांचा 'सामान्य' कसा होतो, हें 'सामान्य' अलंकारावरील विवेचनांत सांगितलेंच आहे. त्याच्या तद्गुणाचा दुसरा भेद तो तद्गुण अलंकार होय. तेव्हां रुद्रटाचा तो भेद आपण येथें घेऊंः—

असमानगुणं यस्मिन्नतिबहलगुणेन वस्तुना वस्तु ।
संसृष्टं तद्गुणतां धत्तेऽन्यस्तद्गुणः स इति ॥

---

१ ए. ८.६४. २ सा. द. १०.९०; ३ कु. ८० (१४५). ४ र. गं. ५१६.
५ गोरे—अलंकारचंद्रिका. ६ का. लं. ९.२४.

'दोन वस्तूंपैकीं दुसरीशीं असमान गुण असणाऱ्या एका वस्तूनें दुसऱ्या वस्तूचें तिच्या ठिकाणीं असणाऱ्या गुणातिशयामुळें गुणग्रहण करणें ' यास तद्गुण म्हणावें. तद्गुणाच्या या दुसऱ्या भेदांत रुद्रटानें 'गुणग्रहण करणें' असें म्हटल्यानें हा भेद तद्गुणच होय. पहिल्या भेदांत गुणग्रहण नसून सरूपतेला जास्त महत्त्व दिलें असल्यानें तो सामान्यांत मोडूं लागला.

स्वमुत्सृज्य गुणं योगादत्युज्ज्वलगुणस्य यत् ।
वस्तु तद्गुणतामेति भण्यते स तु तद्गुणः[1] ॥

अशी मम्मटानें व्याख्या केली. 'आपल्याहून गुणांत अधिक असणाऱ्या अशा दुसऱ्या गोष्टीशीं संबंध आल्यानें स्वतःचा गुण टाकून, दुसरीचा गुण घेणें याला तद्गुण असें म्हणावयाचें. ' तद्गुण या शब्दाचा उच्चार करतांच ही व्याख्या डोळ्यांपुढें उभी राहते.

कृष्णहृद्[2]य धवलतेजवळ तें झालें धवल पळीं ।

कृष्णाकुमारीच्या शुद्ध हृदयाजवळ येतांच एका दुष्टाच्या हृदयांतील दुष्टपणा मावळला व कृष्णाकुमारीच्या अंतरंगांतील धवलतेनें त्याचें हृदय धवल झालें म्हणजे त्याच्या हृदयांतील कृष्णपणा जाऊन त्याला धवलता आली. यांत कृष्णाकुमारीच्या जवळ येण्यानें कृष्णहृदयानें स्वगुण टाकून तिचा धवलत्व हा गुण घेतला म्हणून हा तद्गुण अलंकार झाला. रुय्यकानें मम्मटाच्या व्याख्येंतील 'योगात्' या शब्दाबद्दल कोणताच शब्द घातला नाहीं.

' स्वगुणत्यागादत्युज्ज्वलगुणस्वीकारस्तद्गुणम्[3] '

अशी रुय्यकानें व्याख्या केल्यानें स्वगुणत्याग केव्हां करावयाचा हें स्पष्ट झालें नाहीं. या दृष्टीनें मम्मटाची व्याख्या रुय्यकाप्रमाणें अस्पष्ट नसून अगदीं स्पष्ट आहे. यापुढें बहुतेकांच्या व्याख्या रुय्यकाप्रमाणेंच आहेत.

विद्याधरः—अधिकगुणाङ्गीकरणं स्वगुणत्यागेन तद्गुणः[4] कथितः ।
विश्वनाथः–तद्गुणः[5] स्वगुणत्यागादत्युत्कृष्टगुणग्रहः ।
अप्पय्यदीक्षितः–तद्गुणः[6] स्वगुणत्यागादन्यदीयपरिग्रहः ।
जगन्नाथः–स्वगुणत्यागपूर्वकं स्वसंनिहितवस्त्वन्तरसंबाधिन्गुणग्रहणं तद्गुणः[7]॥

या व्याख्यांतील जगन्नाथाच्या व्याख्येनें मात्र मम्मटाच्या 'योगात्' पदाचा अर्थ आणला आहे. यावरून तद्गुण याची अर्थनिश्चिति अशी कीं, दुसऱ्याशीं संबंध आला असतां स्वतःच्या गुणाचा पूर्णपणें लोप करून दुसऱ्याचा उत्कृष्ट गुण घेणें, यास तद्गुण म्हणावें.आतां यांत मीलित व सामान्य याहून विशेष असा आहे कीं, मीलित

---

१ का. प्र. १०.२०४ २ क. र. हा. कृष्णाकुमारी. ३ अ. सू. ७२. ४ ए. ८.६५.
५ सा. द. १०.९० ६ कु. ( ७५ ) १३९ ७ र. गं. ५१३.

व सामान्य यांत स्वगुणत्याग नसतो व दुसऱ्याच्या उत्कृष्ट गुणाचें ग्रहणही नसतें. तद्गुणांत गुणाचे बाबतींत पहिली वस्तु पूर्णत्वानें पालटते तसें मीलित व सामान्य यांत होत नाहीं असें मीलित व सामान्य यांच्या मागें घेतलेल्या उदाहरणांवरून दिसेल. तद्गुणाचें उदाहरणः—

त्यांहीहून विशेष अंधुक दुजीं त्या मागचीं, यापरी ।
ओळीनें शिखरें जशीं चढत हीं जाती नभोभ्यंतरीं ।
तैसा आदिम वर्ण पालटुनिया नीलत्व त्यां येतसे ।
त्यायोगें गगनास आणिक तया वर्णैकता येतसे ॥[1]

## ६ अतद्गुण.



११. तद्गुणाच्या अगदीं विरुद्ध असा अतद्गुण अलंकार आहे. तद्गुणांत दुसऱ्याचा गुण स्वगुणत्यागाचें मोल देऊन घेतला जातो, तर त्याच्या उलट अतद्गुण कांहींही झालें तरी स्वगुणत्याग होत नाहीं. 'तद्रूपाननुहारश्चेदस्य तत् स्यादतद्गुणः'[2] ही मम्मटाची व्याख्याही हेंच सांगते. रुय्यकानें 'सति हेतौ तद्रूपाननुहारोऽतद्गुणः'[3] अशी व्याख्या केली. त्यानें 'सति हेतौ' हे दोन शब्द अधिक घातले त्यांचा अर्थ 'वास्तविक गुण घेतां येण्यासारखी असतांही स्थिति गुण न घेणें' असा होतो. रुय्यकानें मम्मटाचींच उदाहरणें दिलीं आहेत व त्याच्याच व्याख्येचा अनुकार पुढील व्याख्यांत दिसतो. त्या व्याख्यांत कांहींच फरक झालेला नाहीं.

विद्याधरः—सति हेतौ तद्रूपाननुहारोऽतद्गुणः कथितः[4]
विश्वनाथः—तद्रूपाननुहारस्तु हेतौ सत्यप्यतद्गुणः[5]
अप्पय्यदीक्षितः—संगतान्यगुणानङ्गीकारमाहुरतद्गुणम्[6]
जगन्नाथः—तद्विपर्ययोऽतद्गुणम्[7]

जगन्नाथाच्या 'तत्' याचा संबंध 'तद्गुण' याशीं आहे. तद्गुणाचा विपर्यय म्हणजे अतद्गुण उः—

बोधें खलास न रुचे अहिमुखीं दुग्ध होय गरल ।
श्वानपुच्छ नलिकेंत घातलें होईना सरळ ! ॥[8]

यांत श्वानपुच्छ आपली वक्रता सोडून नलिकेचें सरलत्व घेत नाहीं, सरलत्व येण्याचा योग असतांही तद्गुणाचा स्वीकार करीत नाहीं म्हणून हा अतद्गुण अलंकार झाला. अतद्गुण हा तद्गुणापासून पूर्व पश्चिमेइतक्या अंतरावर असल्यानें त्यांतील वैषम्य सांगत बसण्याची जरूर नाहीं.

---

१ क. र. हा. २ का. प्र. १०.२०५. ३ अ. सू. ७३. ४ ए. ८.६५. ५ सा. द. १०.९१. ६ कु. (७७) १४२. ७ र. गं ५१४. ८ क. र. हा.—कृष्णाकुमारी.

## ७ उत्तर.

१२. अलंकारांत वैचित्र्य असावें लागतें. त्याशिवाय कोणताही अलंकार अलंकार या नांवाला सार्थ होणार नाहीं. उत्तर हा अलकार नुसतें दुसऱ्यानें उत्तर देण्यामुळें होणार नाहीं; कारण केवळ उत्तरांत कांहींच सौंदर्य असणार नाहीं. नुसत्या उत्तरापेक्षां त्यांत कांहीं विशेष पाहिजे. रुद्रट म्हणतो,

उत्तरवचनश्रवणादुन्नयनं यत्र पूर्ववचनानाम् ।
क्रियते तदुत्तरं[1] स्यात्प्रश्नादप्युत्तरं यत्र ॥

(१) उत्तरांतून प्रश्न सूचित होत असेल किंवा (२) प्रश्नांतून उत्तर निघत असेल तेव्हां, उत्तर अलंकार म्हणावें. याशिवाय आणखीही एका अध्यायांत रुद्रटानें उत्तराचा उल्लेख केला आहे व ती त्याची उत्तराची दुसरी व्याख्याच होय.

यत्र ज्ञानादन्यत्पृष्टस्तत्वेन वक्ति तत्तुल्यम् ।
कार्येणानन्यसमख्यातेन तदुत्तरं[2] ज्ञेयम् ॥

म्हणजे उपमानभूत म्हणून माहीत असलेली नित्य परिचयाची वस्तु सोडून एकाद्या उपमेयाला अन्यत्र उपमान म्हणून अविद्यमान असणाऱ्या वस्तूची उपमा देणें याला उत्तर म्हणावें. या उत्तराचें रुद्रटानें दिलेलें उदाहरण अनेक प्रश्न व अनेक उत्तरें मिळून झालेलें आहे. पण वरील उत्तराचें उदाहरण मात्र एक प्रश्न व एक उत्तर असें आहे. पण एकच प्रश्न व एकच उत्तर यांत एवढें वैचित्र्य असणार नाहीं म्हणून पुढील लोकांनीं पहिल्या प्रकारचा उत्तर तसाच न मानतां त्यांत फरक केला. रुद्रटाचा दुसरा ‘ उत्तर ’ मात्र पुढील लोकांच्या ‘ असंभाव्य उत्तरालंकारा ’ सारखा झाला.

(१) ‘ अस्तासि[3] चालला रवि, संध्याविधि अंतरेल, ’ या भावें ।
म्हणसी जागविलें, तरि माझें सामर्थ्य तुज नसे ठावें ॥

(२) मी निजलों[4] असतां बळ, कैचें अस्तासि जावया रविला ?
म्यां काय द्यूतांत ख्यात स्वतपःप्रताप हारविला ?

प्रथम उदाहरणांत मुनीच्या उत्तरावरूनच त्याच्या पत्नीच्या प्रश्नाचा बोध होतो व दुसऱ्यांत जें उत्तर स्पष्ट होत आहे तें असें कीं, मी निजलों असतां रवि अस्ताला जाणें शक्य नाहीं; कारण मी द्यूतांत माझा प्रताप हारविला नाहीं. म्हणून हीं दोन्ही उदाहरणें रुद्रटाच्या पहिल्या व्याख्येचीं होतील.

१३. उत्तरश्रुतिमात्रतः[5] । प्रश्नस्योन्नयनं यत्र क्रियते तत्र वा सति ।
असकृद्यदसंभाव्यमुत्तरं स्यात्तदुत्तरम् ॥

---

१ का. लं. ७.९३ २ का. लं. ८'७२ ३ मो. आदिपर्व ५'१०१
४ मो आदिपर्व ५ १०४ ५ का. प्र १०'१८८

मम्मटानें अशी व्याख्या केली. यांत पहिला प्रकार रुद्रटाचाच आहे असें म्हणतां आलें नाहीं तरी रुद्रटासारखा आहे; कारण दोघांच्याही म्हणण्याचा इत्यर्थ, उत्तर ऐकतांच प्रश्नाचा बोध होणें, हाच आहे. मम्मटाचा दुसरा भेद मात्र निराळा आहे. रुद्रटाच्या एकाच प्रश्नानें होणाऱ्या उत्तरालंकारांत विशेष जादू नसल्यानें व साधा प्रश्न व साधें उत्तर यांत वैचित्र्य नसल्यानें अनेकदां प्रश्न विचारून त्यांचीं असंभाव्य उत्तरें आलीं असत. उत्तर अलंकार होईल असें मम्मटानें म्हटलें. हा मम्मटाचा भेद रुद्रटानें केलेल्या उत्तराच्या दुसऱ्या व्याख्येसारखा आहे; पण रुद्रटानें 'अनेकदां प्रश्नोत्तर' असे शब्द व्याख्येंत घातले नाहींत; फक्त उदाहरणांत ते दर्शित केले आहेत व मम्मटानें ते व्याख्येंतही घातले. उदाहरणः—

तें[1] कां दुर्गुण लोभ जैं पिशुनता जें कां महापातकें
काशाला तप सत्य जैं मन शुचें जें कां सुतीर्थोदकें ।
काशाला जन जैं भलेपण असे कां भूषणें कीर्ति जैं
सद्विद्या जरि कां धनें मरण हें दुष्कीर्ति लोकींच जैं ॥

येथें प्रश्नांतच उत्तर असून तें असंभाव्य असें दिलें आहे व अशा रीतीनें एकच प्रश्न न विचारतां प्रश्न व उत्तरें अनेक आहेत म्हणून हा मम्मटाचा त्याचप्रमाणें रुद्रटाच्या दुसऱ्या व्याख्येप्रमाणें रुद्रटाचाही उत्तरालंकार झाला. रुद्रटानें आपल्या दुसऱ्या व्याख्येंत उपमानभूत व उपमेयभूत अशा तऱ्हेचे शब्द घालण्याचें कारण त्यानें औपम्यालंकारांचा विचार करीत असतां त्या सदरांत 'उत्तर' अलंकार वर्णिला आहे. व वस्तुतः उत्तरालंकाराच्या वरील उदाहरणावरून असें दिसून येईल कीं त्यांत दिलेलें असंभाव्य उत्तर व संभाव्य उत्तर यांत औपम्यभाव अगर साधारणधर्मता असते. मम्मटानें त्याच्या व्याख्येंत या औपम्यभावाचा उल्लेख केला नाहीं. रुद्रटानें पहिली व्याख्या वास्तवालंकारांत घातली असल्यानें त्यांत त्यानेंही औपम्याचा उल्लेख केला नाहीं. यावरून असें दिसून येईल कीं, रुद्रटाच्या व्याख्येचा नको असणारा भाग गाळून मम्मटानें आपली व्याख्या तयार केली तेव्हां त्यानें केलेल्या दोन भेदांपैकीं 'उत्तरश्रुतिमात्रतः प्रश्नस्य उन्नयनम्' या भेदांत त्याला औपम्यभावाची जरूर वाटली नाहीं. दुसऱ्या भेदांत आपोआपच औपम्यभाव रहात असल्यानें त्यानें रुद्रटासारखी वास्तवांत व औपम्यांत उत्तराच्या व्याख्यांची फारखत न करतां दोन्ही व्याख्या एकत्र करून औपम्यभाव व वास्तव हे मोघमच ठेवले.

रुय्यकः–उत्तरात् प्रश्नोन्नयनमसकृदसंभाव्यमुत्तरं चोत्तरम्[2]
विद्याधरः–यत्र प्रश्नपुरःसरमेवासंभाव्यमुत्तरं किमपि ।
असकृद्भवति निबद्धं तदुत्तरं तावदत्रैकम्[3] ॥
विश्वनाथः–उत्तरं[4] प्रश्नस्योत्तरादुन्नयो यदि ।

---

१ भर्तृहरि-नीतिशतक ५५ २ अ. सू. ७३ ३ ए. ८.६६ ४ सा. द. १०.८२

यत्रासकृदसंभाव्यं सत्यपि प्रश्न उत्तरम् ॥
अप्पय्यदीक्षितः–किंचिदाकूतसहितं स्याद्गूढोत्तरमुत्तरम्[2] ।
जगन्नाथः–प्रश्नप्रतिबन्धकज्ञानविषयीभूतोऽर्थ उत्तरम् ॥

१४. वर दिलेल्या व्याख्यांपैकीं अप्पय्यदीक्षिताची व्याख्या सोडल्यास इतर सर्व व्याख्या मम्मटाच्या वळणावर गेलेल्या दिसतात. अप्पय्यदीक्षिताची व्याख्या मात्र भिन्न असल्यानें ती आपण विचारांत घेऊं. त्याच्या व्याख्येचा अर्थ असा कीं जेव्हां साभिप्राय, गूढ अगर दुसरा अर्थ निर्माण होणारें उत्तर दिलेलें असेल तेव्हां तो उत्तर अलंकार होईल. उत्तराचे यानें तीन भेद केलेः–उत्तर, निबद्धप्रश्न व प्रश्नाभिन्नोत्तर.

'यत्रासौ[3] वेतसी पान्थ तत्रेयं सुतरा नदी'

पहिल्या प्रकारचें म्हणून अप्पय्यदीक्षितानें दिलेलें हें उदाहरण उत्तराचें होत नाहीं, कारण इतरांच्या व्याख्येप्रमाणें यांत प्रश्नाचा बोध होत असला तरी अप्पय्यदीक्षिताच्या म्हणण्याप्रमाणें नदी तरण्याचा मार्ग कोणता असें विचारणाऱ्या वाटसरूबद्दल इच्छा असणाऱ्या स्त्रीचें त्या वाटसरूस हें उत्तर आहे, व त्यांत गूढभाव आहे म्हणून हा उत्तर अलंकार आहे. पण वस्तुतः येथें हा अर्थ वक्रोक्तीनें स्पष्ट होतो. अप्पय्यदीक्षितानें उत्तराचें आणखी उदाहरण दिलें आहे तें असेंः—

'पयोधरोन्नतिं[4] दृष्ट्वा वस्तुमिच्छसि चेद्गृस'

पण यांत श्लेष स्पष्ट असून त्यावर अधिष्ठित असणारी वक्रोक्ति असल्यानें हें उत्तराचें उदाहरण होऊं शकत नाहीं. त्याचें निबद्धप्रश्नोत्तराचें उदाहरणः—

कुशलं[5] तस्या जीवति कुशलं पृच्छामि जीवतीत्युक्तम् ।
पुनरपि तदेव कथयसि मृतां नु कथयामि या श्वसिति ॥

या उदाहरणांत, प्रश्न व उत्तरेंही स्पष्ट आहेत. उदाहरणार्थ 'कुशलं तस्याः' हा प्रश्न व 'जीवति' हें उत्तर, 'कुशलं पृच्छामि' हा प्रश्न व 'जीवतीत्युक्तम्' हें उत्तर. अशा तऱ्हेनेंच दुसऱ्या ओळींतही प्रश्नोत्तरें आहेत. पण यांत आक्षेपाची जितकी सुंदर छाया दिसते तितकी उत्तर अलंकाराची दिसत नाहीं. यावरून अप्पय्यदीक्षिताच्या उत्तरांत वक्रोक्ति व आक्षेप यांचा घोंटाळा झाला आहे असें वाटतें.

वास्तविक पाहतां उत्तरअलंकारांत विशेष मोहिनी नाहीं. तो अगदीं साध्या अलंकारांपैकीं एक आहे. अप्पय्यदीक्षिताची उत्तर अलंकाराची व्याख्या पाहतां त्याचा 'उत्तर' अधिक भडक दिसतो. याचें कारण त्यांत दुसऱ्या अलंकारांची छटा आहे.

जगन्नाथानें ( १ ) उन्नीतप्रश्न व ( २ ) निबद्धप्रश्न हे पूर्वीप्रमाणेंच भेद मानले व तदनंतर त्यांचे प्रत्येकीं चार भेद केले आहेत ते असे— १ प्रश्न गर्भित, उत्तर

---

१ कु. (८३) १४७ २ र. गं. ५१९ ३ कु. (८३) ४ कु. (८३). १
५ कु. (८३). २.

अगर्भित. २ प्रश्न अगर्भित, उत्तर गार्भित ३ दोन्ही गार्भित ४ दोन्ही अगर्भित. निबद्धप्रश्नांत प्रश्न स्पष्ट असतो. उन्नीतांत तो आर्थ असतो. जगन्नाथाचें उत्तर प्रकरण अपूर्ण आहे त्यामुळें त्याचीं सर्व मतें कळत नाहींत; पण त्यानें 'असकृत्' म्हणजे अनेकवारच प्रश्नोत्तरें असावीं या प्राचीन मतावर टीका केली आहे. असो.

धनेंपति जरि तूं रे मी असें शास्त्रवेत्ता ।
भट समरिं जरी तूं, मी महा वादि-जेता ।
अनु-चर जरि तूतें सेविती, छात्र मातें ।
न गणिशि मज, जातों तुच्छ मानूनि तूतें ॥[1]

'गरीब माणसाचें येथें काय काम?' असा प्रश्न येथें स्पष्टपणें ध्वनित होत असल्यानें हें उत्तराचें उदाहरण होईल. येथपर्यंत लोकन्यायमूलक सात अलंकारांचें विवेचन झालें. तेवढ्यावरून आपणांस असें दिसतें कीं, या अलंकारांत अत्यंत साधेपणा असल्यानें त्या बाबतींत दुमत झालेलें आढळत नाहीं. प्रथमदर्शनीं रुद्रटाच्या व्याख्या थोडथोड्या भिन्न वाटतात. पण मम्मट आपल्या काटकसरी लेखणीनें सर्व अर्थ मंथन करून एक सूत्र बनवितो व बाकी लोक त्याचें अनुकरण करतात. प्रथम मानले गेलेले अलंकार हे जास्त ठळकपणें दृष्टींत येतात व त्या वेळच्या निरनिराळ्या अलंकारांत फरकही पुष्कळ आहे. पण पुढील अलंकारशास्त्रज्ञांनीं थोडक्या नव्या कलाकुसरीनें एकांतूनच बारीक बारीक अनेक अलंकार करण्यास सुरवात केली. त्यामुळें श्रीमंत लोकांच्या बायका केवळ हौसेखातर एकच एकदाणी पण ती गोल मण्यांची, तांदुळ्या पोतीची, लांबट मण्यांची अशी करवतात त्याचप्रमाणें मीलित, सामान्य, तद्गुण, अतद्गुण हे अलंकार होत. कांहीं अलंकार रसानें ओथंबल्याशिवाय नसावयाचेच किंवा त्यांत प्रत्येक बाबतींत स्वतंत्र वैलक्षण्य असावयाचें; पण तितकें यापैकीं कांहीं अलंकारांत आढळत नाहीं. मनुष्यप्राणी येथून तेथून सारखाच; पण प्रत्येकाला निर्माण करतांना निरनिराळी मूस वापरल्यानें राम हा रामच व शंकर हा शंकरच अशी निरनिराळी व्यक्ति होऊन बसते. तद्वत् या अलंकारांना निरनिराळी मूस वापरल्यानेंच केवळ स्वतंत्रपणा आला आहे. त्यांतल्या त्यांत प्रकार लावावयाचे झाल्यास प्रतीप हा नटवेबाज व उत्तर हा साधा, असें म्हणावें लागेल. प्रत्यनीक हा कोणच्या गोटांतील आहे हें जरा अनिश्चित आहे. तद्गुण, मीलित, सामान्य व अतद्गुण हे याच निर्दिष्ट अनुक्रमानें प्रतीप व उत्तर यांच्या पंक्तींत बसतील.

---

१ भर्तृहरि—नीतिशतक.

# प्रकरण ७ वें

## न्यायमूल अर्थालंकार.

### १ काव्यलिङ्ग.

१. उत्तर अलंकाराशीं किंचिन्मात्र संबंधी व तर्काश्रयी असणारा असा काव्यलिङ्ग अलंकार आहे. लिङ्ग म्हणजे 'खूण' किवा 'चिह्न' काव्यांतील खूण किंवा चिह्न ज्यांत असतें तो काव्यलिङ्ग अलंकार होय. उद्भटापूर्वी 'काव्यलिङ्ग' कोणी मानला नाहीं.

'श्रुतमेकं यदन्यत्र स्मृतेरनुभवस्य वा ।
हेतुतां प्रतिपद्येत काव्यलिंङ्गं तदुच्यते ॥ '

'एकादी ऐकलेली गोष्ट दुसऱ्या एकाद्या गोष्टीच्या अनुभवाला अथवा स्मरण होण्याला कारणीभूत होईल तेव्हां त्यास काव्यलिङ्ग असें म्हणतात.' उद्भटानें 'स्मृतेरनुभवस्य वा' हीं पदें तार्किकांच्या दोन पद्यांना अनुसरून घातलीं आहेत. कांहीं तार्किक आपल्याला कार्यकारणासंबंधीं ज्ञान पूर्वीच असतें व तें अनुभवानें पुनः जागृत होतें असें म्हणतात; तर दुसरे लोक तें ज्ञान अनुमानानें उत्पन्न होतें असें म्हणतात. म्हणून उद्भटानें उपरिनिर्दिष्ट पदांनीं दोघांच्याही मनासारखें केलें. उद्भटाची काव्यलिङ्गाची व्याख्या अगदीं प्रथमावस्थेंतील आहे. काव्यलिङ्गांत सरसत्व असतें व अनुमान हें शास्त्रलिंग अर्थात् त्यांत रूक्षता, नीरसता असते असें इन्दुराजानें आपल्या टीकेंत म्हटलें आहे. आपण आतां काव्यलिङ्गाचें उदाहरण घेऊं:—

त्या काननीं हिंस्रमृगोपपूरितीं ।
पावे न भीति क्षण-मात्र जानकी ।
तीतें भवघ्न प्रभुचेंच लाधलें ।
होतें भयध्वंसक संनिधान कीं ॥

या ठिकाणीं 'भयध्वंसक संनिधान' हें 'लिङ्ग' म्हणजे 'चिन्ह' आहे, त्यायोगें काव्यांतील अर्थ उघड होतो म्हणून हा काव्यलिङ्ग अलंकार झाला.

२. रा. काणे व रा. बनहट्टी यांच्या म्हणण्याप्रमाणें काव्यलिङ्ग अलंकाराचा भामह दण्डींनीं उल्लेख केलेला नाहीं. रा. काणे साहित्य-दर्पणाच्या विवेचक टीपांत म्हणतात, "Ancient writers like Dandin and Bhamaha do not speak of काव्यलिङ्ग at all," and "Dandin speaks of only two kinds of हेतुs" हें खरें आहे; पण वस्तुतः 'हेतु' अलंकाराविषयीं लिहि-

---

१ का. सा. स. ६.७४  २ सा. व. वि. १.५८.

तांना दण्डीनें हेतूच्या अनेकविध प्रकारांपैकीं मुख्य 'ज्ञापक' व 'कारक' हेतूंचीं उदाहरणें दिलेलीं आहेत, त्यांत काव्यलिङ्गाची स्पष्ट छटा दिसते. त्यानें काव्यलिङ्ग शब्द मात्र उच्चारला नाहीं.

अयमान्दोलितप्रौढचन्दनद्रुमपल्लवः ।
उत्पादयति सर्वस्य प्रीतिं दक्षिणमारुतः ॥[1]

यांत पहिली ओळ ही 'दक्षिणमारुतः' या शब्दाचें विशेषण आहे. व हेतु अलंकारांत हेत्वर्थी पंचमी अगर तृतीया असते तशीही येथें नाहीं. उलट साहित्यदर्पणकारांनीं दिलेलें उदाहरण तें या काव्यलिङ्ग अलंकारासारखें आहे असें दिसेल.

त्वद्वाजिराजिनिर्धूतधूलीपटलपङ्किलाम् ।
न धत्ते शिरसा गङ्गां भूरिभारभिया हरः ॥[2]

यांत पहिली ओळ गङ्गेचें विशेषण असून त्यांत पुढील उक्तीची गुरुकिल्ली आहे. 'भूरिभारभिया' पदाचा उलगडा त्या उक्तीनेंच होत आहे. असो. उद्भटानें 'काव्यदृष्टान्तहेतू चेत्यलंकारान्परे विदुः' असें म्हणण्यांत असें स्पष्ट केलें आहे कीं या अलंकाराचा जनक तो नाहीं. काव्यहेतु हें नांव देऊन हा अलंकार त्याच्या पूर्वीच कोणीतरी मानला असला पाहिजे.

भामहानें या अलंकाराला स्थान तर दिलें नाहींच पण हेतु अलंकारालाही फेटाळलें आहे; केवळ पूर्वी असलेल्या 'हेतू'बद्दल त्यानें आपलीं मतें दिलीं आहेत, तद्नच उद्भटानें 'काव्यलिङ्ग' अलंकार 'काव्यहेतू' पासून घेतला आहे. दण्डी उद्भटाच्या मध्यंतरीं कोणीतरी दण्डीच्या 'हेतु' वरून 'काव्यहेतु' अलंकार मानणारा झाला असेलसें वाटतें.

३. 'काव्यलिङ्ग' व 'हेतु' तसेंच 'काव्यलिङ्ग' व 'अनुमान' यांतील हेतूसंबधीं घोटाळा झाल्यानें अलंकारशास्त्रज्ञांच्या उदाहरणांतही कांहीं ठिकाणीं गोंधळ झाल्यासारखा वाटतो. दण्डीनें 'ज्ञापक' व 'कारक' हेतु मानले व कारक हेतूचे भावरूप व अभावरूप असे भेद करून त्याचप्रमाणें ज्ञापकाचेही होतील असें सांगितलें. उद्भटानें हेतूचे प्रकार किती हें सांगितलें नसलें तरी त्याच्या उदाहरणावरून तो 'ज्ञापक' हेतूच दर्शवीत असावा असें वाटतें. त्याचेंच उदाहरण घेतलें तर तें असें आहेः—

छायेयं तव शेषाङ्गकान्तेः किंचिदनुज्ज्वला ।
विभूषाघटनादेशान् दर्शयन्ती दुनोति माम् ॥[3]

यांत इन्दुराजानें सरसत्वावर जोर दिला आहे. व सरसत्वामुळें काव्यलिङ्ग अलंकार झाला असें त्याचें म्हणणें आहे. पण सरसत्व व नीरसत्व यांवरून काव्यलिङ्ग व अनुमान यांची कसोटी लावण्याचे दिवस गेल्यानंतर असें दिसतें कीं,

---

१ का. द. २.२३६. २ सा. द-१०.६३ खा. २ रें उदाहरण. ३ का. सा. सं. ६ '७४ चें उदाहरण.

उद्भटाचें हें उदाहरण ज्ञापकाचेंच प्रतिपादक आहे. किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर ज्ञापक व निष्पादक यांच्या सीमेवरचें हें उदाहरण आहे. त्याची व्याख्याही हेंच सांगते. 'स्मृतेरनुभवस्य वा हेतुतां प्रतिपद्येत' याचा अर्थ नेहमींच्या अनुभवावरून अगर स्मृतीवरून हेतु मिळणें म्हणजेच अनुमानाजवळ आल्यासारखें झालें. थोडक्यांत उद्भटाच्या व्याख्येंत हेतूवर अधिष्ठित पुष्कळ अलंकार डोकावतात असें वाटतें. काश्मीरवासीयांची प्रवृत्ति 'हेतु' न मानण्याकडे आहे. रुद्रटानें हेतु अलंकार मानला पण तो खरा काव्यलिङ्ग अलंकारच होय. त्याची हेतूची व्याख्या अशीः—

हेतु[1]मता-सह हेतोरभिधानमभेदकृद्भवेद्यत्र ।
सोऽलंकारो हेतुः स्यादन्येभ्यः पृथग्भूतः ॥

याच्या 'स्यादन्येभ्यः पृथग्भूतः' याचे नमिसाधूनें दोन अर्थ दिले आहेतः (१) इतर अलंकारांहून विलक्षण व (२) परमताहून भिन्न. या दोहोंपैकीं दुसरा अर्थ असेल तर काश्मीरवासीयांबद्दलचें वरील विधान खोटें ठरेल. पहिला अर्थ असेल तर याच्या हेतूचें उदाहरण काव्यलिङ्गाचें होईल.:—

अविरल[2]कमलविकासः सकलालिमदश्च कोकिलानन्दः ।
रम्योऽयमेति संप्रति लोकोत्कंठाकरः कालः ॥

यांत कार्यकारणभाव गुप्त आहे म्हणूनच हा काव्यलिङ्ग अलंकार होईल. याच्या व्याख्येंतही कार्यकारणभावाचें अभेदत्व असणें हें हेतु अलंकाराचें लक्षण दिलें असून वास्तविक तें काव्यलिङ्गाचें आहे.

४. मम्मट हा काश्मीरवासी असल्यानें त्याचीही हेतु न मानण्याकडे प्रवृत्ति आहे. त्यानें हेतूची व्याख्याही दिली नाहीं. व तो काव्यलिङ्गाची व्याख्या 'काव्य[3]लिङ्ग हेतोर्वाक्य-पदार्थता' म्हणजे 'वाक्यार्थांत अगर पदाच्या अर्थांत हेतु असल्यास त्याला काव्यलिङ्ग म्हणावें' अशी करतो. काव्यलिङ्गाचे मम्मटानें (१) वाक्यार्थता व (२) पदार्थता यावरून दोन भेद केले. उद्भटाच्या व्याख्येंतही 'पदार्थांत हेतु' असें म्हणण्याचा उद्देश असावा, असें इन्दुराजाच्या टीकेकडे पाहिलें असतां वाटतें. मम्मटाच्या अनेकपदार्थतेच्या उदाहरणांत उघड तृतीया असल्यानें तो अनुमान अलंकार वाटतो. त्याचें अनेक पदार्थतेचें उदाहरणः—

प्रण[4]यिसखीसलीलपरिहासरसाधिगतै- ।
र्ललितशिरीषपुष्पहननैरपि ताम्यति यत् ।
वपुषि वधाय तत्र तव शस्त्रमुपाक्षिपतः
पततु शिरस्यकाण्डयमदण्ड इवैष भुजः ॥

---

१ का. लं. ७.८२ २ का. लं. ७.८३. ३ का. प्र. १०.१७४.
४ का. प्र. ६७९.५०२ उदाहरण.

रुय्यक 'हेतोर्वाक्यपदार्थत्वे काव्यलिङ्गम्'[1] असें म्हणून मम्मटाचीच व्याख्या घेतो. पण यानें मम्मटाचीं उदाहरणें मुळींच घेतलीं नाहीत. त्यानें दिलेलीं एकपदार्थता, अनेकपदार्थता, एकवाक्यार्थता, अनेकवाक्यार्थता यांचीं उदाहरणें काव्यलिंगाचींच आहेत, व याचें कारणही तो अनुमान मानतो हेंच असावें.

५. विद्याधरानें, 'वाक्यार्थो यदि हेतुर्भवति पदार्थो विशेषणद्वारा ।
द्विविधं कथयन्ति तदालंकारं काव्यलिङ्गम् ॥

यानें 'विशेषणद्वारा' हेतु प्रकट होणें असें म्हणून थोडी व्याख्या पालटली तरी प्रतीत होणारा हेतु विशेषणद्वारांच प्रतीत होईल असें नाहीं. पण विभक्तींच्या कचाट्यांतून सुटण्यासाठीं त्यानें हें विशेषण घातलें असावें. यावरून त्यानें हेतु व अनुमान यांची काव्यलिङ्गापासून आपणांकडून फारकत केली आहे. विश्वनाथ त्याच्या नेहमींच्या वृत्तीप्रमाणें 'हेतोर्वाक्यपदार्थत्वे काव्यलिङ्गं निगद्यते' अशी व्याख्या करून रुय्यकाचें अनुकरण करतो व वाक्यार्थतेचें उदाहरणही रुय्यकाचेंच घेतो. यानें काव्यलिङ्गाची सीमा बरोबर घालून देण्यासाठीं हेतूंचे तीन प्रकार केले (१) ज्ञापक (२) निष्पादक (३) समर्थक. ज्ञापक हेतु असल्यास अनुमान, निष्पादक असल्यास काव्यलिङ्ग व समर्थक असल्यास अर्थान्तरन्यास म्हणावें असें विश्वनाथ सांगतो. हेतूसंबंधीं भोजानें बरेंचसें विवेचन केलें आहे. त्यानें मुख्य हेतु चार सांगितले आहेत (१) कारक (२) ज्ञापक (३) अभाव (४) चित्र. त्यांचे पुन्हा अनेक पोटभेद पाडले आहेत. त्यांपैकीं कारकाचा प्रवर्तक–क्रियाविष्टकारक हेतु हा भेद काव्यालिङ्गाचा आहे. त्याचप्रमाणें अभावाचे, प्रध्वंसाभाव, प्रागभावाभाव, प्रध्वंसाभावाभाव हे भेद काव्यलिङ्गच आहेत. भोजानें काव्यलिङ्ग मानला नाहीं. पण हेतूचें जाळें इतकें पसरलें कीं त्यांत पुष्कळशा अलंकारांना प्रवेश मिळाला तसाच काव्यलिंगालाही मिळाला आहे. हें हेतूचें अवास्तव पसरलेलें जाळें पाहतां विश्वनाथानें हेतूचे केलेले प्रकार सुटसुटीत आहेत व त्यांत सूक्ष्म दृष्टि आहे. रा. काणे साहित्यदर्पणाच्या टीपांत म्हणतात "The line drawn between निष्पादक and समर्थक appears to us, to say the least, very thin. There is no reason why what is called समर्थक cannot be निष्पादक as well" पण येथें असें वाटतें कीं हे तीन हेतु–भेद करण्यांत विश्वनाथाची सूक्ष्म दृष्टि दिसते व अत्यंत सूक्ष्म फरकानेंही अलंकार कसा पालटतो हें प्रत्ययास येतें. अर्थान्तरन्यासांत असणारा हेतु व काव्यलिङ्गांत असणारा हेतु यांत फरक आहे. जरी निष्पादक व समर्थक यांत कांहीं फरक नाहीं असें वाटलें तरीही वस्तुतः निष्पादन व समर्थन यांत फरक आहे. निष्पत्ति ही दुसऱ्यानें करावयाची.

---

१ अ. सू. ५७. २ ए. ८·४१. ३ सा. द. १०·६३.

समर्थनांत एक गोष्ट पूर्णत्वानें दिलेलीच असते, पण तिला जास्त बळकटी आणण्याचें काम समर्थनानें होतें. निष्पादनांत फलोत्पत्ति व्हावयाची असते. समर्थनांत दिलेल्या गोष्टीला पुष्टि आणावयाची असते. थोडक्यांत निष्पादक हेतूंत अमूर्त स्वरूप असतें तर अर्थान्तरन्यासाच्या समर्थक हेतूंत मूर्त स्वरूप असतें. एकाद्या गोष्टीपासून फल मिळालें नाहीं तर ती गोष्टच निर्फल होईल; पण समर्थन झालें नाहीं तर प्रथम पुढें मांडलेल्या गोष्टीला बाध येत नाहीं.

यावरून निष्पादक हेतु व समर्थक हेतु यांतही बराच फरक आहेसें दिसून येईल. या दृष्टीनें पाहिलें असतां 'पृथ्वी, स्थिरा भव!' हें उदाहरण विश्वनाथानें अर्थान्तरन्यासाचें दिलें असलें तरी तें अर्थान्तरन्यासाचें नसून काव्यलिङ्गाचें आहे; पण उदाहरणांत चूक असली तरी निष्पादक व समर्थक या हेतूंत विश्वनाथानें केलेली फारकत बरोबर आहे. साहित्यदर्पणाच्या टीपांत 'तस्मात्साक्षात्परम्परया वा यत्र कारकहेतुरर्थगतोऽवगम्यते तत्काव्यलिङ्गम्' हा प्रभेतील उतारा घेतला आहे. या कारक हेतूवरूनच दण्डीच्या कारकहेतूंत काव्यलिंगाची छटा आहे असें म्हणण्याला आधार आहे असें वाटतें.

६. जगन्नाथाला अजूनपर्यंत अर्थान्तरन्यास, अनुमान इत्यादींमध्यें होणारी चूकभूल दिसल्यानें, त्याबद्दल दिलसफाई होण्यासाठीं त्यानें आपली व्याख्या शक्य तोंवर आक्षेप न येईल अशीच केली ती अशी:—अनुमितिकरणत्वेन सामान्यविशेषभावाभ्यां चानालिङ्गितः प्रकृतार्थोपपादकत्वेन काव्यलिङ्गम् ॥

'अनुमितिकरणत्वेन' म्हणण्यानें अनुमान नव्हे पण गम्य अनुमान असा अर्थ होऊन अनुमानाचा निरास झाला. 'सामान्यविशेषभावाभ्यां चानालिङ्गितः' म्हणण्यानें अर्थान्तराचा निरास झाला 'प्रकृतार्थोपपादकत्व' या शब्दानें उपमेचा संबंध नाहींसा केला. जगन्नाथानें अप्पय्यदीक्षिताच्या व्याख्येवर टीका केली आहे व ती सार्थ आहे 'समर्थनीयस्यार्थस्य काव्यलिङ्गं समर्थनम्'-समर्थन करण्याजोग्या अर्थाचें समर्थन करणें म्हणजे काव्यलिङ्ग' अशी अप्पय्यदीक्षितानें व्याख्या दिली आहे. यानें दिलेल्या उदाहरणांत जरी 'काव्यलिङ्ग' असला तरी व्याख्येचा शब्दशः अर्थ घेतल्यास इतर ज्यास अर्थान्तरन्यास म्हणतील त्याला हा काव्यलिङ्ग म्हणतो असें वाटतें. कारण जरी अर्थान्तरन्यासांत अर्थाचा न्यास हा विशेष जरुरीचा असला तरी त्यानें दुसऱ्या अर्थाचें समर्थन होतें; व हीच स्थिति काव्यलिंगांत असल्यास काव्यलिंग व अर्थान्तरन्यास यांत कांहींच भेद राहणार नाहीं. यानें वाक्यार्थता व पदार्थता असे काव्यलिङ्गाचे दोन भेद केले आहेत; पण कारण एक असून वैधर्म्यानें दोन फलें दृष्टीस पडणें हा जो त्यानें काव्यलिङ्गाचा भेद केला आहे तो चुकीचा आहे. त्याचें उदाहरणः—

---

१ सा. द. पान ४६. २ र. गं. ४६६. ३ कु. (६०) ???.

जीयादम्बुधितनयाधररसमास्वादयन्मुरारिरयम् ।
अम्बुधिमथनक्लेशं कलयान्विफलं च सफलं च ॥

यांत एकाच कारणानें साफल्य व वैफल्य दाखविलेलें आहे म्हणून तो समुच्चय अलंकार होईल.

जगन्नाथानें 'गम्यमान हेतु सुंदर अलंकारिकांनीं, प्रतीत होणें' असा काव्यलिङ्गाचा अर्थ करून त्याचे भेद केलेः— (१) सुबन्तार्थत्व (२) तिङन्तार्थत्व. सुबन्तार्थत्वाचे दोन भेद. (१) शब्दान्तरार्थानें विशेषित होणारा (२) शुद्ध एक सुबन्तार्थरूप. पुन्हां यांपैकीं पहिल्या भेदाचे साक्षात् किंवा परम्परेनें (१) वाक्यार्थविशेषित व (२) सुबन्तार्थमात्र विशेषित, असे दोन भेद केले. हेच तिङ्न्ताचेही होतात. पण तिन्ङ्न्ताचा शुद्ध भेद संभवत नाहीं. कारण क्रियेस कारक अवश्य लागतें. म्हणजे तिङ्न्ताचे (१) साक्षात् अथवा परम्परेनें वाक्यार्थ विशेषित (२) सुबन्तार्थमात्रविशेषित असे दोन भेद होतील. काव्यलिंगाची व्याख्या दिल्यानंतर मग काव्याचें लिङ्ग कोणतें 'सुबन्त' कीं 'तिङ्न्त' हें ठरविण्याचें काम गौण आहे. हे भेद सर्व तऱ्हेची सिद्धता झाल्यावर सुचतात असेच जगन्नाथालाही सुचले आहेत. वस्तुतः जगन्नाथापूर्वी इतरांनीं दिलेले (१) वाक्यार्थता (२) पदार्थता हेच भेद व त्यांचे उपभेद निरनिराळ्या कसरतीनें जगन्नाथानें दिले आहेत. असो. काव्यलिंगाचें एक उदाहरण घेऊन हें विवेचन पुरें करूंः—

कुटजीं, दैवें आला मधुकर, त्याला न दावि अवमान
रसपूर्ण कमलिनी त्या दाविते आदर, जयासि सीमा न ॥

यांत 'न दावि अवमान' याचा हेतु पुढील चरणांतील वाक्यांत लपलेला असल्यानें हा काव्यलिङ्ग अलंकार झाला.

## २ अनुमान.

७. उद्भटानें काव्यलिंगाची व्याख्या केली त्यावर टीका करतांना इन्दुराजानें शास्त्रलिंग तें अनुमान, असें म्हटलें आहे. अनुमानांत नीरसत्व आहे असें त्याचें म्हणणें आहे. अनु + मा (३ आ.) म्हणजे 'सार काढणें' 'तर्क काढणें' 'निष्पन्न करणें' असा अर्थ होतो. त्यावरून अनुमान म्हणजे तर्किलेलें, अनुमान केलेलें. अर्थात् अनुमान करण्यास कारणें स्पष्ट लागतात. अमुक कारणावरून अमुक तत्त्व निघतें असें म्हणणें म्हणजे अनुमान. तेथें धूर आहे अर्थात् अग्नि असणारच हा तर्क अथवा अनुमान होय. हें अनुमान आपण नेहमींच्या अनुभवावरून बांधीत असतों. या दृष्टीनेंच उद्भटाची काव्यलिङ्गाची व्याख्याही अनुमानाची होते.

१ कु. पान १५५. २ लेले. भामिनीविलास.

'श्रुतमेकं यदन्यत्र स्मृतेरनुभवस्य वा ।
हेतुतां प्रतिपद्येत काव्यलिङ्गं तदुच्यते ॥[1]

एखाद्या माहीत असलेल्या गोष्टीची स्मृति अथवा अनुभव यांच्या सहाय्यामुळें आपण तशाच दुसऱ्या गोष्टींचा कार्यकारणसंबंध लावतों तेव्हा काव्यलिंग म्हणावयाचें असें उद्भट म्हणतो. पण येथें साधनावरून साध्याचा संबंध लागतो. यासाठींच याला अनुमान असें म्हणावयाचें. उद्भटाचें उदाहरण मात्र काव्यलिंगाचेंच आहे. अनुमानांत पंचमी, किंवा तृतीया ही हेतुदर्शक म्हणून हजर असते. काव्यलिंगांत हेतु हा विभक्तींनीं शाब्द नसून तो गम्य असतो.

८. रुद्रटाची व्याख्याः— वस्तु परोक्षं यस्मिन्साध्यमुपन्यस्य साधकं तस्य ।
पुनरन्यदुपन्यस्येद्विपरीतं चैतदनुमानम् ॥[2]
यत्र बलीयः कारणमालोक्याभूतमेव भूतमिति ।
भावीति वा तथान्यत्कथ्येत तदन्यदनुमानम् ॥[3]

रुद्रटानें अनुमानाच्या दोन व्याख्या केल्या आहेत. पहिला भेद इतरांच्या अनुमानाप्रमाणेंच आहे, पण दुसरा निराळा आहे. बलवान् कारण असतां न झालेली गोष्ट झाली अगर होईल असें सांगणें यास अनुमान म्हणतात, असें रुद्रट दुसऱ्या भेदाचें लक्षण देतो. पहिल्याचे यानें दोन भेद केले आहेतः ( १ ) साध्य प्रथम सांगून नंतर साधक हेतु सांगणें व ( २ ) साधक हेतु सांगून नंतर साध्य सांगणें. हे भेद पुढें कोणी दिले नाहींत. दुसऱ्या व्याख्येंतील अनुमानाचेही यानें दोन पोटभेद केले आहेत. पण रुद्रटाचा दुसरा 'अनुमान' अलंकार मात्र भाविकालंकारासारखा वाटतो. रुद्रट भाविक अलंकार मानीत नाहीं पण त्याचा दुसरा अनुमान भाविकासारखाच आहे असें उदाहरणावरून दिसेलः—

अविरलविलोलजलदः कुटजार्जुननीपसुरभिवनवातः ।
अयमायातः कालो हन्त मृताः पथिकगेहिन्यः ॥[4]
दिष्ट्या न मृतोऽस्मि सखे नूनमिदानीं प्रिया प्रसन्ना मे ।
ननु भगवानयमुदितस्त्रिभुवनमानन्दयन्निन्दुः ॥[5]

साध्य व साधन या भावि गोष्टींचा भूतत्वानें उल्लेख केलेलीं हीं दोन्हीं उदाहरणें झालीं. यास्यन्ति यथा तूर्णं विकसित--कमलोज्ज्वलादमी सरसः ।[6]
हंसा यथैवमेतां मलिनयति घनावली ककुभम् ॥
वहन्ति यथा मलयमरुद्यथा च हरितीभवन्ति विपिनानि ।[7]
प्रियसखि तथेह न चिरादेष्यति तव वल्लभो नूनम् ॥

यांत साध्यसाधनरूप झालेल्या ( भूत ) गोष्टींचा त्या पुढें होतील असा ( भावित्वानें ) निर्देश आहे. यावरून हीं भाविकालंकाराचीं उदाहरणें होतात.

---

१ का. सा. स. ६·७४. २ का. लं. ७·५६. ३ का. लं. ७·५९. ४ का. लं. ७·६०.
५ का. लं. ७·६१. ६·७ का. लं. ९. ६२–६३.

१. मम्मटानें, ' अनुमानं तदुक्तं यत्साध्यसाधनयोर्वचः ' अशी व्याख्या केली आहे; साधनसाध्याविषयीं सांगणारा तो अनुमानअलंकार होय. अमुक गोष्ट अमुक कारणांनीं घडली अथवा सिद्ध झाली हें सांगणें म्हणजे, अनुमान होय. हीं कारणें म्हणजेच साधन. तें तीन प्रकारचें असतें. पक्षधर्मता अन्वयित्व व व्यतिरेकता. सिद्ध करावयाची गोष्ट म्हणजे साध्य हें ज्यावर अधिष्ठित असतें त्यास पक्ष म्हणतात व त्या पक्षाचे ठिकाणीं असणारा गुण त्याला पक्षधर्मता असें म्हणावयाचें. अन्वयित्व म्हणजे साध्य व साधन यांत असणारा नित्यसंबंध व त्यांमधील नित्य विरोध म्हणजे व्यतिरेकता. या तीन साधनांनीं साध्य कसें सिद्ध होतें पाहूं.

अनुभवं[2] वदनेन्दुरुपागमन्नियतमेष यदस्य महात्मनः ।
क्षुभितमुत्कलिकातरलं मनः पय इव स्तिमितस्य महोदधेः ॥

' पय इव स्तिमितस्य महोदधेः ' ही उपमा असून बाकीच्या चरणांत अनुमान आहे. 'तिचा वदनेन्दु या महात्म्याच्या दृष्टीस पडला असला पाहिजे ' हें येथें साधन असून ' क्षुब्ध होणें ' हें साध्य आहे. ह्या साध्याचें अधिष्ठान त्याच्या मनावर आहे म्हणजे त्याचें मन हा पक्ष असून उत्कलिकातरलत्व हा त्याचा गुण. उत्कंठेनें आलेली चंचलता ही पक्षधर्मता झाली. तिचा वदनेन्दु दृष्टीस पडणें व त्याचा मनःक्षोभ होणें हा साध्यसाधनांचा नित्य संबंध अथवा अन्वयित्व; इतर स्त्रियांच्या वदनेन्दूंनीं त्याचा मनःक्षोभ होत नाहीं ही व्यतिरेकता; अशा रीतीनें पक्षधर्मता, अन्वयित्व व व्यतिरेकता यायोगें मनःक्षोभ हें साध्य सांगितलें म्हणून हा अनुमान अलंकार झाला.

आला[3] विजय रणीं निश्चित । अरिवदनें म्लान होत
पहा चळचळां कांपत । उठाउठी धावती ॥

' साध्यसाधननिर्देशोऽनुमानम्[4] ' ही रुय्यकाची व्याख्या मम्मटासारखीच आहे. रुय्यकानें शुद्ध अनुमान व गम्य अनुमान अशीं दोन उदाहरणें दिलीं आहेत.

विद्याधरः— अनुमतमनुमानमिदं[6] यत्रस्तत्साध्यसाधने कथिते ।

विश्वनाथः– अनुमानं[7] तु विच्छित्त्या ज्ञानं साध्यस्य साधनात् ।

जगन्नाथः– अनुमितिकरणमनुमानम्[8] ।

या व्याख्या पाहिल्या तर सर्वांचा तात्पर्यार्थ एकच आहे. काव्यलिङ्गांत हेतु स्पष्ट दिसत नाहीं तो ध्वनित होतो. अनुमानांत हेतु गम्य अथवा स्पष्टपणें सांगितलेला असतो. अनुमानांतील हेतु ज्ञापक व सरळ असतो. काव्यलिङ्गांतलि हेतु कारक अगर निष्पादक असून पर्यायानें लक्षांत येतो.

---

१ का. प्र. १०·११७. २ मालतीमाधव ३ ·१०. ३ स्वकृत. ४ अ. सू. ५२. ५ २ ए. ४·५० ७ सा. द. १०·६३. ८ र. गं. ४७५.

# प्रकरण ८ वें

## काव्यन्यायमूलअर्थालंकार

### १ यथासंख्य

१. सम् + ख्या मोजणें अगर स्पष्टीकरण करणें यावरून यथासंख्य म्हणजे वर उल्लेखिलेल्यांचें स्पष्टीकरण असा अर्थ होतो. भामहानें,

'भूयसामुपदिष्टानामर्थानामसधर्मणाम् ।
क्रमशो योऽनुनिर्देशो यथासंख्यं तदुच्यते ॥[1]

अशी व्याख्या केली आहे. यथासंख्य अलंकार भामहापूर्वींच मानलेला आहे; कारण

'यथासंख्यमथोत्प्रेक्षामलंकारद्वयं विदुः ।
संख्यानेमिति मेधाविनोत्प्रेक्षाभिहिता क्वचित् ॥[2]

असा भामहानें उल्लेख केलेला आहे. यावरून याला मेधावीनें 'संख्यान' हें नांव दिलेलें होतें व त्याच्यापासून हा अलंकार भामहानें घेतला. " अनेक भिन्न धर्मीय गोष्टींचा ज्या क्रमानें उल्लेख केला असेल त्याप्रमाणें पुढेंही त्यांचा त्याच अनुक्रमानें निर्देश करणें याला यथासंख्य ह्मणतात." उः—

तीरे–मारुत ना ताल, न तेजें वन हें रवि ।
न जना ललना तापीं–ह्मणी, आटवि, गाहवि ॥[3]

यांत तीर–मारुत, रवि व ललना यांचा जसा उल्लेख आहे त्याच अनुक्रमानें ह्मणी, आटवि व गाहवि यांचा उल्लेख आहे, म्हणून हा यथासंख्य झाला.

दण्डीः— उद्दिष्टानां पदार्थानामनुदेशो यथाक्रमम् ।
यथासंख्यमिति प्रोक्तं संख्यानं क्रम इत्यपि ॥[4]

दण्डीच्या व्याख्येंत अर्थतः फरक नाहीं पण दण्डीनें यथासंख्यालाच 'संख्यान' अथवा 'क्रम' म्हणतात असा उल्लेख केला आहे. यावरून यथासंख्याला 'क्रम' म्हणणाऱ्या एकाद्या अलंकारकर्त्याचाही दण्डीच्या पुस्तकाला आधार आहे असें दिसतें. तसेंच भामह–दण्डी हे समकालीन आहेत असें वाटण्यास हाही एक आधार आहे. भामह–दण्डी एकमेकांचा उल्लेख करीत नाहींत; पण त्यांच्या पूर्वीच्या ग्रंथांचा उल्लेख करतात. भामहाच्या पूर्वी दण्डी होऊन गेला असता तर 'यथासंख्य' हें नांव भामहानें अगर निदान कोणी तरी या अलंकाराला दिलें आहे असा दण्डीनें उल्लेख केलाच असता; तसेंच भामहानेंही केलें असतें. कारण

---

१ भा. लं. २·८९ २ भा. लं. २.८८ ३ सा. व. त्रि. १३·४०. ४ का. द. २.२७३

इतर अनेक ठिकाणीं त्यांनीं तसा उल्लेख केलेला आहे. 'यथासंख्य' या नांवाचे बाबतींत भामह व दण्डी हे दोघेही तिसऱ्याचाच आधार घेऊन लिहीत असावे असें वाटतें. उद्भटानें केवळ अर्थतःच नव्हे तर एकूण एक शब्द भामहाचा घेतला आहे असें दिसेलः— भूयसामुद्दिष्टानामर्थानामसधर्मणाम्

क्रमशो योनुनिर्देशो यथासंख्यं[1] तदुच्यते ॥

वामन—उपमेयोपमानानां संबन्धः क्रमः[2] '

'उपमेयोपमानानां' म्हणण्यानेंच वामनानें अनेक उपमेयें व उपमानें दर्शविलीं आहेत. अनेक उपमानें व उपमेयें यांचा क्रमानें संबन्ध जोडणें याला क्रम म्हणतात. वामनानें भामह, दण्डी, उद्भट या तिघांच्याही नांवाचा स्वीकार केला नाहीं. त्याला क्रम हेंच नांव पसंत पडलें. याच्या व्याख्येंत अजूनपर्यंत दिसणाऱ्या व्याख्यांहून निराळी अशी एक गोष्ट आहे व ती म्हणजे औपम्यभाव ही होय.

यथासंख्य हें नांव रुद्रटानें पुनः घेतलें. त्याची व्याख्या—

निर्दिश्यन्ते यस्मिन्नर्था विविधा यथैव परिपाट्या ।
पुनरपि तत्प्रतिबद्धास्तथैव तत्स्याद्यथासंख्यम्[3] ॥

अजूनपर्यंतचीच व्याख्या पण यानें जरा अधिक स्पष्ट शब्दांत मांडली. या व्याख्येला तो पुढील पुरवणी देतो.

तद्द्विगुणं[4] त्रिगुणं वा बहुषूद्दिष्टेषु जायते रम्यम् ।
यत्तेषु तथैव ततो द्वयोस्तु बहुशोऽपि बध्नीयात् ॥

या पुरवणीमध्यें भामह-उद्भटाच्या 'भूयसाम्' या मोघम शब्दाची अधिक स्पष्टता झाली. रुद्रट म्हणतो कीं प्रधानार्थ दोन अगर तीन असल्यास त्यांच्या अनेक आवृत्तींनींच यथासंख्य अधिक रम्य होईल. ज्याप्रमाणें उत्तर अलंकारांत एकाच प्रश्नोत्तरांत रम्यता नसून ती अनेक प्रश्नोत्तरांत असते, त्याचप्रमाणें यथासंख्यांतही अनेकत्वांत रम्यता असते. यांतील विशेष म्हणजे समान धर्म नसणाऱ्या अशा गोष्टींचा उल्लेख असून त्यांचा परस्पर संबंध असण्याची जरूरी नसते.

तृणें[5] मृगाला, सलिलें झषाला, संतोष हे वृत्ति महाजनाला
तयांस निष्कारण तीन वैरी । किरात, कैवर्तक दुष्ट भारी ॥

तृण, झष, महाजन यांचा अगर किरात, कैवर्तक व दुष्ट यांचा परस्पर कांहीं संबंध नाहीं.

मम्मटः— " यथासंख्यं[6] क्रमेणैव क्रमिकाणां समन्वयः "

रुय्यकः- उद्दिष्टानामर्थानां क्रमेणानुनिर्देशो यथासंख्यम्[7] ।

विद्याधरः-प्रथमं निर्दिष्टानां[8] यस्मिन्नर्थान्तराश्रयोऽर्थानाम् ।
अनुनिर्देशो भवति क्रमेण तत्स्याद्यथासंख्यम् ॥

---

१ का. लं. सा. स. ३. ३८ २ का. सू. ४.३.१७. ३ का. लं. ७.३४. ४ का. लं. ७.३५.
५ वामनपंडित-नीतिशतक २४ ६ का. प्र. १०.४६४ ७ अ. सू. ५९ ८ ए. ८.५०

विश्वनाथः— यथासंख्यमनुद्देश उद्दिष्टानां क्रमेण यत् ।[1]

अप्पय्यदीक्षितः–यथासंख्यं क्रमेणैव क्रमिकाणां समन्वयः ।[2]

जगन्नाथः— उपदेश-क्रमेणार्थानां संबन्धो यथासंख्यम् ॥[3]

वरील सर्व व्याख्यांत अर्थामध्यें कांहींच फरक नाहीं. पण कुवलयानंदांतील

शरणं किं प्रपन्नानि विषवन्मारयन्ति वा ।[4]
न त्यज्यन्ते न भुज्यन्ते कृपणेन धनानि यत् ॥

या उदाहरणांत यथासंख्याला लागणारीं उद्दिष्टें अनेक नाहींत, नुसतें 'धनानि' याचें अनेक वचन घालण्यामुळें यथासंख्याला लागणारीं वेगवेगळीं उद्दिष्टें त्यामध्यें येणें शक्य नाहीं. कुवलयानंदांत यथासंख्याची व्याख्याही हुबेहुब मम्मटाचीच घेतली आहे.

२. आतां वर दिलेल्या अलंकारशास्त्रज्ञांची यथासंख्याचीं उदाहरणें पाहिलीं तर त्यांत असें दिसेल कीं, भामह, दण्डी, उद्भट, वामन, रुय्यक, यांचीं उदाहरणें रुद्रट, मम्मट, व विश्वनाथ यांच्या उदाहरणांप्रमाणें अगदीं शुद्ध यथासंख्यांचीं नाहींत.भामह, दण्डी, उद्भट व वामन यांच्या उदाहरणांत उपमानोपमेयभाव आहे व 'जियन्ते' 'जिताः' या पदांनीं त्यांत प्रतीपाचाही भास होतो. एवढें मात्र खरें कीं, तो भास गौण आहे व यथासंख्यानेंच त्या उदाहरणांचें सौंदर्य अधिक वाढलें आहे. रुय्य-काचेंही उदाहरण असेंच आहे पण त्यानें त्यांत प्रतीप व यथासंख्य हे दोन्ही अलंकार आहेत असें स्पष्ट म्हटलें आहे. हें उदाहरणांविषयीं झालें. आतां यांच्या व्याख्या पाहतां, औपम्यभावाचा उल्लेख फक्त वामनानें केला आहे. असधर्मि अस-णाऱ्या अनेक गोष्टींसंबंधीं क्रमशः लिहिणें हेंच या अलंकारांत मुख्य तत्त्व आहे. त्यांत औपम्यभावच गोचर झाला पाहिजे असें नाहीं. पण ती गोष्ट वामनानें व्याख्येंत घातल्यानें त्याच्या व्याख्येचें उदाहरण नेहमींच संकराचें होईल असा संभव वाटतो. रुय्यक व जगन्नाथ यांनीं त्यांच्या यथासंख्याचे शाब्द व आर्थ असे दोन भेद केले आहेत.

यथासंख्याचीं उदाहरणें:—मानी मनोजशर हार–तुरे फुलांचे ।
कंदर्प–कोप–वचनें ध्वनि कोकिलांचे ।
राका शशी मदन–दर्पण भाविलाहे ।
नेघेचि तो, न परिसे, न तयासि पाहे.

(२) देवर्षि म्हणे, 'राजा ! परिसावा नृपजनेंद्र शशबिंदु; ।
यद्दृष्टिपुढें अरिनृपसिंह नयांचा बलाब्धि, शश, बिंदु. ॥[5]

---

१ सा. द. १०·७९ २ कु. (५०) १०७ ३ र. गं. ४७६ ४ कु. १०९ ङ.
५ र. पं. नलदमयंती.

# २ पर्याय.



३. भामहापासून ज्याला पर्यायोक्त म्हणत आले तसेंच पुढें पर्याय या नांवानें जो एक निराळाच अलंकार मानला त्यासाठीं म्हणजे अशा दोन अलंकारांकरितां रुद्रटानें पर्याय हा एकच शब्द वापरला आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे रुद्रट पर्यायाचेच जे दोन प्रकार करतो, त्यांनाच इतर पर्यायोक्त व पर्याय असे वेगवेगळे अलंकार समजतात. पर्याय म्हणजे फेरा अगर पुनरावृत्ति असा अर्थ आहे. रुद्रटाची व्याख्याः—

यत्रैकमनेकस्मिन्ननेकमेकत्र वा क्रमेण स्यात् ।
वस्तु सुखादिप्रकृति क्रियेत वान्यः स पर्यायः[१] ॥

ही व्याख्या इतर ज्याला पर्याय म्हणतात त्या पर्यायप्रकाराची होय. (१) एक वस्तु अनेकांच्या ठिकाणीं (२) अनेक वस्तू एका ठिकाणीं सुखदुःखादि स्वरूपानें असणें, याला रुद्रट पर्याय म्हणतो. रुद्रटाच्या दुसऱ्या भेदाचें उदाहरण पाहतां भय व अभय यांच्या विनिमयामुळें त्यांत परिवृत्तीची छटा दिसतेः—

आच्छिद्य[२] रिपोर्लक्ष्मीः कृता त्वया देवभृत्यभवनेषु ।
दत्तं भयं द्विषद्भ्यः पुनरभयं याचमानेभ्यः ॥

परंतु वस्तुतः त्यांत पर्यायच आहे. रुद्रटानें वर सांगितलेले दोनच भेद केले आहेत. आतां दुसऱ्या व्याख्या पाहूंः—

मम्मटः— एकं क्रमेणानेकस्मिन् पर्यायः[३] । अन्यस्ततोऽन्यथा
रुय्यकः— एकमनेकस्मिन्ननेकमेकस्मिन् वा क्रमेण पर्यायः[४] ।
विद्याधरः— एकस्मिन्यदनेकं क्रमादनेकत्र वा भवत्येकम् ।
तमलंकारनिरूपणनिपुणाः पर्यायमब्रुवत[५] ॥
विश्वनाथः— क्वचिदेकमनेकस्मिन्ननेकं चैकगं क्रमात् ।
भवति क्रियते वा चेत्तदा पर्याय[६] इष्यते ॥
अप्पय्यदीक्षितः— पर्यायो[७] यदि पर्यायेणैकस्यानेकसंश्रयः ।
जगन्नाथः— क्रमेणानेकाधिकरणकमेकमाधेयमेकः पर्यायः[८] ।
क्रमेणानेकाधेयकमेकमधिकरणमपरः ।

४. या सर्व व्याख्यांवरून पर्याय म्हणजे एकच वस्तु क्रमानें अनेक आधारांवर असणें किंवा अनेक वस्तु क्रमानें एका आधारावर असणें, रुय्यकानें याचे चार भेद केले. (१) एक वस्तु क्रमानें अनेकांचे ठिकाणीं असंहतत्वानें राहणें.
(२) एक वस्तु संहतत्वानें अनेक ठिकाणीं क्रमानें राहणें.

---

१ का. लं. ७.४२ २ का. लं. ७.४४ ३ का. प्र. १०.१८०।१८१ ४ अ. सू. ६० ५ ए. ८.५१ ६ सा. द. १०.८० ७ कु. (५१)) १०८) ८ र. गं. ४७८ पान,

( ३ ) अनेक वस्तु असंहतत्वानें एके ठिकाणीं क्रमानें असणें.

( ४ ) अनेक वस्तु संहतरूपें एके ठिकाणीं क्रमानें असणें.

उदाहरणें:— पद्मालया ही अतिमात्र चंचला
सोडी क्रमानें स्वपती अनिश्चला ॥
पूर्वी समुद्रीं मग विष्णुच्या करीं ।
सोडोनि त्या, नीच जनास आदरी ॥

( २ ) पदांनीं चांचल्य टाकिलें । तें नयनांनीं अंगिकारिलें ।
तारुण्यभरानें शोभलें । रूप तियेचें ॥

( ३ ) ज्यां[3] नयनीं क्रोधाच्या ज्वाला स्फुरती रिपूंसि भय देती ।
तेथेंच संप्रती अनुराग, रूपा, येउनी सुखा देती ॥

( ४ ) निष्ठुर[4], अवरद, अरूप ऐशीं नामें तुझीं मुखीं होतीं ।
तेथेंच भक्ततारक, कल्पद्रुम सदय संप्रती वसती ॥

पहिल्या उदाहरणांत एक लक्ष्मी अनेक ठिकाणीं असंहतरूपें आहे. दुसऱ्या उदाहरणांत एक चांचल्य अनेक ठिकाणीं संहतरूपें आहे. तिसऱ्या उदाहरणांत अनेक वस्तु असंहतरूपें एका ठिकाणीं क्रमानें आहेत. चौथ्या उदाहरणांत अनेक आधेयें संहतत्वानें एके ठिकाणीं आलीं आहेत. या चारी उदाहरणांत आधार हा आधेयांकडून क्रमानें व्याप्त झालेला दाखविल्यानें हे पर्यायाचे चार भेद झाले. मम्मटाचें 'बिम्बोष्ठराग० ' हें उदाहरण जगन्नाथाच्या मतें सार अलंकाराचें आहे. त्या उदाहरणांत ' राग ' हा क्रमानें एक आधेय सोडून दुसऱ्या ठिकाणीं जात नाहीं तर एकाच वेळीं दोन्ही ठिकाणीं राहातो म्हणून जगन्नाथाचें म्हणणें बरोबर दिसतें. कारण त्यांत रागाचा उत्कर्ष होत आहे.

५. अप्पय्य-दीक्षितानें आपल्या पर्याय-भेदांना निराळीं नांवें दिलीं आहेत. ( १ ) शुद्धपर्याय ( २ ) संकोच पर्याय ( ३ ) विकासपर्याय ( ४ ) आधेय पर्याय.

यांपैकीं शुद्ध पर्याय म्हणजे रुय्यकाचा पूर्वीं उदाहरण देऊन सांगितलेला पहिला भेद होय. दुसऱ्या भेदाचें उदाहरण पुढीलप्रमाणें होईल:—

राहे[5] नभांत तम, चंद्र तयासि पाहे
सोडी भयार्त तम धैर्य गुहेंत राहे ।
दिव्यौषधी बघुनि त्राण तयास नोहे ।
धांवोनि नीच हृदयीं झणि ठाव पाहे ॥

वर सांगितलेल्या भेदांपैकीं तिसरा व चौथा भेद हे एका निराळ्या पर्यायभेदाचे उपभेद आहेत. त्या पर्यायाची व्याख्या अशी—

एकस्मिन् यद्यनेकं वा पर्यायः सोऽपि सम्मतः ॥

---

१–२–३–४ स्वकृत. ५ का. प्र. पान. ६९.

हा भेद इतरांनींही केला आहे. पण याचे उपभेद मात्र इतरांनीं अप्पय्य-दीक्षितांप्रमाणें केले नाहींत. विकास पर्यायाचें उदाहरणः—

क्रोध—ज्वाला पेटती नयनीं । हृदयही व्यापिलें तयांनीं ।
खड्गीं वेगें संचारोनी । अरिमस्तकें तोडिलीं ।

अप्पय्यानें विकासपर्यायाचें म्हणून 'बिम्बोष्ठ राग' हें उदाहरण दिलें आहे, त्याप्रमाणेंच वरील उदाहरण आहे. हें पर्यायाचें होत नसून सार अलंकाराचेंच होईल; कारण क्रोधज्वाला क्रमानें पण सर्वत्र व्याप्त झाल्यानें हा पर्याय झाला नाहीं. मम्मटाचें उदाहरणही यावरून कसें चुकीचें आहे हें दिसेलच. अप्पय्यदीक्षिताचें आधेयपर्यायाचें उदाहरणही पर्यायाचें वाटत नाहीं. त्यानें दिलेलें उदाहरण असेंः—

इदानीं नाथस्त्वं वयमपि कलत्रं किमपरम् ।
हतानां प्राणानां कुलिशकठिनानां फलमिदम् ॥

यांत पर्याय कोठें आहे तें कळणेंही कठीण आहे. एकंदरीत अप्पय्यानें मानलेले भेद पाहतां ते मानण्यांत आपत्तीच आहे असें दिसेल.

## ३ परिवृत्ति

६. पर्याय व परिवृत्ति यांत किंचित् गोंधळ होण्याचा संभव असल्यानें आतां परिवृत्तिसंबंधीं विचार करूं. परिवृत्ति म्हणजे परत फिरणें अगर अदलाबदल. परिवृत्ति अलंकारांतही अदलाबदल, विनिमय असतो.

विशिष्टस्य यदादानमन्यापोहेन वस्तुनः ।
अर्थान्तरन्यासवती परिवृत्तिरसौ यथा ॥[3]

एक गोष्ट देऊन दुसऱ्या विशिष्ट गोष्टीचें ग्रहण करणें यास परिवृत्ति म्हणतात असें भामह म्हणतो. परिवृत्ति एक अर्थ नेऊन दुसरा आणून ठेवणारी आहे. 'अर्थानां यो विनिमयः परिवृत्तिस्तु सा स्मृता'[4] ही दण्डीची व्याख्या भामहासारखीच आहे. उद्भटाची व्याख्या भामह—दण्डींहून अगदीं निराळ्या तऱ्हेची आहेः—

समन्यूनविशिष्टैस्तु कस्यचित्परिवर्तनम् ।
अर्थानर्थस्वभावं यत्परिवृत्तिरभाणि सा ।[5]

भामहानें 'अर्थान्तरन्यासवती' हा शब्द 'अर्थान्तरन्यास अलंकार ज्यांत आहे अशी परिवृत्ति' हें दर्शविण्यासाठीं घातला आहे कीं काय असा संशय येतो. कारण त्याचें उदाहरण पाहातां एका ओळींत परिवृत्ति व दुसऱ्यांत अर्थान्तरन्यास आहे. किंवा कदाचित् अर्थान्तरन्यास हा फक्त उदाहरणांतच

१ स्वकृत  २ कु. पानं. १४६  ३ भा. लं. ३.४०.  ४ का. द. २.३५१.
५ का. सा. सं. ५-१७.

आला असेल व त्याच्या मतें 'अर्थान्तरन्यासवती' याचा अर्थ निराळा अर्थ आणून ठेवणारी असाच असेल. कदाचित् परिवृत्ति, हा सामान्य व्यवहारांतील मोबदल्याचा प्रकार नाहीं. त्यांत विशेषदर्शन असावयास पाहिजे व ओघानेंच विशेषदर्शनांतून सामान्य विधान काढून अर्थान्तरन्यास जोडीस असल्यास परिवृत्ति अधिक रम्य होईल असें त्याला वाटलें असेल. दण्डीनें अगर उद्भटानें ही भानगड ठेविली नाहीं. उद्भट तीन स्थितींत परिवृत्ति संभवते असें म्हणतो. ( १ ) सम व न्यून ( २ ) न्यून व सम ( ३ ) सम व सम यांच्यांत निर्फल अथवा सफल विनिमय होत असेल तेव्हां परिवृत्ति होईल.

( १ ) निर्कटींच्या नगाग्रींचे मिळती त्यास निर्झर ।
गज दानव्ययें त्याचें घेती जल निरंतर ॥[१]

यांत दान व जल या सम गोष्टींचा सफल विनिमय आहे म्हणून ही सम परिवृत्ति झाली.

( २ ) जाये पुरीप्रति जोडी अपकीर्ति, सुकीर्ति हातची दवडी ।
मातेप्रति पोर जसें मुद्रा हरवूनि मेळवुनि कवडी ॥[२]

येथें न्यूनाधिक परिवृत्तीनें नुकसान झालेलें आहे व परिवृत्ति निर्फल झाली आहे. ( ३ ) स्वामी पुण्य यश विपुल घेउनि हे म्यां धरा तुम्हां विकिली ।

उघडील जी कपाट स्वर्गाचें ती जिवीं धरावि किली ॥[३]

यांत यश घेऊन स्वर्ग देणारी धरा दिली म्हणजे सम व असम गोष्टींचा विनिमय झाल्यामुळें परिवृत्ति अलंकार झाला. या उदाहरणांत परिवृत्तीची सफलता आहे.

वामनानें 'समविसदृशाभ्यां परिवर्तनं परिवृत्तिः'[४] असें म्हटलें. उद्भटानें समपरिवृत्ति, न्यूनपरिवृत्ति व विशिष्ट परिवृत्ति असे तीन भेद केले, पण वस्तुतः त्यांतील शेवटचे दोन भेद एकाच न्यून अथवा विशिष्ट या भेदांत समाविष्ट करणें शक्य असल्यानेंच वामनानें केवळ दोन भेद केले असावे. ( १ ) सम किंवा ( २ ) असम विनिमय असल्यास परिवृत्ति अलंकार होतो असें वामन म्हणतो.

रुद्रटः—युगपद्दानादाने अन्योन्यं वस्तुनोः क्रियेते यत् ।
क्वचिदुपचर्येते वा प्रसिद्धितः सेति परिवृत्तिः ॥[५]

'उपचर्येते' या पदानें मूर्तांतच नव्हे तर अमूर्तांतही दान व आदान या क्रिया उत्पन्न करण्यामुळें 'परिवृत्ति' होते, असें रुद्रटानें आपल्या व्याख्येंतच सांगून टाकलें.

---

१ सा. व. वि. १३.२० २ मो. विराटपर्व ३ मो. अ. मे. ६.५९.
४ का. सू. ४.३.१६. ५ का. लं. ७.७७.

मम्मटः—परिवृत्तिर्विनिमयो योऽर्थानां स्यात्समासमैः ॥

रुय्यकः—समन्यूनाधिकानां समाधिकन्यूनैर्विनिमयः परिवृत्तिः ॥

विद्याधरः—अधिकन्यूनसमानां न्यूनाधिकतुल्यवस्तुभिर्यत्र ।
विनिमय एषा कथिता परिवृत्तिः कोविदैस्त्रिविधा ॥

विश्वनाथः—परिवृत्तिर्विनिमयः समन्यूनाधिकैर्भवेत् ॥

अप्पय्यदीक्षितः—परिवृत्तिर्विनिमयो न्यूनाभ्यधिकयोर्मिथः ॥

जगन्नाथः—परकीययत्किंचिद्वस्त्वादानविशिष्टं परस्मै स्वकीय
यत्किंचिद्वस्तुसमर्पणं परिवृत्तिः ॥

या व्याख्यांवरून असें दिसेल कीं, परिवृत्तीचे कित्येकांनीं तीन व कित्येकांनीं दोन प्रकार मानले आहेत. उद्भट, मम्मट, विद्याधर, विश्वनाथ व रुय्यक हे तीन भेद मानणारे आहेत; व वामन व अप्पय्यदीक्षित हे दोन भेद मानतात.

७. परिवृत्तींत, पैसा देऊन दोन आंबे आणण्याचा प्रत्यक्ष देवाण घेवाण असा व्यवहार नसून काल्पनिक विनिमय असतो. या अलंकारांतील 'विनिमय' शब्दाच्या अर्थासंबंधीं मतभेद आहे. (१) विनिमय हा दोन व्यक्तींत नसून एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं व कोणत्याही बाबतीत विनिमय असा एक अर्थ वामन व रुय्यक करतात व दोन व्यक्तींत एकाद्या अर्थाचा विनिमय असा दुसरा अर्थ मम्मट, जगन्नाथ इत्यादि करितात. असो. परिवृत्ति व पर्याय यांत फरक आहे. तो असा कीं पर्यायांत एक वस्तु क्रमानें अनेक ठिकाणीं असते म्हणजे ती जो एक आधार सोडते त्याचा आधार दुसरी वस्तु घेत नाहीं. पण परिवृत्तींत त्या सोडलेल्या आधारावर दुसरें आधेय येतें.

## ४ परिसंख्या.

८. परिसंख्या हा शब्द मीमांसकांचा आहे. सामान्य गोष्टींतून कांहीं विशेष गुणांमुळें विशिष्ट गोष्टी निवडून काढणें असा त्याचा अर्थ आहे. 'पंच पंचनखा भक्ष्याः' भक्ष्य म्हणून पांचच पंचनख प्राणी विहित आहेत दुसरे नाहींत हें त्याचें उदाहरण आहे. या अर्थावरून परिसंख्या अलंकाराच्या नांवासंबंधीं असा बोध होतो कीं, विशिष्ट कथन अगर निरास ज्यांत असतो तो परिसंख्या अलंकार. परिसंख्येची व्याख्या वामनापर्यंत कोणी केलेली दिसत नाहीं. रुद्रट तिची व्याख्या पुढीलप्रमाणें करतोः—

१ का. प्र. १०·१७२. २ अ. सू. ६१. ३ ए. ८·५२. ४ सा. द. १०·८१
५ कु. (५२) (११०). ६ र. गं. ४८१.

पृष्टमपृष्टं वा सद्गुणादि यत्कथ्यते क्वचित्तुल्यम् ।
अन्यत्र तु तद्भावः प्रतीयते सेति परिसंख्या[1] ॥

सद्गुण, क्रिया अथवा जातिरूप वस्तु इतर ठिकाणीं असतांही ती नियत आधारानें आहे व इतरत्र तिचा अभाव आहे असें सांगतात तेव्हां परिसंख्या होते. यांतील अभावकथन हें ( १ ) पृच्छेमुळें किंवा ( २ ) अपृच्छेमुळेंही असतें.

उः— को[2] लाभो गुणिसंगमः किमसुखं प्राज्ञेतरैः संगतिः ।
का हानिः समये च्युतिर्निपुणता का धर्मतत्त्वे रतिः ।
कः शूरो विजितेन्द्रियः प्रियतमा काऽनुव्रता किं धनम् ।
विद्या किं सुखमप्रवासगमनं राज्यं किमाज्ञाफलम् ॥

' लाभ कोणता तर गुणिसंगम ' असें म्हणण्यांत लाभ हा इतर ठिकाणीं असतांही तो गुणवानांच्या संगतींतच आहे असा नियत आधार लाभ या गोष्टीला दिला गेला. तसेंच पुढेंही नियत आधार सांगितले आहेत. म्हणून हा परिसंख्या अलंकार झाला. प्रश्नोत्तरें असल्यामुळें कांहीं गोष्टींचें या उदाहरणांत पृच्छेमुळं कथन आहे.

श्रुतेंचि[3] कीं श्रोत्र न कुंडलानें । दानेंचि कीं पाणि न कंकणानें ।
साजे तसा देहहि हा न आनें । परोपकारेंचि न चंदनानें ॥

या उदाहरणांतही एका गोष्टीला नियत आधार देऊन तिचा इतरत्र अभाव दाखविला आहे. येथें प्रश्न नसल्यानें ही अपृच्छेनें कथन असणारी परिसंख्या झाली.

मम्मटः—किंचित्पृष्टमपृष्टं वा कथितं यत्प्रकल्पते ।
तादृगन्यव्यपोहाय परिसंख्या[4] तु सा स्मृता ॥

९. मम्मटानें रुद्रटाचें ' सद्गुणादि ' एवढेंच पद न घेतां बाकी व्याख्या मात्र तशीच केली आहे. रुद्रटाच्या पुष्कळ व्याख्यांतून ' हर्षकोपादि ' व ' सद्गुणादि ' हीं पदें आढळतात. यावरून कदाचित् त्याला या विकारांचें व गुणांचें द्योतक असे अलंकार पाहिजे असतील. मम्मटानें रुद्रटाच्या दोन भेदांचे चार भेद केले. ( १ ) प्रश्नपूर्वक उत्तर ( २ ) अप्रश्नपूर्वक उत्तर ( ३ ) प्रश्नपूर्वक उत्तर असून त्यांत इतरांचा निरास केलेला ( ४ ) अप्रश्नपूर्वक उत्तरें असून इतरांचा निरास केलेला. पहिल्या व चौथ्या प्रकारचें उदाहरण अनुक्रमें वर दिलेलें ' को लाभो[5] ' व ' श्रुतेंचि[6] कीं ' होऊं शकेल. दुसऱ्या प्रकारचें उदाहरणः—

परम[7] आवडी नामाची । सुख-वसति वनाची ।
ईशचरणीं भक्ताची । सत्य माउली आढळे ॥

---

१ का. लं. ७.७७. २ भ. नी. १०३. ३ भ. नी. ७१. ४ का. प्र. १०.१८५.
५ भ. नी. १०३. ६ भ. नी. ७१. ७ स्वकृत.

तिसऱ्या प्रकारचें उदाहरणः—

काय ध्याऊं? चरण, ना कृष्णमाया।
काय पाहूं? ईश, ना क्षणिक देहा॥
काय सेवूं? नाम, ना वासनेला।
काय लेवूं? भक्ति, ना द्वैतजाला॥[1]

दुसऱ्या प्रकारच्या उदाहरणांत प्रश्न न विचारतां उत्तर आहे व त्यांत भक्ताची आवड व वसति यांना नियत स्थान आहे असें सांगितलें आहे. तिसऱ्या प्रकारच्या उदाहरणांत प्रश्न, उत्तर व निरास या तिन्ही गोष्टी स्पष्ट आहेत.

रुय्यकः—'एकस्यानेकत्र प्राप्तावेकत्र नियमनं परिसंख्या॥[2]

१०. परिवृत्तींत अगर पर्यायांत विनिमय व क्रमानें स्थानांत बदल होत जाणें अशी स्थिति असल्यानें परिसंख्येंत फरक दाखविण्यासाठीं एकच वस्तु अनेक ठिकाणीं असणें शक्य असतां इतरत्र त्याचा निरास करून एके ठिकाणींच अस्तित्व दाखविणें यास परिसंख्या म्हणावें असें रुय्यकानें सांगितलें. यानें मम्मटाचेच भेद स्वीकारले आहेत. निरास असणें व नसणें यासाठीं मात्र तो शाब्द व आर्थ हे शब्द वापरतो. अनेक ठिकाणीं वास्तव्य असतां त्याचें नियमन करणें हा जो रुय्यकानें आपल्या व्याख्येंत अर्थ आणला तो पुढें बहुतेकांनीं घेतला व त्याचे शाब्द व आर्थ हे भेदही घेतले असें व्याख्या पाहतां दिसून येतें.

विद्याधरः— एकस्यानेकप्राप्तो एकत्र यो भवेन्नियमः।
ख्याता सा परिसंख्या संख्यावाद्भिश्चतुर्भेदा॥[3]
प्रश्नपूर्वान्यथा चेति सा भवेत्प्रथमं द्विधा।
वर्जनीयस्य शाब्दत्वादर्थत्वाच्च द्विधा पुनः॥

विश्वनाथः— प्रश्नादप्रश्नतो वापि कथिताद्वस्तुनो भवेत्।
तादृगन्यव्यपोहश्चेच्छाब्द आर्थोऽथवा तदा। परिसंख्या॥[4]

अप्पय्यदीक्षितः—परिसंख्या निषिध्यैकमेकस्मिन्वस्तुयन्त्रणम्॥[5]

जगन्नाथः—सामान्यतः प्राप्तस्यार्थस्य कस्माच्चिद्विशेषाद्व्यावृत्तिः परिसंख्या॥[6]

अप्पय्यय्यदीक्षित शाब्द व आर्थ असे दोनच भेद करतो. परिसंख्य, विधि व नियम हे शब्द मीमांसकांचे असून त्यांतलि फरक स्पष्ट व्हावा म्हणून असें म्हटलेलें आहे कीं, विधिरत्यन्तमप्राप्ते नियमः पाक्षिके सति।
तत्र चान्यत्र च प्राप्ते परिसंख्येति गीयते॥[7]

---

१ स्वकृत. २ अ. सू. ६०. ३ ए. ८·५३–५४. ४ सा. द. १०·८१–८२.
५ कु. (५३) १११. ६ र. गं. ४८२. ७ र. गं.

११. उत्तर व परिसंख्या या दोन्ही अलंकारांत प्रश्न सूचित अगर स्पष्ट असतो पण उत्तरालंकारांत उत्तर असंभाव्य असतें म्हणजे तें साधें, सहज कल्पना करतां येण्याजोगें नसतें. परिसंख्येंत उत्तर साधें असलें तरी इतरांची व्यावृत्ति हाच तींत विशेष आहे. परिसंख्या अलंकारांतहि कविप्रतिभेवर स्वारस्य अवलंबून आहे. नुसत्या प्रश्नोत्तरांत कांहींच सौंदर्य असणार नाहीं.

## ५ अर्थापत्ति.

११. हा अलंकार प्रारंभीं पुष्कळ अलंकारशास्त्रज्ञांनीं मानलेला अगर अस्तित्वांत आणलेला दिसत नाहीं.

प्रत्यक्षादि प्रतीतोऽर्थो यस्तथा नोपपद्यते ।
अर्थान्तरं च गमयत्यर्थापत्तिं वदन्ति ताम् ॥

असें भोजानें म्हटलें आहे. यावरून भोजापूर्वीही हा अलंकार मानला असावा. अर्थापत्ति याचा अर्थ दुसरा अर्थ आणून देणारी असा होतो. "प्रत्यक्ष प्रमाणांनी निर्माण होणारा अर्थ न देतां दुसरा अर्थ जाणविणें म्हणजे अर्थापत्ति होय." मम्मटानें हा अलंकार मानला नाहीं. रुय्यकानें, 'दण्डापूपिकयार्थान्तरापतनमर्थापत्तिः' अशी व्याख्या केली. 'ज्याप्रमाणें दण्डभक्षणावरून अपूपिकाभक्षण हें ओघानेंच येतें. म्हणजे जेथें उंदरानें काठी इतकी कठिण असतां खाऊन टाकली तेथें तिला बांधलेला वडा खाल्ला हें निश्चितपणें आघानेंच सिद्ध होतें. त्याप्रमाणें एका अर्थावरून दुसरा अर्थ ओघानें निर्माण होणें यास अर्थापत्ति म्हणतात' मात्र हें अनुमान नव्हे. अनुमानांत व्याप्तीची मर्यादा असते. अमुक आहे म्हणून अमुक असलेंच पाहिजे हा जो अनुमानांतील प्रकार तो यांत नसतो. व्याप्तीशीं याचा संबंध नाहीं. ही अर्थापत्ति दोन प्रकारची आहे. (१) अप्राकरणिकावरून प्राकरणिक व (२) प्राकरणिकावरून अप्राकरणिक अर्थ निर्माण होणें. हा अर्थ कधीं श्लेषानेंही निर्माण होतो. अर्थापत्तीचीं उदाहरणें:-

व्रजौवन करावया वसविलें नखाग्रीं धरा ।
सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरा ।
वराहतनु घेउनी उचलली रदाग्रें धरा ।
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ? न कां उद्धरा ॥ १ ॥

पहिल्या तीन ओळींत सांगितलेल्या इतक्या विशेष गोष्टी तुम्ही केल्या असतांही हा पतित तुम्हांस उद्धरून नेण्यास कठिण कसा ? हा निराळाच अर्थ निर्माण होत असल्यानें येथें अर्थापत्ति अलंकार झाला. वरील केकेंत पहिल्या तीन ओळींत अप्रस्तुतार्थ (अप्राकरणिक अर्थ ) असून त्यावरून चौथ्या ओळींत प्रस्तुतार्थ ( प्राकरणिक अर्थ ) दिला आहे.

---

१ स. कं. ३.५२ २ अ. सू. ६३ ३ मो. के. ५.

धर्म म्हणे, ' मारीलचि निर्दय हा अंतकाम हे भाचे, ।
सात्यकिसहि जड; नुपडिल मग हरिच्या दंत का महेभाचे ॥

या आर्येत प्रथम प्रस्तुतार्थ असून त्यांतून अप्रस्तुतार्थ निघाला आहे. अशा रीतीनें रुय्यकाचे दोन भेद झाले.

विश्वनाथः— दण्डापूपिकयान्यार्थागमोऽर्थापत्तिरिष्यते ॥[2]
अप्पय्यदीक्षितः– 'कैमुत्येनार्थसंसिद्धिः काव्यार्थापत्तिरिष्यते '[3]
जगन्नाथः— केनचिदर्थेन तुल्यन्यायत्वादर्थान्तरस्यापत्तिरर्थापत्तिः[4]

१३. रुय्यक, विद्याधर व विश्वनाथ यांनीं अर्थापत्तीचे (१) प्रस्तुतार्थ (२) अप्रस्तुतार्थ यांवरून वर उदाहृत केलेले दोन भेद केले आहेत. अप्पय्यदीक्षितानें केलेल्या व्याख्येवर जगन्नाथानें आक्षेप घेऊन ती व्याख्या चुकीची आहे असें ह्मटलें आहे. कैमुतिकन्याय म्हणजे एकादी असाध्य गोष्टही साध्य झाल्यावर इतर गोष्टी ओघानेंच सिद्ध होणें, जगन्नाथ म्हणतोः यत्तु ' कैमुत्येनार्थसंसिद्धिः काव्यार्थापत्तिरिष्यते ' इति कुवलयानन्दकृता अस्या लक्षणं निर्मितं तदसत्। कैमुतिकन्यायस्य न्यूनार्थविषयत्वेनाधिकार्थापत्तावव्याप्तेः । जगन्नाथाच्या मतें अप्पय्य-दीक्षितांचें लक्षण हें चुकीचें आहे; कारण कैमुतिकन्यायांत अर्थाचें न्यूनत्व असल्यानें अधिक अर्थ निर्माण होत नाही. त्याच्या म्हणण्याप्रमाणें ' स जितस्त्वन्मुखेनेन्दुः का वार्ता सरसीरुहाम् ' हें उदाहरण कैमुतिकन्यायाचें नसून न्यायसाम्यत्वानें अर्थापत्ति झाल्याचें आहे.

जगन्नाथानें अर्थापत्तीचे २४ व भोजानें ६ भेद केले आहेत. जगन्नाथाचे भेद असेः– (१) प्रकृतावरून अप्रकृत (२) अप्रकृतावरून प्रकृत (३) प्रकृतावरून प्रकृत ( ३ ) अप्रकृतावरून अप्रकृत हे मुख्य चार भेद होतात. निर्माण होणाऱ्या दुसऱ्या अर्थाचें पहिल्या अर्थाशीं साम्य, न्यूनत्व किंवा आधिक्य असण्यावरून या प्रत्येक भेदाचे तीन भेद ह्मणजे बारा भेद झाले व पुनः भावत्व व अभावत्व असे प्रत्येकीं दोन भेद म्हणून एकंदरींत २४ भेद होतात. या भेदांचीं उदाहरणें देतांना ' दिङ्मात्रं दर्शनं ' ह्मणून त्यानें थोड्या भेदांचींच उदाहरणें दिलीं आहेत.

१४. अर्थापत्ति, अप्रस्तुतप्रशंसा अगर समासोक्ति यांत फरक पाहूं गेल्यास असें आढळेल कीं अप्रस्तुतप्रशंसा अगर समासोक्ति यांत प्रस्तुत अगर अप्रस्तुत अर्थ उक्त नसून तो गम्य असतो. अर्थापत्ति अलंकारांत प्रस्तुत अगर अप्रस्तुत कसाही अर्थ असला तरी उक्तच असतो.

---

१ मो. शल्यपर्व २·६६ २ सा. द. १०–८३ ३ कु. ( ) ११८·५९ ४ र. गं. ४८६. ५ र. गं. ४८७.

## ६ विकल्प.

५. विकल्प म्हणजे संशय, भेद अथवा विविधता. यावरून "विकल्प म्हणजे तुल्यबल असणाऱ्या दोन गोष्टींतील विरोध" असा अर्थ होतो; व ह्याच अर्थी रुय्यकाची व्याख्या आहेः—'तुल्यबलविरोधो विकल्पः'[1]. विकल्पाची व्याख्या मम्मटापर्यंत आढळत नाहीं. विद्याधर विकल्पाची व्याख्या पुढीलप्रमाणें करतोः—

तुल्यप्रमाणशैष्ट्यात् प्राप्तावेकत्र यौगपद्येन ।
उभयोः समानबलयोः स्फुरति विरोधो विकल्प इत्युक्तः[2] ॥

"दोन तुल्यबल गोष्टी सारख्याच महत्त्वाच्या आधारावर असून त्यांत विरोध असणें याला विकल्प म्हणावें" असें म्हणून विद्याधरानें रुय्यकापेक्षां थोडी निराळी व्याख्या केली.

विश्वनाथः—विकल्पस्तुल्यबलयोर्विरोधश्चातुरीयुतः[3] ।
अप्पयदीक्षितः—विरोधे तुल्यबलयोर्विकल्पालंकृतिर्मता[4] ।
जगन्नाथः—विरुद्धयोः पाक्षिकी प्राप्तिर्विकल्पः[5] ।

१६. रुय्यकाची व्याख्या अगदीं प्राथमिक स्वरूपाची असल्यानें जगन्नाथ म्हणतो त्याप्रमाणें 'भक्तिप्रह्वविलोकिनी' या उदाहरणांत 'नेत्रे तनुर्वा हरेः' असें म्हणण्यानें 'नेत्रे' व 'शिवतनु' यांत तुल्यबल विरोध नाहीं. विद्याधर, विश्वनाथ, अप्पय्यदीक्षित इत्यादिकांच्या उदाहरणांत असा गोंधळ झालेला दिसत नाही. नागोजी भट्टाच्या मतें हा अलंकार मानूंच नये. प्रतिभेनें काव्यसौंदर्य निर्माण केल्याशिवाय या अलंकाराला रम्यता नाहीं. परंतु एकदां एक अलंकार अस्तित्वांत आला असतां पुढें तो नापसंत झाला तरी टाकून देणें जड असल्यानें हा अलंकार किंवा यासारखेच इतर पुष्कळ अलंकार अलंकार-मंजूषेंत जागा धरून राहिले आहेत. विकल्प हा अलंकार समुच्चयाचा विरोधी आहे. व यांत तुल्यबल असणाऱ्या दोन गोष्टींतून एकाच गोष्टीचें ग्रहण करतां येतें; कारण दोन गोष्टींत विरोध असल्यानें दोन्ही गोष्टींचा स्वीकार करणें शक्य नसतें. विकल्प अलंकारांत औपम्यभाव किंवा श्लेष असला तर अधिक सौंदर्य येतें.

भीम[6] म्हणे कृष्णा ! अजि जातों मी संगर महा करितों ।
नमवो धनुष्य किंवा मस्तक मजपुढति अजि सुयोधन तो ॥

धनुष्य नमविणें किंवा मस्तक नमविणें या दोन्ही पूर्ण विरोधी गोष्टी एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं सांगितल्यामुळें हा विकल्प झाला.

---

१ अ. मू. ६४. २ ए.८.५६. ३ सा.द. १०.८५. ४ कु. (५४) ११२ ५ र. गं. ४८७. ६ र. गं. ४८८. ६ स्वकृत.

## ७ समुच्चय.

१७. समुच्चय या शब्दाच्या अर्थावरून समुच्चय अलंकार म्हणजे एकाच्या सिद्धीसाठीं एका कारणाबरोबर इतरही कारणें येणें याला समुच्चय म्हणावयाचें. समुच्चयाची व्याख्या रुद्रटापर्यंत कोणींच केली नाहीं; मात्र दण्डीच्या समुच्चयोपमेंत उपमेच्या जोडीला समुच्चयही असावासें वाटतें:

समुच्चयोपमाप्यस्ति न कान्त्यैव मुखं तव ।
ल्हादनाख्येन चान्वेति कर्मणेन्दुमितीदृशी[1] ॥

रुद्रटः— यत्रैकत्रानेकं वस्तु परं स्यात्सुखावहाद्येव ।
ज्ञेयः समुच्चयोऽसौ त्रेधान्यः सदसतोर्योगः[2] ॥

जेव्हां एके ठिकाणीं अनेक वस्तु शोभादायक रीतीनें मदतीला येतात, तेव्हां समुच्चय होतो. हा समुच्चय जाति,क्रिया, गुण व द्रव्य यांनीं व द्रव्यादींचा सुखावह योग होण्यामुळें होतो. समुच्चयाच्या ( १ ) सत् ( २ ) असत् व ( ३ )सदसत् या गोष्टींच्या योगानें तीन स्थिति संभवतात. रुद्रटाच्या या समुच्चय प्रकारांचीं उदाहरणें पाहूं:—

उल्हाटांचे[3] शब्द, हांका भटांच्या । विद्रुंगाच्या गर्जना वारणांच्या ॥
सर्वांनी या एक कल्लोळ केला । ऐसा कांहीं काळ संग्राम झाला ॥

शब्द, हांका व गर्जना यांचा योग आल्यानें कल्लोळ झाला म्हणून हें जातिसमुच्चयाचें उदाहरण झालें. द्रव्यादींचा सुखावह योग असतां होणारा समुच्चयः—

सरस[3] यौवन, सुंदररूपता । वपु निरामय, कीर्ति दिगंता ॥
मुदित मानस शांति अखंडिता । सुखनिवास अशा परि कोणता ॥

फुका[4] कोरडें वैर कीं निर्दयत्व ।
परस्त्री, परद्रव्य हें मुख्य सत्त्व ।
अनिष्टत्व चित्तीं सुहृद्बांधवांचें ।
स्वतःसिद्ध हें रूप पैं दुर्जनांचें ॥

येथें दुर्जनाच्या दुर्गुणांचा समुच्चय सांगितल्यामुळें हा गुणसमुच्चय झाला. क्रियासमुच्चयाचें उदाहरण असें:--

खरें[5] वचन बोलवी, जडपणास कीं मालवी ।
महोन्नतिस डोलवी, दुरित मारुनी चालवी ।

---

१ का. द. २.२१   २ का. लं. ७.१९   ३ साधुदास. वनविहार. ९.३८.
४ सा. व. वि. ७.१२.   ५ भ. नी.   ३ भ. नी.

मनीं सुख अमोलवी, यश जगत्रयीं कालवी।
अनेक गुण पालवी, सुजन संगति झूलवी ॥

सत् समुच्चय चांगल्या गोष्टी एकत्र येण्यानें होतो:—

वर्षानीरें अंकुर भूला नव आले ।
नीरावर्ते संकुल झालीं तरुमूलें ॥
स्थूलाघातां पर्वत सोडी जलपातां !
नीरक्रीडा ही करि मोदें क्षितिकांता ॥

येथें सर्व चांगल्या गोष्टी एकत्र जमून आल्या आहेत. असत् समुच्चय अनिष्ट गोष्टी एकत्र येण्यामुळें होतो:—

त्यातें श्रम बहु झाला होता, तंई तो पडे असावध हो ।
केला दौःशासनिनें धर्म, नय, त्यजुनिया असा वध हो ॥

श्रम होणें ह्या अनिष्ट गोष्टीला येथें असावध होणें व वध होणें या अनिष्ट गोष्टी येऊन मिळाल्या आहेत. सदसत् समुच्चयांत चांगल्या व अनिष्ट गोष्टी एकत्र येतात

कुसुमचयीं अग्निपतन । रूपविलासी स्त्रियांत वृद्धत्व ।
सौंदर्यांत सुदुर्गुण । नीचाठायीं प्रभूत श्रीमत्व ॥

रुद्रटाच्या समुच्चयाची एक व्याख्या आपण पाहिलीच आहे. त्याशिवाय दुसरी व्याख्या आहे ती अशी:—

व्यधिकरणे वा यस्मिन्गुणक्रिये चैककालमेकस्मिन् ।
उपजायेते देशे समुच्चयः स्यात्तदन्योऽसौ ॥

गुण व क्रिया यांचे आश्रय भिन्न असतांही तीं एका वेळीं एके ठिकाणीं येतात तेव्हां दुसऱ्या प्रकारचा समुच्चय होतो. या व्याख्येंत मम्मटानें पुढें सुधारणा केली आहे. याशिवाय रुद्रटानें औपम्यालंकार विभागांत एक समुच्चयाची व्याख्या केली आहे ती अशी:—

सोऽयं समुच्चयः स्याद्यत्रानेकोऽर्थ एकसामान्यः ।
अनिवादिर्द्रव्यादिः सत्युपमानोपमेयत्वे ॥

'इव'या सारख्या शब्दप्रयोगावांचून, उपमानें व उपमेयें अनेक असून तीं एका द्रव्यरूप जातिरूप इत्यादि सामान्य धर्मानें बद्ध होतात तेव्हां समुच्चय होतो. पण ही व्याख्या हुबेहूब दीपकाच्या व्याख्येसारखी होते व याचें उदाहरणही दीपकाचेंच आहे.

---

१ सा. व. वि. १६·१८. २ मो. गदापर्व. ३ स्वकृत. ४ का. लं. ७·२७.
५. ५ का. लं. ८·१०३·१०४.

१८. डॉ. सुखटणकर यांनीं समुच्चयावर टीप लिहिली आहे. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा आहे कीं रुद्रटाचा 'समुच्चय' अलंकार पुढील अलंकारकर्त्यांना कळलेला नाहीं. मम्मट हा रुद्रटाच्या काव्यालंकारांशीं पूर्ण परिचित होता. मम्मटानंतर अल्लटानें काव्यप्रकाशांत कांहीं भाग लिहिलेला आहे व त्या सर्व भागाला आधार रुद्रटाचाच आहे. असें असतां रुद्रटाच्या अर्थाप्रमाणें त्यानें उदाहरणें दिलीं नाहींत याचें कारण रुद्रटाला त्यानें सहेतुक बाजूस सारलें असें नसून अल्लटाला रुद्रटाचा दुसरा समुच्चय प्रकार कळलाच नाहीं

काव्यप्रकाशाच्या वृत्तींत रुद्रटाच्या समुच्चयाचा दुसरा प्रकार सांगितला आहे पण वस्तुतः तो तसा नाहीं. रुद्रटाचा पहिला समुच्चय व दुसरा यांत फरक आहे. पहिल्या प्रकारांत एकेक वस्तु मिळून समुच्चय झाला आहे तर दुसऱ्या प्रकारांत वस्तूंच्या जोड्या असून त्या जोड्यांनीं समुच्चय झाला आहे.

डॉ. सुखटणकर पुढें म्हणतात कीं, There is no question of things which are 'good' by themselves and 'bad' on account of some qualifying circumstances." Nami Sadhu in his commentary 7–25 rightly observed सामोद कुसुमादिषु मध्वादिनां सतां योगः in this Samuccaya there is a union of two good things. And further on in 7–25 मिश्रीभूताः there is actual mixture, combination, union.

In 'Sadyoga' there is a heap of pairs of good things. In Asadyoga a heap of pairs of bad things and in 'Sadasadyoga', a heap of pairs of things one of which is good and the other bad.

रुद्रटाच्या या जोड पद्धतीचा काव्यप्रकाशांत उल्लेखही नाहीं. त्यांतील उदाहरणें रुद्रटाच्या पहिल्या समुच्चयप्रकाराचा होतात. 'तथाहि...शोभनाशोभनयोः' ही वृत्ति मागाहून कोणीतरी घुसडलेली आहे. असो.

१९. आतांपर्यंत आपण रुद्रटाच्या तीन व्याख्या पाहिल्या व त्यांपैकीं तिसरी व्याख्या दीपकाचीच होते हें सांगितलें. पहिल्या व्याख्येचीं पूर्वीं दिलेलीं उदाहरणें हीं रुद्रटानें दिलेल्या उदाहरणासारखींच आहेत. तीं पाहातां असें दिसेल कीं सुखावह वस्तूंचा समुच्चय, चांगल्या गोष्टींच्या एकत्र योगानें होणारा समुच्चय, वाईट वस्तूंच्या एकत्र योगानें होणारा समुच्चय, चांगल्या वाईटांच्या योगानें होणारा समुच्चय, गुणसमुच्चय, क्रियासमुच्चय, द्रव्यसमुच्चय, अशा निरनिराळ्या समुच्चयाचीं उदाहरणें रुद्रटानें दिलीं असतां सुखावहादींचा निराळा समुच्चय सांगण्याचें

कारण नाहीं. कारण त्यामुळें आणखीही फांटे फुटण्याचा संभव आहे. पण रुद्रटाला त्या शब्दाची आवडच आहे असें दिसतें. त्याचप्रमाणें सत्, असत्, सदसत् असे भेद व्याख्येंतच गोंवून मर्यादा घालण्यापेक्षां ते तीन भेद न सांगतां एक सामान्य लक्षण सांगितल्यानें त्यांत या व आणखी कित्येक भेदांनांही रिघाव मिळाला असता. पण व्याख्येंतच भेदांना नियत स्वरूप मिळाल्यामुळें असेच आणखी कांहीं भेद यांत कां येऊं शकणार नाहीं हा साहजिकच प्रश्न येतो. व रुद्रटाची ही व्याख्या सदोष वाटते. त्याची दुसरी व्याख्या पाहिली असतां, त्यांतील ' व्यधिकरणे ' व ' एकस्मिन् देशे ' हे शब्द ध्याख्येंत आवश्यक नाहींत, किंबहुना ते नकोत. कारण गुणक्रियांचा समुच्चय हा आश्रयभेद असतांच होईल असें नसून एकाश्रयांतही गुणक्रियासमुच्चय असतो.

**१०.** मम्मटानें आपल्या व्याख्येंतून रुद्रटाचे ' व्यधिकरणे ' 'एकस्मिन् देशे ' हे शब्द कमी केले आहेत. मम्मटाची व्याख्याः—

तत्सिद्धिहेतोवकस्मिन् यत्रान्यत्तत्करं भवेत् ।
समुच्चयो[1]ऽसौ स त्वन्यो युगपद्या गुणक्रियाः ॥

" (१) प्रस्तुत कारण साधक असतां इतर साधनें त्यास मदतीस आलीं किंवा (२) गुण अथवा क्रिया हीं एका कालीं होतील तर त्याला समुच्चय म्हणतात. " मम्मटानें रुद्रटाची प्रथमावस्थेंत असणारी व्याख्या चांगलीच सुधारली. त्याच्या व्याख्येंतील कांहींसें शैथिल्य व कांहीं विनाकारण असणारे निर्बंध हे मम्मटानें नाहींसे केले. रुय्यकानें व्याख्येंत व भेदांत त्याचेंच अनुकरण केलें.

' गुणक्रियायौगपद्यं समुच्चयः '
एकस्य सिद्धिहेतुत्वेऽन्यस्य तत्करत्वं च[2] '

या दोन व्याख्यांतील पहिली व्याख्या ही मम्मटाच्या दुसऱ्या समुच्चयाची आहे व दुसरी व्याख्या ती मम्मटाच्या पहिल्या समुच्चयाची आहे. मम्मटानें आपल्या पहिल्या समुच्चयाचीं ( १ ) सत् ( २ ) असत् ( ३ ) सदसत् यांचा योग दर्शविणारीं उदाहरणें दिलीं आहेत. तसेंच रुय्यकानेंही केलें आहे, पण ते भेद व्याख्येंतच घालून त्यांनीं व्याख्येला अनाठायीं बंधन घातलें नाहीं. हा रुद्रटाच्या व यांच्या व्याख्येंत फरक आहे. मम्मटानें गुणक्रियासमुच्चयाचीं १ गुणसमुच्चय २ क्रियासमुच्चय ३ गुणक्रियासमुच्चय एक कालीं घडून होणारीं उदाहरणें दिलीं आहेत, तशींच रुय्यकानेंही दिलीं आहेत. क्रियांचें यौगपद्य म्हणजे त्यांच्या एककालीनत्वानें होणारा समुच्चयः—

जेव्हां[3] कृष्णग्रीवा मन्माला या युगासि गांठि पडे ।
त्याचि क्षणांत बाई ! खल-भूप-भ्रूलतांसि गांठि पडे ॥

---

१ का. प्र. १०-१७८. २ अ. सू. ६५-६६. ३ मो.

कृष्णाच्या गळ्यांत माळ घालणें व खलभूपाच्या कपाळावर आठ्या चढणें या एकाच कालीं घडलेल्या गोष्टी येथें दाखविल्या आहेत.

उदयाचालिं शशि येतां । धवलत्वें व्यापिलें क्षणिं नभासी ।
कृष्णत्व दस्युहृदया । निर्भयता साजवी वनचरासी ॥[1]

धवलत्व, कृष्णत्व व निर्भयत्व या गुणांचें यौगपद्य या ठिकणीं दाखविलें आहे.

विद्याधराची व्याख्या पाहतां विद्याधरानें समुच्चयाचा तत्करसमुच्चय असा एक स्वतंत्र भेद कल्पिलेला दिसतो; पण वस्तुतः तो रुय्यकाच्या दुसऱ्या भेदाप्रमाणेंच आहे. विद्याधराची व्याख्याः--

यद्भवति यौगपद्यं गुणक्रियाणां समुच्चयः स स्यात् ।
एषोऽदर्शि विकल्पप्रनिभक्तभूनो द्विधास्माभिः ॥
एकेन क्रियमाणं यत्रान्यः स्पर्धयैव तत्कुरुते ।
सोऽपि समुच्चयभेदः कथितोऽन्यस्तत्करो द्वैधम् ॥[2]

रुय्यकाच्या व्याख्येंत 'एकस्य सिद्धिहेतुत्वेऽन्यस्य तत्करत्वम्'[3] असें म्हटलें आहे. त्यांत तत्कर हें त्या भेदाचें नांव नसून त्याचा अर्थ 'तसेंच करणें' म्हणजे एकानें जें केलें असतें त्यालाच पुष्टी देणारी कृति करणें असा आहे. विद्याधरानें आपल्या समुच्चय प्रकाराला तत्कर हेंच नांव देऊन टाकलें. त्यानें गुणक्रियांच्या यौगपद्यावरून दोनच भेद केले आहेत.

विश्वनाथानें समुच्चयाची समाधि-अलंकारापासून फारकत करण्यासाठीं व्याख्या अधिक स्पष्ट केलीः—

समुच्चयोऽयमेकस्मिन् सति कार्यस्य साधके ।
खले कपोतिकान्यायात्तत्करः स्यात्परेऽपि चेत् ॥
गुणौ क्रिये वा युगपत्स्यातां यद्वा गुणक्रिये ।[4]

'(१) एक कारण समर्थ असतांही दुसरीं मदतीला येणें अगर (२) गुण अथवा क्रिया किंवा गुण व क्रिया यांच्या एककालिकत्वाला समुच्चय म्हणावें' याच्या व्याख्येंत मम्मट रुय्यकाच्या व्याख्येहून निराळें कांहीं नाहीं.

अप्पय्यदीक्षितः—बहूनां युगपद्भावभाजां गुम्फः समुच्चयः ।[5]
अहं प्राथमिकाभाजामेककार्यान्वयेऽपि सः ॥

"विरोध न येतां कारणांची एककालीं स्थिति संभवणें किंवा स्पर्धेनें कारणें जुळून येणें याला समुच्चय म्हणावें." अप्पय्यदीक्षित या समुच्चयाचे भेद करण्याचे भानगडींत पडला नाहीं.

जगन्नाथः—युगपत्पदार्थानामन्वयः समुच्चय[6]

---

१ स्वकृत. २ ए. १८·५७—५८ ३ अ. स. ६६. ४ सा. द. १०·८४—८५.
५ कु. (५५) ११३. ६ र. गं. ४८९.

यानें ' युगपद् ' म्हणजे अगदीं एकाच वेळीं असा अर्थ न सांगतां किंचित् मागें पुढें काल असणें यालाहीं ' युगपद् ' ह्मणतां येईल पण त्यांन पर्याय अलंकारांतील क्रम नसला म्हणजे झालें असें म्हटलें आहे.

जगन्नाथाला रुद्रटाच्या ' सुखवहादि ' शब्दाची स्मृति झाल्यासारखें वाटतें कारण त्यानें समुच्चयाचे भेद पुढील प्रमाणें पाडले आहेतः--( १ ) भिन्नधर्मीयांचें ऐक्य ( २ ) एक धर्मीयांचें ऐक्य हे दोन मुख्य भेद, यांपैकीं पहिल्या भेदाचे उपभेदः-- ( १ ) गुण ( २ ) क्रिया ( ३ ) गुणक्रिया ( ४ ) रमणीय ( ५ ) अरमणीय ( ६ ) रमणीय आणि अरमणीय यांचा योग येण्यानें होणारे समुच्चय भेद. दुसऱ्या मुख्य भेदाचे उपभेदः-- ( १ ) अतिरिक्त संबंधी कारणानें व ( २ ) जवळच्याच कारणानें समुच्चय होणें. हे दोन भेद झाले. यावरून हें दिसून येईल कीं अजूनपर्यंत दिसणाऱ्या सर्व भेदांचा जगन्नाथानें संग्रह केला आहे.

२१. आतां ' शशी दिवस धूसरो ' या उदाहरणासंबंधीं असणाऱ्या मतभेदाकडे पाहूं:- हें उदाहरण मम्मटानें सद्सत् योगाचें ह्मणून दिलें आहे. पण तो सद्सतांचा योग नाहीं असें ह्मणणारे कित्येक लोक आहेत. कारण शशी व कामिनी हीं चांगलीं असलीं तरी त्यांच्या वाईट विशेषणामुळें तीं अशोभन झाली आहेत. ह्मणून तें उदाहरण अशोभनांच्या योगामुळें आहे असें ते ह्मणतात. पण मम्मट, रुय्यक, विश्वनाथ, जगन्नाथ हे म्हणतात कीं, हा सद्सतांचाच योग आहे, कारण शशी स्वतःच्या ठिकाणीं शोभन आहे ह्मणजे दिवसधूसरत्वानें शोभन असें नव्हे. दिवस धूसरत्वानें शशीचें अशोभनत्व व खल इत्यादींचें अशोभनत्व या दृष्टीनें हा सद्सत् यांच्या योगानें होणारा समुच्चय होय. ' सद्सतां योगः' याचा अर्थ एक चांगली गोष्ट व एक वाईट, गोष्ट असाच न घेतां नेहमीं चांगली असणारी गोष्ट वाईट झाली तरी ती सद्सत् संयोग याच सदरांत येईल.

कित्येकांच्या मतें एकच कार्योत्पत्ति होण्यासाठीं शशी,कामिनी व खल या चांगल्या वाईट गोष्टींचा एकत्र योग होऊन एक-कार्यसाधक समुच्चय कसा होईल ? यावर रुय्यक ह्मणतो कीं शशी,कामिनी सुंदर असूनही शल्यवत् झाल्यानें त्यांत दुष्टत्व आलें म्हणून त्यांचा खल इत्यादिकांशीं समुच्चय होणें अगदीं शक्य आहे. या वादांत मम्मट-रुय्यक इत्यादि लोकांचें ह्मणणें बरोबर वाटतें. असो. समुच्चय व पर्याय यांत फरक काय हें पाहूं गेल्यास असें दिसतें कीं, पर्यायांत क्रमानें एका पाठोपाठ एक अशा वस्तु येतात. समुच्चयांत जवळ जवळ एकदमच अनेक गोष्टी येतात. समुच्चयांत सहकारित्वानें कार्य घडतें. समाधि व समुच्चय यांत हा फरक आहे कीं, समाधींत एका कारणाला दुसरें कारण सौकर्य आणतें; समुच्चयांत सौकर्य आणण्याचा प्रश्न नसून सिद्धीसाठीं अनेकांनीं एकत्र होणें ही मुख्य गोष्ट असते.

---

१ का. प्र. ६८८ पान.

वर जगन्नाथाचे रमणीय, अरमणीय, यावरून, केलेले भेद पाहिले असतां किंवा रुद्रटाचींही (१) सत् (२) असत् योगाचीं उदाहरणें पाहिलीं असतां कित्येकांना अनुक्रमें सम व विषम अलंकारांची आठवण होईल. जगन्नाथ या शंकेच्या निरसनार्थ म्हणतो कीं, अभिप्रेत अर्थ पाहून सम अगर विषम समुच्चय यांतील फरक ठरवावा लागेल. पण जगन्नाथाची 'अभिप्रेत अर्थ पाहून' ही अट व्यवहारांत पाळली न गेल्यानें सम–समुच्चय, विषम–समुच्चय यांत फरक राहात नाहीं.

## ८ समाधि.



**१२.** समाधि याचा अर्थ नीट उपाययोजना करणें, पूर्णता आणणें, संयोग करणें असा होतो. या दृष्टीनें समाधि अलंकाराचें नामाभिधान सार्थ आहे. या अलंकाराचा प्रथमपासून शेवटपर्यंत थोडासा गोंधळ झाल्यासारखा दिसतो. भामह, दण्डी या अलंकाराला समाहित म्हणतात. वामनानेंही त्याला समाहित म्हटलें आहे. उद्भट समाधि नांवाचा अलंकार मानीत नाहीं. समाहित नांवाचा अलंकार त्यानें मानला आहे पण तो दण्डीपेक्षां अगर भामहापेक्षां अगदीं निराळ्या तऱ्हेचा आहे. वामनापासून पुढें समाधि हा अर्थालंकार मानला गेला आहे, व भामह–दण्डीच्या समाहिताहून निराळा असा 'समाहित' हा रसालंकार मानला आहे. आपण प्रथमतः भामहांचा समाहित अलंकार पाहूं:—

> समाहितं राजमित्रे यथा क्षत्रिययोषिताम् ।
> रामप्रसक्त्यै यान्तीनां पुरोऽदृश्यत नारदः ॥[1]

ही भामहाची व्याख्या पाहातां असें दिसेल कीं भामहानें समाहिताचें लक्षण कांहींच न देतां 'राजमित्रां'त सांगितल्याप्रमाणें हें समाहिताचें उदाहरण होईल एवढेंच सांगितलें आहे. पण त्याच्या उदाहरणावरून व्याख्येचा ध्वनि असा निघतो कीं, कोणचेंही कार्य करूं घातलें असतां त्याला पोषक अशी दुसरी गोष्ट घडून कार्यपूर्ति होणें याला समाहित म्हणावें." पुढील अलंकारकोविदांनीं यालाच पुढें 'समाधि' हें नांव दिलें आहे असें दिसून येईल. दण्डीनें समाहिताची व्याख्या अशी केली,

> किंचिदारभमाणस्य कार्यं दैववशात्पुनः ।
> तत्साधनसमापत्तिर्या तदाहुः समाहितम् ॥[2]

भामहाच्या उदाहरणावरून त्याच्या व्याख्येचा जो ध्वनि निघतो त्याच अर्थाची दण्डीची व्याख्या आहे. दण्डीनें समाहित हा अर्थालंकार मानला आहे, व समाधि

---

१ भा. लं. ३·१०. २ का. द. २·२९८

हा गुण मानला आहे. वामनाची 'सादृश्याल्लक्षणा वक्रोक्तिः'[1] ही जी वक्रोक्तीची व्याख्या आहे त्याप्रमाणेंच दण्डीचा समाधि गुण आहे. दण्डीचा समाधि गुण दाखविणारें व समाहित अलंकार दाखविणारें उदाहरण हींही पुष्कळशीं सारखीं आहेत. अर्थातच या समाधि गुणाचा व समाहित अलंकाराचा कांहीं संबंध नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

> ऐन्यामध्यें[2] महालीं निरखित असतां रूपशृंगार बाला,
> आला मागूनि भर्ता, पुढति बघुनिया बिम्बयोगें तयाला,
> बिम्बाच्या बिम्बभावा विसरुनि सरली लाजुनी त्यास मागें,
> कान्तें तों आयती ती कवळुनि हृदयीं चुम्बिली गाढ वेगें !

या ठिकाणींही पतीच्या मनांतील इच्छित आपोआप साधन संपत्तीनें म्हणजे पत्नीच्या मागें सरकण्यानें घडून आल्यामुळें हा समाहित अर्थात् दण्डीचा समाहित म्हणजेच पुढें 'समाधि' नांव धारण करणारा अलंकार होय.

९३. वामनानें शब्दगुणाचें निरूपण करीत असतां, 'आरोहावरोहक्रमः समाधिः'[3] अर्थगुण निरूपण करीत असतां, 'अर्थदृष्टिः समाधि:'[4] व अर्थालंकार निरूपण करतांना 'यत्सादृश्यं तत्संपत्तिः समाहितम्'[5] अशा 'समाधि' व 'समाहित' यांच्या व्याख्या केल्या आहेत. त्यांचा अर्थ असाः— आरोह व अवरोह यांत सुव्यवस्थितपणा असल्यास तो समाधि नामक शब्दगुण होईल. अर्थामध्यें सुव्यवस्थितपणा असेल तेव्हां समाधि हा अर्थगुण होईल. आतां समाहित अलंकार पाहूं गेल्यास वामनाचा समाहित व दण्डीचा समाहित यांत पुष्कळ फरक आहे असें दिसेल. वामनाच्या व्याख्येप्रमाणें पाहिलें असतां ज्या ठिकाणीं एकाद्या वस्तूचें सादृश्य कल्पावें त्याठिकाणीं मूर्तिमान ती वस्तूच दिसावी याला समाहित अलंकार म्हणावयाचें. यावरून दण्डीच्या व वामनाच्या व्याख्येंत एक गोष्ट मात्र साधारण आहे व ती म्हणजे दण्डीच्या व याच्या व्याख्येंत इच्छित अगर सादृश्यकल्पन यांचें संपत्तीमध्यें रूपांतर होतें. संपत्तीमध्यें रूपांतर होणें याचा अर्थ जी गोष्ट आपणांस मिळते ती आपणांस अनिष्ट नसून उलट इष्ट असते. ही दोन्ही व्याख्यांतील सामान्य गोष्ट आहे. पण नुसत्या इच्छिताला इतर साधनें मिळून फलोत्पत्ति होते असें दण्डी म्हणतो व 'सादृश्य कल्पित असावें तोंच प्रत्यक्ष ती वस्तु प्रत्यक्ष दिसल्यामुळें कल्पनासृष्टीतून सत्य-सृष्टींतच इच्छित फलप्राप्ति होते' असें वामन म्हणतो. दण्डीच्या उदाहरणाप्रमाणें 'ऐन्यामध्यें' हें उदाहरण दिलेंच आहे. आतां वामनाच्या व्याख्येप्रमाणें उदाहरण घेऊं.

---

१ का. सू. ४·३·८ २ केशवसुत. ३ का. सू. ३·१·१३ ४ का. सू. ३·२·७
५ का. सू. ४·३·२९

अवलोकी ती प्रेमळमूर्ति खुल्या कल्पनासृष्टीतें ।
आढळली कांक्षिता सत्य तो मातृमूर्ति तदृष्टींत ॥

कल्पनासृष्टींत कल्पिलेली आईची प्रेमळ मूर्ति सत्यसृष्टींत कन्यकेच्या दृष्टी-पुढें आल्यानें येथें वामनाचा समाहित अलंकार झाला.

२४. मम्मटानें दण्डीची व्याख्याच पण थोडक्यांत आणली पण तो त्या अलंकाराला दण्डीप्रमाणें 'समाहित' न म्हणतां 'समाधि' असें म्हणतो. मम्मटानें 'माधुर्य', 'ओज' व 'प्रसाद' हे तीनच गुण मानल्यामुळें समाधि हा अर्थ-गुण व शब्दगुण म्हणून त्यानें विवेचिला नाहीं. 'समाधिः सुकरं कार्यं कारणान्तर-योगतः' ही त्याच्या समाधि अलंकाराची व्याख्या पहातां दण्डीच्या समाहि-तांत व मम्मटाच्या समाधींत फरक नाहीं हें दिसून येईलच.रुय्यक 'कारणान्तरयोगात्कार्यस्य सुकरत्वं समाधिः' अशी व्याख्या करतो.

उद्भटानें मानलेला समाहित मम्मटानें मानला नाहीं. कारण तो अर्थालंकार नसून रसालंकार आहे. व रुय्यकानें मम्मटाचा 'समाधि' अलंकार तर स्वीकारलाच पण उद्भटानें घालून दिलेल्या समाहितानें वळणही त्यानें गिरविलें. उद्भटाप्रमाणेंच रुय्यकही आपला समाहित अर्थालंकारांत घालतो आहे. पण या समाहितासंबंधीं रसालंकारांत विवेचन करावयाचें असल्यानें त्याचा विचार येथें सोडून देऊं.

हेत्वन्तरसंबंधात् स्फूर्जति कार्यस्य यत्र सौकर्यम् ।
स समुच्चयसादृश्यात्समाधि नामात्र निर्दिष्टः ॥

विद्याधरानें, अशी व्याख्या करून त्याचबरोबर हेंही सांगितलें कीं कार्याच्या साफ-ल्याला साधनें मिळणें हें समुच्चयाचेंही लक्षण आहे पण सुरू असणाऱ्या कार्याला सौकर्य आणणें हें समुच्चयांत मुख्य धोरण नसून सर्वांनीं एकोप्यानें एक कार्य घडविणें हें धोरण असतें. 'समाधींत' चालू कामाला हातभार देण्याला साधन मिळणें हा विशेष असतो.

विश्वनाथाच्या 'समाधिः सुकरे कार्ये दैवाद्वस्त्वन्तरागमात्' या व्याख्येंत मम्मट–रुय्यकाचेंच वळण गिरविलें आहे. जगन्नाथाची व्याख्या पाहातां हेंच आढळून येईल. 'एककारणजन्यस्य कार्यस्याकस्मिककारणान्तरसमवधानाहितसौकर्यं समाधिः' जगन्नाथाच्या या व्याख्येप्रमाणेंच अप्पय्यदीक्षिताच्या व्याख्येचें स्वरूप आहे. आतां समाधि अलंकाराचें उदाहरण घेऊन समाधि–विचार संपवूं:—

अवलोकितांचि आधीं भुलला लावण्यकल्पलतिकेला ।
त्यांत तिनें उचितादर सस्मित मधुरोदितेंहि अति केला ॥

आधींच लावण्यानें भूल पडली होती त्यांत मधुर हास्यानें गोड शब्दांत योग्य आदर केल्यानें अनुकूल मनोभावनांना अधिकच भर मिळाली. म्हणून हा समाधि अलंकार झाला.

---

१ स्वकृत. २ का. प्र. १०·१९२. ३ अ. सू. ६७. ४ ए. ८-५९. ५ सा. द. १०·८६. ६ र. गं. ४९२. ७ मो.

# प्रकरण ९ वें

## शृंखलाबंधमूल अलंकार

### १ कारणमाला.

१. कारणमाला, एकावली, मालादीपक व उदार (सार) हे शृंखलाबन्धमूल म्हणून समजले जातात. या अलंकारांचीं नांवेंच त्यांत शृंखला आहे हें सूचित करीत आहेत. मालेंत अगर एकावलींत अनेक वस्तूंना शृंखलेनें बद्ध केलेलें असतें तद्वत्, तच हे अलंकार आहेत. कारणमाला शब्दाचा दर्शनी अर्थ कारणांची गुंफलेली माला असा होतो अर्थात् कारणें देतांना त्यांत काव्यसौंदर्य हें असलेंच पाहिजे. नुसतीं रुक्ष कारणें उपयोगी नाहींत. रुद्रटानें कारणमालेची व्याख्या केली ती अशीः— कारणमाला[१] सेयं यत्र यथापूर्वमेति कारणताम् ।
अर्थानां पूर्वार्थाद्भवतीदं सर्वमेवेति ॥

कारणमाला म्हणजे पूर्व-पूर्वी उल्लेखिलेल्या गोष्टीचें कारण देत जाणें, म्हणजे अमुक कारणानें अमुक गोष्ट झाली, त्या गोष्टीमुळें अमुक झालें अशा तऱ्हेनें पूर्व-पूर्वीपासून संबंध लावीत येणें याला कारणमाला म्हणावयाचें. जसें,

जरी[२] हृदयीं विषयस्मृती । तरी निःसंगाही आपजे संगती ।
संगें प्रकटे मूर्ति । अभिलाषाची ॥

हृदयांत विषयांचें स्मरण केल्यास निःसंगालाही वासना निर्माण होतात व त्या वासनांनीं इच्छा मूर्त स्वरूप घेतात. येथें एक गोष्ट सांगून तीच दुसऱ्या गोष्टीचें कारण झालें आहे असें उत्तरोत्तर दाखविल्यानें ही कारणमाला झाली. रुद्रटाच्या व मम्मटाच्या व्याख्येंत कांहींच फरक नाहीं पण मम्मटाची व्याख्या रुद्रटापेक्षां थोडक्या शब्दांत आली आहे.

मम्मटाची व्याख्याः-यथोत्तरं चेत्पूर्वस्य पूर्वस्यार्थस्य हेतुता ।
तदा कारणमाला[३] स्यात् ।

रुय्यकः— पूर्वपूर्वस्योत्तरोत्तरहेतुत्वे कारणमाला[४] ।

विद्याधरः— यद्यत्पूर्व[५] तत्तद्यथोत्तरं चेत् क्रमेण संश्रयति ।

---

१ का. लं. ७·८४. २ ज्ञा. २·२१. ३ का. प्र. १०·१८६. ४ अ. सू. ५३. ५ ए. ८-६०.

हेतुत्वं भवाति तदा कारणमालेत्यलंकारः ॥

विश्वनाथः-- परं परं प्रति यदा पूर्वपूर्वस्य हेतुता।

तदा कारणमाला स्यात्।

अप्पयदीक्षितः-- गुम्फः कारणमाला स्याद्यथाप्राक्प्रान्तकारणैः ॥

जगन्नाथः-- सैव शृंखला आनुगुण्यस्य कार्यकारणभावरूपत्वे कारणमाला॥

जगन्नाथानें कारणमालेचें, अलंकारांच्या मानानें अधिक विवेचन केलें आहे. 'पङ्क्तिरूपेण निबद्धानामर्थानां पूर्वपूर्वस्योत्तरोत्तरस्मिन्, उत्तरोत्तरस्य वा पूर्वस्मिन्संसृष्टं शृंखला' म्हणजे या कारणमालेंत, आधीं कारण व मग कार्य किंवा आधीं कार्य व मग कारण अशी सांगड असते म्हणून याला कारणमाला म्हणावयाचें असें जगन्नाथ म्हणतो.

'जितेन्द्रियत्वं विनयस्य कारणं' हा श्लोक जगन्नाथाच्या मतें कारणमालेचें समर्पक उदाहरण नाहीं. त्याच्या म्हणण्याप्रमाणें त्या वाक्यांत आकांक्षा शिल्लक राहते म्हणजे त्यांत जितेन्द्रियत्वाचें कारण काय हें कळतच नाहीं. व ती जिज्ञासा कायम राहिल्यानें हें समर्पक उदाहरण नाहीं .

कारणमालेंत, रुय्यकानें म्हटल्याप्रमाणें कार्यकारणभावांचा क्रम असला पाहिजे. भग्नप्रक्रमदोष उत्पन्न झाल्यास कारणमालेंत चारुता राहाणार नाहीं. कारणमालेचें उदाहरणः--

सूर्यकिरणीं होती घन। घनवृष्टीपासाव अन्न।
अन्नापासुनि प्रजा जाण। वेदप्रमाण निर्धारें॥

## २ एकावली.

१. वामनापर्यंत एकावली अलंकार मानलेला दिसत नाहीं. रुद्रटानें व्याख्या केली ती अशीः—एकावलीति सेयं यत्रार्थपरंपरा यथालाभम्।

आधीयते यथोत्तरविशेषणस्थित्यपोहाभ्याम्।

उत्तरोत्तर विशेषणांच्या योजनेनें अगर निरासानें प्राप्त होणारी अर्थपरंपरा ठेवलेली असते तेव्हां यास एकावली ह्मणावें. यांत उत्तरोत्तर असणारा अर्थ पूर्वपूर्वीच्या अर्थांचा विशेषण होत जातो. मम्मटाची व्याख्याही याच अर्थाची आहेः—

स्थाप्यतेऽपोह्यते वापि यथापूर्वं परं परम्।
विशेषणतया यत्र वस्तु सैकावली द्विधा॥

---

१ ए. ८. ४५. २ सा. द. १०.७६. ३ कु. (४६) १०१. ४–५ र. गं. ४६१.
६ र. गं. ४६२. ७ मु. वनपर्व १-४५. ८ का. लं. ७-१०९ ९ का. प्र. १०-११८

रुद्रटानें त्याचप्रमाणें मम्मटानें आपल्या एकावलीचे दोन भेद केले आहेत. (१) स्थापनेनें पूर्वपरंपरा उत्तरोत्तर लावून होणाऱ्या एकावलीचें उदाहरणः—

(१) म्लेंच्छ मनुष्याचा मळ त्या म्लेंच्छाचा मळ स्वयें तेली।
त्या तेल्याचा मळ ते, ज्यांची पुंप्रकृति संक्षया गेली॥

(२) निषेधानें पूर्वपरंपरा उत्तरोत्तर लावून होणाऱ्या एकावलीचें उदाहरण—
नव्हे सभा जी नच वृद्ध जींत। न वृद्ध ते धर्म न दावितात।
न धर्म तो ज्यांत वसे न सत्य। न सत्य तें जें छलना-प्रयुक्त॥

पहिल्या उदाहरणांत म्लेंच्छ मनुष्याचा मळ आहे या विधानाची स्थापना केली व नंतर म्लेंच्छ हा तेल्याचा मळ, तेली हा पुंप्रकृति नष्ट झालेल्याचा मळ, अशी पूर्वपूर्वी जाऊन विधानपरंपरेची स्थापना केली आहे. दुसऱ्या उदाहरणांत निषेधानें विधान ठेवून यालाही उत्तरोत्तर निरासानें मर्यादित केलें आहे. या दोहोंत स्थापनेनें अगर निषेधानें विधानाची आवली आहे. ती पूर्वपूर्वी अगर उत्तरोत्तर विशेषणानें जोडली आहे.

रुय्यकः—यथापूर्वं परस्य विशेषणतया स्थाप्यतेऽपोह्यते वैकावली॥
विद्याधरः—यत्र विशेषणभावं पूर्वं पूर्वं प्रति क्रमेणैव।
भजति परं परमेवालंकृतिरेकावली कथिता॥
विश्वनाथः—पूर्वं पूर्वं प्रति विशेषणत्वेन परं परम्।
स्थाप्यतेऽपोह्यते वा चेत्स्यात्तदेकावली द्विधा॥
अप्पय्यदीक्षितः—गृहीतमुक्तरीत्यार्थश्रेणिरेकावलीर्मता।
जगन्नाथः—सैव शृंखला संसर्गस्य विशेष्यविशेषणभावरूपत्वे एकावली॥

विद्याधरानें एकावलीचा निषेधानें होणारा प्रकार जमेस धरलेला नाहीं. विश्वनाथ स्थापना व निषेध या दोन प्रकारांशिवाय एक तिसरा मानतो व तो म्हणजे पहिल्या वाक्यांत असणारें विशेष्य दुसऱ्यांत विशेषण होणें.

वार्ध्यो भवन्ति विमलाः स्फुटन्ति कमलानि वापीषु।
कमलेषु पतन्त्यलयः करोति सङ्गीतमलिषु पदम्॥

हें विश्वनाथानें दिलेलें उदाहरण आहे. यांत पहिल्या अर्धांत 'वापी' हें विशेष्य आहे तें द्वितीयार्धांत विशेषणासारखें वापरलें आहे. या उदाहरणांत उत्तरोत्तर विशेषणांची स्थापना केलेली आहे याचाच निषेध करून एकावलीचा चौथा प्रकार होईल असें विश्वनाथ म्हणतो. अप्पय्यदीक्षितानें पूर्वपूर्वी उत्तरोत्तरांचीं विशेषणें असणें व उत्तरोत्तर पूर्वपूर्वींचीं विशेषणें असणें असे एकावलीचे दोन भेद केले आहेत. त्यानें निषेधाचा भाग सोडून दिला आहे. जगन्नाथानें पूर्वपूर्वींचीं पदें उत्तरोत्तर पदांचीं

१ मो. कर्णपर्व २९·९३ २ महादेव नारायण काळे. ३ अ. सू. ५४ ४ ए. ८·४६. ५ सा. द, १०-७८. ६ कु, (४७) १०४. ७ र. गं. ४६६ ८ सा. द. पान ५४.

विशेष्यें अगर विशेषणें असणें यावरून दोन भेद केले. त्यांत उत्तरोत्तर विशेषणत्व असणाऱ्या भेदाचें स्थापकत्व व अपोहकत्व यावरून दोन भेद केले. स्थापकत्व म्हणजे एक गोष्ट आधीं सांगून नंतर तिच्यांतील पूर्वपूर्वीचीं विशेष्यें उत्तरोत्तर विशेषणें होतात. अपोहकत्व म्हणजे नकारात्मक विधान करून पुढें पूर्वपूर्वीचीं विशेष्यें उत्तरोत्तर विशेषणें होतात. यानें मानलेला हा प्रकार विश्वनाथानेंही पूर्वी मानलेला आहे, हें वर सांगितलेंच आहे.

शिरे वसंतीं रस वल्लरींतुनी, रसांतुनी पुष्पसमूह थाटला।
सुगंध पुष्पांतुनि दाटला वनीं, प्रमोद गंधातुनि मूर्त लोटला॥

हे उदाहरण विश्वनाथ व जगन्नाथ यांच्या 'स्थापकत्वानें पूर्वपूर्वी विशेषणत्व असणं या भेदाचें होईल. जगन्नाथ, मालादीपक हा एकावलीचाच प्रकार मानावा असें म्हणतो तेव्हां मालादीपक म्हणजे काय हें प्रथमतः पाहूं.

## ३ मालादीपक.



३. मालादीपक हा प्रकार प्रथमतः दण्डीनें मानला आहे. त्यानें उदाहरण दिलें आहे तें असें:—

शुक्लः[१] श्वेतार्चिषो वृद्ध्यै पक्षः पञ्चशरस्य सः।
स च रागस्य रागोऽपि यूनां रत्युत्सवश्रियः॥
इत्यादिदीपकत्वेऽपि पूर्वपूर्वव्यपेक्षिणी।
वाक्यमाला प्रयुक्तेति तन्मालादीपकं मतम्॥

म्हणजे दण्डीनें मालादीपक हा दीपकाचाच एक भेद मानला आहे. "पूर्वपूर्व-व्यपेक्षी वाक्यांची माला असून त्यांत दीपकाप्रमाणेंच शब्द असल्यास त्यास मालादीपक म्हणावयाचें." यानंतर मध्यंतरीं हा अलंकार कोणीच मानलेला दिसत नाहीं. मम्मटानें हा स्वतंत्र अलंकार म्हणून मानून त्याचें दीपकानंतर ताब-डतोबच विवेचन केलें आहे. त्याची व्याख्याः—

मालादीपकमाद्यं[३] चेद्यथोत्तरगुणावहम्।

"पूर्वपूर्वीचें पद उत्तरोत्तर पदाला गुणावह होईल (उपकारी होत जाईल) तेव्हां मालादीपक म्हणावयाचें." दण्डीला मालादीपकांत एक शब्द दीपाप्रमाणें वाटला म्हणून त्यानें त्यालाही दीपकाचाच प्रकार गणलें. पण दीपकांत व मालादीपकांत पूर्वपूर्वव्यपेक्षित्व नसणें व असणें यावरून मोठा फरक झालेला दिसतो व या दृष्टीनेंच मम्मटानें मालादीपक स्वतंत्र अलंकार मानला. रुय्यकानेंही मम्मटाप्रमाणें हा स्वतंत्र अलंकार मानला. त्याची तसेंच विद्याधराचीही व्याख्या पहातां अर्थानें मम्मटाहून त्या निराळ्या नाहींत.—

---

१ सा. द. वि. १०.११३ २ का. द. २.१०७।१०८ ३ का. प्र. १०.१५७

पूर्वपूर्वस्योत्तरोत्तरगुणावहत्वे मालादीपकम् ।[1]

माला या शब्दाचा उपयोग फक्त चारुत्वासाठीं आहे असें रुय्यक म्हणतो. व या विच्छित्तिविशेषासाठींच त्यानें दीपकाहून हा अलंकार निराळा केला.

विद्याधरः— यत्रोत्तरोत्तरगुणावहत्वमुल्लसति पूर्वपूर्वस्य ।[2]
तदिदं मालादीपकमित्याम्नातं विपश्चिद्भिः ॥

या व्याख्येंत रुय्यकाहून निराळा अर्थ नाहीं. आतांपर्यंत उल्लेखिलेल्या व्याख्यांत हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं शृंखलान्यायमूल म्हणून या अलंकाराचें वर्णन रुय्यकानेंच प्रथम केलें. मम्मटानें फक्त दीपकाहून हा अलंकार निराळा केला पण त्यानें शास्त्रीय-रीत्या निराळ्या ठिकाणीं त्याचा उल्लेख केला नाहीं. तसा निराळ्या ठिकाणीं उल्लेख प्रथम रुय्यकानेंच केला व त्याचें वळण पुढें गिरविलें गेलें.

विश्वनाथः— तन्मालादीपकं पुनः ।[3]
धर्मिणामेकधर्मेण सम्बन्धो यद्यथोत्तरम् ।

विश्वनाथाची व्याख्या एका दृष्टीनें अधिक स्पष्ट आहे. धर्मीचा एका धर्मानें उत्तरोत्तर संबंध जडवीत जाणें यास मालादीपक म्हणावें असें तो म्हणतो. आतांपर्यंत प्रथमोच्चारित गोष्टी उत्तरोत्तर पुढील गोष्टीला उपकारक होणें या क्रमाला मालादीपक म्हणावें एवढीच व्याख्या असल्यामुळें शृंखला-न्यायमूल इतर अलंकारांशीं या अलंकाराचा संसर्ग येणें संभवनीय होतें; यासाठीं विश्वनाथानें धर्म व धर्मी अशीं पदें घातलीं.

४. दीपकैकावलीयोगात् मालादीपकमिष्यते ।[4] या व्याख्येनें अप्पय्यदीक्षितानें दीपक अलंकार व एकावली यांचें मिश्रण म्हणजे मालादीपक असें म्हटलें आहे. यावरून दण्डीनें मालादीपक मानल्यानंतर मध्यंतरीं एकावली अलंकार मानला गेल्यावर त्यांत कसें स्थित्यंतर झालें हें स्पष्ट दिसतच आहे. जगन्नाथानें अप्पय्यदीक्षिताचें म्हणणें सर्वस्वीं खोडून टाकलें आहे. मालादीपक हा दीपक नव्हेच पण स्वतंत्र अलंकारही न मानता तो एकावलीचाच प्रभेद मानावा असें त्याचें मत आहे. व त्याप्रमाणें त्यानें मालादीपक स्वतंत्र न मानतां तो एकावलीचा एक भेद म्हणून मानला आहे. दीपकाचे वंशांत जन्मलेला अलकार, तो स्वतंत्र तर नाहींच, पण एकावलीच्याच वंशांतील तो आहे असा जगन्नाथाचे न्यायालयांत निकाल लागला ! जगन्नाथाचें हेंही मत ग्राह्य आहे पण तें निराळ्या दृष्टीनें. रुय्यकानें एकावलीचे पोटभेद केले त्याप्रमाणें एकेकच भेद केल्यास मालादीपक हा स्वतंत्र अलंकार होऊं शकेल. पण विश्वनाथ व जगन्नाथ यांनीं

१ अ. सू. ५५ २ ए. ८-४७ ३ सा. द. १०-७७. ४ कु. (४८) १०५

पूर्वपूर्वींचीं पदें उत्तरोत्तर विशेष्यं अगर विशेषणें होत जाणें यावरून एकावलीचे दोन पोटभेद मानल्यामुळें मालादीपकांत येणारा विशेष एकावलींतच येऊन जातो; म्हणून साहजिकच मालादीपकाला स्वतंत्र राहण्यास अवसर नाहींसा होतो. या कचाट्यांत आल्याकारणानें विश्वनाथाला धर्म धर्मी असे शब्द घालावे लागले. त्या एकावली प्रभेदांत व मालादीपकांत एवढाच फरक शिल्लक राहतो कीं मालादीपकांत एकच शब्द सर्व अर्थांना स्पष्ट करतो तसें एकावलींत होईलच असें नाहीं. पण हा फरक इतका सूक्ष्म राहातो कीं तो अलंकार विश्वनाथ व जगन्नाथ यांनी केल्याप्रमाणें एकावलींतच मोडणें इष्ट होईल व याला कारण त्यांनीं केलेल्या एकावलीच्या प्रभेदांत मालादीपक येऊन जातें. हे दोघे एकावलींतच मालादीपकाला प्रविष्ट करतात, तर उलट रुय्यकानें एकावलीच्या विरुद्ध मालादीपक मानलेलें आहे ! व त्यानें मालादीपक हा स्वतंत्र अलंकार मानणें रास्तच आहे. विश्वनाथाची मात्र व्याख्या स्पष्ट करतांना दिशाभूल झाली व त्यामुळें त्याला मालादीपक अलंकार सोडण्याचेंही धारिष्ट झालें नाहीं. पण जगन्नाथानें मात्र तें काम केलें.

५. येथपर्यंत मालादीपकाला कसें आंदोलन मिळालें तें आपण पाहिलें. आतां याला मालादीपक कां म्हणावें व तसें म्हणणें योग्य कीं नाहीं हें पहावयाचें आहे. रुय्यकाच्या मतें दीपकानंतर तातडतोब मालादीपकाचें वर्णन करण्याचें कारण नाही; अर्थात् रुय्यकाच्या अनुयायांचीही मतें त्याहून निराळीं नाहींत. मम्मट दीपकानंतर लगेच मालादीपक विचारांत घेतो. येथपासूनच मालादीपकाला दीपकाचें घर वर्ज्य झालें, जगन्नाथ मालादीपक हा एकावलीचाच प्रकार मानतो. अप्पय्यदीक्षित दीपक व एकावलीच्या योगाला एकावली म्हणतो. आतां या अलंकाराच्या उदाहरणाकडे अगदीं आरंभापासून लक्ष दिल्यास असें दिसतें कीं हळूहळू व्याख्येप्रमाणें तंतोतंत उदाहरणाकडे पाहण्याची दृष्टि सुटत जातां जातां शेवटीं मालादीपक एकावलीच्या प्रान्तांत घुसलें व याचें मूळ नागरिकत्व कोठलें हें ओळखतां येईनासें झाल्यानें शेवटीं त्या हक्कासाठीं भांडणेंच जणुं होऊन न्यायमूर्तींनीं त्याला नवीन वसतिस्थानाचेंच नागरिकत्व दिलें. वास्तविक माला याचा अर्थ सांगड, जुळणी, अनेकांचें एकत्र येणें, एका सूत्रांत गुंफिलें जाणें असा होतो. मालोपमेंतही उपमेयाच्या सूत्रांत अनेक उपमानें गुंफिलेलीं असतात. तद्वत् मालादीपकांतही दीपकरूप असणाऱ्या शब्दसूत्रानें पूर्वपूर्वव्यपेक्षी मणिमाला गुंफिलेली असते. यांतील माणि फुटून पडला तर थोडीशीच सौंदर्यहानि होईल पण सूत्रच काढून घेतलें तर सर्वच मणि विस्कळित होतील. यावरून शब्दसूत्राचें महत्त्व अधिक कीं मण्यांचे अधिक ! मणी नसतील तर सूत्राला सौन्दर्य नाहीं. सूत्र नसलें तर मणिमाला होणार नाहीं

व प्रत्येक मणि स्वतंत्र काढला तरीही सौंदर्यहानि ठेवलेलीच; अशा वेळीं प्रथम सूत्राचें ह्मणजे मालाकाराचें ह्मणजेच दीपकाचें महत्त्व व तदनंतर सूत्रित अगर दीपित झालेल्या वाक्यमालेचें महत्त्व आहे हें उघड आहे. या दृष्टीनें पाहिल्यास मम्मटानंतर फक्त अप्पय्यदीक्षितानेंच याचा विचार केलेला दिसतो. त्यानें दीपक व एकावली यांच्या संमिश्रणाला मालादीपक असें म्हटलें आहे. जरी उद्योतानें मालोपमेंतील व मालादीपकांतील माला शब्दाचा अर्थ निराळा आहे असें म्हटलें तरी वरील दृष्टीनें विचार केल्यास मालेचा अर्थ बदलला तरी मर्यादेबाहेर बदलणार नाहीं; व जरी जगन्नाथानें मालादीपक हा एकावलीचा भेद मानण्याचें ठरविलें तरी त्यानें ' धर्मेण बुद्धिस्तव. ' हें दिलेलें उदाहरण पहातां मालादीपक एकावलींत समाविष्ट होईल असें नाहीं.

एकंदरींत मालादीपकाचा विचार दण्डीनें दीपक-भेद म्हणून केला तेंच योग्य आहे. त्याच्या खालची पायरी म्हणून मम्मटाचें मत बरोबर धरतां येईल. पेटीमध्यें उत्तरोत्तर अनेक पेट्या दिसत जाव्या व एका दगडावर अनेक दगड सुंदर तऱ्हेनें रचावे हा ' वर ' व ' मध्यें ' यांतील फरक एकावली व मालादीपक यांत आहे.

## ४ सार.



६. या अलंकाराची व्याख्या रुद्रटापूर्वी झालेली दिसत नाहीं. रुद्रटानें त्यांची व्याख्या केली ती अशीः—

यत्र यथा समुदायाद्यथैकदेशं क्रमेण गुणवदिति ।
निर्धार्यते परावधि निरतिशयं तद्भवेत्सारम् ॥[1]

ज्या ठिकाणीं ' पुष्कळ गोष्टींतून एक गोष्ट विशेष गुणवान् म्हणून निवडली जाते, अशा ठिकाणीं अत्यंत पराकोटीला गेलेलें वैशिष्ट्य क्रमानें दाखविल्यास सार अलंकार होतो. '

मम्मटः— उत्तरोत्तरमुत्कर्षो भवेत्सारः परावधिः ।[3]

मम्मटानें रुद्रटाचीच व्याख्या पण रेखीव केली. " उत्तरोत्तर पराकोटीला उत्कर्ष गेल्यास सार अलंकार होतो. यानें उदाहरणही रुद्रटाचेंच घेतलें आहे.

रुय्यकः—उत्तरोत्तरमुत्कर्षो सारः[4]

विद्याधरः— वस्तुस्पृहणीयत्वे विश्रान्तिं चेद्यथोत्तरं तनुते ।
सारो नाम तदानीं कथितोऽलंकारसारज्ञैः ॥[5]

विद्याधराच्या व्याख्येंत एक गोष्ट निराळी आहे ती म्हणजे ' पूर्वीची आकांक्षा पुढील पदांत विश्रान्ति घेत जाणें असा क्रम असेल तेव्हां सार अलंकार होतो असें तो म्हणतो. अजूनपर्यंत 'पूर्वीची आकांक्षा' असे शब्द कोणी वापरलेले नव्हते. पण

१ र. गं. ४६४. २ का. लं. ७-९४ ३ का. प्र. १०-१९० ४ अ. सू. ५६ ५ प्र. ८-४८०

त्याच्या आकांक्षेचा अर्थ एवढाच होतो कीं 'याहून अधिक कोणतें' ही जी जिज्ञासा उत्पन्न होते ती पूर्ण करणें, म्हणजे उत्कर्ष परकोटीला गेलेला दाखविणें असा अर्थ होईल.

विश्वनाथः—उत्तरोत्तरमुत्कर्षो वस्तुनः सार उच्यते।[1]

अप्पय्यदीक्षितः—उत्तरोत्तरमुत्कर्षः सार इत्यभिधीयते॥[2]

जगन्नाथः—सैवं संसर्गस्योत्कृष्टाभावरूपत्वे सारः॥[3]

जगन्नाथानें उत्कर्ष व अपकर्ष यावरून सार अलंकार मानला आहे. अप्पय्यदीक्षितानें व्याख्येंत उत्कर्ष असें म्हटलें आहे पण सार अलंकाराचे भेद देतांना 'श्लाघ्यगुणांच्या उत्कर्षानें होणारा सार' व 'अश्लाघ्यगुणांच्या उत्कर्षानें होणारा सार' दिला आहे. यावरून त्याचें मतही जगन्नाथासारखेंच दिसतें. पण त्यानें तें व्याख्येंत गोंवलेलें नाहीं.

वर दिलेल्या दोन भेदांशिवाय अप्पय्यदीक्षित आणखी तिसरा भेद मानतो तो म्हणजे उभयरूप सार त्यांत श्लाघ्य व अश्लाघ्य गुणोत्कर्ष असतो असें तो म्हणतो. त्याचें उदाहरण त्यानें असें दिलें आहे.—

गिरिर्महान्गिरेरब्धिर्महानब्धेर्नभो महत्।

नभसोऽपि महद्ब्रह्म ततोऽप्याशा गरीयसी॥[4]

यांत आशा हा अश्लाघ्य गुण व बाकी श्लाघ्य गुण म्हणून उभयरूप असें अप्पय्यदीक्षित म्हणतो. पण वस्तुतः गिरि इत्यादिकांत श्लाघ्य गुण व आशेंत ती मानवी या दृष्टीनें अश्लाघ्य गुण असें म्हणण्यानें काव्यांतील सौंदर्य नष्ट होतें. उलट आशा ही इतकी बलवती म्हणण्यांत श्लाघ्यगुणांचा पराकाष्ठेचा उत्कर्षच दाखविला आहे; कारण ब्रह्मापर्यंतच उत्कर्ष विश्रान्ति न घेतां तो आशेपर्यंत येतो. या दृष्टीनें दोनच भेद मानणं इष्ट होतें. सार अलंकार एकविषयत्वानें व अनेक विषयत्वानें मानणारांबद्दल जगन्नाथानें असें म्हटलें आहे कीं, एकविषयत्वानें सार मानल्यास शृंखलेचें चारुत्व येणार नाहीं, म्हणून तो सार अलंकार होऊं शकणार नाहीं. हीच शंका मनांत येऊन कित्येकांनी त्या अलंकाराला 'वर्धमान' असें नांव दिलें आहे. यावर जगन्नाथ म्हणतो कीं, हा अलंकारभेद शृंखलान्यायमूल होत नाहीं म्हणून सार अलंकाराचा तेवढाच एक भेद स्वतंत्र अलंकार मानण्यापेक्षां सार हाच शृंखलान्यायमूल न म्हणणें बरें.

इंग्लिशमध्यें याच अलंकाराला climax म्हणतात; व अश्लाघ्यगुणांच्या उत्कर्षाला Anti-climax म्हणतात. जसें—'It is an outrage to bind a Roman citizen; to scourge him is an atrocious crime; to put him to death is almost a parricide; but to crucify him, what shall I call it?'[5].

---

१ सा. द. १०·७९ २ र. गं ४६५ ३ कु. ४१ (१०६) ४ कु. १०८. ५ Milton.

आतां सार अलंकाराचीं उदाहरणें पाहून या अलंकाराचा विचार संपवूं.

( १ ) ऐसें[1] असतां भ्राता, तोही स्वज्येष्ठ त्यांतही राजा,
तत्रापि धर्मकोविद, बहु मानी आणि शांतवन आजा ॥

यांत ज्येष्ठत्व हा गुण उत्तरोत्तर उत्कर्ष पावत असल्यानें हा सार अलंकार झाला.

( २ ) दिठीं[2] देखतां अंतरें रूप गेलें; रथीं डोलतां भावना भृंग झाले ।
रथू लोपतां लागली दृष्टि केतीं; बुडे केतु, पाहे पुढां धूळ पंथीं
रजू लोपतां, मूर्छनापात तो हो; पुरीं ओळला शोक संताप मोहो ।
महागर्जना माजली शंख नादीं, रथू धांवतां नावरे लोकमांदी ॥

( ३ ) तुमचें[3] पुरुषत्व काय झालें ? । नामरूपातें बुडविलें ।
रंकाचेंही एकत्व आलें । भणंग केलें प्रारब्धें ॥

यांपैकीं ' दिठीं देखतां ' या उदाहरणांत राम वनवासांत जात असतां जनतेच्या शोकाचें पराकोटीला गेलेलें स्वरूप उत्तरोत्तर दाखवित गेल्यानें हें सार अलंकारांचें उदाहरण झालें. ' तुमचें पुरुषत्व ' या उदाहरणांत गुणांच्या अपकर्षाचें असीमत्व दाखविल्यानें तें अश्लाघ्यगुण निदर्शक सार अलंकाराचें उदाहरण होईल.

---

१ मो. कर्णपर्व. ४१·२७. २ मु. अयोध्याकांड ४७·४८. ३ मु. विराटपर्व ३·६३.

# प्रकरण १० वें

## विरोधमूल–अलंकार

### १ विरोध.

१. येथपर्यंत विचारांत घेतलेल्या अलंकारांपेक्षां उत्तरोत्तर जास्त भानगडीच्या अलंकारांचा विचार करावयाचा असल्यानें त्यांतल्यात्यांत विरोधमूल अलंकार प्रथम घेऊं. विरोध हा अलंकार अगदीं भामहापासून विवेचिला आहे. भामहाची विरोधाची व्याख्याः—

गुणस्य वा क्रियाया वा विरुद्धान्यक्रिया भिदा ।
या विशेषाभिधानाय विरोधं तं विदुर्बुधाः ॥

रा. बनहट्टींनीं उद्भटाच्या टीकेंत 'विरुद्धान्यक्रियावचः' असा पाठ भामहाच्या व्याख्येंत घातला आहे. पण भामहाचा ग्रंथ छापणाऱ्या रा. त्रिवेदींनीं 'विरुद्धान्य-क्रिया भिदा' असा पाठ दिला असल्यानें तोच ग्राह्य आहे. 'विशेषकथनासाठीं गुण किंवा क्रिया यांच्या विरुद्ध दुसरी क्रिया निराळ्या प्रकारें सांगणें याला विरोध ह्मणावें' भामहानें विरोधाचें उदाहरण पुढील दिलें आहेः—

उपान्तरूढोपवनच्छायाशीतापि धूरसौ ।
विदूरदेशानपि वः संतापयति विद्विषः ॥

२. यावर रा. बनहट्टी म्हणतात, "Thus all the examples of the authors like Bhamaha, Udbhata and others do not fall under Mammata's विरोध' पण भामहाचें उदाहरण मम्मटाच्या विरोधाचेंही होऊं शकतें 'अभिनवनलिनी किसलय' हें मम्मटाचें विरोधभेदाचें असलेलें उदाहरण पाहातां त्याचें भामहाच्या उदाहरणाशीं आत्यंतिक साम्य आहे असें दिसेल; व म्हणूनच भामहाचें तें उदाहरण विरोधाचेंच असून तें मम्मटाच्या व भामहाच्या व्याख्येशीं जुळतें आहे. त्या उदाहरणांत गुणक्रियाविरोध दाखविलेला आहे.

दण्डीः— विरुद्धानां पदार्थानां यत्र संसर्गदर्शनम् ।
विरोधदर्शनायैव स विरोधः स्मृतो यथा ॥

---

१–२ भा. लें. ३-२४–२५. ३ का. सा. स. पान. १२४. ४ का. प्र. पान ६६४.
५ का. द, २. २३३,

'विरोध दर्शविण्यासाठींच केवळ विरुद्ध पदार्थांचें संसर्गदर्शन होतें तेव्हां विरोध अलंकार होतो.' संसर्गदर्शन[१] ह्मणजे एकाच उपचारानें विरुद्ध पदार्थ बद्ध असणें. रा. बनहट्टी ह्मणतात, "All these writers, of course have no idea about the real nature of विरोध such as is defined by Mammata, viz. विरोधः सोऽविरोधेऽपि विरुद्धत्वेन यद्वचः. They are not at all aware of then otion that the विरोध (contradiction) between things should not be real but an apparent one. Real contradiction according to Mammata is a fault in poetry. Hence it should not exist at all. Thus all the examples of the authors like Bhamaha, Udbhata and others do not fall under Mammata's विरोध."

रा. बनहट्टींच्या म्हणण्याप्रमाणें पूर्वींच्या या लोकांना 'विरोध' याचा खरा अर्थ कळला नव्हता तेव्हां त्यांचीं उदाहरणेंही मम्मटाच्या विरोधाचीं होणार नाहींत. पण भामहाचें उदाहरण मम्मटाच्या विरोधाचेंही कसें होऊं शकतें हें पूर्वीं दाखविलेंच आहे. दण्डीचीं उदाहरणें पाहातां असें दिसून येतें कीं, 'विरोधां-तून निरनिराळे भेद पुढील लोकांना सुचवून देणारा दण्डीच आहे. त्याचीं उदा-हरणें क्रियाविरोध, गुणविरोध, द्रव्यजाति-विरोध द्रव्यविरोध, कार्यकारणविरोध, श्लेषाधिष्ठित विरोध इतके विरोधभेद दर्शवितात. त्यांपैकीं केवळ कार्यकारणविरोधां-तून मात्र निराळा अलंकार सूचित होण्यासारखा आहे; बाकी सर्व उदाहरणें मम्म-टाच्याही विरोधाचीं होतील.

दण्डीवरील तरुण वाचस्पतीच्या टीकेंत त्याचप्रमाणें[२] 'हृदयंगमा' या नांवानें ओळखिल्या जाणाऱ्या टीकेंत अनुक्रमें 'विरोधदर्शनायैव विरोधप्रतिभासायैव' व "विरोधदर्शनाय[३] इत्यत्रापि उपचारेण विरोधाभासः प्रतिपाद्यते" असें म्हटलें आहे. अर्थात् टीकाकार हे स्वतःचा अर्थही लेखकाच्या माथीं मारतात म्हणून या दोन टीकांच्या या स्पष्टीकरणाला महत्त्व देण्याचें कारण नाहीं. तथापि दण्डीची विरोधाची व्याख्या घेतली असतां 'विरुद्धानां पदार्थानां' असें म्हणूनही तो ज्याअर्थीं खऱ्याखुऱ्या भासणाऱ्या विरोधाचीं उदाहरणें देत नाहीं, त्याअर्थीं 'विरोधदर्शनाय' याचा अर्थ विरोधाचें दर्शन हें केवळ आभासरूप असावें अशींच त्याची समजूत असेल; पण हें अनुमान बाजूस ठेवलें तरी निदान एवढें निश्चित म्हणण्यास हरकत नाहीं कीं, भामह-दण्डीचीं विरोधाचीं उदाहरणें खरा विरोध दाखवीत नसून विरोधाभास दाखवितात व तीं मम्मटाच्याही विरोधाच्या व्याख्येशीं जुळतात.

---

१ का. सा. स, १२४. २ का. द. १८७ पान. ३ का. द. पान १८७.

३. उद्भटः— गुणस्यं वा क्रियाया वा विरुद्धान्यक्रियावचः।
यद्विशेषाभिधानाय विरोधं तं प्रचक्षते ॥

"कांहीं विशेष सांगण्यासाठीं गुण किंवा क्रिया यांच्याविरुद्ध गुण किंवा क्रिया जेव्हां कवि स्वशब्दांत सांगतो तेव्हां त्याला विरोध म्हणतात." उद्भटाच्या या व्याख्येंत व भामहाच्या व्याख्येंत कांहींही फरक नाहीं. त्रिवेदींच्या पाठाप्रमाणें भामह जेथें 'भिदा' म्हणतो तेथें उद्भट 'वचः' म्हणतो. रा. बनहट्टी म्हणतात, "The[2] word विरुद्धान्यक्रियावचः seems to have proved a hard nut for the commentators to crack...It seems better to take क्रिया in the ordinary sense viz. 'action.' This word क्रिया should include under it गुण and द्रव्य by लक्षणा. The expanded definition will then become—गुणस्य वा क्रियाया वा ( द्रव्यस्य वा ) विरुद्ध—अन्य ( गुण-द्रव्य) —क्रिया—वचः तं विरोधं विदुः etc. which is quite correct intelligible and suitable to the example given." दण्डीच्या टीकाकारांबद्दल पूर्वी जें म्हटलें तेंच इन्दुराज व विवृतिकार यांजबद्दल म्हणावें लागेल; लक्षणेनें क्रियेंतून गुण व द्रव्य असा अर्थ काढावा असें रा. बनहट्टींनीं म्हटलें आहे तरी त्यांच्या या मताबद्दल साशंकता वाटते. विरोधाच्या व्याख्यांचीं पुढील लक्षणें आपणांस माहीत असल्यानेंच केवळ, उद्भटांत नसलेला अर्थ लक्षणेनें काढून तो त्याच्यावर लादणें बरोबर नव्हे. उद्भटाला केवळ गुण-क्रिया यासंबंधींच बोलावयाचें असेल. भामहानें गुण व क्रिया यांबद्दलच सांगितलें व उद्भट त्याचेंच अनुकरण करीत आहे. अशा स्थितींत उद्भटावरच लक्षणा लादण्याचें विशेष कारण काय ? विरोधाची व्याख्या अजून घटत असल्यानें उद्भटाला द्रव्यासंबंधीं सुचलेंच नाहीं असें म्हणण्यास काय हरकत आहे ? उद्भट उदाहरण देतो तें भामहाप्रमाणें बिनचूक नाहीं. पण आहे तशाच स्थितींत तें धरल्यास व विषम अलंकार त्यानें अगर त्याच्यापूर्वी कोणींही मानला नाहीं हें लक्षांत घेतल्यास त्याचें उदाहरण त्याच्याकाळीं गुणविरोधाचेंच ठरतें. पुढील शास्त्रज्ञांच्या मतें मात्र तें विषमाचेंच ठरेल. तो द्रव्यविरोधाचें उदाहरणही देत नाहीं, तेव्हां उद्भटाच्या व्याख्येचा वर दिलेला अर्थच मानावा.

४. उद्भटापर्यंत विरोधांतील आवश्यक असणारी गोष्ट जी 'विरोधाभास' ती स्पष्टपणें कोणी सांगितली नव्हती. ती वामनानें सांगितली आहे. 'विरुद्धाभासत्वं विरोधः[3]'—'विरुद्धत्वाचा आभास होणें म्हणजेच विरोध' अशी वामन विरोधाची

---

१ का. सा. स. ५·६७. २ का. सा. स. १२४ पान. ३ का. सू. ४·३·१२.

व्याख्या करतो. पण हा विशेष स्पष्ट करतां करतां वामनाच्या उदाहरणांत मात्र शैथिल्य आलेलें असून त्याच्या विरोधाचीं उदाहरणें असंगतीचींच होतात असें दिसेलः—

पीतं पानमिदं त्वयाद्य दयिते मत्तं ममेदं मनः ।
पत्राली तव कुंकुमेन रचिता रक्ता वयं मानिनी ।
त्वं तुङ्गस्तनभारमन्थरगतिर्गात्रेषु मे वेपथु –।
स्त्वन्मध्ये तनुता ममाधृतिरहो मारस्य चित्रा गतिः ॥

पहिल्या ओळींत 'तूं पान केलेंस आणि माझें मन मत्त झालें' असें म्हणण्यामुळें कारण एकीकडे व त्याचें कार्य दुसरीकडेच दिसतें म्हणून हा असंगति अलंकार होत आहे. या उदाहरणांत पुढील ओळींतही असाच कार्यकारणांचा भिन्नाश्रय दिसत आहे; वामनाचें दुसरेंही उदाहरण 'असंगति' अलंकाराचें आहे. वामनानें 'विरोधाभास' ही गोष्ट नवीन व अर्थविशद करणारी घातली यांत शंका नाहीं पण त्याचीं उदाहरणें असंगतीचीं झालेलीं पाहून साहजिकच त्याच्या (त्यानेंच लिहिलेल्या) वृत्तीकडे अधिक लक्ष पुरवावेंसें वाटतें. वृत्तींत वामन 'अर्थस्य विरुद्धस्येवाभासत्वं विरुद्धाभासत्वं विरोधः' असें म्हणतो.येथें वामनाच्या 'अर्थस्य' या शब्दाचा काय अर्थ करावयाचा हा प्रश्न उभा राहतो. 'अर्थ' याचा अर्थ गुण, क्रिया इत्यादि असा असता तर त्यानें तें वृत्तींत स्पष्टपणें म्हटलें असतें. कारण इतरत्र त्यानें तसें स्पष्टीकरण केलें आहे. 'अर्थ' याचा अर्थ कोणतीही 'घडणारी गोष्ट', 'वस्तुस्थिति' 'वर्ण्य गोष्ट' असा केला तर त्याच्या शब्दांचा असा अर्थ होईल कीं 'एकाद्या घडणाऱ्या वर्ण्य गोष्टीसंबंधीं विरुद्धत्वाचा आभास होईल तेव्हां त्यास विरोध म्हणावें.' म्हणजेच 'एकाद्या वर्णिलेल्या गोष्टींत सुसंगति नसल्याचा म्हणजे विरोध असल्याचा किंवा असंगती असल्याचा भास होणें याला विरोध अलंकार म्हणतात. व्याख्येचा अगदीं सरळपणें हा अर्थ होतो. वामनाचीं उदाहरणें या व्याख्येला जुळणारीं असल्यामुळें असंगतीचीं झालीं असावीं. त्याच्या व्याख्येचा असा अर्थ घेतला तरच उदाहरणांत असणाऱ्या विरोधाची संगति लावतां येते. विरोध अलंकारांतील क्रिया–गुण, गुण–गुण यांतील विरोध जर पाहूं लागलों तर तो त्या उदाहरणांत सांपडत नाहीं. तेव्हां व्याख्येचा अर्थ एक व उदाहरण दुसरेंच असा वामनावर येणारा आरोप या सरळ अर्थानें नाहींसा होतो. मात्र येवढेंच म्हणावें लागेल कीं, वामनाचा विरोध हा इतरांच्या विरोधाप्रमाणें नसून इतरांच्या असंगतीप्रमाणें आहे. 'विरुद्धाभासत्वं विरोधः' एवढीच व्याख्या केल्यानें विरुद्धाभास कशांत असावा, ही गोष्ट अस्पष्ट राहिली आहे. वामनाच्या पण वृत्तीनें व्याख्येचें स्पष्टीकरण होतें.

---

१ का. सू. ४·३. २ का. सू.४·३·१२

यस्मिन्द्रव्यादीनां परस्परं सर्वथा विरुद्धानाम् ।
एकत्रावस्थानं समकालं भवति स विरोधः[1] ॥

५. अजूनपर्यंत पेंचांत असलेली विरोधाची व्याख्या रुद्रटानें वरील व्याख्येंत जरा स्पष्ट शब्दांत मांडिली. "जेव्हां द्रव्यादि (क्रिया, जाति, गुण व द्रव्य) परस्परविरुद्ध असतां त्यांचें समकालीं एकाच ठिकाणीं अस्तित्व घडून येतें तेव्हां त्या अलंकारास 'विरोध' ह्मणावयाचें." समकालीं, एकत्र अवस्था, व द्रव्यादि या तीन शब्दांमुळें त्याच्या विरोधाच्या व्याख्येंत पूर्वीइतका दोष राहणार नाहीं. यानें केलेले विरोध भेद असेः— (१) जाति–जाति विरोध (२) गुण–गुण विरोध (३) क्रिया–क्रिया विरोध (४) द्रव्य–द्रव्य विरोध (५) जाति–गुण विरोध (६) जाति–क्रिया विरोध (७) गुण–क्रिया विरोध (८) गुण–द्रव्य विरोध (९) क्रिया–द्रव्य विरोध (१०) विरोधाला लागणाऱ्या दोन्ही जातींचा अभाव असणें (११) विरोधाला अवश्य अशा दोन्ही गुणांचा अभाव असणें. (१२) विरोधाला अवश्य अशा दोन्हीही क्रियांचा अभाव असणें तसेंच (१३) द्रव्यांचाही अभाव असण. अशा रीतीनें रुद्रटानें १३ भेद केले. पण याचे शेवटचे चार भेद पुढें विशेषसे मान्य झाले नाहींत. रुद्रट ' जातिद्रव्यविरोधो न संभवत्येव ' असें म्हणतो, पण मम्मटानें व पुढील शास्त्रज्ञांनीं तो भेद मानला आहे.

६. मम्मटानें थोडक्यांत अशी व्याख्या केली कीं, ' विरोधः सोऽविरोधेऽपि विरुद्धत्वेन यद्वचः '[2]–' वस्तूच्या ठिकाणीं विरोध नसतांही विरोध आहे असें म्हणणें याला विरोध म्हणावें. ' अशी व्याख्या करतांना त्यानें हें स्पष्ट बजाविलें कीं विरोध हा प्रत्यक्ष सृष्टींतील नसून काव्यसृष्टींतील आहे. मम्मटानें रुद्रटाचे पहिले नऊ भेद व जातिद्रव्य–विरोध असे दहा भेद मानले आहेत. त्यांचीं उदाहरणें घेऊंः

(१) जातिविरोधः—

गज[3] गोष्पदीं बुडाला ! हा दैवा सिंधु शोषिला मशकें ।
न शके सोसाया हें, वधिला तो केसरी कसा शशकें ॥

येथें गज व गोष्पद; सिंधु व मशक; शशक व केसरी; या जातिनिदर्शक जोड्या असून त्यांत वस्तुतः विरोध नाहीं; पण त्या एकत्र आणल्यामुळें विरोध उत्पन्न होत असल्यानें हा जातिविरोध झाला.

(२) क्रियाविरोधः—

*मारी[4] यांत बुडी जो तो तरे यास सकर्दमा ।*
*मानवाधमही पावे पाहतां गति उत्तमा ॥*

---

१ का.लं. ९-३०. २ का. प्र. १०·१६६. ३ मो. द्रोणपर्व १·२३ ४ सा. व. वि.१३·९

या उदाहरणांत खड्गबंध हा चित्रालंकार आहेच; पण जो बुडी मारील तो तरेल असें म्हणून बुडणें व तरणें या विरोधी क्रिया एकत्र येऊन विरोधाभास होत असल्यामुळें हा क्रियाविरोध आहे.

( ३ ) वज्रापेक्षांहि कठिणें, पुष्पाहुनि मृदु अशीं ।
लोकोत्तरांचीं हृदयें कोणा जाणवतील नीं ॥

यांत एकाच हृदयाचे ठिकाणीं काठिण्य व मृदुत्व हे दोन गुण दाखविल्यामुळें हा गुणागुणांत विरोध म्हणजे गुणविरोध झाला.

( ४ ) जातिद्रव्यविरोधः—

सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास दारा परी,
असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी; ।

यांत प्रभु हें द्रव्यवाचक व खासदार जातिवाचक आहे. म्हणून जातिद्रव्यविरोध झाला.

( ५ ) जाति–गुणविरोधः—

विपरीतचि हें कुरुकुलदीपांनीं स्वप्रकाश हारविला ।

यांत दीप हें जातिवाचक व स्वप्रकाशहीनत्व हा गुण त्याला विरोधी आहे. त्यामुळें हा जातिगुणविरोध झाला.

( ६ ) मानी वरि पळाले गुरुनेंहि निवारितां नडक राया ।

यांत वीरांचा मानीपणा व त्याला विरुद्ध 'पळणें' ही क्रिया असल्यामुळें हा गुणक्रिया--विरोध झाला.

( ७ ) जाति–क्रिया विरोधः—

प्रेक्षक, सुर, मुनि, सज्जन बहु हळहळले किरीटिसुतपातें ।
रडला पाहुनि सत्यब्रह्मज्ञहि नारदादि मुतपा तें ॥

सत्यब्रह्मज्ञ ही जाति व रडणें ही तद्विरोधी क्रिया म्हणून हा जातिक्रिया विरोध झाला.

( ८ ) क्रिया–द्रव्य विरोधः—

सर्वसहेसही बहु देतो खलकायभार ताप सदा ।

( ९ ) ऐसें अवलोकितां सती । म्हणे नवल हो ! श्रीपति ।
अंधकार झाला गभस्ती । तुझिया सूत्रें ॥

हा द्रव्य–विरोध झाला.

(१०) हिमाद्रि त्याच्या स्वतपःप्रभावें । सुखोष्ण झाला नवला कथा ते ॥

---

१ उत्तररामचरित्र गडबोले २ मो. केका ७ ३ मो. सभापर्व ७·४२. ४ मो. द्रोणपर्व ३·५५ ५ मो. द्रोणपर्व ३·१४६ ६ मो. द्रोणपर्व ३·७० ७ मु. हरिश्चं ३·२० ( सर्व फरक करून ). ८ स्वकृत.

हा द्रव्य-गुण विरोध झाला. हिम म्हणजे बर्फ त्यानें युक्त अद्रि सुखोष्ण असा झाला म्हणून द्रव्य-गुण विरोध याप्रमाणें दहा भेदांचीं उदाहरणें झालीं.

७. 'विरुद्धाभासत्वं विरोधः[1]' ही रुय्यकाची व्याख्या शब्दशः वामनाप्रमाणें व अर्थतः मम्मटाप्रमाणें आहे. यानें भेदही मम्मटाप्रमाणेंच केले आहेत.

विद्याधरः—स्फुरति विरोधाभासे भवति विरोधोऽभिधो दशधा।[2]

विश्वनाथः—जातिश्चतुर्भिर्जात्याद्यैर्गुणो गुणादिभिस्त्रिभिः।
क्रिया क्रियाद्रव्याभ्यां यद्द्रव्यं द्रव्येण वा मिथः॥
विरुद्धमिव भासेत विरोधोऽसौ दशाकृतिः।[3]

अप्पय्यदीक्षितः—आभासत्वे विरोधस्य विरोधाभास इष्यते।[4]

जगन्नाथः—एकाधिकरणसंबद्धत्वेन प्रतिपादितयोरर्थयोर्भासमानैकाधिकरणासंबंधत्वमेकाधिकरणासंबद्धत्वभानं वा विरोधः[5] ॥ यद्वा, एकाधिकरणासंबद्धत्वेन प्रतिपादनं सः॥

अप्पय्यदीक्षितानें विरोधाचें श्लेषमूलकत्वाचें उदाहरण दिलें आहे. इतर भेद त्यानें मानलेले नाहींत. जगन्नाथानें आपल्या व्याख्येंत एकाधिकरणत्वावर अधिक जोर दिला आहे, कारण इतर अलंकारांशीं फारकत करण्यासाठीं विरोधाला एकाधिकरणात्वावर बसविणें त्याला योग्य वाटलें. विरोध व विरोधमूल अलंकार यांत फरक कोणता हें आपण त्या अलंकारांचा विचार केल्यावर पाहूं. सध्यां, रूपक व विरोध यांत साम्य येतें अशा वेळीं रूपक कोणतें व विरोध कोणता हा प्रश्न पुढें येतो.

उः— हो सार्वभौम होउनि कैसा भोगील अल्पविषयातें ? !
स्वजनधनमानहानीस्तव होइल अन्न कल्प विष यातें ॥[6]

रूपकाच्या व्याख्येप्रमाणें या उदाहरणांत अन्न व विष यांत अभेद म्हणून हें रूपक व्हावयास पाहिजे. पण अर्थाचा झोंक पाहतां विरोध होणेंच इष्ट आहे. म्हणून रूपक व विरोध हे अलंकार निश्चित करतांना अर्थाच्या कलाकडे पाहूनच ते ठरवावे लागतील.

अप्पय्यदीक्षितानें 'विरोध' अलंकाराची उत्पत्ति झाल्यानंतर त्याच्या परिहारासाठीं उत्प्रेक्षा असलेलें उदाहरण दिलें आहे. यावर जगन्नाथ म्हणतो विरोध अलंकाराचा परिहार केल्यावर तें विरोधालंकाराचें उदाहरणच होऊं शकणार नाहीं.

रुय्यकानें श्लेष गर्भित विरोध असतां कोणास प्राधान्य द्यावें यासंबंधीं स्वतः तटस्थ राहून उद्भट-मम्मटाचीं मतें दिग्दर्शित केलीं आहेत. उद्भट-मम्मटाचीं याबद्दल असणारीं मतें आपण श्लेषप्रकरणांत पाहिलींच आहेत.

---

१ अ. सू. ४०२. २ ए. ८·३३. ३ सा. द. १०·६८–६९. ४ कु. (३३) ७६. ५ र. गं. ४२७. ६ मो. शल्यपर्व. १·४७.

## २ विभावना.



८. हा विरोधमूल अलंकार आहे. विभावनेचा विचार भामहापासून झालेला आहे. भामहाची व्याख्याः—

क्रियायाः प्रतिषेधे या तत्फलस्य विभावना[1] ।
ज्ञेया विभावनैवासौ समाधौ सुलभे सति ॥

इन्दुराजानें म्हटल्याप्रमाणें ' विरुद्धाभासा भावना येन तेन विभावना ' विरुद्ध आभास उत्पन्न होणारी जी भावना तिला विभावना म्हणावयाचें. या दृष्टीनें या अलंकारांत हाच अर्थ आहे. " क्रियेचा म्हणजेच कारणाचा प्रतिषेध असतांही त्याच्या फलाचें दर्शन होणें याला विभावना म्हणावयाचें " असा भामहाचा अर्थ झाला.

दण्डीः— प्रसिद्धहेतुव्यावृत्त्या यत्किंचित्कारणान्तरम् ।
यत्र स्वाभाविकत्वं वा विभाव्यं सा विभावना[2] ॥

दण्डीनें विरोध व विभावना यांतील सूक्ष्म भेद सांगितला. 'प्रसिद्ध कारण नसतां सूक्ष्म कारणानें अथवा स्वाभाविकपणें गोष्ट घडणें याला विभावना म्हणावयाचें' असें त्यानें म्हटलें आहे. भामहाची व्याख्या दण्डीच्या व्याख्येइतकी स्पष्ट नाहीं. विभावनेच्या दण्डीनें सांगितलेल्या दोन्ही प्रकारचीं उदाहरणें घेऊं. ( १ ) सूक्ष्म कारणानें होणारी विभावनाः—

रस[3] लोपला सकलही जयांतला । नव-पुष्प-निर्गम तदीय थांबला ।
अथवा अशा मग कशा पुरातना । लतिका वनीं फुलति कारणाविना ॥

या उदाहरणांत लतांचा फुलण्याचा काल नसतांही लता फुलतात याचें ऋषि-सामर्थ्य हें सूक्ष्म अथवा अप्रसिद्ध कारण आहे म्हणून ही विभावना झाली. ( २ ) स्वाभाविक कारणानें होणारी विभावनाः—

ते राजसुता[4] सीता सेवितसे प्रेमयुक्त कमलाक्षा ।
जीचे वनसंचारी, दिसती पद रक्त, जरि नसे लाक्षा ॥

लाक्षारस लाविला नसतांही पावलें स्वाभाविक कारणानें आरक्त घडलें झालीं. म्हणून ही विभावना होय.

या दोन भेदांचा मिश्र भेद करून तो तिसरा भेद म्हणून दण्डीनें मानला आहे. विभावनेंत कारणाला महत्त्व आहे विरोधांत तसें नाहीं हाच या दोन अलंकारांत फरक होय. म्हणून दण्डी म्हणतो, ' अहेतुकं च तस्येह विवक्षेत्यविरुद्धता'[5] उद्भटानें भामहाची व्याख्या अक्षरशः घेतली आहे. त्यामुळें ती पुन देण्याचें कारण नाहीं.

---

१ भा. लं. २·७७. २ का. द. २·१९९. ३ सं. व. वि. ५·२८ ४ मो. मं. अ. का.५९
५ का. द.१२०२.

वामनः—क्रियायाः प्रतिषेधे प्रसिद्धतत्फलव्यक्तिर्विभावना[1]

'क्रियेचा निषेध असतांही त्याच क्रियेचें प्रसिद्ध फल दिसणें' ही व्याख्याही इतरांपेक्षां निराळी नाहीं. वामनानें विरोधानंतर लगेच विभावना विचारांत घेतल्यामुळें येथें एक गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे. ती म्हणजे शास्त्रीय रीत्या अलंकार–विवेचन करणारा रुद्रट पहिला आहे तरी वामनानेंही अलंकारांना शास्त्रीय रीति लाविल्यासारखें वाटतें. याचें कारण असें कीं, जरी त्यानें प्रत्यक्षपणें शास्त्रीयरीत्या अलंकाराची विभागणी केली नाहीं तरी फरक स्पष्ट व्हावा या हेतूनें किंचित् फरक असणारे अलंकार एकामागें एक विचारांत घेण्याचा त्याचा उपक्रम आहे. साहजिकपणेंच अलंकारांची विभागणी बरीचशी जणुं शास्त्राला धरून अशी झाली आहे.

रुद्रटः— सेयं विभावनाख्या[2] यस्यामुपलभ्यमानमभिधेयम् ।
अभिधीयते यतःस्यात्तत्कारणमन्तरेणैव ॥

रुद्रटानें विभावनेचे तीन भेद केले आहत. ( १ ) उक्त गोष्ट वास्तविक कारण नसतांही घडली असें सांगणें ( २ ) विकाराला उत्पन्न होण्यास लागणारें कारण नसतांही कारणान्तरानें विकार दिसणें ( ३ ) एखाद्या गोष्टींत असणारा धर्म दुसऱ्या गोष्टींतही तसाच आहे असें दर्शविणें. हे रुद्रटाचे भेद सूक्ष्म फरकानें दण्डीच्याच भेदासारखे आहेत असें दिसेल.

'क्रियायाः प्रतिषेधेऽपि फलव्यक्तिर्विभावना[3]'–मम्मटाची ही व्याख्या वामनाच्या व्याख्येंतील 'प्रसिद्ध' हा शब्द गाळून जशीच्या तशीच घेतलेली दिसते. वामनाच्या ' प्रसिद्ध ' या शब्दांत विशेषसा अर्थ नाहीं असें वाटून मम्मटानें तो शब्द गाळला असावा. यानें विभावनेचे भेद केलेले नाहींत.

रुय्यकः—' कारणाभावे कार्यस्योत्पत्तिर्विभावना[4] '

' क्रियायाः प्रतिषेधः ' असें म्हणून ' क्रिया ' हा शब्द वापरणें चुकीचें असून ' कारण ' हाच शब्द वापरणें योग्य आहे असें रुय्यकानें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें विरोध,विशेषोक्ति, विभावना यांतील फरक सांगून रुय्यकानें विभावनेचे उक्त-निमित्ता व अनुक्त-निमित्ता हे दोन भेद केले आहेत. याशिवाय विभावना ही मालाविभावनाही होईल असें म्हणून त्यानें मालाविभावनेचें उदाहरण दिलें आहे. रुय्यकाचे उपरिनिर्दिष्ट दोन भेद म्हणजेच दण्डीचे स्वाभाविक व सूक्ष्मकारणामुळें होणारे विभावनेचे भेद होत. रुय्यकानें हें स्पष्ट सांगितलें आहे कीं विभावनेंत उक्त असो अगर गम्य असो पण कारण हें असतेंच. त्या कारणामुळेंच कार्य घडतें. कशाही स्वरूपांत कारण नसलें तर तो विरोध अलंकार होईल.

---

१ का. सू. ४·३·१३. २ क. लं. ९·१६ ३ का. प्र. १०·१६२. ४ अ. स. ४१.

विद्याधरः—असति प्रसिद्धहेतौ कार्योत्पत्तिर्विभावना भवति ॥[1]

विश्वनाथः—विभावना विना हेतुं कार्योत्पत्तिर्यदुच्यते ।[2]

विश्वनाथानें 'हेतु' हा शब्द 'कारण' या अर्थीच घेऊन अजूनपर्यंत रूढ झालेले 'क्रिया' व 'कारण' हे दोन्ही शब्द सोडून दिले. विद्याधरानें सर्व रुय्यकाचेंच विवेचन पण स्वतःच्या शब्दांत दिलें आहे; अर्थात् मालाविभावनाही त्यानें दिली आहे. विश्वनाथ मात्र 'उक्तनिमित्ता' व 'अनुक्तनिमित्ता' असे दोनच भेद करतो. रुद्रटानें अतिशयोक्तिमूलक अलंकारांचे सदरांत विभावना हा अलंकार घालून विभावनेंत अतिशयोक्ति आहे असें म्हटलें. रुय्यकाचेंही मत रुद्रटासारखें असून विश्वनाथ या बाबतींत मौनच धरतो.

अप्पय्यदीक्षितः—'विभावना विनापि स्यात्कारणं कार्यजन्म चेत्'[3]

जगन्नाथ–'[illegible]ण्येन प्रतिपाद्यमाना कार्योत्पत्तिर्विभावना'[4] या व्याख्येंत इतरांहून निराळा विशेष नाहीं. रुद्रट व रुय्यक विभावना ही अतिशयोक्तियुक्त असते असें म्हणतात पण हें म्हणणें, जगन्नाथानें, उदाहरणासह खंडून टाकलें आहे. अतिशयोक्ति व रूपक हीं विभावनेला क्वचित् साहाय्यक होतात पण नेहमींच होतील असें नाहीं असें जगन्नाथाचें म्हणणें आहे.

अप्पय्यदीक्षितानें विभावनेचे भेद केले ते असेः—( १ ) समग्र कारण नसतां कार्य घडणें ( २ ) कारण हें प्रतिबंधक असतांही कार्य घडणें (३) त्या कार्याचें जें कारण होऊं शकणार नाहीं अशा कारणामुळेंही कार्य घडणें ( ४ ) विरोधी कारणानें कार्य घडणें (५) कार्यापासून कारण उत्पन्न होणें. या भेदाविषयीं पुढें विचार करावयाचा आहे. अप्पय्यदीक्षिताचा चौथा व पांचवा हे विभावनाभेद कारणाचा अभाव दर्शवित असल्यानें ते दोन भेद करण्यांत अर्थ नाहीं असें जगन्नाथानें म्हटलें आहे व तें सार्थ आहे. पण त्याशिवायही अप्पय्यदीक्षिताचा सहावा भेद हा अतिशयोक्ति अलंकार होईल असें वाटतें; कारण तो भेद म्हणजे कार्यकारण–विपर्ययच होय. आणि कार्यकारणविपर्ययानें अतिशयोक्ति होते. त्याचप्रमाणें विभावनेच्या केलेल्या मूळ व्याख्येंत व विभावनेच्या दुसऱ्या भेदांत कांहींच फरक रहात नाहीं. यावरून अप्पय्यदीक्षिताचे हे भेद भ्रामक आहेत असें आढळून येईल.

जगन्नाथानें रुय्यकाच्या विभावना भेदांपैकीं 'उक्तनिमित्ता' ह्या विभावनाभेदावर शस्त्र धरलें आहे, व शब्दानेंच कारण सांगितल्यावर विभावना कोठें राहिली असा सवाल टाकला आहे. पण जगन्नाथाचें हें विधान चुकीचें आहे असें वाटतें.

यदवधि विलासभवनं यौवनमुदयाय चन्द्रवदनायाः ।
दहनं विनैव तदवधि यूनां हृदयानि दह्यन्ते ॥[5]

---

१ ए. ८.३६. २ सा. द. १०.६६–३७. ३ कु. (३४) ७७. ४ र. गं. ४३१.
५ र. गं. ४३५

या उदाहरणांत 'हेतु' हा शब्द नसला तरी तो गम्य असल्यानें त्याचें हेतूंत पर्यवसान होतें. म्हणून ही उक्तनिमित्ता म्हणणें योग्य वाटतें. उक्त म्हणजे सांगितलेलें असा अगदीं मूळ अर्थ न घेतां गम्य अगर पर्यायानें लागू पडणारें निमित्त असा अर्थ घ्यावा. हें लक्षांत घेतल्यावर विभावना व विरोध यांत फरक दृष्टीस पडतो. तो असा कीं, विरोधांत उक्त किंवा अनुक्त यांपैकीं कोणतेंही कारण मुळींच नसतें; विभावनेंत सूक्ष्म कां होईना पण कारण असावेंच लागतें. विभावनेंतील मुख्य गोष्ट म्हणजे नेहमींचा दृग्गोचर होणारा कार्यकारणभाव नसतां इतर कारणांनीं ती गोष्ट घडते. ही स्थिति विरोधांत नसते.

अधिक निरीक्षण केल्यास असें दिसून येईल कीं, पुढील अलंकारशास्त्रज्ञांचे विभावनभेद दर्शविणारे उक्तनिमित्ता व अनुक्तनिमित्ता हे शब्द घोंटाळ्यांत पाडणार आहेत यासाठीं दण्डीचे 'कारणान्तर व 'स्वभावज' हे दोन शब्द स्वीकारणें जास्त सोईचें आहे.

## ३ विशेषोक्ति.



एकदेशस्य विगमे या गुणान्तरसंस्थितिः ।
विशेषप्रथनायासौ विशेषोक्तिर्मता यथा ॥[1]

'एका गुणाच्या हानीबरोबर दुसरा गुण, विशेष सांगण्यासाठीं आणला जातो तेव्हां त्याला विशेषोक्ति म्हणावें' ही जी भामहाची विशेषोक्तीची व्याख्या ती पुढील शास्त्रज्ञांहून अगदीं निराळी आहे. भामहाचें या अलंकाराचें उदाहरण मात्र इतरांच्या मतेंही विशेषोक्तीचेंच होईल. कारण असतांही कार्य न घडणें हा या अलंकाराचा विशेष आहे असें इतर अलंकार-कोविदांना वाटतें पण भामहाला त्या विशेषाची जरूर वाटली नाहीं. एक गुण नाहींसा होत असतांही दुसऱ्याच्या दृढतेमुळें विशेष गोष्ट घडून येणें याच गोष्टीवर भामह अधिक भर देतो. दण्डीः—

गुणजातिक्रियादीनां यत्तु वैकल्यदर्शनम् ।
विशेषदर्शनायैव सा विशेषोक्तिरिष्यते ॥[2]

"गुण, जाति, क्रिया, द्रव्य यांसंबंधीं विशेष सांगण्यासाठीं त्यांचें स्वरूप-वैकल्य दाखविणें यास विशेषोक्ति म्हणतात." दण्डीची ही व्याख्या पाहतां तींत व भामहाच्या व्याख्येंत फारच थोडा फरक आहे.

गुण, जाति, क्रिया, द्रव्य यांत स्वरूपवैकल्य दाखविण्यासाठीं दण्डीनें जीं उदाहरणें दिलीं आहेत तीं फक्त त्याच्याच व्याख्येप्रमाणें विशेषोक्तीचीं होऊं

---

१ भा. लं. ३.२२. २ का. द. २.३२३.

शकतील. इतरांच्या मतें तीं विभावनेचीं होतील; कारण त्यांत कारण नसतां कार्य घडलें आहे. त्याच्या विशेषोक्तीच्या उदाहरणांत असणारी विभावना अतिशयोक्तिमूलक आहे.

वामनः—एकगुणहानिकल्पनायां साम्यदार्ढ्यं विशेषोक्तिः[१] 'एका गुणाच्या हानीबरोबर इतर गुणांच्या साम्याची दृढता असणें.' ही वामनाची विशेषोक्तीची व्याख्या भामहाच्या व्याख्येशीं बरीचशी जुळते. वामनानें तर 'रूपकं चेदं प्रायेणेति'[२] असेंही म्हटलें आहे व उदाहरण म्हणून पुढील ओळ दिली आहे:—

"भवन्ति यत्रौषधयो रजन्यामतैलपूराः सुरतप्रदीपाः।"[३]

पण वस्तुतः ही ओळ रूपकाचें उदाहरण होत नाही. 'अतैलपूराः सुरतप्रदीपाः' म्हणण्यानें कारणावांचून कार्य घडल्यामुळें हें विभावनेचें उदाहरणच होईल. वामनानें दिलेलीं सर्व उदाहरणें अशींच आहेत. त्याची व्याख्या भामहाशीं किंचित् जुळते, पण इतरांच्या व्याख्यांहून ती अगदीं भिन्न आहे. रुद्रटानें विशेषोक्ति अलंकार मानलेला नाहीं.

मम्मटः—विशेषोक्तिरखण्डेषु कारणेषु फलावचः[४]

मम्मटानें विशेषोक्तीला निराळें वळण लावलें पण तें मुळांत उद्भटानेंच लावलें आहे असें दिसेल.

उद्भटः— यत्सामग्र्येपि शक्तीनां फलानुत्पत्तिबन्धनम्।
विशेषस्याभिधित्सातस्तद्विशेषोक्तिरुच्यते॥[५]

"शक्तिसमूह असतांनाही, विशेष कथन करण्यासाठीं, त्या शक्तीपासून फलोत्पत्ति झाली नाहीं असें सांगणें." उद्भटानें दर्शितनिमित्ता व अदर्शितनिमित्ता हे दोन भेद विशेषोक्तीचे केले. मम्मटानें या भेदांसह उद्भटाची व्याख्या घेऊन ती स्वतःच्या शब्दांत मांडली. भामह, दण्डी इत्यादिकांची शिथिल असणारी व्याख्या सुव्यवस्थित करण्याचा प्रयत्न उद्भटानें केला व मम्मटानें किंचित् फरक करून ती व्याख्या पूर्णत्वाला नेली. मम्मटानें आपल्या विशेषोक्तिभेदांना उद्भटाचींच नांवें न देतां उक्तनिमित्ता व अनुक्तनिमित्ता अशीं नांवें दिलीं. याशिवाय अचिन्त्यनिमित्ता हा तिसरा भेद त्यानें मानला.

रुय्यकः— कारणसामग्र्ये कार्यानुत्पत्तिर्विशेषोक्तिः।[६]

रुय्यक अनुक्तनिमित्तेचें अचिन्त्यनिमित्ता व चिन्त्यनिमित्ता असे भेद करतो. तरीही त्याचे तीन भेद मम्मटाप्रमाणेंच होतात. रुय्यकाच्या व्याख्येंत अर्थतः बदल कांहींच नाहीं. कारणाचा अभाव असतां विभावना होते व इष्टकार्योत्पत्ति

---

१ का. सू. ४·३·२३. २ का. सू. ४·३. ३ का. सू. ४·३.
४ कां. प्र. १०।६३ ५ का. सा. स. ५।५३. ६ अ. सू. ४२.

न होतां विरुद्ध कार्योत्पत्तीमुळें विशेषोक्ति होते; यामुळें कित्येक वेळां उदाहरणांत विभावना आहे कीं विशेषोक्ति हें ओळखतां येत नाहीं. अशा वेळीं तो संदेहसंकर समजावा असें रुय्यकानें म्हटलें आहे.

विद्याधरः-- यदि कारणसाकल्ये कार्यासिद्धिस्तदा विशेषोक्तिः।[1]

विश्वनाथः— सति हेतौ फलाभावो विशेषोक्तिस्तथा द्विधा ॥[2]

अप्पय्यदीक्षितः-- कार्याजनिर्विशेषोक्तिः सति पुष्कलकारणे।[3]

जगन्नाथः-- ' प्रसिद्धकारणकलापसामानाधिकरण्येन वर्ण्यमाना कार्यानुत्पत्तिर्विशेषोक्तिः '[4] या सर्व व्याख्यांचा आशय एकच आहे.

विशेषोक्ति व विभावना यांत फरक असा कीं, हे दोन्हीही दोन विरुद्ध टोकांवरील अलंकार आहेत. एकींत कारणें असतां कार्य घडत नाहीं. व दुसरींत कारणें नसतांही कार्य घडतें. विरोध व विशेषोक्ति यांतील फरकः—विरोधांत विशेषकथन नसून विरोधाभास उत्पन्न करणें हें ध्येय, तर विशेषोक्तींत विरोधाभास उत्पन्न करणें हें ध्येय नसून कारणें असतांही कार्य घडत नाहीं हें दाखविण्याचा मुख्य उद्देश असतो. विभावना व विशेषोक्ति या दोहोंतही विशेषकथन असतें.

विशेषोक्तीचें उदाहरणः—

स्ववत्समल भक्षिती तरि न सर्वथा बाटती।[5]

यांत मलभक्षण हें कारण असतांही बाटण्याचें कार्य घडून आलें नाहीं; म्हणजे कारण उक्त आहे पण कार्य घडलें नाहीं म्हणून ही उक्तनिमित्ता विशेषोक्ति झाली.

न ताप निवला, तृषा न शमली, रजें माखलें ॥
शरीर अजुनी नभे कमल एकही चाखलें ॥
न सोंड उचलोनियां कमलिनी गजें स्पर्शिली।
हकाक मधुपीं, पहा, अधिच काय आरंभिली ॥[6]

यांत मधुपांना हकाक करण्याचें कारण नसतांही हकाक झाली म्हणजे कारणावांचून कार्य घडल्यानें ही विभावना झाली. यावरून विशेषोक्ति व विभावना यांत दक्षिण व उत्तर ध्रुवाइतका फरक आहे हें दिसेलच. अर्थात् विभावनेंत कारणावांचून कार्य घडतें याचा अर्थ मुळींच कारण नसणें असा नव्हे हें विभावनाप्रकरणांत सांगितलेंच आहे. वर उक्तनिमित्ता विशेषोक्तीचें उदाहरण दिलें आहे. अनुक्तनिमित्ता विशेषोक्ति याचा अर्थ खरें कारण न देतां इतर पुष्कळ कारणें देऊनहि कार्य घडलें नाहीं असें दाखविणें. यांतील खरें कारण सांगतां येत असतांही न सांगणें याला चिन्त्यनिमित्ता म्हणतात व खरें कारण सांगतां येतच नसल्यानें न सांगणें याला अचिन्त्यनिमित्ता म्हणतात.

---

१ ए. ८.३६. २ सा. द. १०.६७. ३ कु. (३५) ८३. ४ र. गं. ४३७.
५ मो. केका. ६ अन्योक्तिकलाप-चिपळूणकर कृ. शा.

भिक्षाटणें अशन तें क्षण एक वार
शय्या महीवरि जया न कलत्र पोर।
कंथा जया वसन कीं शतखंड तेंही
टाकीच ना तदपि तो विषयांस देही ॥

या ठिकाणीं कारणें अनेक असतांही मनुष्याकडून विषयत्यागाचें कार्य होत नाहीं असें सांगितलें आहे. विषयत्याग न घडण्याचें खरें कारण मनोदौर्बल्य व विषयासक्ति हें अनुक्त असल्यानें ही चिन्त्यनिमित्ता विशेषोक्ति झाली.

## ४ अतिशयोक्ति.

भामहापासून बहुतेक अलंकार-कर्त्यांनीं अलंकारांचें अधिष्ठान अतिशयोक्तीवर असतें असें म्हटलें आहे. भामह 'वक्रोक्तिः काव्यजीवितम्' म्हणणारांपैकीं एक असून तो अतिशयोक्ति व वक्रोक्ति एकच आहेत असें समजत असल्यानें ओघानेंच अतिशयोक्तीला तो काव्यजीवित समजतो. दण्डी, मम्मट वगैरे शास्त्रज्ञही हेंच गृहीत धरतात. रुद्रटानें आपल्या शास्त्रीयरीत्या केलेल्या अलंकारविभागणींत अतिशयोक्तीला सर्वच मैदान मोकळें न देतां, तिच्यावर अधिष्ठित असलेल्या अलंकारांना स्वतंत्र प्रकरणांत गोविलें आहेत. तेव्हां अशा महत्त्वाच्या अलंकारांचें विवेचन सध्यांच हातीं घेणें युक्त आहे.

'अतिशयेन उक्तिः अतिशयोक्तिः' म्हणजे नेहमी अनुभवांत येणाऱ्या गोष्टींचें अगर वर्ण्य विषयाचें वस्तुस्थितीपेक्षां अधिक वर्णन करणें म्हणजे अतिशयोक्ति होय. भामहाची व्याख्याः—

निमित्ततो वचो यत्तु लोकातिक्रान्तगोचरम् ।
मन्यतेऽतिशयोक्तिं तामलंकारतया यथा ॥[२]

'निमित्तानें ( वर्ण्य विषयाचें ) अतिशययुक्त वर्णन करणें याला अतिशयोक्ति म्हणावें' या व्याख्येंत भामहानें एकच प्रकार गोंविला असला तरी 'असें असतें तर असें झालें असतें,' अशा तऱ्हेची असंभाव्य वर्णनाची कल्पना करून पुढील शास्त्रज्ञांना अतिशयोक्तीचा एक भेद त्यानें सुचवून दिला.

दण्डीः— विवक्षा या विशेषस्य लोकसीमातिवर्तिनी ।
असावतिशयोक्तिः स्यादलंकारोत्तमा यथा ॥[३]

दण्डीची ही व्याख्या भामहाप्रमाणेंच झाली तरी दण्डीचें अतिशयोक्तीचें उदाहरण पुढील शास्त्रज्ञांच्या मतें सामान्य अलंकाराचें होईलः—

१ वामन. २ भा. ल. २-८१. ३ का. द. २-२१४.

मल्लिकामालभारिण्यः सर्वाङ्गीणार्द्रचन्दनाः ।
क्षौमवत्यो न दृश्यन्ते ज्योत्स्नायामभिसारिकाः ॥

या उदाहरणांत ही ज्योत्स्ना व या अभिसारिका असें दाखवितां येत नसल्यामुळें हें दण्डीचें उदाहरण 'सामान्या 'कडे झुकतें. यानें संशयातिशयोक्ति, निर्णयातिशयोक्ति इत्यादि भेद केले आहेत.

अहो विशालं भूपाल भुवनत्रितयोदरम् ।
माति मातुमशक्योऽपि यशोराशिर्यदत्र ते ॥

हें अतिशयोक्तीचें म्हणून दण्डीनें दिलेलें उदाहरण अतिशयोक्तीचें वाटत नसून त्यांत 'अधिक' नामक अलंकाराची छटा आहे. यानें अतिशयोक्ति हा वाचेचा उत्तमोत्तम अलंकार गणला आहे.

उद्भटः— निमित्ततो यत्तु वचो लोकातिक्रान्तगोचरम् ।
मन्यतेऽतिशयोक्तिं तामलंकारतया बुधाः ॥

'यथा' ऐवजीं 'बुधाः' व 'मन्यते' 'ऐवजीं' 'मन्यन्ते' हे शब्द घालून ही भामहाचीच व्याख्या आहे. उद्भटानें केलेले अतिशयोक्तीचे भेद पुढें बहुतेकांनीं स्वीकारले आहेत. ते भेद असेः—(१) वस्तुतः फरक असतांही नाहीं असें म्हणणें (२) फरक नसतांही आहे असें ठरविणें (३) असंभाव्य गोष्टींची कल्पना करणें (४) क्रियेला लागणारा अत्यल्प वेळ दाखविण्यासाठीं त्या क्रियेची व तिच्या कारणाची आलटापालट करणें, म्हणजे कार्यानंतर कारण झालें असें सांगणें. उदाहरणें:—

सौंदर्याची संपदा हे विभिन्ना । चातुर्याची पद्धती तीहि भिन्ना
लोकीं आहे पद्मपत्रेक्षणा ही । स्रष्ट्याची ही सृष्टि सामान्य नाहीं ॥

या उदाहरणांत 'विभिन्ना' 'भिन्ना', इत्यादि पदांनीं सौंदर्यांत व चातुर्यांत जगाविरहित फरक नसतांही तो आहे असें दाखविलें आहे, म्हणून ही दुसऱ्या प्रकारची अतिशयोक्ति झाली. मम्मटानें उद्भटाचा पहिला व दुसरा भेद एकत्र करून त्याला 'प्रस्तुतस्य यदन्यत्वम्' असें म्हटलें आहे.

(२) शंभुपुढें उदयातें एकाकाळींच केशवा करितें, ।
जरि बहु अयुतें असतें चंद्रार्क, स्पष्ट लोपते तरि ते ॥

या उदाहरणांत असंभाव्य कल्पना केल्यामुळें ही अतिशयोक्ति झाली. (३) कार्यानंतर कारण घडून आल्याचें उदाहरण:—

कदा नेणों वोढी शरधितुनि काढी शर कदा ।
कदा धन्वी जोडी वरि वरिहि सोडी तरि कदा ।

---

१ का, द. २.२१५. २ का, द. २-२१९. ३ का. सा. स. २-३४. २ वामनशास्त्री कमकर. ५ मो. अनुशासनपर्व ३·८५. ६ र. प. नलदमयंती.

विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्ष्यास्तव रणीं ।
कळे राजेन्द्राची त्वरित शरसंधान करणी ॥

वामनः--संभाव्यधर्मतदुत्कर्षकल्पनातिशयोक्तिः

( १ ) संभाव्य धर्माची आणि ( २ ) त्याच्या उत्कर्षाची कल्पना करणें म्हणजे अतिशयोक्ति होय. वामनानें त्याच्या दुसऱ्या भेदाचें उदाहरण दण्डीच्या ' मल्लिका-मालभारिण्यः ' या उदाहरणासारखेंच आहे, पण दण्डीनें अभिसारका ' न दृश्यन्ते ', असें जेथें म्हटलें तेथें यानें ' प्रयान्ति ' घातल्यानें याचें उदाहरण ' सामान्या 'चें न होतां अतिशयोक्तीचेंच होत आहे.

९. रुद्रटानें अतिशयाधिष्ठित अलंकारांचा निराळा वर्ग पाडतांना अतिशयाचें सामान्य लक्षण दिलें तें असें:—

यत्रार्थधर्यनियमः प्रसिद्धिबाधाद्विपर्ययं याति ।
कश्चित्क्वचिदतिलोकं स स्यादित्यतिशयस्तस्य ॥

'( अर्थ व धर्म यांचें स्वरूप प्रसिद्ध असतां त्या ) प्रसिद्धीला बाध आणून अर्थ व धर्म यांचें नियत स्वरूप अतिशय विपर्यस्त होतें, तेव्हां ' अतिशय ' होतो. रुद्रटाच्या अतिशयोक्तिचें सामान्य लक्षण व भामहाचें ' लोकातिक्रान्तगोचरं वचः' हें अतिशयोक्तीचें लक्षण सारखें आहे असें दिसतें. रुद्रटानं ' पूर्व ' या नांवाचा एक अलंकार मानला आहे; वस्तुतः ती कालाच्या पौर्वापयविपर्ययानें होणारी अतिशयोक्ति आहे. त्या पूर्व अलंकाराचें लक्षण असें:—

' यत्रैकविधावर्थौ जायेते यो तयोरपूर्वस्य ।
अभिधानं प्राग्भवतः सतोऽभिधीयेन तत्पूर्वम् ॥ '

दोन अर्थ तुल्यकार्य करणारे असतां, आधीं होणारी गोष्ट नंतर व नंतर घडणारी गोष्ट आधीं झाली असें सांगून तुल्यकालाचा अतिक्रम झाला असतां, पूर्वालंकार होतो; पण हें लक्षण अतिशयोक्तीचेंही होईल. त्याचप्रमाणें पूर्वाची आणखी एक दिलेली व्याख्या पाहातां ती आधीं कारण व नंतर कार्य हा नेहमींचा क्रम पालटून आधीं कार्य व नंतर कारण घडून होणारी कार्यकारण-पौर्वापर्यविपर्य नांवाची अतिशयोक्तीच आहे असें दिसतें. त्याची व्याख्याः—

यत्रातिप्रबलतया विवक्षते पूर्वमेव जन्यस्य ।
प्रादुर्भावः पश्चाज्जनकस्य तु तद्भवेत्पूर्वम् ॥

' अतिप्रबलत्वामुळें जनका ( कारणा ) पूर्वी जन्याचें ( कार्याचें ) कथन होतें, तेव्हां ' पूर्व ' होतो. अर्थात् हा पूर्व म्हणजे अतिशयोक्ति होय. रुद्रटाचीं या अलंकाराचीं उदाहरणेंही अतिशयोक्तीचींच दिसतात. तीं उदहरणें अशीं:—

१ का. सू. ४,३-१० २ का. लं. ९.१. ३ का. लं. ८.९७. ४ का. लं. ९.३.

(१) काले[1] जलदकुलाकुलदशदिशि पूर्वं वियोगिनीवदनम् ।
गलदविरलसलिलभरं पश्चादुपजायते गगनम् ॥

(२) जनमसुलभमभिलषतामादौ दन्दह्यते मनो यूनाम् ।
गुरुरनिवारप्रसरः पश्चान्मदनानलो ज्वलति ॥

वियोगिनीवदन व गगन हीं समकालीं सलिलसमाकुल होतील किंवा आधीं गगन व नंतर वियोगिनीवदन सलिलसमाकुल होईल. पण पहिल्या उदाहरणांत तसें न सांगतां आधीं वियोगिनीवदन व नंतर गगन सलिलसमाकुल झालें असें सांगितल्यानें ही अतिशयोक्तिच झाली.

दुसऱ्या उदाहरणांत आधीं तरुणाच्या मनाचा दाह होतो व नंतर दाहाचें कारण जो अनल तो ज्वलन पावतो; तेव्हां कार्य आधीं व नंतर कारण निर्माण झाल्यानें हा ' पूर्व ' अलंकार म्हणजे अतिशयोक्तीच होय.

मम्मटः—निगीर्याध्यवसानं तु प्रकृतस्य परेण यत् ।
प्रस्तुतस्य यदन्यत्वं यद्यर्थोक्तौ च कल्पनम् ॥
कार्यकारणयोर्यत्र पौर्वापर्यविपर्ययः ।
विज्ञेयातिशयोक्तिः सा ॥

मम्मटानें चार स्थितींत अतिशयोक्ति संभवते असें ह्मटलें आहे. ( १ ) उपमानानें उपमेयाला गिळून टाकणें. ( २ ) प्रस्तुत गोष्टीला अन्यत्व देणें. या भेदांतच उद्भटाचे ' भेदेऽनन्यत्वम् ' ' अभेदे नानात्वम् ' हे पहिले दोन भेद मम्मटानें एकत्रित केले. ( ३ ) ' यदि ' सारखे शब्द घालून असंभाव्य गोष्टीची अथवा अर्थाची कल्पना करणें ( ४ ) कारण हें कार्यानंतर घडलें असें दाखविणें.

मम्मटानें पहिला भेद हा उद्भटापेक्षां अगदीं निराळा कल्पिला आहे. मम्मटाचा तिसरा व चौथा हे भेद उद्भटाच्या तिसऱ्या व चौथ्या भेदाप्रमाणेंच आहेत. मात्र उद्भटाचे पहिले दोन भेद मिळून मम्मटाचा दुसरा भेद होतो. मम्मटानें अतिशयोक्तीचें सामान्य लक्षण दिलेलें नाहीं. वर उल्लेखिलेल्या चार भेदांना अतिशयोक्ति म्हणावें असें तो म्हणतो. आतांपर्यंत चालत आलेले ' लोकातिक्रान्तगोचरम् ' सारखे शब्द याच्या अतिशयोक्तींत दिसत नाहींत. कारण त्या शब्दांची चिकित्सा म्हणूनच हे चार भेद आहेत. मम्मटाच्या पहिल्या भेदाचीं उदाहरणें—

(१) छळें वृत्तें मत्प्राण व्याकुळ होतात; घातलें कानें ।
आंत विषचि; सोसावा कैसा हो, तात घात लेंकानें ॥

पहिल्या उदाहरणांत वृत्त हेंच विष म्हटल्यानें वृत्त हें उपमेय विष या उपमानानें गिळून टाकलें आहे.

१ का. लं. ८·९८ २ का. लं. ९·४ ३ का. प्र. १०·१५३ ४ मो. सौ. पर्व· १·११

राजा म्हणे कनकलतिके ! बोलसी तितुकें परम निकें ।

दुसऱ्या उदाहरणांत स्त्री हें उपमेय कनकलतिका या उपमानानें सर्वस्वीं गिळून टाकलें म्हणून ही अतिशयोक्ति झाली. मम्मटाच्या बाकीच्या भेदांचीं उदाहरणें उद्भटाच्या अतिशयोक्तीच्या भेदांसाठीं दिलेल्या उदाहरणांसारखींच होतील.

रुय्यक अलंकारांचे वर्ग पाडण्यांत गुंतल्यामुळें, अतिशयोक्तीचा एकच भेद स्वतंत्र घेऊन त्याचें वर्णन करणें त्याला भाग पडलें. एकदां कार्यकारणभावाचें ज्यांत महत्त्व आहे असे अलंकार वर्णन करीत असतां व पुनः अभेदप्रधान अलंकारांचें वर्णन करीत असतां असें दोन वेळां अतिशयोक्तीचें विवेचन त्यानें केलें आहे, प्रथम वर्णिलेली अतिशयोक्ति अशीः—

'कार्यकारणयोः समकालत्वे पौर्वापर्यविपर्यये चातिशयोक्तिः'

'( १ ) कार्यकारणाचें समकालनित्व असणें ( २ ) अगर कार्य आधीं व नंतर कारण घडलेंसें दाखविणें, या दोन स्थितींत अतिशयोक्ति होते.' अतिशयोक्तीच्या पूर्वीच्या अलंकारकर्त्यांनीं केलेल्या भेदांत रुय्यकाचा दुसरा भेद आहे पण पहिला भेद मात्र दिसत नाहीं. समकालीनत्व म्हणण्यांतही कार्यकारणाचा विपर्यय आहेच त्यामुळें पहिला भेद मानण्याचें वस्तुतः कारण नाहीं. असो ही कार्यकारणभावाची अतिशयोक्ति झाली. रुय्यकाची दुसरी व्याख्या 'अध्यवसितप्राधान्ये त्वतिशयोक्तिः'"अध्यवसित म्हणजे विषयी किंवा उपमान हें उपमेयाला नाहींसें करून प्रधान होईल तेव्हां त्यास अतिशयोक्ति म्हणावें." मम्मटानें एक भेद म्हणून मानलेली ही अतिशयोक्ति रुय्यकानें सामान्य लक्षण म्हणून दिली आहे. वास्तविक हें अतिशयोक्तीचें सामान्य लक्षण करणें कितपत योग्य आहे हा प्रश्नच राहील. 'अतिशयानें वर्णन करणें म्हणजे अतिशयोक्ति' हें प्राचीन शास्त्रज्ञांनी केलेलें अतिशयोक्तीचें वर्णनच तिचें सामान्य लक्षण होणें योग्य आहे. तसें लक्षण करण्यानें अतिशयोक्तीचे भेद करण्यास अवसर सांपडतो. रुय्यकानें वर दिलेलें सामान्य लक्षण देऊन पांच भेद केले आहेत ते असे:— ( १ ) भेद असतां नाहीं म्हणणें. ( २ ) अभेद असतां नाहीं असें दाखविणें. ( ३ ) संबंध असतां नाहीं म्हणणें ( ४ ) संबंध नसतां आहे असें म्हणणें ( ५ ) कार्यकारण यांचा पौर्वापर्यविपर्यय नसतां तो आहे असें दाखविणें.

रुय्यकानें अतिशयोक्तीचें दोन ठिकाणीं केलेलें वर्णन पाहिलें तर असें आढळून येईल कीं , एकदां अभेद-प्रधान अलंकारांचे सदरांत व एकदां कार्यकारणभावाला महत्त्व असणारे जे विरोध-मूलक-अलंकार त्यांच्या सदरांत अतिशयोक्तीचें वर्णन करून, कार्यकारणभावावर अधिष्ठित असे दोन तुकडे

---

१ मु. आदिपर्व १६'१२ २ अ. सू. ४३ ३ अ. सू. २२

एका बाजूला ठेऊन वर्णन करण्यामुळें रुय्यकाची अतिशयोक्तीची व्याख्या मात्र आपल्या आसनावर साहजिकच डळमळली आहे.

रुद्रटानें ' पूर्व ' अलंकार दोन ठिकाणीं वर्णन केला आहे. व तो जरी अतिशयोक्तीच्याच सदरांत बसला तरी त्याचें अतिशयोक्तीचें सामान्य लक्षण दृढ असल्यानें ' पूर्व ' अलंकारामुळें त्या व्याख्येला बाध येत नाहीं.

आतांपर्यंत पाहिलेल्या भेदविवेचनांत मम्मटानें भेदनिर्णय अधिक व्यवस्थितपणें केला आहे असें वाटतें. रुय्यकाच्या तिसऱ्या व चौथ्या भेदांशिवाय बाकीच्या भेदांचीं उदाहरणें वर आलींच आहेत. संबंध असतां नाहीं असें दाखविण्यानें तिसरा भेद होतो. त्याचें उदाहरणः—

सौंदर्याची संपदा हे विभिन्ना । चातुर्याची पद्धती तीहि भिन्ना
लोकीं आहे पद्मपत्रेक्षणा ही । ब्रह्मा हीचा निर्मिता खास नाहीं ॥[1]

यांत प्रथमार्धांत एक अतिशयोक्तिभेद आहेच पण चौथ्या चरणांत ब्रह्मदेवाशीं तिच्या निर्मितीचा संबंध असतांही नाहीं असें म्हटलें आहे म्हणून हा तिसरा भेद झाला.

जो अम्बरीं उफळतां खुर लागलाहे ।[2]
तो चंद्रमा निज तनूवरि डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवलत्व नेघे ।
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥

या उदाहरणांत चंद्रावरील कलंकाचा व अश्वाच्या उफळण्याचा संबंध नसतांही तो असल्याचें सांगितलें आहे म्हणून ही चौथ्या प्रकारची अतिशयोक्ति झाली.

' सिद्धत्वेऽध्यवसायस्यातिशयोक्तिर्निगद्यते '[3]

रुय्यकाप्रमाणेंच विश्वनाथाचेंही हें अतिशयोक्तीचें सामान्य लक्षण होऊं शकत नाही. रुय्यक–विश्वनाथांनीं ' संबंध असतां नाहीं असें सांगणें ' या अतिशयोक्तिभेदाचें उदाहरण ' अस्याः सर्गविधौ '[4] हें दिलें आहे; या सर्व श्लोकांत वेदाभ्यास जड असा जो पुराणमुनि तो असलें सौंदर्य कसें निर्माण करूं शकेल असें म्हणण्यानें पुराणमुनींशीं संबंध असतां तो नाहीं असें म्हटलें आहे हें खरें; पण हिची निर्मिति ब्रह्मदेवानें केली नाहीं मग ती चन्द्रानें अगर मदनानें तर केली नसेलना ? अशा तऱ्हेचा संशय दाखविला असल्यानें अतिशयोक्त वर्णन असतांही हा संदेह अलंकारच होईल; कारण संबंध असतांही नाहीं म्हणणें यापेक्षां संशय घेणें यांतच खरें सौन्दर्य आहे. पुराणमुनि हा निर्मिता नाहींच असें न म्हणतां तो निर्माता कसा होऊं शकेल असें म्हणून तेथेंही गोड संशयच दाखविला अस-

---

१ वा. शा. केमकर ( फरकाने ) २ र. पं. नलदमयंती ३सा. द. १०'४६. ४सा. द. पान ३४.

त्यानें तें उदाहरण संदेहाचेंच होईल. व मम्मटानेंही तें संदेह अलंकाराचें म्हणून दिलें आहे.

विद्याधर हा रुय्यकाचा कट्टा अनुयायी असल्यानें रुय्यकाची व्याख्या, त्यानें केलेले पांच भेद व त्यानें अतिशयोक्तीचें दोन ठिकाणीं केलेलें विवेचन, हें त्याला सर्वस्वीं मान्य आहे. अप्पय्यदीक्षितानें अतिशयोक्तीचें सामान्य लक्षण दिलें नाहीं, एकदम भेदच सांगितले ते असेः—(१) रूपकातिशयोक्ति (२) अपह्नवातिशयोक्ति (३) भेदकातिशयोक्ति (४) संबंधातिशयोक्ति (५) असंबंधातिशयोक्ति (६) अक्रमातिशयोक्ति (७) चपलातिशयोक्ति (८) अत्यंतातिशयोक्ति.

अप्पय्यदीक्षित दुसरा भेद वर्णन करीत असतां उत्प्रेक्षापह्नुतींत इतका गुरफटून गेला कीं शेवटीं अतिशयोक्तीचा मुद्दा सुटून गेला आहे वस्तुतः त्याचे हे भेद योग्य आहेत कीं नाहीं हा प्रश्नच आहे. त्याचें रूपकातिशयोक्तीचें उदाहरण पाहातां त्यांत रूपकाचा संबंधही येत नाहीं:—

'पश्य[१] नीलोत्पलद्वंद्वान् निःसरन्ति शिताः शराः'

या त्याच्या उदहारणांत उपमानानें उपमेयाचें सर्वस्वीं निगरण केलें असल्यानें येथें रूपकाला अवसरच नाहीं.त्याचप्रमाणें 'त्वत्सूक्तिषु[२] सुधा राजन् भ्रान्ताः पश्यंति तां विधौ' हें अपह्नवातिशयोक्तीचें लक्षण दिलें असलें तरी अपह्नुतींत प्रस्तुत गोष्टीचा निह्नव शब्दांत केलेला असतो तो यांत केला नाहीं म्हणून यांत अपह्नवाचा संशयही येत नाहीं. याची भेदकातिशयोक्ति हीच मम्मटाचा 'प्रस्तुतस्य यदन्यत्वम्' हा भेद होय. याची अक्रमातिशयोक्ति म्हणजे रुय्यकाचा 'कार्यकारणभाव समकालीं असणें' हा भेद होतो. अप्पय्यदीक्षितानें चपलातिशयोक्ति हा आणखी एक भेद कां केला हें कळतच नाहीं, त्याचें उदाहरण—

'यास्यामीत्युदिते[३] तन्व्या वलयोऽभवदूर्मिका'

'मी जाणार' असें पतीनें म्हणतांच पत्नीची दुःखानें इतकी दुरवस्था झाली कीं तिची अंगठी कंकण झाली,' म्हणजे पत्नीला इतकी कृशता आली. या अर्थावरून चपलातिशयोक्ति म्हणजे त्याचीच अत्यंतातिशयोक्ति होते; व त्याची अत्यंतातिशयोक्ति म्हणजे इतरांचा कार्यकारणपौर्वापर्य-विपर्यय भेद होय. अशा रीतीनें यानें मानलेल्या आठ भेदांपैकीं पुढील भेद शिल्लक राहातातः—

(१) रुपकातिशयोक्ति हें नांव चुकीचें असलें तरी त्याच्या स्पष्टीकरणावरून तो भेद मम्मटाच्या पहिल्या भेदासारखा आहे. (२) भेदकातिशयोक्ति (३)

---

१ कु. ३७ उ. २ कु. ३८ उ ३ कु. ४३ उ.

संबंधातिशयोक्ति ( ४ ) असंबंधातिशयोक्ति ( ५ ) अक्रमातिशयोक्ति याच भेदांत चपलातिशयोक्ति व अत्यंतातिशयोक्ति हे भेद सामावतील. कारण कार्यकारण-भावाचा तुल्यकाल अगर कालविपर्यय झाला तरी तो पौर्वापर्य-विपर्ययच होय असें रुय्यकाच्या भेदचिकित्सेच्या वेळीं सांगितलेंच आहे.

अशा रीतीनें जे पांच भेद शिल्लक राहातात यांतीलही तिसरा व चौथा भेद वस्तुतः एकच मानावयास पाहिजेत. मम्मटानेंही उद्भटाचे पहिले दोन भेद असेच एकत्र केले आहेत. एकंदरींत अप्पय्यदीक्षिताचे खरे चारच भेद शिल्लक राहातात.

जगन्नाथ.—' विषयिणा विषयस्य निगरणमातिशयः तस्योक्तिः ॥ '

ही व्याख्या रुय्यक-विश्वनाथासारखीच आहे. जगन्नाथानें अतिशयोक्तीच्या भेदांबद्दल स्वतः असें कांहींच सांगितलें नाहीं. तो जुन्या-नव्यांचीं मतें मात्र देतो. त्याच्या एकंदर लिहिण्याचा झोंक असा दिसतो कीं वरीलप्रमाणें व्याख्या केल्यास भेद मानतां येणार नाहींत. अतिशयोक्तीमधील निगरण अनुग्राहक असेल तेव्हां ती अतिशयोक्ति सावयवा होईल व अनुग्राहक नसेल तेव्हां ती निरवयवा होईल असें त्यानें म्हटलें आहे.

एकंदरींत अतिशयोक्तीबद्दल मतभेद आहे पण अतिशयोक्ति काव्यांत बराच मोठा भाग व्यापते यांत शंका नाहीं. ही अतिशयोक्ति रूपक, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांत मिश्रित असतां कधीं संकर होईल तर कधीं लिहिणाराचा कल पाहून केवळ अतिशयोक्ति अगर केवळ रूपक अथवा केवळ उत्प्रेक्षा होईल. विरोध-मूलक अलंकारांत वास्तविक अतिशयोक्तीचें वर्णन यावयास नको; कारण त्यांत अभेद हीच मुख्य गोष्ट आहे. पण कार्यकारणपौर्वापर्यविपर्यय हा अतिशयोक्तीचा विरोधमूलक असा भेद मानलेला असल्यानें सबंध अतिशयोक्तीचेंच विवेचन विरोधमूलकांत केलें आहे.

याच दृष्टीनें पाहतां अभेदावर असणारी अतिशयोक्ति व विरोधावर असणारी अतिशयोक्ति या दोघींचें एक सामान्य लक्षण कसें होऊं शकेल ? अभेद म्हणजे पूर्णत्वानें ऐक्य तर विरोधांत दर्शनीं कां होईना पण ऐक्याचा अभाव असतो. असें असतांही रुय्यकानें अतिशयोक्तीचें सामान्य लक्षण केलें; व पुढील अलंकार-कोविदांनीं विशेषतः अत्यंत चिकित्सक अशा जगन्नाथानेंही तें स्वीकारलें. पण जगन्नाथाच्या चिकित्सक वृत्तीमुळेंच त्यानें अतिशयोक्तीचे भेद मानण्याचें तरी निदान टाळलें किंवा विशेष आस्था दाखविली नाहीं; कारण ते भेद व्याख्येशीं नीट सामावतां येणें शक्य झालें नसतें असें वाटतें. अतिशयो-क्तीचीं थोडीं उदाहरणें देऊन हें विवेचन पुरें करूं. असंभव गोष्टीची कल्पना करून होणारी अतिशयोक्ति:—[1]

---

[1] र. गं. ३०७

कीं, पर्वतमस्तकींचें जळ । अधोपंथें धांवे तुंबळ ।
तें परतोनि पावे मूळ । तरी हें ऐसें घडों ये ॥[1]

लोकातिसीमावर्ति वर्णनानें अतिशयोक्तिः---

तेणें महाघोष निर्घातें । शेषकूर्म अवचितें ।
गजबजोनि भूभारातें । सांडूं पाहती ॥
तेथें तिन्ही लोक डळमळित । मेरु मांदार आंदोलित ।
समुद्रजळ उसळित । कैलासवरी ॥[2]

## ५ असंगति

असंगति अलंकार वामनापर्यंत कोणी मानला नसला तरीही वामनाचा विरोध हा इतरांच्या विरोधासारखा नसून त्याच्या व्याख्येचा खरा अर्थ असंगतीसारखाच कसा होतो व त्याचीं उदाहरणेंही असंगति अलंकाराचींच कशीं होतात, हें 'विरोध' प्रकरणांत पाहिलें आहे. असंगति म्हणजे संबद्धता नसणें; व वामनानेंही 'अर्थस्य[3] विरुद्धाभासस्य' या शब्दांनीं वर्ण्य अर्थात अगर गोष्टींत विरुद्धत्वाचा किंवा असंगतीचा भास होणें असें सांगितल्यामुळें त्याची विरोधाची व्याख्या ही प्रथमावस्थेंतील असंगतीची व्याख्या असें म्हणण्यास हरकत वाटत नाहीं. रुद्रटाची व्याख्याः—

विस्पष्टे समकालं कारणमन्यत्र कार्यमन्यत्र ।
यस्यामुपलभ्येते विज्ञेयाऽसंगतिः[4] सेयम् ॥

'एकाच वेळीं, एके ठिकाणीं एक कारण स्पष्ट असतां, त्याचें कार्य दुसऱ्या ठिकाणीं दिसणें याला असंगति म्हणावें.'

मम्मटः— भिन्नदेशतयात्यन्तं कार्यकारणभूतयोः ।
युगपद्धर्मयोर्यत्र ख्यातिस्सा स्याद्[5]संगतिः ॥

ज्या अलंकारांत कार्यकारणभूत असणारे धर्म एकाच वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं दिसतात किंवा वर्णिलेले असतात तेव्हां असंगति अलंकार होतो. " ही व्याख्या रुद्रटाच्या व्याख्येसारखीच आहे.

रुय्यकः—तयोर्विभिन्न[6]देशत्वे ।

रुद्रट-मम्मटांचा 'एकाच काळीं' या अर्थी असणारा शब्द गाळून रुय्यकानें नुसतेंच कार्यकारणांचें भिन्न-देशीयत्व असणें अशी व्याख्या केली आहे.

१ मु. हरिश्चंद्रा ३·२३ २ ज्ञानेश्वरी १·५४–५५ ३ का. सू. ४·३. ४ का. लं. ९·४८
५ का. प्र. १०·१९१. ६ अ. सू. ४४.

विद्याधरः—'एषासंगतिरुक्ता हेतोः कार्यस्य भिन्नदेशत्वे' भोजानें असंगति अलंकार चित्रहेतूच्या सदरांत घातला आहे—

क्रियायाः कारणं हेतुः कारको ज्ञापकश्च सः।
अभावश्चित्रहेतुश्च चतुर्विध इहेष्यते॥
विदूरकार्यः सहजः कार्यानन्तरजस्तथा।
युक्तो न युक्त इत्येवमसङ्ख्याश्चित्रहेतवः॥

यावरून भोजाचा विदूरकार्य हा जो चित्रहेतु प्रकार तो असंगति अलंकार होईल.

विश्वनाथः—कार्यकारणयोर्भिन्नदेशतायामसङ्गतिः॥

अप्पय्यदीक्षितः—विरुद्धं भिन्नदेशत्वं कार्यहेत्वोरसंगतिः।

जगन्नाथः—विरुद्धत्वेनापाततो भासमानं हेतुकार्ययोर्वैयधिकरण्यमसंगतिः॥

जगन्नाथानें आपली व्याख्या अधिक रेखीव केली. अजून कोणीही न घातलेले 'आपाततः विरुद्धत्वेन भासमानं' हे शब्द यानें आपल्या व्याख्येंत स्वतंत्र-बुद्धीनें घातले. दर्शनीं विरुद्ध वाटणारें कार्यकारणांचें भिन्नदेशत्व म्हणजे असंगति असें जगन्नाथ म्हणतो. असंगति अलंकाराचें उदाहरणः—

अतिथी तिष्ठे दाराशीं। पायीं शीण नृपासी।
वाग्बाणीं विंधितां साधूंसी। हृदयीं दुःख नृपाच्या।

येथें दाराशीं तिष्ठावें लागल्यानें अतिथीचे पाय दुखावयास पाहिजेत पण अतिथीऐवजीं राजाचे पाय दुखतात; तसेंच साधूंना वाग्बाण लागला तर दुःख मात्र राजाच्या हृदयांत होतें. म्हणजे कारण एके ठिकाणीं व कार्य दुसऱ्या ठिकाणीं दिसतें.

विरोध, विभावना, विशेषोक्ति व असंगति यांतील फरक असा—विरोधांत सदैव निरनिराळ्या ठिकाणीं असणाऱ्या गोष्टी एके ठिकाणीं झालेल्या दिसतात. असंगतींत नेहमीं एके ठिकाणीं घडणाऱ्या अगर असणाऱ्या गोष्टी अपवाद म्हणून निरनिराळ्या ठिकाणीं दिसतात. विरोधांत कार्यकारणांत संगति असते. असंगतींत कार्यकारणभावांत आपाततः असंगति दिसते. विभावनेंत दृश्यमान कारणावांचूनही कार्य घडतें तर विशेषोक्तींत दृश्यमान अनेक कारणें असतांही फलोत्पत्ति होत नाहीं. म्हणजे विभावनेचा व्यत्यास विशेषोक्ति व विरोधाचा व्यत्यास असंगति होय.

---

१ ए. ८:३८ २ स. कं. म. ३.१६।१७५ ३ सा. द. १०.६९ ४ कु. (३७) ८५. ५ र. गं. ४३९ ६ स्वकृत.

रुय्यक म्हणतो असंगतीला अतिशयोक्तीची गरज असते व जगन्नाथ म्हणतो अतिशयोक्तीची गरज असतेच असें नाहीं; पण फलाच्या अभेदाध्यवसायाची मात्र गरज आहे.

## ६ विषम.

विषम अलंकार रुद्रटानें प्रथमतः विचारांत घेतला. विषम याचा समता नसणें असा अर्थ उघड आहे. रुद्रटाची व्याख्याः—

कार्यस्य कारणस्य च यत्र विरोधः परस्परं गुणयोः।
तद्वत्क्रिययोरथवा संजायेतेति तद्विषमम् ॥

जेव्हां कार्याच्या व कारणाच्या ( १ ) गुणांत विरोध असतो अगर ( २ ) त्याच्या क्रियेंत विरोध येतो तेव्हां विषम अलंकार होतो. ही विषमाची व्याख्या अतिशयालंकाराचे वर्गात रुद्रटानें दिली आहे. याशिवाय वास्तवालंकाराच्या वर्गांत विषमाचें सविस्तर वर्णन केलें आहे.

" विषम इति प्रथितोऽसौ वक्ता विघटयति कमपि संबंधम् ।
यत्रार्थयोरसन्तं परमतमाशङ्क्य तत्सत्वे ॥
अभिधीयते सतो वा संबन्धस्यार्थयोरनौचित्यम् ।
यत्र स विषमोऽन्योऽयं यत्रासंभाव्यभावो वा ॥

( १ )संबंध नसतांही तो आहे असें दुसऱ्याचें मत असतांना संबंध नाहीं याबद्दल दुसऱ्याच्या मताची खात्री करण्यासाठीं, दोन गोष्टींत अविद्यमान असणारा संबंध अधिक तोडणें यास विषम म्हणावें.

( २ ) दोन गोष्टींत विद्यमान असणारा संबंध अनुचित आहे असें सांगणें किंवा असंभाव्य भाव सांगण यालाही विषम म्हणावें. अशा दोन तऱ्हेच्या विषमाच्या व्याख्या रुद्रटानें केल्या आहेत. त्यांपैकीं दुसऱ्याचे चार भेद केले. ( १ ) कर्त्याला स्वल्प कार्यही करतां न येणें ( २ ) कर्त्याला महत्कार्यही करतां येणें ( ३ ) हीनबल कर्ताही कार्य करण्यास समर्थ असणें ( ४ ) कर्ता बलिष्ठ असतांही कार्याला असमर्थ असणें. हे चार भेद देऊन वास्तवालंकारांतच तिसरा विषम-भेद रुद्रटानें दिला आहे त्याची व्याख्याः—

यत्र क्रियाविपत्तेर्न भवेदेव क्रियाफलं तावत् ।
कर्तुरनर्थश्च भवेदपरमभिधीयते विषमम् ॥

कर्त्याला त्याच्या क्रियेचें फल तर मिळत नाहींच पण उलट अनर्थ मात्र त्याच्या पदरीं पडतो तेव्हां त्यास विषम म्हणतात.

---

१-२-३ का. लं. ९.४५-७.४७-७.४९. ४ का. लं. ७.५४.

अशा रीतीनें रुद्रटानें विषमाचा अतिविस्तार केला आहे. तो विस्तार जितका घटलेला पाहिजे तेवढा नसल्यामुळें मम्मटाला बरीचशी छाटाछाट करावी लागली.

मम्मटः—
क्वचिद्यदतिवैधर्म्यान्न श्लेषो घटनामियात् ।
कर्तुः क्रियाफलावाप्तिर्नैवानर्थश्च यद्भवेत् ।
गुणक्रियाभ्यां कार्यस्य कारणस्य गुणक्रिये ।
क्रमेण च विरुद्धे यत् स एष विषमो मतः ।

( १ ) अतिवैधर्म्यामुळें दोन वस्तूंत संबंध जुळणें अशक्य असें दाखविणें (२) कर्त्याला क्रियेचें फल तर नाहींच पण उलट अनर्थ प्राप्त होणें ( ३ ) कार्य हें नेहमीं कारणानुकारी असतांही त्याच्या गुणांत वैधर्म्य दिसणें ( ४ ) त्याचप्रमाणें त्याच्या क्रियेंत वैधर्म्य दिसणें याला विषम म्हणावयाचें. मम्मटाच्या या भेदांशीं रुद्रटाच्या भेदांचीं सांगड कशी बसते तें पाहूं.

अतिशयालंकारांत प्रारंभींच दिलेला रुद्रटाचा विषम पाहिला असतां त्याचे दोन भेद मम्मटाच्या तिसऱ्या व चौथ्या भेदासारखेच दिसतील. वास्तवालंकारांत दिलेल्या विषमांपैकीं पहिले दोन विषम-भेद मम्मटाच्या पहिल्या भेदांत सामावतात; रुद्रटानें त्यांचें विशेषतः त्यांतील दुसऱ्या विषमाचें जितक्या जास्त विस्तारानें वर्णन केलें आहे तितक्या विस्ताराची जरूर नाहीं. रुद्रटाचा वास्तवालंकारांतील तिसरा म्हणजेच शेवटचा विषम हा मम्मटाचा दुसरा भेद होतो.

अशा रीतीनें रुद्रटाचा अतिविस्तार मम्मटानें थोडक्यांत आपल्या विषमांत सामाविला. या भेदांचीं उदाहरणें पुढील होऊं शकतील:—

मदनशत्रुशरासन हें महा ।
मदनमूर्तिच केवळ राम हा ।
करिल सज्ज कसा धनु आपण ।
अहह ! दारुण तात तुझा पण ।

यांत मदनमूर्ति राम व मदनशत्रूचें धनुष्य या विधर्मी गोष्टींत संबंध जुळणें अशक्य असें दाखविलें आहे म्हणून हा मम्मटाच्या विषमाचा पहिला प्रकार झाला.

( २ ) त्वां परी मदपराधकारकें योजिलाचि उपकार हा मला ।
कीं तवागमन येथ जाणण्या हस्तनाश मम हेतु जाहला ॥

येथें उपकृतीचें अनर्थकारक फल हस्तनाश हें होय, तें पदरीं पडल्यानें हा दुसरा भेद झाला.

---

१ का. प्र. १०·१९४. २ वामन. ३ सा. व. वि. ४·४७.

( ३ ) कर्पूरकर्दळीचें अंतर । नखीं चिरूनी काढिती सार ।
तें शिंपितांचि वैश्वानर । अधिक आंगीं पाजळे ॥[1]

शीतोपचार हें कारण असतां त्यायोगें वैश्वानराला अधिक चेतविणें ही विरुद्ध क्रिया झाल्यामुळें क्रियावैधर्म्य दाखविणारा हा चौथा भेद झाला.

( ४ ) गोरी नंद, यशोदा गोरी, वसुदेव, देवकी, गोरा ॥
तत्सुत काळा कां तूं ? भोळे जन ठकविशी हृदयचोरा ॥[2]

'गौरत्व' हें कारण असतांही 'काळ्या' रंगाची निर्मिति दिसते म्हणून हा गुणवैधर्म्यानें तिसरा भेद झाला.

**रुय्यकः**—विरूपकार्यानर्थयोरुत्पत्तिर्विरूपसंघटना च विषमम्[3]

( १ ) कारणापासून अननुरूप कार्योत्पत्ति होणें किंवा ( २ ) अनर्थोत्पत्ति होणें व ( ३ ) अननुरूप गोष्टींचा संयोग होणें यांस विषम म्हणावें. रुय्यकानें अशा रीतीनें तीनच भेद केले आहेत. विद्याधरांत रुय्यकाचेंच अनुकरण दिसतें.

**विद्याधरः**—विषमं[4] विरूपघटना विसदृशकार्यानभीष्टयोर्जननम्

**विश्वनाथः**—गुणौ क्रिये वा यत्स्यातां विरुद्धे हेतुकार्ययोः ।
यद्वारब्धस्य वैकस्यमनर्थस्य च सम्भवः ॥
विरूपयोः संघटना या च तद्विषमं[5] मतम् ।

विश्वनाथानें मम्मटाचे चार भेद स्वीकारले. मात्र त्यांचीं नांवें देतांना त्यानें कांहीं शब्द मम्मटाचे व कांहीं रुय्यकाचे घेतले आहेत.

**अप्पय्यदीक्षितः**— विषमं[6] वर्ण्यते यत्र ( १ ) घटनाऽननुरूपयोः ।
( २ ) विरूपकार्यस्योत्पत्तिः
( ३ ) अनिष्टस्याप्यवाप्तिश्च तदिष्टार्थसमुद्यमात्
( ४ ) इष्टस्याप्राप्तिः

अप्पय्यदीक्षिताच्या या चार भेदांपैकीं तिसरा व चौथा भेद एकत्र केले तरी चालेल. म्हणजे याचे भेद वस्तुतः रुय्यकाप्रमाणें तीनच राहातात.

**जगन्नाथः**— अननुरूपसंसर्गो विषमम्[7] ।

विषमाचें सामान्य लक्षण असें फक्त जगन्नाथानेंच केलें आहे. जगन्नाथ म्हणतो कीं, या सामान्य लक्षणांत विषमाचे सर्व भेद येतील. संसर्ग दोन प्रकारचा आहे:—उत्पत्तिलक्षण व संयोगादिलक्षण. उत्पत्तिलक्षणसंसर्गाचें अयोग्यत्व म्हणजेच कारणापासून विपरीत कार्य होणें किंवा इष्ट फल न मिळतां अनर्थोत्पत्ति होणें.

---

१ मु. वनपर्व ६·५५. २ मो.. ३ अ. सू. ४५. ४ ए. ८·३८.
५ सा. द. १०·७१–७२. ६ कु. ( ३·८ ) ८८. ७ र. गं. ४५३.

संयोगलक्षणसंसर्गानें संयोगीचें अयोग्यत्व किंवा अननुरूपांचा संसर्ग असा अर्थ होतो. अशा रीतीनें पूर्वीं मानलेले गेलेले भेद तो मानतो. जगन्नाथानें इष्टफलप्राप्ति व अनिष्टफलप्राप्ति यांचे पुष्कळ भेद केले आहेत. पण एकंदरींत मुख्य भेद त्यानें तीनच मानले आहेत. विषमाला कविप्रतिभेची जोड इतर अलंकारांप्रमाणेंच आवश्यक आहे असें जगन्नाथानें म्हटलें आहे. विषमाचें उदाहरणः—

पेटीमाजि निरोधिला न सुटका ज्याला भुकेला फणि ।
तों केलें बिळ मूषकें अवचटें तो आंत गेला क्षणि ।
त्यातें भक्षुनि सर्प तत्कृतपथें निश्चिंत गेला पहा ।
ऐसें कर्म अतर्क्य यास्तव तुम्हीं कीं स्वस्थ चित्तें रहा ॥

यांत दुसऱ्या ओळींत व तिसऱ्या ओळीच्या प्रथमार्धांत विषम अलंकार साधला आहे. कर्त्याच्या क्रियेचें फल न मिळतां अनर्थ होणें हा विषमाचा दुसरा भेद व विभावना यांत फरक हा आहे कीं विभावनेंत स्पष्ट कारण नसतां कार्य घडतें व विषमांत कारणाचें सदृश कार्य तर नाहींच पण उलट जें घडतें तेंही अनर्थ-कारक असतें.

## ७ सम.



विषम अलंकाराच्या अगदीं उलट सम अलंकार आहे. सम म्हणजे योग्य गोष्ट घडणें. विषमांत सर्वच अननुरूप व अयोग्य घडतें. समांत अनुरूपांचाच संसर्ग होतो. रुद्रटापर्यंत सम अलंकार मानलेला दिसत नाहीं.

मम्मटः—समं[२] योग्यतया योगो यदि संभावितः क्वचित् ।

‘ योग्य गोष्टीशीं तदनुरूप गोष्टींचा संसर्ग येणें ’ अशी समालंकाराची व्याख्या करून मम्मटानें त्याचे दोन भेद केलेः— ( १ ) चांगल्या गोष्टींचा योग येणें ( २ ) वाईट गोष्टींचा योग येणें. वाईट गोष्टीच्या योगांतहि ‘सम समां संयोग’ च असतो. म्हणून हे दोन्हीहि समालंकाराचे भेद होतील.

रुय्यकः—- तद्विपर्ययः समम्[३]—तत् म्हणजे विषम. विषमाचा विपर्यय तो सम अलंकार होय. रुय्यकानें विषमाचे तीन भेद केले आहेत. पण त्या सर्वांचा विपर्यय केला असतां समालंकार न होतां फक्त तिसरा भेद जो अननुरूप संसर्ग त्याचा विपर्यय केला तर समालंकार होईल असें त्यानेंच सांगितलें आहे. कारण त्यानें मानलेल्या पहिल्या दोन विषम-भेदांचा विपर्यय हा अलंकारच होणार नाहीं. तिसरा मात्र सौंदर्यपूर्ण आहे. या समालंकाराचे यानें मम्मटाप्रमाणेंच दोन भेद केले आहेत.

---

१ भ. नी. २ का. प्र. १०·१९३. ३ अ. सू. ४६.

विद्याधरः—अस्य प्रथमभिदायाः सममिति कविभिर्विपर्यये कथितम् ।[1]

रुय्यकाचा तिसरा विषम भेद तो विद्याधराचा पहिला असल्यानें त्यानें 'प्रथम भिदायाः' असें म्हटलें आहे. येरवीं याच्या व्याख्येंत कांहींच फरक नाहीं.

विश्वनाथः—समं[2] स्यादानुरूप्येण श्लाघा योग्यस्य वस्तुनः ।

अप्पय्यदीक्षितः—समं[3] स्याद्वर्णनं यत्र द्वयोरप्यनुरूपयोः ।

जगन्नाथः—अनुरूपसंसर्गः समम्[4] ।

'समा'च्या व्याख्येंत मतभेद होण्यासारखें कांहीं नाहीं. विश्वनाथानें याचे भेद केले नाहींत. उलट अप्पय्यदीक्षितानें विषमाचे जेवढे जेवढे भेद केले आहेत त्यांपैकीं कोणाचाही विपर्यय झाला असतां 'सम' अलंकार होतो असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें जगन्नाथानेंही विषमाच्या विपर्ययानें समालंकाराचे विषमालंकारा-इतके भेद केले आहेतः—(१) उत्पत्तिलक्षणसंसर्ग व (२) संयोगादि संसर्ग; या दोन मुख्य भेदांपैकीं पहिल्याचे (१) कारणानुरूप कार्य घडणें (२) वस्तूशीं संसर्ग आला असतां त्या वस्तूच्या गुणासारखे गुण उत्पन्न होणें व (३) इष्ट प्राप्ति होणें असे तीन भेद झाले. मुख्य भेदांपैकीं दुसऱ्या भेदाचे उपभेद दोन होतातः (१) स्तुतिपर्यवसायी व (२) निन्दापर्यवसायी अनुरूपता असणें.

अशा रीतीनें विषमभेदांपैकीं प्रत्येकाचा विपर्यय करून सम अलंकार होईल असें जगन्नाथ म्हणतो व सर्व विषमभेदांचा विपर्यय समालंकारांत रूपांतरित होऊं शकत नाहीं असें रुय्यक म्हणतो. रुय्यकाचें हें म्हणणें जगन्नाथ खंडून टाकतो. जगन्नाथाचें म्हणणें एका अर्थी बरोबर दिसतें. जरी कारणापासून कार्य घडावयाचेंच हा नियम असला तरीही कविप्रतिमेनें त्या नेहमींच्या नीरस झालेल्या नियमालाही सरसत्व आणतां येईल. असो. आतां याचीं उदाहरणें घेऊंः—

तुझ्या[5] बहुत शोधिले अघानिधी पदांच्या रजें ।
न तें अनृत, वर्णिती बुधजनीं सदाचार जे, ।
असे सतत ऐकते, सतत बोलते मीच ते ।
प्रमाण न म्हणों जरी उचित माझिया नीचते ॥

येथें माझें असत्यवादित्व माझ्या नीचपणाला योग्यच असें म्हटल्यानें कारण-कार्याचें सारूप्य अगर सदृशत्व दिसतें म्हणून हा समालंकार झाला.

सहित[6] विजयलक्ष्मी जानकी भाज रामा ।
वरुनि प्रगट लज्जा लंघिती भूमिसीमा ।
तरुण प्रबळ चिंता रावणा माळ घाली ।
उचित समसमस्तां भूतळीं कीर्ति झाली ॥

---

१ ए. ८·३९. २ सा. द. १०·७१. ३ कु. (३९) ९१. ४ र. गं. ४४९.
५ मो. केका. ३. ६ मु. बालकांड १०२.

सम–सम तसेंच असम–असम यांचा योग आल्यानें येथें समालंकार झाला. यांत दोन्ही भेद आले आहेत. निन्दापर्यवसायी अनुरूपता असतां होणारा सम :—

निंबनिंबोळिया मोडोनि आला। तरि तो कावळ्यांसाचि सुकाळ झाला ॥[1]

सान्निध्यानें समगुण निर्माण होणें :—

पाहें पां चंदनाचेनि अंगानिळें। शिंवतले निंब होते ते जवळें॥
तिहीं निर्जीवीं देवांचीं निडळें। बैसणीं केलीं ॥[2]

जगन्नाथाच्या या भेदांत संसर्गानें त्या वस्तूचा गुण निर्माण होत असल्यानें तो तद्गुणाप्रमाणें वाटतो. अनुरूप–योग :—

ना तरी स्त्रियांमाजी स्त्रीरत्न। नरवैडूर्य नळनिधान॥
उभययोग घडे धन्य। पुण्य प्रारब्ध दोहींचें ॥[3]

## ८ विचित्र.



हा अलंकार मम्मटानें अगर तत्पूर्वी कोणी मानलेला दिसत नाहीं. रुय्यकाची व्याख्या:— ' स्वविपरीतफलनिष्पत्तये प्रयत्नो विचित्रम्[4]

" ज्या कारणाचें जें फल दिसतें तें कारण उत्पन्न करून त्याहून विपरीत फल-निष्पत्तीसाठीं प्रयत्न करणें, याला विचित्र म्हणावयाचें "जसें: —

मुक्तीसाठी मनुज करिती कर्मपाश प्रयत्नें।
शान्तीसाठीं मुनिजनमतीं धुंडिती ब्रह्म यत्नें।
लंघायातें अशुभ जलधिस्नान तीर्थी करीती।
कर्में ऐशीं अविमल भवभ्रांतिनें आदरीती ॥[5]

मुक्ति पाहिजे म्हणून मनुज कर्मपाश निर्माण करतात व त्यांपासून विपरीत फल-प्राप्ति होते असें आरंभीं त्याचप्रमाणें पुढेंही दाखविलें आहे. म्हणून हा विचित्रा-लंकार झाला.

विद्याधरः–कारणविपरीतफलोत्पत्तौ यत्नो विचित्रमित्युक्तम्[6] '

विश्वनाथः–विचित्रं तद्विरुद्धस्य कृतिरिष्टफलाय चेत्[7] '

अप्पय्यदीक्षितः–विचित्रं तत्प्रयत्नश्चेद्विपरीतः फलेच्छया।[8]

जगन्नाथः– इष्टसिद्ध्यर्थमिष्टैषिणा क्रियमाणमिष्टविपरीताचरणं विचित्रम्[9] ॥

---

१ ज्ञानेश्वरी ९·४३८. २ ज्ञानेश्वरी ९·४८४. ३ मु. वनपर्व ६·४४. ४ अ. सू. ४७.
५ लेले शा. वि. १५. ६ ए. ८·३९. ७ सा. द. १०·७२. ८ कु.( ४० ) ९३.
९ र. गं. ४५२.

हा भेद प्रथमदर्शनीं विषमाचाच असें वाटणें संभवनीय आहे. विचित्र याचा अर्थ आश्चर्यकारक, नेहमींच्या रीतीविरुद्ध असा होतो. विचित्रअलंकारांतही विपरीत पद्धति स्वीकारलेली असते. हा अलंकार व विषम यांत फरक आहे. कर्ता स्वतःच कारणाच्या विपरीत फलाची प्राप्ति इच्छीत असतो. विषमांत विपरीत फल अनिच्छेनें मिळत असतें. इच्छा व अनिच्छा या दृष्टीनेंच पाहतां हे दोन्ही अलंकार एकमेकांच्या विरुद्ध आहेत, रुय्यकानें[1] हा विचित्र निर्माण केला व तो जगन्नाथासुद्धां सर्वांनीं पुढें मान्य केलेला आहे. या अलंकारांत अगदीं निराळें असें वैशिष्ट्य असल्यानें हा विषमाचा भेद होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थः—

> नम्रपणेंच सभेंत महोन्नत, जे गुण वर्णुनिया परक्यांचे
> सांगितल्याविण दाविति कौशल सर्व जनाप्रति जे स्वगुणांचे
> स्वार्थ परार्थहि साधितिं जिंकिति शांतिचळें मुखरत्व खलांचें
> संत महाद्भुत भाजन यापरि सेवन कोण करी न तयांचें !

उन्नति होण्यास नमणें हें दर्शनीं विपरीत आहे.नमणें हें उन्नतीला कारण नसून अवनतीला कारण आहे. अवनतीचें कारण नमणें हें माहीत असतांही नमावयाचें व त्याहून विपरीत फल जें उन्नति त्याची इच्छा करावयाची याला विचित्र म्हणावयाचें. वर दिलेल्या उदाहरणांतही अशीच विचित्र पद्धति आहे.

महोन्नत होण्याचें, स्वगुणांचें कौशल्य दाखावेण्याचें व खलांचें मुखरत्व जिंकण्याचें कार्य घडण्यास कारणही त्याला नेहमीं सहचारी असणारें असेंच पाहिजे पण त्या कार्याच्या अगदीं विरुद्ध असणारें जें कार्य त्याचीं कारणें निर्माण करून आपल्याला पाहिजे असणाऱ्या कार्यफलाची इच्छा कर्ता या ठिकाणीं करीत आहे म्हणून हा विचित्र अलंकार झाला.

## ९ अधिक.

रुद्रटाचे पूर्वी[1] या अलंकाराची व्याख्या केलेली दिसत नाहीं. दण्डीनें 'अहो विशालं भूपाल'[2] हें अतिशयोक्तीचें दिलेलें उदाहरण अधिक अलंकाराचें होतें पण दण्डीनें अर्थातच त्याला 'अधिक' असें म्हटलेलें नाहीं. तो त्याला अतिशयोक्तीच म्हणतो. पुढील अलंकार-कोविदांनीं हा अलंकार निर्माण केला. रुद्रटाची व्याख्याः—

(१) यत्रान्योन्यविरुद्धं विरुद्धबलवत्क्रियाप्रसिद्धं वा।
वस्तुद्वयमेकस्माज्जायत इति तद्भवेदधिकम्[3] ॥

---

१ वामन. २ का. द. २·२१९. ३ का. लं. ९·२६·२८.

(२) यत्राधारे सुमहत्याधेयमवस्थितं तनीयोऽपि ।
अतिरिच्यते कथंचित्तदधिकमपरं परिज्ञेयम् ॥[1]

(१) एका कारणापासून परस्परविरुद्ध अशा दोन क्रिया निर्माण होणें; किंवा एका कारणापासून ज्यांच्या क्रिया परस्परविरुद्ध आहेत अशा वस्तु निर्माण होणें.

(२) आधेय लहान असूनही मोठ्या आधारावर न मावणें. अशा रीतीनें रुद्रटानें दोन अधिकाचे प्रभेद दाखविले आहेत पण यांतील पहिला अधिकाचा भेद हा इतरांच्या मतें अधिक होणार नाहीं; तो विरोधाचे सदरीं जाईल. रुद्रटाचा दुसरा अधिक भेद हा पुढील अलंकारशास्त्रज्ञांच्या अधिकाचा एक भेद होईल. कारण मम्मटानें याच्या एका भेदाचाच व्यत्यास करून एक दुसरा भेद मानला आहे. मम्मटाची व्याख्याः

महतोर्यन्महीयांसावाश्रिताश्रययोः क्रमात् ।
आश्रयाश्रयिणौ स्यातां तनुत्वेऽप्यधिकं[2] तु तत् ॥

(१) आश्रयि मोठा असूनही लहान आश्रयांत राहणें.
(२) आश्रयि लहान असूनही मोठ्या आश्रयांत न राहणें.
या दोन्ही भेदांचीं उदाहरणें अशीं होतीलः—

नृपदर्शनें[3] मुनिवरास जाहला। बहु मोद तो न जठरांत मावला ।
जरि यामिनी-चर-वधार्थ सेविला । उद-राशि सर्व उदरांत राहिला ॥

आश्रयि लहान असूनही आश्रयांत मावूं शकला नाहीं असें पहिल्या ओळींत दाखविलें व दुसऱ्या ओळींत अगस्तिमुनीचे जठर लहान असतां आश्रयि जो समुद्र तो त्याहून मोठा असतांही त्यांत राहिला असें दाखविलें आहे. हीं दोन्हीं भेदांचीं उदाहरणें झालीं. रुय्यकानें मम्मटाची व्याख्या घटवून अगदीं थोडक्यांत मांडिली,

आश्रयाश्रयिणोरननुरूप्यमधिकम्[4]

आश्रय व आश्रयि हीं एकमेकांना अनुरूप नसलीं म्हणजे अधिक अलंकार होतो. हें अननुरूपत्व आश्रय लहान व आश्रयि मोठा किंवा आश्रय मोठा व आश्रयि लहान असण्यानेंही असूं शकेल म्हणून यांचें अननुरूप्य म्हणण्यांत मम्मटाचे दोन्हीं भेद आले.

विद्याधरः—अधिकमिदं[5] गदितं तद्यत्राननुरूपताश्रयाश्रयिणोः ।

विश्वनाथः—आश्रयाश्रयिणोरेकस्याधिक्येऽधिकमुच्यते[6] ।

अप्पय्यदीक्षितः—अधिकं[7] पृथुलाधारादाधेयाधिक्यवर्णनम् ॥
पृथ्वाधेयाद्यदाधाराधिक्यं तदपि तन्मतम् ॥

१ का. लं. ९·२६·२८. २ का. प्र. १०·१९६. ३ सा. च. वि. ५·५४. ४ अ. सू. ४८.
५ ए. ८·४०. ६ सा. द. १०·७२. ७ कु. (४१) ९४.

अप्पय्यदीक्षितानें इतरांप्रमाणेंच अधिकालंकार मानला आहे; पण अधिकानंतर 'अल्प' अलंकार त्यानें दिला आहे तो असा—

अल्पं[1] तु सूक्ष्मादाधेयाद्यदाधारस्य सूक्ष्मता ।

'सूक्ष्म आधेयापेक्षां आधार फारच सूक्ष्म असणें.' वस्तुतः ही नुसती व्याख्या पाहिली तर त्यांत आधेयापेक्षां आधार लहान असणें हेंच मुख्य तत्त्व आहे. केवळ सूक्ष्मतेवरून तो निराळा अलंकार मानणें योग्य होणार नाहीं. केवळ व्याख्या पाहातां तो 'अधिक' अलंकार होत आहे. पण उदाहरण पाहतां त्या अलंकारांत अतिशयोक्तीच दिसते. त्यानें 'अल्पा'चें दिलेलें उदाहरणः—

यन्मध्यदेशादपि[2] ते सूक्ष्मं लोलाक्षि दृश्यते ।
मृणालसूत्रमपि ते न समाति स्तनांतरे ॥

अजूनपर्यंतचीं उदाहरणें पाहतां आधेय म्हणजे आधाराचे आंत जाऊन राहणारें असा अर्थ दिसतो. पण अप्पय्यदीक्षितानें आधेयाचा अर्थ निराळा केला आहे. हातांत कंकण असणें यांत कंकणाला हाताचा आधार आहे. घरांत मनुष्य असणें यांत मनुष्याला घराचा आधार आहे. पण हाताच्या आधारावर असणारें आधेय जें कंकण तें आधाराबाहेर असतें व घरांत असणारें आधेय जें मनुष्य तें आधाराच्या आंत असतें. अलंकारांत तरी निदान दोन्ही प्रकारांना आधार गणलें जात नाहीं. सरळ अर्थ पाहतां तसा आहे यांत संशय नाही. पण घरांत मनुष्य असणें यांत जो आधाराधेयाचा संबंध तोच अलंकारशास्त्रांत घेणें इष्ट आहे. थोडक्यांत म्हणजे आधाराचे आंत आधेय पूर्णपणें अगर अव्यापकत्वानें जाऊन राहणें हाच आधार व आधेय यांतील संबंध आहे. या दृष्टीनें पाहतां अप्पय्यदीक्षिताच्या अल्पालंकाराच्या उदाहरणांत अतिशयोक्ति आहे. आधाराधेय संबंध नाहीं, ह्मणून उदाहरणाकडे पाहतां त्याची व्याख्या अतिशयोक्तींत जाणें बरोबर होईल नुसतीच व्याख्या पाहिली असतां मात्र ती 'अधिक' अलंकारांत समाविष्ट होत आहे. कोणत्याही दृष्टीनें 'अल्प' अलंकार स्वतंत्र राहूं शकत नाहीं.

जगन्नाथः— आधाराधेययोरन्यतरस्यातिविस्तृतत्वासिद्धिफलकमितरस्यातिन्यूनत्वकल्पनम्[3] ॥

एकंदरींत सर्व व्याख्या पाहिल्या असतां सर्व व्याख्यांतून 'अधिका' चा एकच अर्थ निर्माण होत आहे. हा अलंकार आश्रय व आश्रयि यांच्या विरोधामुळें विरोधमूलक अलंकारांचे वर्गांत घातला आहे.

---

१ कु. (४२) ९५. २ कु. पान १३७. ३ र. गं. ४५३.

## १० अन्योन्य.

अन्योन्य अलंकारांत एकमेकांनीं एकमेकांस सहाय्य करणें अशी स्थिति वर्णि-लेली असते. रुद्रटानें याची केलेली व्याख्या अशी—

यत्र परस्परमेकः कारकभावोऽभिधेययोः क्रियया ।
संजायेत स्फारिततत्त्वविशेषस्तदन्योन्यम्[1] ॥

विशिष्टधर्माच्या परिपोषाकरितां, दोन वर्ण्य वस्तू, एकमेकांवर क्रिया करतात तेव्हां अन्योन्य होतो. रुद्रटानें ' कारकभाव ' वगैरे शब्दांनीं अवडंबर केलें आहे मम्मटानें त्याचेंच म्हणणें थोडक्यांत मांडलें:—

' क्रियया तु परस्परं वस्तुनोर्जननेऽन्योन्यम्[2] '

यांतील ' जनने ' याचा अर्थ ' उत्पत्ति ' म्हणजे सौंदर्योत्पत्ति असा घ्यावयाचा. " दोन गोष्टी परस्पर सौंदर्य वाढविणाऱ्या असणें यास अन्योन्य म्हणावें. "

रुय्यकः—परस्परं क्रियाजननेऽन्योन्यम्[3] ।
विद्याधरः—भवति क्रियोपजननं यद्यन्योन्यं तदन्योन्यम्[4] ।
विश्वनाथः—अन्योन्यम्[5]उभयोरेकक्रियायाः करणं मिथः ।
अप्पय्यदीक्षितः—अन्योन्यं[6]नाम यत्र स्यादुपकारः परस्परम् ॥
जगन्नाथः—द्वयोरन्योन्येनान्योन्यस्य विशेषाधानमन्योन्यम्[7]

रुद्रटानें घातलेलें ' स्फारिततत्त्वविशेष ' हें पद मम्मटानें गम्य ठेविलें व तें अप्प-य्यदीक्षितापर्यंत गम्य राहिलें. जगन्नाथानें पुनः स्पष्टपणें ' विशेषाधान ' असें म्हटलें. व त्यानें आपल्या अन्योन्याचे दोन भेद केले ( १ ) क्रियेनें उपकारी होणें अगर ( २ ) गुणांनीं उपकारी होणें. अन्योन्याचें उदाहरण—

जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगाचि होय लेणें ।
तेथ अलंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना[8] ॥

## ११ विशेष.

या अलंकाराचा वामनापर्यंत जन्म झालेला दिसत नाहीं. रुद्रट या अलंका-राची व्याख्या करतो ती अशी:—

किंचिदवश्याधेयं यस्मिन्नभिधीयते निराधारम् ।
तादृगुपलभ्यमानं विज्ञेयोऽसौ विशेष[9] इति ॥

---

१ का. लं. ७·८९. २ का. प्र. १०·१८७. ३ अ. सू. ४९. ४ ए. ८·४०.
५ सा. द. १०·७३. ६ कु. (४३) ९७. ७ र. गं. ४५५. ८ ज्ञानेश्वरी १०·४४.
९ का. लं. ९·४५.

आश्रय आवश्यक असणारी गोष्ट जेव्हां निराधार स्थितींतही राहूं शकते असें वर्णन असेल तेव्हां तेथें विशेषालंकार होतो. याशिवाय आणखी दोन भेद केले आहेतः—( २ ) जेव्हां पुष्कळ आधारांवर एक वस्तु एकाच वेळीं असते ( ३ ) जेव्हां एक गोष्ट करीत असतां त्याच वेळीं दुसरी अशक्य अशी गोष्ट केली जाते तेव्हां विशेषालंकार होतो. अशा रीतीनें रुद्रटानें तीन स्थितींत विशेषाचा संभव सांगितला.

वरील भेदांपैकीं दुसऱ्या भेदांत व पर्याय अलंकारांत फरक असा आहे कीं, पर्यायांत एक वस्तु एका ठिकाणाहून जाऊन दुसरे ठिकाणीं राहाते तेथून पुनः तिसऱ्या स्थानीं जाते अशा तऱ्हेनें क्रमानें आधार पालटते. विशेषांत एकच वस्तु एकाच वेळीं अनेक ठिकाणीं असते. परिवृत्तींत विनिमय असतो विशेषांत तो नसतो. म्हणून विशेष अलंकार हा परिवृत्ति व पर्याय यांहून भिन्न आहे. रुद्रटाच्या पहिल्या भेदांत मम्मटानें फरक केला आहे तो म्हणजे रुद्रटानें प्रसिद्ध आधार हे शब्द घातलेले नाहींत ते यानें घातले. बाकी याचे विशेषाचे भेद रुद्रटासारखेच आहेत.

रुय्यकः—अनाधारमाधेयमेकमनेकगोचरमशक्यवस्त्वन्तरकरणं च विशेषः[1] ॥

विद्याधरः—आधेयमनधिकरणं युगपद्यद्येकमप्यनेकत्र ।
यदसंभावितवस्त्वन्तरकरणं च त्रिधा विशेषोऽसौ[2] ॥

विश्वनाथः—यदाधेयमनाधारमेकं चानेकगोचरम् ।
किंचित्प्रकुर्वतः कार्यमशक्यस्येतरस्य वा ।
कार्यस्य करणं दैवाद्विशेषस्त्रिविधस्ततः[3] ॥

अप्पय्यदीक्षितः—विशेषः[4] ख्यातमाधारं विनाऽप्याधेयवर्णनम्
विशेषः सोऽपि यद्येकं वस्त्वनेकत्र वर्ण्यते
किंचिदारंभतोशक्यवस्त्वन्तरकृतिश्च सः ॥

जगन्नाथः—प्रसिद्धमाश्रयं विना आधेयं वर्ण्यमानमेको विशेषप्रकारः[5] ।

यच्चैकमाधेयं परिमितयत्किंचिदाधारगतमपि युगपदनेकाधारगततया वर्ण्यते सोऽपरो विशेषप्रकारः ॥

विशेषाचें सामान्य लक्षण रुद्रटापासून तों जगन्नाथापर्यंत कोणींच दिलेलें नाहीं. जगन्नाथाशिवाय सर्वांनीं विशेषाचे तीन भेद मानले आहेत; जगन्नाथ दोनच मानतो. त्याला अशक्य वस्तुकरणाचा भेद मान्य नाहीं. तो म्हणतो, जोंपर्यंत विशेषाचें सामान्य लक्षण केलें नाहीं तोंपर्यंत पहिल्या दोन भेदांच्या जोडीला आधाराधेयाशीं संबंध नसणारा हा अलंकारभेद कसा येऊं

---

१ अ. सू. ५०. २ ए. ८·४१. ३ सा. द. १०·७४. ४ कु. (४४) ९८. ५ र. गं. ४५६

शकेल ! हा भेद निदर्शनेचा मानावा असें त्याचें मत आहे. अप्पय्य-दीक्षितानें आधारावांचून आधेय असणें याचें उदाहरण 'कमलमनम्भसि कमले कुवलये च तानि कनकलतिकायाम्' हें दिलें आहे. हें उदाहरण मम्मटानें अतिशयोक्तीचें दिलें आहे व वास्तविक तें अतिशयोक्तीचेंच आहे. कारण विशेषांत वस्तु निराधार राहते व 'कमलमनम्भसि' या उदाहरणांत कमलाकडून मुखाचें निगरण हेंच मुख्य आहे. त्या निगरणामुळेंच अधिक मनोहरत्व आलें आहे. अर्थात् विशेषाला अतिशयोक्तीची जोड पाहिजे असें मम्मटानें म्हटलें आहे, तरी अतिशयोक्ति मुख्य असतां विशेषाला महत्त्व नाहीं. विशेषाचीं उदाहरणें:—

तें[२] पहांटेंविण पहावित । अमृतेंवीण जीववित ।
योगें वीण दावित । कैवल्य डोळां ॥
कहीं[३] एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठाचि
केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धवळिलें विश्व ॥

हें तिसऱ्या विशेषभेदाचें उदाहरण होईल.

( २ ) गगनभुवनआपीं[४] राम चैतन्यरूपी, ।
दहनपवनतापीं वीर राम प्रतापी; ॥
गिरिवर–तरुवल्ली रामजाळ्या छळाया ।
दशमुख बळहीना ठाव नाहीं पळाया ॥

या उदाहरणांत एकच राम अनेक ठिकाणीं एकाच वेळीं दृग्गोचर होत असल्यानें हा दुसरा विषमभेद झाला.

चक्रवाकीच्यां[५] आर्तीकारण । उदय पावे सहस्र किरण ।
त्रैलोक्याचें तमहरण । तया योगें होतसे ॥

## १२ व्याघात.

व्याघात म्हणजे तडाखा, भंग, अडथळा असा अर्थ होतो. प्रथमतः रुद्रटानें व्याघाताची व्याख्या केली ती अशीः—

अन्यैरप्रतिहतमपि कारणमुत्पादनं न कार्यस्य ।
यस्मिन्नभिधीयेत व्याघातः[६] स इति विज्ञेयः ॥

इतर कारणांनीं प्रतिबंध केला नसतांही कारण कार्योत्पादन करीत नाहीं असें सांगतात तेव्हां व्याघात अलंकार होतो. म्हणजे इतर कारणें विरोध

१ कु. पान. १३८ २ ज्ञा. ९·१०१. ३ ज्ञा. ९·१०२ ४ मु. रामायण–युद्धकांड. २७८.
५ नि. मा. उ. १·४७ ( फरकानें. ६ का. लं. ९·५२

करीत नसतांही उलट कार्य निर्माण करतात तरीही त्या कारणाकडून कार्यनिर्मीति होत नाहीं. रुद्रटाची व्याख्या मम्मटानें बदलून स्पष्ट शब्दांत मांडली.

मम्मटः— यद्यथा साधितं केनाप्यपरेण तदन्यथा ।
तथैव यद्विधीयेत स व्याघात इति स्मृतः ॥[1]

रुय्यकः— (१) यथा साधितस्य तथैवान्येनान्यथाकरणं व्याघातः[2]
(२) सौकर्येण कार्यविरुद्धक्रिया च ।

रुय्यकानें रुद्रट-मम्मटापेक्षां निराळाच व्याघातभेद दुसऱ्या सूत्रांत सांगितला आहे:–" विशिष्ट कार्याचें उत्पादक जें कारणविशेष तेंच विरुद्ध कार्यनिष्पत्ति अत्यंत सुकरत्वानें करील तेव्हां व्याघात होतो. " असें तो म्हणतो.

विद्याधरः—सौकर्येण निबद्धा[3] कार्यनिबद्धा क्रिया भवेद्यत्र ।
ख्यातोऽभिमतव्याहतिहेतुर्व्याघात एषोऽपि ॥

रुय्यकानें एकदां दोन भेद केल्यावर ते व्याघात-भेद अप्पय्यदीक्षितापर्यंत सर्वांनीं मान्य केले.

विश्वनाथः—व्याघातः[4] स तु केनापि वस्तु येन यथा कृतम्
तेनैव चेदुपायेन कुरुतेऽन्यस्तदन्यथा ॥
सौकर्येण च कार्यस्य विरुद्धं क्रियते यदि ॥

अप्पय्यदीक्षितः—स्याद्व्याघातो[5]ऽन्यथाकारि तथाकारि क्रियेत चेत् ।
सौकर्येण निबद्धाऽपि क्रिया कार्यविरोधिनी ॥

जगन्नाथः—यत्र ह्येकेन कर्त्रा येन कारणेन कार्यं किंचिन्निष्पादितं निष्पिपादयिषितं वा तदन्येन कर्त्रा तेनैव कारणेन तद्विरुद्धकार्यस्य निष्पादनेन निष्पिपादयिषया वा व्याहन्यते स व्याघातः[6] ॥

मम्मट, रुद्रट व जगन्नाथ व्याघाताचे भेद करीत नाहींत. जगन्नाथाचें मत व्याघाताला अनुकूल नाहीं असें दिसतें. खरें पाहिलें असतां हा कारणापासून विरोधी कार्योत्पत्ति सांगणाऱ्या 'विषमा'चाच भेद मानण्यास हरकत नाहीं. दोहोंत फरक एवढाच राहातो कीं यांत कारण एकच असून दोन कर्ते दोन निरनिराळीं विरोधी फलें निर्माण करतात किंवा विरोधी कार्यनिष्पत्ति सुकरत्वानें होते. यावरून या व्याघातांत विषमताच दिसत असल्यानें स्वतंत्रपणें हा अलंकार न मानतां विषमाचा भेद म्हणून मानावा. व्याघाताचें उदाहरणः—

तोडी दीनतरूंना दुर्जन--गण तो सदैव वचनांहीं ।
वचनांनींच सतांच्या पल्लव फुटती तयास बा पाही ॥[7]

---

१ का. प्र. १०·२०६ २ अ. सू. ५२ ३ ए. ८·४३ ४ सा. द. १०·७५-७६.
५ कु. (४५) १०१ ६ र. गं. ४५९. ७ गोरे अ. चं.

येथपर्यंत विरोधमूलक अलंकारांचा विचार झाला. त्यांत असें दिसून येईल कीं हा विरोध केवळ कविप्रतिभाजन्य असतो. अन्योन्य व सम या अलंकारांत वास्तविक विरोध कांहींच नाहीं. ते विषमाचे विपर्यास आहेत. विषम हा विरोधमूलक आहे अर्थात अन्योन्य व सम यांत विरोध नसतां केवळ विषमविरोधी म्हणून त्यांना विरोधमूलकांत घालणें योग्य नाहीं. या दृष्टीनें विरोधमूलक वगैरे सारखीं सदरें पाडण्यानें अतिशयोक्तीसारख्या अलंकारांची फारच ओढाताण होते.

---

# प्रकरण ११ वें

## गूढार्थप्रतीतिमूल अलंकार

### १ सूक्ष्म.

१. येथपर्यंत विरोधगर्भ, शृंखलाबन्ध, तर्कन्यायमूल, वाक्यन्यायमूल, लोकन्यायमूल एवढ्या अलंकारांचा सामान्यतः विचार झाला. आतां गूढार्थप्रतीतिमूल अलंकार विचारांत घ्यावयाचे आहेत. गूढ अर्थ ज्यांत प्रगट झालेला दिसतो ते गूढार्थप्रतीतिमूल अलंकार होत. त्यांपैकीं प्रथमतः सूक्ष्म अलंकार आपण विवेचनासाठीं घेऊं.

हेतु, सूक्ष्म व लेश यांत वक्रोक्ति--अतिशयोक्ति नसल्यामुळें भामह ते अलंकार मानीत नाहीं. उलटपक्षीं दण्डी ह्या अलंकारांना 'वाचामुत्तमभूषणम्' म्हणणारा आहे. त्यानें केलेली सूक्ष्माची व्याख्याः--

इङ्गिताकारलक्ष्योऽर्थः सौक्ष्मात् सूक्ष्म इति स्मृतः।[1]

'निरनिराळ्या अंगविक्षेपांनीं अगर चेष्टांनीं मनोविकार द्योतित होणें; किंवा आकारानें ह्मणजे मुखावरील विकारांनीं मनांतील विचार प्रकट होणें, यास सूक्ष्म म्हणावयाचें. दण्डीनंतर उद्भटानें अगर वामनानें हा अलंकार मानलेला नाहीं.

रुद्रटः—यत्रायुक्तिमदर्थो गमयति शब्दो निजार्थसंबद्धम्।
अर्थान्तरमुपपत्तिमदिति तत्संजायते सूक्ष्मम्[2] ॥

२. रुद्रटाची व्याख्या दण्डीच्या व्याख्येहून अगदींच भिन्न आहेसें दिसतें. जेव्हां दिसण्यांत सामान्य असतांही एकादा शब्द स्वतःच्या अर्थाशीं संबद्ध, उपपत्तिमान असा निराळाच अर्थ उत्पन्न करतो अगर जाणवितो तेव्हां सूक्ष्म अलंकार होतो. दण्डी हा इंगिताकाराला महत्त्व देतो व रुद्रट शब्दाला महत्त्व देतो. इंगितांनीं आंतील अर्थ बाहेर कळणें व शब्दांनीं स्वतःच्या सामान्यार्थाहून निराळा अर्थ निर्माण करणें यांत भेद आहे. रुद्रट हा काश्मीरवासी आहे. "काश्मीरवासीयांचा हेतु, सूक्ष्म वगैरे अलंकार न मानण्याकडे कल आहे." रुद्रटानें हा अलंकार मानला आहे. पण याचा सूक्ष्म व इतरांचा सूक्ष्म एक नसून रुद्रटाचा भाव तो इतरांचा सूक्ष्म आहे म्हणून त्याची भाव अलंकाराची व्याख्या पाहूं:—

---

१ का. द. २.२६०    २ का. लं. ७.९८

यस्य विकारः प्रभवन्नप्रतिबद्धेन हेतुना येन ।
गमयति तदभिप्रायं तत्प्रतिबंधे च भावोऽसौ ॥[1]

" एकाद्यानें विकार-प्रतिबंध केला असतांही अप्रतिबद्ध हेतूमुळें विकाराचा कार्यकारणभाव दुसरा मनुष्य आळखतो तेव्हां त्याला भाव म्हणावयाचें " हा एक भेद झाला. अभिधेयमभिदधानं तदेव तदसदृश सकलगुणदोषम् ।
अर्थान्तरमवगमयति यद्वाक्यं सोऽपरो भावः ॥[2]

बोललेलें अगर बोललें जाणारें वाक्य सर्व गुणदोष दर्शविणारा निराळाच अर्थ उत्पन्न करतें तेव्हां त्याला 'भाव म्हणावयाचें.' रुद्रटानें या भावभेदाचें उदाहरण दिलें आहे तें असें:—

एकाकिनी यदबला तरुणी तथाहम् ।
अस्मिन् गृहे गृहपतिश्च गतो विदेशम् ।
किं याचसे तदिह वासमियं वराकी ।
श्वश्रूर्ममान्धबधिरा ननु मूढ पान्थ ॥[3]

हेंच उदाहरण रुय्यकानें उत्तरालंकाराचें दिलें आहे. विश्वनाथानें हेंच जरी नाहीं तरी रुय्यकाच्या उदाहरणांप्रमाणेंच जवळ जवळ अर्थ असणारें असें उदाहरण दिलें:— वीक्षितुं न क्षमा श्वश्रूः स्वामी दूरतरं गतः ।
अहमेकाकिनी बाला तवेह वसतिः कुतः ॥[4]

आतां प्रश्न असा येतो कीं, 'उत्तरं प्रश्नस्योत्तरादुन्नयो यदि'[5] हें उत्तराचें लक्षण असतां वरील उदाहरणांत केवळ प्रश्नाचा उन्नयच करण्यांत सौंदर्य आहे कीं 'मी एकटी आहे; अबला आहे, तरुणी आहे; माझे पति येथें नाहींत, माझी सासू अंधबधिरा आहे, तर तुझाच आधार गुपचूपपणें तूं मला दे' असा व्यंजनेनें अर्थ काढण्यांत सौंदर्य आहे ? दुसरा अर्थच अधिक युक्त आहे व त्या अर्थाचा स्वीकार केला तर तरुणी अबला व मूढ पान्थ या शब्दांची व्यंजनेनें संगति लागते. या दृष्टीनें या उदाहरणांत उत्तर अलंकारापेक्षां व्यंजनेनें हा अर्थ दर्शविणारा निराळाच अलंकार मानणें युक्त होईल व तो अलंकार म्हणजे रुद्रटाच्या भावालंकाराचा दुसरा भेद होय.

एरवीं विश्वनाथानें रुय्यकाचीं उदाहरणें जशींचीं तशींच घेतलीं असतां 'एकाकिनी' हेंच उदाहरण स्वशब्दांत करण्याचें कारणही हेंच असावें. तें उदाहरण निर्माण करतांना त्यानें व्यंजनेनें निराळा अर्थ निर्माण करणारीं 'तरुणी' 'अबला' हीं पदें काढून त्यांतील व्यंजकता अगदीं लंगडी केल्यानें तेथें

---

१ का. लं. ७·३६. २ का. लं. ७·३८. ३ का. लं. ७·३९. ४ सा. द. १०·५५ पान.
५ अ. सू. ८५.

उत्तराला प्राधान्य मिळूं लागतें व यामुळें विश्वनाथाचें उदाहरण मात्र बरोबर उत्तराचेंच होत आहे.

३. आतां सूक्ष्माची सर्वांची व्याख्या पाहतां रुद्रटाचा 'भावा' चा पहिला भेद जरी 'सूक्ष्म' होत असला तरी दुसरा भेद सूक्ष्म अलंकारांत मोडतां येत नाहीं, कारण त्यांत इंगिताकाराला महत्त्व नाहीं व इतर सर्वांनीं त्याच गोष्टीला महत्त्व दिलें आहे. रुद्रटाच्या भावालंकाराचा दुसरा भेद व त्याचाच सूक्ष्म अलंकार यांत फारसा भेद नाहीं. पण उदाहरणें पाहातां भावभेदाच्या उदाहरणांत व्यंजनेला जरा अधिक महत्त्व आहे असें दिसतें. रा. काणे म्हणतात, " Some of the figures defined by रुद्रट are not admitted as अलंकार ' s by other writers. हेतु ( defined as हेतुमता सह हेतोरभिधानमभेदकृद्भवेद्यत्र' ७.८२ ) is said by मम्मट to be no alamkara at all. रुद्रट defined भाव ( with two well-known varieties 7.38 & 36 ) and gives two varieties &c."आतां हा भाव अलंकार 'भाव' या नांवानेंच जरी ओळखला नसला तरी 'सूक्ष्म' हा इतरांनीं मानलेला अलंकार तोच रुद्रटाचा पहिला भावभेद म्हणण्यास हरकत नाहीं. या पहिल्या भेदाचें 'ग्रामतरुणम्[१]' हें उदाहरण मम्मटानें व्यंजनेचें उदाहरण म्हणून घेतलें आहे. रुद्रटाच्या दुसऱ्या भेदांतील व्यंजनेला रजा दिली तर तो रुय्यकाचा 'उत्तर' होईल. इतरांनीं 'भाव' हा अर्थालंकार न माननां त्याचें विवेचन रस प्रकरणांत केलें आहे. रुद्रटाचा सूक्ष्म व दुसरा भावभेद हा त्यांच्या 'भाव' सदरांत जाईल असें वाटतें.

४. मम्मटः—कुतोऽपि लक्षितः सूक्ष्मोऽप्यर्थोऽन्यस्मै प्रकाश्यते ।
धर्मेण केनचिद्यत्र तत्सूक्ष्मं परिचक्षते[२] ॥

येथें 'कुतोऽपि' म्हणजे 'इंगिताकारात्' असा अर्थ होतोच पण 'कुतोऽपि' म्हणजे 'इंगिताकार अथवा शब्द' असाही अर्थ होईल. शब्दापासून ज्ञापक हेतूनें लक्षिलेला अर्थ तो सूक्ष्म, किंवा इंगिताकारावरून ओळखिलेला अर्थ तो सूक्ष्म. पण उदाहरणांवरून 'कुतोऽपि' याचा अर्थ 'इंगिताकारात्' असाच असावा असें दिसतें. म्हणजे " कायाचेष्टा अगर मुखावरील विकार यांनीं लक्षिलेल्या भावना दुसऱ्याला कोणत्याही धर्मानें कळविल्या असतां सूक्ष्मालंकार होतो. " वास्तविक मम्मटाची ही व्याख्या दण्डीचीच सुधारलेली आवृत्ति होय. 'अन्यस्मै प्रकाश्यते' 'केनचित् धर्मेण' हे सूक्ष्मांत आवश्यक असणारे शब्द किंवा यासारखेच दुसरे शब्द दण्डीच्या व्याख्येंत नाहींत. मनांतील भावना दुसऱ्याला कळविणें व त्याही विशिष्ट धर्मानें कळविणें हाच सूक्ष्मांत विशेष

१ का. लं. ७.३७. २ का. प्र. १८९.

असल्यानें व दण्डीच्या व्याख्येंत हा विशेष स्पष्ट न केल्यानें राहिलेला कमीपणा मम्मटानें नाहींसा केला. मम्मटाचाच अर्थ पुढें सर्वांनीं मान्य केला आहे.

रुय्यकः—' संलक्षितसूक्ष्मार्थप्रकाशनं सूक्ष्मम् '[1]

विद्याधरः—' संलक्षितसूक्ष्मार्थस्य प्रकाशनं सूक्ष्मम् ।[2]

विश्वनाथः—संलक्षितस्तु सूक्ष्मोऽर्थ आकारेणेङ्गितेन वा ।
कयापि सूच्यते भङ्ग्या यत्र सूक्ष्मं तदुच्यते ॥[3]

याच्या व्याख्येंतील ' कयापि भङ्ग्या ' हे शब्द मम्मटाच्या पेक्षां अधिक चांगले घातले आहेत. मम्मटानें ' केनचित् धर्मेण ' असें म्हटलें आहे तरी विश्वनाथाच्या त्या शब्दांनीं सूक्ष्मार्थ घेणाराची तीव्र बुद्धि दिसते.

अप्पय्यदीक्षितः—सूक्ष्मं पराशयाभिज्ञे तरसाकूतचेष्टितम् ।[4]

५. अप्पय्यदीक्षिताची व्याख्या जरा निराळी आहे. 'दुसऱ्याचा आशय जाणून त्याला[5] उत्तर म्हणून केलेल्या ज्या चेष्टा त्या चेष्टांवरून दुसऱ्याला सूक्ष्मपणें उत्तर मिळतें म्हणून तो सूक्ष्म अलंकार होय.' याच्या व्याख्येंत व एका उदाहरणांत किंचित् फरक असला तरी दुसरें उदाहरण यानें इतरांचेंच घेतलें आहे. अप्पय्यदीक्षितानें व्याख्येंत ' पराशया ' हा शब्द विनाकारण घालून सूक्ष्माचे दोन भेद अलंकार म्हणून मानले आहेत पण त्या दोन्ही अलंकारांचीं उदाहरणें सूक्ष्माचींच होतात. त्यानें ' मयि[6] पश्यति सा केशैः सीमन्तमणिमावृणोत् ' हें सूक्ष्माचें उदाहरण दिलें आहे व कामुक पुरुषाच्या प्रश्नात्मक अवलोकनाला तिनें चेष्टात्मक उत्तर दिलें असें त्याचें विवेचन केलें. पण चेष्टांनीं उत्तर देणें म्हणजेच प्रश्न उन्नीत करणें असा अर्थ होतो. म्हणजे हें प्रश्नोत्तरच होतें. व त्यामुळें उदाहरणाला उत्तरालंकाराची छटा येते. म्हणून अजूनपर्यंत सूक्ष्म या अलंकारानें होणारा अर्थ अप्पय्यदीक्षितानें थोडा पालटला. पण याच सूक्ष्माचें ' संकेतकाल० '[7] हें त्यानें दिलेलें उदाहरण इतरांच्या मतेंही सूक्ष्माचेंच होईल. सूक्ष्मासारखाच पण रेखामात्र फरकानें निराळा मानलेला अप्पय्यदीक्षिताचा पिहितालंकार असाः—

पिहितं परवृत्तान्तज्ञातुः साकतचेष्टितम् ।

वास्तविक ' पराशयाभिज्ञे ' हें ' सूक्ष्मा'तील पद व ' परवृत्तान्तज्ञातुः ' हें ' पिहिता'तील पद यांत ' आशय ' व ' वृत्तांत ' हाच फरक राहातो. पिहिताचें उदाहरण तर सूक्ष्माचेंच आहेः— ' प्रिये गृहागते प्रातः कान्ता तल्पमकल्पयत् ' या उदाहरणांत ' सपत्नीच्या गृहीं तूं जागला आहेस ' हा सूक्ष्मार्थ प्रकट होत आहे. यांत मनोविकार चेष्टांनीं पतीला प्रगट होत आहेत. अप्पय्यदीक्षितानें ' वक्त्रस्यन्दि०'[8] हें इतरांचें सूक्ष्माचें उदाहरण आपल्या

---

१ अ. सू. ७५ २ ए. ८.६१ ३ सा. द. १०.९१-९२. ४ कु. १४९. ५ कु. ८४.
६ कु. ( ८५ ) १५०. ७ कु. १५० उ. ८ कु. पान १८९.

पिहिताचें दिलें आहे. यावरून इतरांचा सूक्ष्म तोच ह्याचा पिहित असें म्हणण्यास बळकटी येते. याचा 'पिहित' व 'सूक्ष्म' हे दोन्ही 'सूक्ष्म' च होतात. रुय्यकाचें 'एकाकिनी०' हें उदाहरण वस्तुतः सूक्ष्माचें असून त्यानें तें उत्तराचें म्हणून दिलें आहे. त्याचेंच अनुकरण पुढें दोघांनीं केलें. अप्पय्यदीक्षिताला तें उदाहरण उत्तराचें न वाटल्यामुळें त्यानें उत्तरालंकारासारखाच पण व्यंजनेवर बसलेला सूक्ष्म अलंकार मानला व याच कारणानें बहुधा इतरांचा 'सूक्ष्म' व याचा 'सूक्ष्म' निराळे झाले. आतां याच्या सूक्ष्माचें व उत्तराचें लक्षण पाहिलें तर त्यांतही सूक्ष्म–पिहित यांच्या इतकेंच अगदीं रेखामात्र अंतर आहे. त्याचें उत्तराचें लक्षण असें:—

'किंचिदाकूतसहितं स्याद्गूढोत्तरमुत्तरम्'[1]

६. यावरून उत्तरांत प्रत्यक्ष उत्तर व सूक्ष्मांत चेष्टांनीं उत्तर ह्राच काय तो फरक राहिला आहे. इतरांच्या उत्तर–सूक्ष्मांत इतका अल्प भेद नाहीं. अप्पय्याच्या उत्तराचेंही एक उदाहरण कसें घोटाळ्याचें आहे तें उत्तरालंकाराच्या विवेचनांत दाखविलेंच आहे.

एकंदरींत पाहतां सूक्ष्मांत व्यंजनेला अधिक महत्त्व व उत्तरांत कविप्रतिभेनें निर्मित अशा प्रश्नोत्तरांच्या रचनाकौशल्याला महत्त्व आहे. अर्थात् व्यंजनात्मक काव्य हें उत्तम काव्य असल्यानें व्यंजना 'उत्तरां'त खुलेलच पण 'सूक्ष्मां'त आकार-चेष्टांचें व व्यंजनेचें महत्त्व आहे.

सूक्ष्मांत मुख्य गोष्ट ही आहे कीं, एकाचे मनोविकार अत्यंत सूक्ष्मपणें पाहिल्याशिवाय न दिसणारे अर्थात् अत्यंत सूक्ष्म निरीक्षकाच्याच लक्षांत येणारे व ते शब्दांनीं न बोलतां केवळ मनोविकारांच्या होणाऱ्या कृतीवरूनच ओळखतां येणारे असतात.

७. आतां 'आकार' व 'इंगित' यांत फरक कोणता तें पाहूं:—अमरकोशांत 'आकाराविङ्गितौकृती'[2] असें म्हटलें आहे, म्हणजे आकार व इंगित भिन्न असा अर्थ होईल. पुनः 'आकारस्त्विङ्ग इंगितम्'[3] असेंही म्हटलें आहे. म्हणजे आकार व इंगित याचा एकच अर्थ होईल. कालिदासानें रघुवंशांत 'इंगिताकारैः' हे शब्द वापरले आहेत म्हणजे तो आकाराचा व इंगिताचा आकार व चेष्टा असा भिन्नार्थ करतो. मम्मट आणि विश्वनाथ यांनीं आपल्या व्याख्यांत आकार व इंगित हे दोन्ही शब्द घातले आहेत. आकार म्हणजे आकृति व इंगित म्हणजे हावभाव, चेष्टा. अमरकोशांतील उल्लेखाप्रमाणें इंगित व आकृति या दोहोंना सामान्य शब्द आकार हा आहे, म्हणूनच 'आकाराविङ्गिताकृती' म्हटलें आहे.

---

१ कु. (८३) १४७. २ अमरकोश ३·३·१६२ ३ अमरकोश १·३·१५.

इंगित म्हणजे चेहऱ्यावर दृग्गोचर होणारे विकार व आकार म्हणजे अवयवांच्या निरनिराळ्या हालचाली असा अर्थ होईल. सूक्ष्माचें उदाहरण—

राधेयपताकेचा होता मागेंचि तेधवां तोल,
तो लक्षिला नृपा ! म्यां परिभवपिशुनप्रभंजनालोल.[1] ॥

'मागें तोल दिसणें' यांत 'पराभव' सूक्ष्मपणें पाहिल्यानें अगर सूचित झाल्यामुळें हा सूक्ष्मालंकार झाला. पण हें उदाहरण मम्मटाच्या सूक्ष्माचें होऊं शकणार नाहीं. कारण मम्मटाची व्याख्येप्रमाणें 'कायाचेष्टा अगर मुखावरील विकार यांनीं ज्ञात झालेल्या दुसऱ्याच्या मनांतील भावना दुसऱ्याला कोणत्याही धर्मानें कळविल्या असतां सूक्ष्म अलंकार होतो.' प्रस्तुत उदाहरणांत विश्वनाथाच्या म्हणण्याप्रमाणें सूक्ष्मार्थ पाहणाराचें बुद्धिचातुर्य दिसतें.

हेमें-जंबीर पैं कान्त हातीं धरी । खेळवी त्यास देखोनियां सुंदरी ॥
सूर्य रेखाटिला चित्रभित्तीवरी । चंद्र-बिंबानना बिंदु दे त्यावरी[2] ॥

यांत हेम-जंबीरानें नायकनायिकांचें क्रीडेविषयीं औत्सुक्य दर्शविलें 'सूर्य रेखाटला' या शब्दांनीं नायकानें संकेतसमय सायंकाळचा दर्शविला. पण त्यावर बिंदु देऊन नायिकेनें चंद्रोदयानंतरचा काल सूचित केला म्हणून हें सूक्ष्माचें उदाहरण झालें. मम्मटाच्या मताप्रमाणेंही हें सूक्ष्माचें उदाहरण होईल.

## २ व्याजोक्ति.

८. व्याज म्हणजे मिष; व्याजेन उक्तिः व्याजोक्तिः कोणच्या तरी मिषानें बोलणें म्हणजे व्याजोक्ति. वामनाची व्याजोक्तीची व्याख्याः—व्याजस्य सत्यसारूप्यं व्याजोक्तिः[3]
सत्याच्या मिषानें सत्यासारखेंच असणारें असें बोलणें.

मम्मटः—व्याजोक्तिश्छद्मनोद्भिन्नवस्तुरूपनिगूहनम्[4] ।

"स्फुट होणाऱ्या वस्तूंचें स्वरूप कोणत्याही मिषानें लपवून टाकणें" वामनाच्या व्याख्येंत, बाहेर दिसलेली गोष्ट कोणत्याही मिषानें लपविणें एवढा अर्थ न येतां सत्यसारूप्य कोणत्याही मिषानें लपविणें एवढाच अर्थ येतो. या दृष्टीनें मम्मटाची व्याख्या थोडी जास्त स्पष्ट आहे. रुय्यकानें महत्त्वाचे तेवढेच शब्द घेऊन व्याख्या केली.

रुय्यकः— उद्भिन्नवस्तुनिगूहनं व्याजोक्तिः[5]

विद्याधरः— यत्रोद्भिन्नं किंचिद्वस्तु कुतश्चिन्निगूह्यते भूयः ।
वस्त्वन्तरनिक्षेपाद् व्याजोक्तिं तामुशन्त्येताम्[6] ॥

---

१ मो.—कर्णपर्व ७·४०. २ विठ्ठल कवि. ३ का. सू. ४·३·२५. ४ का. प्र. १०·१८४. ५ अ. सू. ७६. ६ ए. ८·७०.

विश्वनाथः—व्याजोक्तिर्गोपनं व्याजादुद्भिन्नस्यापि वस्तुनः ।

अप्पय्यदीक्षितः—व्याजोक्तिरन्यहेतूक्त्या यदाकारस्य गोपनम् ।

९. या सर्व व्याख्यांचा मथितार्थ एकच दिसतो. ग.काणे म्हणतात, "Udbhata and his followers do not define व्याजोक्ति separately but include it under अपह्नुति. पण व्याजोक्तींतील कोणतेंही चिन्ह उद्भटाच्या अपह्नुतींत दिसत नाहीं. व्याजोक्ति हा शब्दही त्यानें वापरला नाहीं, व त्याचें उदाहरणही शुद्ध अपह्नुतीचें आहे. अपह्नुति व व्याजोक्ति यांत फरक आहे तो असाः--(१) अपह्नुतींत औपम्यभाव असतो व्याजोक्तींत तो नसतो (२) अपह्नुतींत स्पष्ट निषेध करून नंतर उपमेयाचे जागीं उपमान ठेवलें जातें. (३) व्याजोक्तींत निषेध नसतो व औपम्यभावही नसतो; कारण निगूहित गोष्ट व स्पष्ट स्वरूप दाखविलेली सत्यापलापित गोष्ट यांत नसते. 'न हें नभोमंडल वारिराशि' हें अपह्नुतीचें उदाहरण आहे. यांत 'न' या शब्दानें स्पष्ट निषेध असून हें नभोमंडळ नाहीं तर वारिराशि आहे' असें म्हणण्यांत दोहोंतील औपम्यभाव कायम ठेविला आहे. अपह्नुतींत चोरून कांहींही ठेविलेलें नसतें; व्याजोक्तित आड पडदा असतो. उदाहरणार्थ,

" सृष्टी ही हिममिषें तरूवर नवमोत्यांची जाळी घाली ।

या उदाहरणांत वास्तविक " हिम नसून नवमोत्यांची जाळीच आहे पण ती हिमाच्या मिषानें घातली आहे. " असें सांगून स्पष्ट निषेध केला नसला तरी हिमबिंदू व नवमोत्यें यांत औपम्यभाव आहे व यांत उद्भिन्न वस्तु लपवून ठेवण्याजोगी अशी कोणतीच नसल्यानें हीही अपह्नुतीच झाली.

वक्रोक्ति व व्यजोक्तींतील फरक असा कीं, वक्रोक्तींत बोललेलें वाक्य श्रोता दुसऱ्या अर्थींच घेत असतो व बोलणाऱ्याच्या मनांत निराळाच अर्थ असतो. व्याजोक्तींत वस्तुस्थिति निराळी असून ती ओळखूं येऊं नये म्हणून दुसरा पेहेराव स्वतःच चढवावयाचा व लोकांना तो विशेष भासूं द्यावयाचा नाहीं हा प्रयत्न असतो. व्याजोक्तींत कर्त्याची अगर वक्त्याचीच सत्यापलाप करण्याची हातोटी असते. वक्रोक्तींत दुसरा मनुष्य वक्त्याच्या शब्दांतून निराळा अर्थ काढीत असतो. एकूण व्याजोक्तींत कर्ता अगर वक्ताच ठक तर वक्रोक्तींत श्रोता ठक असतो.

## ३ स्वभावोक्ति.



१०. स्वाभाविक म्हणजे—वस्तुस्थिति जशी असेल, तसेंच हुबेहुब वर्णन करणें यास स्वभावोक्ति म्हणतात. भामह स्वभावोक्तीला अगदींच क्षुल्लक लेखीत असावा.

---

१ सा.द. १०·९२. २ कु. (८६)·१५१. ३ का. कावि.

गतोऽस्तमर्को भातीन्दुर्यान्ति वासाय पक्षिणः ।
इत्येवमादि किं काव्यं वार्त्तामेनां प्रचक्षते ॥

असें भामहानें म्हटलें आहे. भट्टीची वार्ता म्हणजेच स्वभावोक्ति होय, त्यालाच उद्देशून बहुधा भामह म्हणतो कीं या वर्णनांत काव्य कसलें आहे ? पुढें तो स्वतः स्वभावोक्तीची व्याख्या करतो ती अशीः—

स्वभावोक्तिरलंकार इति केचित् प्रचक्षते ।
अर्थस्य तदवस्थत्वं स्वभावोऽभिहितो यथा ॥

या व्याख्येच्या भाषेवरून त्याला स्वभावोक्ति आंवडत नव्हती, कारण,

समासेनोदितमिदं धीखेदायैव विस्तरः ।
असंगृहीतमप्यन्यदभ्यूह्यमनया दिशा ॥

असें म्हणून त्यानें स्वभावोक्तीबद्दल अगदीं वीट दर्शविला आहे. दण्डीचें मत भामहाच्या अगदीं उलट आहे. तो म्हणतोः—

श्लेषः सर्वासु पुष्णाति प्रायो वक्रोक्तिषु श्रियम् ।
भिन्नं द्विधा स्वाभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम् ॥

वाङ्मय वक्रोक्ति व स्वभावोक्ति यांवर अधिष्ठित आहे असें म्हणण्यांत त्यानें स्वभावोक्तीला बरेंच महत्त्व दिलें आहे व हा अलंकार तो सर्व अर्थालंकारांच्या आधीं विवेचनांत घेतोः–नानावस्थं पदार्थानां रूपं साक्षाद्विवृण्वती ।

स्वभावोक्तिश्च जातिश्चेत्याद्या सालंकृतिर्यथा ॥

" पदार्थांचें जाति, क्रिया, गुण, द्रव्य या अवस्थांतील नाना तऱ्हेचें रूप प्रत्यक्ष डोळ्यांपुढें उभें करणारी ती स्वभावोक्ति अथवा जाति होय. "

जातिक्रियागुणद्रव्यस्वभावाख्यानमीदृशम् ।
शास्त्रेष्वस्यैव साम्राज्यं काव्येष्वप्येतदीप्सितम् ॥

शेवटीं असें म्हणून त्यानें आवडत्या स्वभावोक्तीचें वर्णन संपविलें आहे.

उद्भट— क्रियायां संप्रवृत्तस्य हेवाकानां निबन्धनम् ।
कस्यचिन्मृगडिम्भादेः स्वभावोक्तिरुदाहृता ॥

" एकादा प्राणी अथवा मूल इत्यादिकांचें, त्यांची सहज क्रिया चालली असतांना केलेलें वर्णन म्हणजे स्वभावोक्ति होय " दण्डीनें पदार्थाच्या नानावस्थांचें स्वरूप हुबेहुब दाखविणें म्हणजे स्वभावोक्ति म्हटलें. यानें क्रियेचें वर्णन म्हणजे स्वभावोक्ति असें म्हटलें. क्रिया चालली असतां केलेलें वर्णन असें म्हणण्यानें क्रियेला महत्त्व आहे असा अर्थ होईल. वामन स्वभावोक्ति मानीत नाहीं. रुद्रट,

१ भा. लं. २·८७. २ भा. लं. २·९३. ३ भा. लं. २·९५. ४ का. द. २·३६२. ५ का. द. २·८. ६ का. द. २·१३. ७ का. सा. स. ३·४१.

संस्थानावस्थानक्रियादि यद्यस्य यादृशं भवति ।
लोके चिरप्रसिद्धं तत्कथनमनन्यथा जातिः ॥
शिशुमुग्धयुवतिकातरतिर्यक्संभ्रान्तहीनपात्राणाम् ।
सा कालावस्थोचितचेष्टा सुविशेषतो रम्या ॥

रुद्रट या अलंकाराला जाति असें नांव देतो. यानें दण्डीपासून 'अवस्थान' व उद्भटापासून फरक करून 'क्रियादि' शब्द घेतला व आपली व्याख्या केली. अर्थात् स्वभावाख्यान म्हणजे स्वभावोक्ति या व्याख्येंत पालट होणें संभवनीय नाहीं पण यानें त्यांतल्या त्यांत कोणतें स्वभावाख्यान रम्य होईल हेंही सांगितलें आहे.

मम्मटः—स्वभावोक्तिस्तु डिम्भादेः स्वक्रियारूपवर्णनम् ॥[1]

रुय्यकः—सूक्ष्मवस्तु स्वभावस्य यथावद्वर्णनं स्वभावोक्तिः ।[3]

विद्याधरः—वस्तुस्वभाव उच्चैर्यः स्यात्सूक्ष्मो यथावदेतस्य ।
यद्वा वर्णनमेषा कथिता कविभिः स्वभावोक्तिः ॥[4]

विश्वनाथः—स्वभावोक्तिर्दुरूहार्थस्वक्रियारूपवर्णनम् ॥[5]

अप्पय्यदीक्षितः—स्वभावोक्तिः स्वभावस्य जात्यादिस्थस्य वर्णनम् ॥[6]

या सर्व व्याख्यांचा अर्थ एकच आहे. आतां या अलंकारांत कविकल्पनेला जरा बाजूस राहावें लागून सामान्य गोष्टींत प्रतिभेचा प्रवाह कवीनें आणावा लागतो. स्वभावोक्तीचीं उदाहरणें:—

( १ ) पीतां स्तनातें क्षणमात्र राहणें महादरें मातृमुखासि पाहणें ।
वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें । तेणेंचि फूत्कार करूनि नाहणें. ॥,

ही नेहमीं लहान बालकांची पाहिली जाणारी चेष्टा असतांही कवीच्या शब्दां-तच असा रस आहे कीं त्या काव्यानेंच अधिक रम्यता त्या गोष्टींत वाटूं लागते.

( २ ) जरेंकरूनि व्यापिली वपू । तेणें कंधरा प्राप्तकंपू ।
संहनन लवोनी जाला चापू । आला खोकत टेंकित ।

( ३ ) मुखें वासुनी लोचनभ्रूतटातें । उभारूनियां वांकुल्या मर्कटातें ।
अहो दाविती शब्द तैसे करीती । असे खेळती बाळ निःशंकरीतीं

दुसऱ्या उदाहरणांत म्हाताऱ्याचें व तिसऱ्यांत मुलांच्या माकड-चेष्टांचें वर्णन आहे. यावरून हें दिसून येईल कीं केवळ क्रियाप्रवृत्त वस्तूचें वर्णन म्हणजे स्वभावोक्ति न म्हणतां कविप्रतिभेनें यथास्वरूप वर्णन म्हणजे स्वभावोक्ति होय

१ का. लं. ७. २९,३०. २ का. प्र. १०·१६८. ३ अ. सू. ७८. ४ ए. ८·७०. ५ सा. द. १०·९२. ६ कु. ( ३ ) १५८. ७ मो. ८ मु. हरिश्चंद्राख्यान ८·१०१. ९ वामन.

# ४ भाविक.

११. हा अलंकार एकाद्या श्लोकांतच दिसणार नाहीं तर तो संबंध प्रबंधाचा गुण आहे असें भामहानें म्हटलें आहे. म्हणजे भामह भाविकाला अर्थालंकार समजत नाहीं.

भाविकत्वमिति प्राहुः प्रबन्धविषयं गुणम्।
प्रत्यक्षा इव दृश्यन्ते यत्रार्था भूतभाविनः॥
चित्रोदात्ताद्भुतार्थत्वं कथायां स्वभिनीतता।
शब्दानाकुलता चेति तस्य हेतून् प्रचक्षते॥[1]

'ज्यांत गत अथवा भावी गोष्टी प्रत्यक्ष होत आहेत असें वाटतें त्या प्रबन्धविषयक गुणाला भाविक म्हणावयाचें.' असें म्हणून भामहानें भाविकाचे हेतु सांगितले आहेत. प्रबन्धगुण म्हटल्यामुळें त्यानें भाविकाचें उदाहरण दिलें नाहीं.

भाविकं तमिति प्राहुः प्रबन्धाविषयं गुणम्।[2]
भावः कवेरभिप्रायः काव्येष्वस्य व्यवस्थितिः॥

'भाव म्हणजे कवीचा अभिप्राय. त्यानें व्याप्त असा प्रबन्धगुण म्हणजे भाविक, व याची फोड करण्यासाठीं दण्डी जे उद्गार काढतो त्यावरून तोही याला अर्थालंकार मानीत नाहीं:—परस्परोपकारित्वं सर्वेषां वस्तुपर्वणाम्।
विशेषणानां[3] व्यर्थानामक्रिया स्थानवर्णना॥
व्यक्तिरुक्ति क्रमबलाद्गंभीरस्यापि वस्तुनः।
भावायत्तमिदं सर्वमिति तद्भाविकं विदुः॥

उद्भटः—प्रत्यक्षा इव यत्रार्था दृश्यन्ते भूतभाविनः।
अत्यद्भुताः स्यात्तद्वाचामनाकुल्येन भाविकम्[4]॥

'जेव्हां आश्चर्यकारक गत गोष्टी अथवा भावी गोष्टी कवीच्या शब्दशक्तीमुळें प्रत्यक्ष घडल्याप्रमाणें भासतात तेव्हां भाविक अलंकार होतो.' ह्या व्याख्येंतील प्रथमार्ध भामहाचेंच आहे. पण उद्भट हा अलंकार गणतो व भामह तसें मानीत नाहीं. उद्भटाचें उदाहरण त्याच्या व्याख्येला विशेषसें लागू पडत नाहीं:—

करोषि[5] पीडां प्रीतिं च निरञ्जनविलोचना
मूर्त्यानया समुद्वीक्ष्य नानाभरणशोभया॥

'अंजन वगैरे न घातलेली पण नानालंकारांनीं भूषित असल्यासारखी जिचा मूर्ति आहे अशी पार्वती मला पीडा देते व सुख देते' असें म्हणण्यांत येथें भावि-

१ भा. लं. २.५२–५३. २ का. द. २. ३६३. ३ का. द. २. ३६४–३६५.
४ का. सा. स. ६.७३. ५ का. सा. सं. ६.

कापेक्षां विरोधाभास हा दुसरा अलंकारच जास्त प्रामुख्यानें वठतो. कारण यांत गत किंवा भावि अर्थ डोळ्यापुढें उभे राहिलेले दिसत नाहींत. वामनानें हा अलंकार मानला नाहीं त्याचप्रमाणें रुद्रटही मानीत नाहीं.

मम्मटः—प्रत्यक्षा इव यद्भावा क्रियन्ते भूतभाविनः । तद्भाविकम्[1] ॥

मम्मटानें भामहापासून चालत आलेलीच व्याख्या घेतली आहे. पण त्याचें उदाहरण मात्र अगदीं स्पष्ट आहे.

यापुढें विरहकाल सरोनी मीलनावसर संनिध येतो ।
कल्पितां सहज मोदभरें तो मूर्तसा मजचि गोचर होतो ॥

येथें भावी गोष्ट प्रत्यक्ष पाहिल्यासारखी अगर अनुभवल्यासारखी वाटत आहे. म्हणून हा भाविक अलंकार झाला.

रुय्यकः— अतीतानागतयोः प्रत्यक्षायमाणत्वं भाविकम्[3] ॥

विद्याधरः— भूतस्य भाविनो वा प्रत्यक्षायमाणतार्थस्य ।
विलसति सुतरामेतन्निगद्यते भाविकं कविभिः[4] ॥

विश्वनाथः— अद्भुतस्य पदार्थस्य भूतस्यार्थस्य भविष्यतः ।
यत्प्रत्यक्षायमाणत्वं तद्भाविकमुदाहृतम्[5] ।

अप्पय्यदीक्षितः—भाविकं[6] भूतभाव्यर्थसाक्षात्कारस्य वर्णनम् ॥

१२. रुय्यकानें भाविक हा अलंकार म्हणून भिन्न कसा आहे तें दाखविलें आहे. तो म्हणतो कीं, भाविक म्हणजे प्रसाद नव्हे, कारण त्यांत भूतभावी हे प्रत्यक्षायमाण करणें हा हेतु असतो. हा अद्भुत रस नव्हे, कारण त्यांत विस्मय उत्पन्न होतो. यांत निगरण नसल्यानें अतिशयोक्तीपासून हा भिन्न आहे. भ्रान्तिमान् अलंकाराप्रमाणें यांत भ्रान्ति नसून भूतभावीं हे भूतभावी असेच प्रकाशित होतात. स्वभावोक्तीप्रमाणें यांत वस्तुस्थितीचें स्वभाववर्णन नसतें. यांत वस्तु प्रत्यक्ष दृश्यमान असल्याप्रमाणें करणें हाच मुख्य हेतु आहे. कधीं कधीं स्वभावोक्तींतही असें वर्णन आलें असतां तो स्वभावोक्ति व भाविक यांचा संकर समजावा. एरवीं भाविकच अलंकार होईल. असें रुय्यक विवेचन देतो. भामह–दण्डीनंतर 'प्रबंधविषयं गुणम्' हे शब्द गाळून पुढील शास्त्रकारांनीं भाविक हा अर्थालंकारांत घातला. गाँहिंवरली नंदस्त्री घटकेंत पुसोनि नंदना शतदा;

तैसेंचि मनीं भावि निजसदनाचाहि नंद नाश तदा[7] ॥

यांत भावि गोष्ट नेत्रांपुढें उभी केल्यानें हा भाविक झाला.

---

१ का. प्र. १०·१७३. २ सा. व. वि. ११·२७. ३ अ. सू. ७९. ४ प्र. ८·७३.
५ सा. द. १०·९३–९४. ६ कु. १५९. ७ मो. मंत्रभागवत १०·५८७.

## ५ उदात्त.



१३. भामहानें उदात्ताचें लक्षण न देतां फक्त उदाहरण दिलें आहे; व त्यावरून महान् संपत्तीचें अगर महापुरुषाचें वर्णन म्हणजे उदात्त असा अर्थ निघतो.

दण्डीः-- आशयस्य विभूतेर्वा यन्महत्त्वमनुत्तमम् ।
उदात्तं नाम तं प्राहुरलंकारं मनीषिणः ॥

"एकाद्याच्या मनांतील चित्तवृत्तीचें अथवा ऐश्वर्याचें अत्यंत अतिशयानें वर्णन करणें." दण्डीचें हें लक्षण व भामहाचें सूचित होणारें उदात्ताचें लक्षण सारखेंच आहे. दण्डीनें वास्तविक उदाहरणांत मोठ्या पुरुषाचें वर्णन केलें असतां व्याख्येंत मात्र 'आशय' हाही शब्द घातला आहे. भट्टी याच अलंकाराला उदार म्हणतो.

उद्भटः— उदात्तमृद्धिमद्वस्तु चरितं च महात्मनाम् ।
उपलक्षणतां प्राप्तं नेतिवृत्तत्वमागतम् ॥

उभ्दटानें आपल्या व्याख्येंत बराच फरक केला. उभ्दटानें ऐश्वर्य अगर महापुरुषवर्णन हे काव्याचे गौण विषय ठेविले आहेत याचें कारण उदात्त रसवत् अलंकार होऊं नये हें होय. प्रधान विषय निराळा असतांही या गौण गोष्टीचें वर्णन प्राधान्य पावलें तर हा उदात्त अलंकार संभवतो, असें उद्भटाचें मत आहे. ग. काणे यांनीं वर्णानुक्रमानें दिलेल्या सूचींत वामन उदात्त मानतो असें दिलें आहे पण वस्तुतः तो मानीत नाहीं. रुद्रटानेंही 'उदात्त' नांवाचा अलंकार मानलेला नाहीं.

मम्मटः—उदात्तं[३] वस्तुनः संपद् । महतां चोपलक्षणम् ।

मम्मटानें उद्भटाची व्याख्या थोडक्यांत दिली. उदारचरितांचें अगर संपत्तीचें गौण म्हणूनच वर्णन करावयास लागणें म्हणजे उदात्त असें उद्भटाप्रमाणें मम्मटही म्हणतो. रुय्यकः—समृद्धिमद्वर्णनमुदात्तम्[४] ॥ अङ्गभूतमहापुरुषचरितवर्णनं च ॥

विद्याधरः— अभिमतमेतदुदात्तं[५] समृद्धिमद्वस्तुवर्णनं यत्र
यच्च महापुरुषाणामङ्गतया चरितवर्णनं भवति ॥

विश्वनाथः—लोकातिशयसंपत्तिवर्णनोदात्तमुच्यते[६] ।
यद्वापि प्रस्तुतस्याङ्गं महतां चरितं भवेत् ॥

अप्पय्यदीक्षितः—उदात्तमृद्धेश्चरितं[७] श्लाघ्यं चान्योपलक्षकम् ॥

एकंदरींत, कवीनें स्वतःच्या कल्पनेनें केलेल्या ऐश्वर्याच्या व उदारचरितांच्या अतिशयपूर्ण गौण वर्णनाला उदात्त म्हणतात. स्वभावोक्तींत वस्तुस्थिति जास्त रंगविलेली नसते. उदात्तांत जास्त रंग दिलेला असतो.

---

१ का. द. २.३००. २ का. सा. स. ४.४९. ३ का. प्र. १०.१७६-१७७.
४ अ. स. ८०. ५ ए. ८.७४. ६ सा. द. १०.९४-९५. ७ कु. (९७) १६०.

उदात्ताचें उदाहरणः—

रत्नस्तंभावरी कौतुकीं । वेष्टण केलें कनकलतिकीं
मुक्ताफळें आणि माणिकीं । घोंस केले फळांचे ॥
द्राक्षीफळांचे मंडप दाट । तळीं वाहती रसांचे पाट ।
अमृत निश्चळ सुस्वादिष्ट । हेमचंबू दाळिंबी ॥
रत्नवृक्षांचे मांदोडे । प्रवाल वल्लींचे जुंवाडे ।
वैडूर्यखाणी चहूंकडे । भानुतेजें झळकती ॥[1]

यांत संपत्तीचें वर्णन असल्यानें हा उदात्त झाला. उद्भटाच्या उदात्ताचा व रसवत् अलंकाराचा कोणता संबंध आहे हें रसवत् अलंकाराच्या विवेचनाचे वेळीं पाहूं. ऐश्वर्य अगर महापुरुषचरित वर्णन हें अंगभूत असतां उदात्त होतो असें म्हणणारे मम्मट रुय्यक इत्यादि आहेत; पण उद्भटाप्रमाणें उदात्ताचा व रसवत् अलंकाराचा संबंध ते लावीत नाहींत. रुद्रटाचा अवसर अलंकार 'उदात्त' अलंकारासारखाच आहे. त्यानें अवसराचें दिलेलें लक्षण असेंः—

अर्थान्तरमुत्कृष्टं सरसं यदि वोपलक्षणं क्रियते ।
अर्थस्य तदभिधानप्रसङ्गतो यत्र सोऽवसरः ॥

१४. एक वर्ण्य गोष्ट वर्णन करीत असतां उत्कृष्ट किंवा सरस अशी दुसरी गोष्ट गौण म्हणून वर्णन करणें याला अवसर म्हणावें असें रुद्रट म्हणतो. 'अवसर' हा शब्द एका अर्थी सूचक आहे. मुख्य वर्णनांत दुसऱ्या वर्णनाला अवसर मिळणें, जागा मिळणें, स्थान मिळणें म्हणजे 'अवसर' होय. रुद्रटानें हा अलंकार व्यापक केला आहे. त्यानें उत्कृष्ट गोष्टीचें म्हणून 'तदिदमरण्यं यस्मिन्'[2] हें उदाहरण दिलें आहे. हेंच उदाहरण मम्मटानें 'महतां चोपलक्षणम्' या उदात्तप्रकाराचें दिलें आहे; व टीपेंत 'न चात्र वीरो रसः तस्येहांगत्वात्' असें म्हटलें आहे. 'सा सिप्रा नाम नदी'[3] हें उदाहरण सरस अर्थाचें म्हणून रुद्रटानें दिलें आहे व त्यांत शृंगार अंगभूत आहे. यावरून सरस याचा अर्थ 'शृंगार' एवढाच रुद्रटानें केला आहे कीं काय असा भास होतो. व्याख्येंत तर स्पष्टपणें 'उत्कृष्टं सरसं यदि वा उपलक्षणं' असें म्हटल्यानें उत्कृष्ट किंवा सरस असा अर्थ होतो. पण वस्तुतः 'तदिदमरण्यं' हा श्लोकही सरस आहेच व मम्मटानें तसें ह्मटलेंही आहे. रुद्रटाच्या व्याख्येवरून त्यानें उत्कृष्ट व व सरस अशा दोहोंचीं निदर्शक दोन उदाहरणें दिलीं आहेत असें वाटतें. रुद्रटानें उत्कृष्ट वर्णनांतही सरसत्व आहे, असें सूचित केलेलें दिसत नाहीं. नमिसाधूनें [4]टकेंत 'सरसं' म्हणजे 'सशृंगारादिकं' असें म्हटलें आहे. म्हणजे त्याच्या म्हणण्याप्रमाणें

---

१ मु. सभापर्व. २ का. लं. ७·१०३. ३ का. लं. ७·१०४. ४ का. लं. ७·१०५.

अशा वर्णनांत शृंगार इत्यादि कोणताही रस असूं शकेल. या दृष्टीनें 'तदिदमरण्यं' हें वर्णनही सरस आहे. मम्मटानें 'सा सिप्रा' हें रुद्रटाचें उदाहरण घेतलें नाहीं याचें कारण रुद्रटाची व्याख्या त्याच्या व्याख्येहून अधिक व्याप्त आहे. मम्मटानें 'संपत्ति' 'ऐश्वर्य' अगर 'महच्चरित' अशा शब्दांनीं उदात्ताला बंधन घातलें आहे. रुद्रटाच्या 'उत्कृष्टं सरसं यदि वा' याचा अर्थ 'उत्कृष्टं सरसं यदि च' असाही होत आहे असें त्याच्या उदाहरणावरून दिसतें. त्याच्या अवसरांत कोणताही अर्थ उपलक्षणतेनें येईल पण तो उत्कृष्ट किंवा सरस असला पाहिजे. रुद्रटाच्या सरस या शब्दानें रसयुक्त असा अर्थ होऊन रस हा अंगभूत असावा असा अर्थ निघतो. पण उद्भटानें 'उपलक्षणतेनें वर्णन न झाल्यास तो रस होईल' असें ह्मटलें आहे तसें मात्र पुढें कोणी ह्मटलें नाहीं. एवढेंच नव्हे पण रस हा शब्दही उदात्ताचे संबंधीं रुद्रटानंतर कोणी वापरला नाहीं.

---

# प्रकरण १२ वें

## सादृश्यगर्भ अलंकार

### १ समासोक्ति.

१. यानंतर अलंकारांतील मोठें क्षेत्र व्यापणाऱ्या सादृश्यगर्भ अलंकारांचा आपण विचार करूं. विश्वनाथानें केलेल्या वर्गाप्रमाणें सादृश्यगर्भालंकारांनही निरनिराळे वर्ग आहेत. त्यांपैकीं गम्यौपम्याश्रयी अलंकार हा एक होय गम्यौपम्य म्हणजे ज्यांत उपमानोपमेयभाव उक्त नसतो त्यास गम्यौपम्य म्हणतात; व त्याचा आश्रय घेणारे अलंकार ते गम्यौपम्याश्रयी अलंकार होत. या औपम्यभाव गर्भित असणाऱ्या अलंकारांपैकीं समासोक्ति प्रथम पाहूं. समासोक्ति म्हणजे समासानें बोलणें.

भामहः—यत्रोक्तेर्गम्यतेऽन्योऽर्थस्तत्समानविशेषणैः ।
सा समासोक्तिरुद्दिष्टा संक्षिप्तार्थतया यथा ॥[1]

' समासानें म्हणजे संक्षिप्तपणानें. ज्या उक्तींतून समान विशेषणांचे योगें संक्षिप्तपणानें निराळा अर्थ निघतो ती समासोक्ति होय.' म्हणजे वर्ण्य वस्तूला लावलेली विशेषणें तत्समान दुसऱ्या एखाद्या वस्तूला लागत असल्यानें त्या दोन वस्तूंत औपम्यभाव वाटणें. समासोक्तीचें उदाहरण—

करितां विलाप शल्या ! व्याकुळ होसील कंठ वाळल ।
असती तव उक्ति, हिला धर्मात्मा कर्ण हा न भाळेल ॥[2]

यांत वास्तविक शल्याच्या उक्तीबद्दल लिहिलेलें आहे. पण ' असती ' या विशेषणानें ' खोटी ' व ' अपवित्र ' अगर ' कुलटा ' असा अर्थही होईल; व त्यामुळें पुढील, ' धर्मात्मा कर्ण हा न भाळेल ' हें वाचून शल्याच्या उक्तीबद्दल लिहिलें असतांही अप्रस्तुत ' स्त्री ' हा अर्थ मनांत येतो, म्हणून ही समासोक्ति झाली.

या अलंकारांत विशेषणाला महत्त्व असतें; कारण त्यांतूनच अप्रस्तुत गोष्ट निर्माण व्हावयाची असते. आतां यांत औपम्यभाव कसा ? तर उक्ति हा शब्द स्त्रीलिंगी असल्यानें ' स्त्री ' डोळ्यांपुढें येते. व ' असती ' या विशेषणानें दोन अर्थ निर्माण होतात. यामुळें ' उक्ति ' व ' स्त्री ' यांतील औपम्यभाव पुरा होतो. शिवाय ' भाळेल ' या शब्दानेंही औपम्यभावाला पुष्टी येते.

---

१ भा. ल. २'७९. २ मो. कर्णपर्व २७'५१.

दण्डी:— वस्तु किंचिदभिप्रेत्य तत्तुल्यस्यान्यवस्तुनः ।
उक्तिः संक्षिप्तरूपत्वात् सा समासोक्तिरिष्यते ॥[1]

१. ही दण्डीची व्याख्या बरोबर वाटत नाहीं. 'एकाद्या विशिष्ट वस्तूबद्दल बोलावयाचें असतांना तिच्यासारख्या दुसऱ्या वस्तूबद्दल संक्षेपानें बोलणें म्हणजे समासोक्ति असा दण्डीच्या व्याख्येचा अर्थ होतो. पण वस्तुतः समासोक्तींत अभिप्रेत निराळें व वर्णन केलें जाणारें निराळें असें नसून केलेल्या वर्णनांतून सहज अप्रस्तुत अर्थ निर्माण होतो. तेथें अभिप्रेत अर्थ असण्याची जरूर नाहीं. अभिप्रेत वस्तूबद्दल न बोलतां तत्तुल्य अन्य वस्तूचें वर्णन केलें व नंतर अभिप्रेत वस्तूला तें लागू पडलें म्हणजे ती अप्रस्तुतप्रशंसा होईल. अभिप्रेत म्हणजे प्रस्तुत. प्रस्तुताचें वर्णन अन्य अप्रस्तुतानें करणें म्हणजे अप्रस्तुतप्रशंसा, अर्थात् दण्डीचें उदाहरणही अप्रस्तुतप्रशंसेचेंच होईल. त्याचें उदाहरणः—

पिबन्मधु यथाकामं भ्रमरः फुल्लपङ्कजे ।
अप्यसन्नधसौरभ्यं पश्य चुम्बति कुड्मलम् ॥[2]

हें प्रौढ स्त्रीवरून बालेवर मन गेलेल्या पुरुषाला उद्देशून म्हटलें असल्यानें भ्रमर हा अप्रस्तुत होतो अर्थात् ही अप्रस्तुतप्रशंसा होते.

विशेष्यमात्रभिन्नापि तुल्याकारविशेषणा ।
अस्त्यसावपराप्यस्ति भिन्नाभिन्नविशेषणा ॥[3]

'विशेष्य तेवढें भिन्न (१) एरवीं सारखींच विशेषणें असणारी व (२) भिन्नाभिन्न विशेषणें असणारी अशी ही समासोक्ति असते.' असें दण्डी म्हणतो. या दोन भेदांशिवाय दण्डीनें अपूर्व समासोक्ति हा तिसरा भेद केला आहे. पूर्वीचा धर्म टाकून देणाऱ्या एकाद्या अभिप्रेत वस्तूचें दुसऱ्या वस्तूच्या वर्णनानें वर्णन करणें यामुळें अपूर्वसमासोक्ति होते. त्याचें उदाहरणः—

निवृत्तव्यालसंसर्गो निसर्गमधुराशयः ।
अयमम्भोनिधिः कष्टं कालेन परिशुष्यति ॥[4]

हें उदाहरण देऊन पुढें दण्डी म्हणतो कीं समुद्रासारख्या पुरुषाची कष्टमय दशा पूर्वधर्मत्यागानें झालेली येथें दाखविली म्हणून ही अपूर्वसमासोक्ति होय. वर सांगितल्याप्रमाणें दण्डीची व्याख्या असल्यामुळें त्याचीं सर्व उदाहरणें अप्रस्तुत प्रशंसेचींच वाटतात. मूळ व्याख्येंत फरक असता तर भिन्नाभिन्नविशेषणा समासोक्ति ही प्रस्तुतवर्णनानें अप्रस्तुतभाव निघून अप्रस्तुत प्रशंसा वाटली असती. पण वर दिलेल्या अपूर्वसमासोक्तीच्या उदाहरणांत अम्भोनिधीची अशी स्थिति नसतांही केवळ अप्रस्तुत वर्णनाकरतां तशी दाखविल्यानें ती स्पष्ट अप्रस्तुत प्रशंसाच वाटते.

वामनः— 'अनुक्तौ समासोक्तिः'[5]

---

१ का. द. २·२०५. २ का. द. २·२०६. ३ का. द. २·२०८. ४ का. द. २·२१२.
५ का. सू. ४·३·३.

'उपमेयाबद्दल कांहींच न बोलतां समानवस्तु वर्णन करणें म्हणजे समासोक्ति होय.' अप्रस्तुताचें वर्णन प्रस्तुतार्थ अभिप्रेत असतां करणें असें वामनानें दण्डीप्रमाणेंच स्पष्ट शब्दांत म्हटलें नसलें तरी उपमेयाबद्दल न बोलणें व अप्रस्तुत सांगणें यांत कांहींच फरक नाहीं. अर्थात् वामनाची समासोक्ती ही अप्रस्तुत प्रशंसाच होते. यानें अप्रस्तुत प्रशंसेची व्याख्या, 'किंचिदुक्तावप्रस्तुतप्रशंसा' अशी केली आहे. म्हणजे उपमेयाबद्दल किंचित् सांगितलें व समानवस्तुन्यास केला तर अप्रस्तुतप्रशंसा होते. ही व्याख्याही इतरांहून भिन्न आहे. या सर्वांच्या व्याख्यांत अप्रस्तुतप्रशंसा म्हणजे अप्रस्तुताची स्तुति असा अर्थ घेतलेला दिसतो.

सकलसमानविशेषणमेकं यत्राभिधीयमानं सत् ।
उपमानमेव गमयेदुपमेयं सा समासोक्तिः[२] ॥

३. 'जेथें सर्व विशेषणें सारखीं असतां, उपमानावरून उपमेयाचा बोध होतो, तेव्हां समासोक्ति होते.' रुद्रटाची ही व्याख्या दण्डी-वामनाप्रमाणेंच आहे. म्हणजे याची समासोक्ति अप्रस्तुतप्रशंसाच आहे. त्याचें उदाहरणही तसेंच वाटतें. उद्भट पुष्कळ वेळां भामहाचें अनुकरण करतो; त्यामुळें इतरांच्या व्याख्येप्रमाणें त्याची समासोक्ती-ची व्याख्या नाहीं. प्रकृतार्थेन वाक्येन तत्समानविशेषणैः ।

अप्रस्तुतार्थकथनं समासोक्तिरुदाहृता[३] ॥

'समानविशेषणाच्या योगें प्रकृत अर्थ असणाऱ्या वाक्यानें अप्रस्तुत अर्थ सांगणें याला समासोक्ति म्हणावयाचें.' भामहानें 'प्रकृत' 'अप्रस्तुत' हे शब्द घातले नव्हते ते उद्भटानें स्पष्ट घातले त्यामुळें त्याची व्याख्या अधिक चांगली झाली.

मम्मटः— परोक्तिर्भेदकैः श्लिष्टैः समासोक्तिः[४] ॥

मम्मटानें उद्भटाच्या व्याख्येंतील मर्म ओळखून अजूनपर्यंत 'समान विशे-षण' हा चालत आलेला शब्द पालटला व भेदक म्हणजे अप्रस्तुत व प्रस्तुत असें दोन अर्थ दर्शविणारीं श्लिष्ट विशेषणें अप्रस्तुतार्थ सुचवतील तेव्हां त्यास समा-सोक्ति म्हणावें अशी आपली व्याख्या केली. थोडक्यांत, श्लिष्ट विशेषणांमुळें प्रस्तुतांतून अप्रस्तुत निघणें याला समासोक्ति म्हणावयाचें. उदाहरणार्थ,

कर्णा ! उगा उगा रे ! किति कत्थन ? हें न ऐकवे कानें ।
त्यजिली, निर्मर्यादा असती वाणी तुझी, विवेकानें[५] ॥

या उदाहरणांतील निर्मर्यादा व असती यांचे 'बेताल, स्वैराचारिणी; व खोटी, कुलटा' असे दोन दोन अर्थ होतील त्यामुळें प्रस्तुत 'वाणी' असतां निर्मर्यादा असती या विशेषणामुळें अप्रस्तुत 'स्वैराचारिणी स्त्री' असाही अर्थ मनांत येतो म्हणून ही समासोक्ति होय. मम्मटानें घातलेला 'श्लिष्ट' शब्द रुय्यकानें

---

१ का. सू. ४·३·४. २ का लं. ८·६६. ३ का. सा. सं. ३·३३.
४ का. प्र. १०·१४८. ५ मो. कर्णपर्व. २५·१७.

गाळला व 'विशेषणसाम्य' हा शब्द पुनः आणला. 'विशेषणसाम्यादप्रस्तुतस्य गम्यत्वे समासोक्तिः' त्याच्या या व्याख्येचा अर्थ उद्भटाप्रमाणेंच आहे. त्यानें विशेषणसाम्याचे (१) श्लिष्टता (२) साधारण्य (३) औपम्यगर्भ असे तीन प्रकार केले. यांपैकीं साधारण्याचे धर्मसमारोप व कार्यसमारोप असे दोन भेद, औपम्यगर्भाचे उपमासमास व संकरसमास असे दोन भेद, म्हणून एकंदर विशेषणसाम्य पांच प्रकारचें झालें.

समासोक्तीचे (१) शुद्धसमारोपानें (२) विशेषणसाम्यानें (३) कार्यसमारोप आणि विशेषणसाम्यानें मुख्य भेद तीन होतात यांपैकीं विशेषणसाम्याचे वर उल्लेखिलेल्या पांच प्रकारांवरून पांच समासोक्ति भेद होतात. कार्यसमारोपेचे (१) लौकिकी व (२) शास्त्रीय या वस्तूंवरून (१) लौकिकी (२) शास्त्रीय (३) लौकिकीवर शास्त्रीय (४) शास्त्रीयवर लौकिकी व्यवहारसमारोपानें चार भेद होतात. अशा रीतीनें अनेक भेद सांगून रुय्यकानें 'एवं बहु प्रकारा समासोक्ति' असें म्हटलें आहे. यानें समासोक्तीचा फारच मोठा प्रपंच दाखविला आहे. उत्प्रेक्षा, रूपक, अपह्नुति इत्यादि अनेक अलंकारांशीं संकर होऊन राहणाऱ्या समासोक्तीचेंही त्यानें वर्णन केलें आहे.[1]

विश्वनाथः—समासोक्तिः समैर्यत्र कार्यलिङ्गविशेषणैः ।
व्यवहारसमारोपः प्रस्तुतेऽन्यस्य वस्तुनः ॥[2]

४. विश्वनाथानें आपल्या व्याख्येंतच सर्व गोष्टी सांगितल्या "कार्यलिङ्ग व विशेषणें यांच्या साम्यानें प्रस्तुतावर अप्रस्तुताचा व्यवहार समारोपच केवळ केला जातो तेव्हां समासोक्ति अलंकार होतो." विशेषणसाम्याचें (१) श्लिष्ट (२) साधारण्य (३) औपम्यगर्भ हे तीन भेद होतात. औपम्यगर्भाचे पुनः तीन भेद (१) उपमागर्भ (२) रूपकगर्भ (३) संकरगर्भ यांपैकीं रूपकगर्भ विशेषणांनीं होणारी समासोक्ति ही समासोक्ति अलंकाराचा विषय नाहीं असें विश्वनाथ म्हणतो. त्याचप्रमाणें शेवटीं औपम्यगर्भा समासोक्तीही न मानल्यामुळें यानें विशेषणसाम्यानें होणारी समासोक्ति दोनच प्रकारची मानली आहे.

समासोक्ति
|
विशेषणसाम्या —— कार्यसाम्या —— लिङ्गसाम्या
|
श्लिष्टता —— साधारण्य

समासोक्तींत रूपसमारोप नसून फक्त व्यवहारसमारोप असतो व रूपकांत रूपसमारोप असतो. या व्यवहारसमारोपाचे रुय्यकाप्रमाणेंच यानें चार भेद दिले आहेत व

१ अ. सू. ३१. २ सा. द. १०-५६-५७.

आणखीही भेद पडतील म्हणून ही समासोक्ति अनेक प्रकारची आहे असें यानें सांगितलें. रुय्यक रूपकगर्भा समासोक्ति मानून समासोक्तीचे पांच भेद करतो. विश्वनाथ रुपकगर्भा समासोक्ति हा भेद न मानतां चारच प्रकार करतो.

अप्पय्यदीक्षितः—समासोक्तिः परिस्फूर्तिः प्रस्तुतेऽप्रस्तुतस्य चेत्

अप्पय्यदीक्षितानें विशेषणसाम्या समासोक्तीचें (१) श्लिष्टतेनें (२) साधारण्यानें व (३) सारूप्यानें असे तीन भेद केले आहेत. यांपैकीं पहिले दोन रुय्यक–विश्वनाथानें मानलेलेच आहेत, पण याची सारूप्यानें होणारी समासोक्ति ही अप्रस्तुत प्रसंशाच वाटते. तिचें उदाहरण ' पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना ' हें दिलें आहे, व त्यावरून अप्रस्तुत असा कुटुंबाचा अर्थ निघतो असें त्यानें म्हटलें पण तें चुकीचें असें जगन्नाथ म्हणतो व जगन्नाथावर टीका करणाऱ्या नागोजी भट्टानें जगन्नाथाला खंडून काढलें आहे. अप्पय्य दीक्षितानें वर सांगितलेल्या भेदांहून अधिक भेद केलेले नाहींत.

जगन्नाथः–यत्र प्रस्तुतधर्मिको व्यवहारः साधारणविशेषणमात्रोपस्थापिताप्रस्तुत-धर्मिकव्यवहाराभेदेन भासते सा समासोक्तिः ॥

जगन्नाथानें विशेषणसाम्याचे श्लेष, शुद्ध व साधारण्य या योगें तीन भेद केले. व पुनः धर्मान्तर पुरस्कार व कार्य पुरस्कार यावरून दोन भेद केले. लौकिक व व्यवहार यांवरून रुय्यकाप्रमाणेंच चार भेद त्यानें दिले आहेत.

आतां या समासोक्तीचें समालोचन करतां असें दिसेल कीं समासोक्ति काव्यांत किती भाग व्यापते हें प्रथम रुय्यकानें पाहिलें. त्यामुळें मम्मटानें समासोक्तीचें आकुंचित मानलेलें क्षेत्र रुय्यकानें विस्तृत केलें. मम्मटानें न मानलेला व्यवहार-समारोपही याच्या समासोक्तींत आला आहे. जास्त चिकित्सेनें पाहूं लागलें तर रुय्यकाच्या अगर विश्वनाथाच्या श्लिष्ट समासोक्तीबद्दल कांहीं म्हटलें नाहीं तरी त्यांनीं साधारण्यानें विशेषणसमासोक्तीचा जो भेद केला आहे त्यांत वस्तुतः व्यवहारसमारोपच आहे असें दिसून येईलः—

तन्वी मनोरमा बाला लोलाक्षी पुष्पहासिनी
विकासमेति सुभग ! भवद्दर्शनमात्रतः।

लता या अप्रस्तुत गोष्टीची प्रतीति या उदाहरणांत ' पुष्पहासिनी विकासमेति ' या शब्दांनीं होत आहे. 'विकासमेति' या शब्दांत व्यवहार समारोप असल्यानें त्यानें लताप्रतीति होते पुष्पहासिनी हें विशेषण साधारण्यानें लागत नसून श्लेषानें प्रस्तुताप्रस्तुताकडे लागत आहे. ' पुष्पवत् हासिनी ' हें स्त्रीला लागू पडेल व 'पुष्प-मेव हास्यं तद्वती पुष्पहासिनी' हें लतेच्या अर्थाला लागू पडेल. वास्तविक येथें

१ कु. २३. २ कु. पान ७६. ३ र. गं. ३६७. ४ अ. स. पान ९३.

साधारण्य नसून हा श्लेष आहे. तेव्हां साधारण्य हा विशेषणसाम्येचा भेद पडत असला तरी निदान या ठिकाणीं व्यवहारसमारोप व श्लिष्टता असल्यानें साधारण्य हा भेद व्यर्थ वाटतो. शिवाय व्यवहारसमारोप हा भेद मानला असतां त्याचें कैमर्थ्यच ठरतें असें वाटूं लागतें.

विश्वनाथाचेंही एक असेंच उदाहरण आहेः—

निसर्गसौरभोद्भ्रान्तभृङ्गसङ्गीतशालिनी ।
उदिते वासराधीशे स्मेराजनि सरोजिनी ॥

यांत पहिल्या ओळीचें समासोक्तिदृष्ट्या वैयर्थ्य आहे. स्मेराजनि या शब्दानेंच समासोक्ति होत आहे असें विश्वनाथच ह्मणत आहे. तेव्हां येथेंहि प्रस्तुत अप्रस्तुताला साधारण्यानें विशेषणें लागनात असें ह्मणतां येत नाही. तसेंच 'स्मेराजनि' या पदानेंही धर्मसमारोपच होत आहे. या दृष्टीनें रुय्यक–विश्वनाथाचे हे भेद व्यर्थ वाटतात. वस्तुतः मुख्य भेद [illegible] समासोक्ति व व्यवहारसमारोपा समासोक्ति हेच शिल्लक राहतील. अप्पय्यदीक्षितानें साधारण्याचें जें उदाहरण दिलें आहे तें पाहतांही त्यांतील विशेषणामुळें समासोक्ति होत नसून 'संसेव्यसे' या पदानेंच फक्त अप्रस्तुतार्थ मनांत येतो. ती ओळ सोडल्यास तें उदाहरण स्वभावोक्तीचें होईल. असो. समासोक्तीचें उदाहरणः—

संकोचेली खळहृता राज्यश्री फार तीस पालवितो ।
घालवितो हार गळां शासन पहिलें तसेंचि चालवितो ॥

## २ परिकर.

५. या अलंकाराची वामनानें अगर त्यापूर्वीही कोणी व्याख्या केलेली दिसत नाहीं रुद्रटाची व्याख्या— साभिप्रायैः सम्यग्विशेषणैर्वस्तु यद्विशेष्येत

द्रव्यादिभेदभिन्नं चतुर्विधः परिकरः स इति ॥

"सहेतुक योग्य विशेषणांनीं एकादी वस्तु विशेषित केली असतां परिकर अलंकार होतो." रुद्रटानें परिकाराचे द्रव्यादिवरून चार भेद केले.

विशेषणैर्यत्साकूतैरुक्तिः परिकरस्तु सः ।

रुद्रटाच्या व्याख्येंतील 'सम्यक्' हा शब्द व शेवटचे भेद गाळून मम्मटाची ही व्याख्या रुद्रटासारखीच आहे असें दिसेल. परिकराचें उदाहरणः—

क्षोभुनि बोले शकुंतला । पवित्र विश्वामित्रबाळा ।
राया ! भूमंडळपाळा ! । तूंचि अविचारें जल्पिसी ॥

---

१ सां. द. पान ४१. २ मो. गङ्गापर्व १·१२४. ३ का. लं. ८·७२. ४ का. प्र. १०·१८३.
५ मु. आदिपर्व.

येथें 'भूमंडळपाळा' 'पवित्र विश्वामित्रबाळा' हीं विशेषणें सहेतुक असल्यानें हा परिकर अलंकार झाला. अखिल पृथ्वीचें पालन करणारा असूनहीं तूं मला टाकण्यांत अन्याय करतोस व अविचारानें बडबडतोस हें भूमंडळपाळा या शब्दानें सूचित करावयाचें आहे; तसेंच शकुंतला पवित्र असल्यानें टाकण्यास अयोग्य असतांही तिच्यावर अपावित्र्याचा आरोप आणून दुष्यंत तिला टाकीत होता अर्थात् ती क्षोभून बोलली असें 'पवित्र' या विशेषणानें सांगावयाचें आहे.

रुय्यकः— विशेषणसाभिप्रायत्वं परिकरः[१] ॥

विद्याधरः— विलसति विशेषणानां प्रतीयमानार्थगर्भता यत्र ।
सहृदयहृदयाल्हादी परिकरः[२] नामा स निर्दिष्टः ॥

'वाच्यार्थाहून निराळा अर्थ विशेषणें सुचवतील तेव्हां परिकर अलंकार होतो' विद्याधरानें परिकराचा व्यत्यास म्हणून परिकरांकुर अलंकार मानला आहे. परिकरांत साभिप्राय विशेषणें असतात व परिकरांकुरांत विशेष्य साभिप्राय असतें:— तादृक् किमपि विशेष्यं साभिप्रायत्वमश्नुते यत्र ।
स परिकराङ्कुर[३] नामालंकारः कीर्तितः कविभिः ॥

विश्वनाथः—उक्तिर्विशेषणैः साभिप्रायैः परिकरो[४] मतः ।

अप्पय्यदीक्षितः—अलंकारः परिकरः[५] साभिप्राये विशेषणे ।

जगन्नाथः—विशेषणानां साभिप्रायत्वं परिकरः[६] ॥

६. अप्पय्यदीक्षितानें विद्याधराप्रमाणेंच परिकरांकुर मानला आहे. त्याचप्रमाणें साभिप्राय विशेषणें अनेक असावीं असें मत रुद्रटापासून विश्वनाथापर्यंत सर्वांचें आहे. पण अप्पय्यदीक्षित एकच विशेषण साभिप्राय योजिलें असतांही हा अलंकार होईल असें म्हणतो. तसेंच जगन्नाथाचेंही मत आहे. जगन्नाथानें परिकरांकुर मानलेला नाहीं.

समासोक्ति व परिकर यांत फरक म्हणजे समासोक्तींत अप्रस्तुतार्थ सूचित होतो; परिकरांत सहेतुक वापरलेल्या विशेषणांनीं अप्रस्तुतार्थ प्रस्तुताशीं औपम्यभाव बाळगीत नाहीं. त्यांत वाच्य अर्थांतून ध्वनीनें नव्हे तर गुणीभूत व्यंजनेनें निराळा अर्थ निर्माण होतो.

सदाश्रितपदा ! सदाशिवमनोविनोदास्पदा !
स्वदासवशमानसा ! कलिमलांतका ! कामदा !
वदान्यजनसद्गुरो ! प्रशमितामितासन्मदा !
गदारिदरनंदकांबुजधरा ! नमस्ते सदा ![७]

---

१ अ. स. ३२. २ ए. ८.२४. ३ ए. ८.२५. ४ सा. द. १०.५७. ५ कु. (६२) १२२. ६ र. गं. ३८६. ७ मो. केका १.

या उदाहरणांत साभिप्राय विशेषणें अनेक आहेत. एकच साभिप्राय विशेषण असलेलें उदाहरण, अनन्यगतिकां जनां निरखितांचि सोपद्रवा ।
तुझेंचि करुणार्णवा ! मन धरी उमोपद्रवा ॥

'करुणार्णव' या विशेषणानें 'तुला भक्तांची करुणा यावयाचीच व तूं त्यांना जवळ करणारच' हा हेतु दर्शविला गेला म्हणून परिकर अलंकार झाला. परिकराचे रुद्रटाप्रमाणें द्रव्यादिवरून चार भेद कोणीच मानले नाहींत. पुढील शास्त्रज्ञांनीं विशेष्य हा एकच शब्द वापरला त्यामुळें तें विशेष्य कोणत्याही जातीचें होऊं शकेल. परिकरांकुर अलंकार न मानणारा उद्योतकार म्हणतो कीं, साभिप्राय विशेषणांनीं परिकर अलंकार होतो असें म्हणण्यांत विशेष्य साभिप्राय असलें तरीही परिकर अलंकार होईल असा अर्थ निघत असल्यानें परिकरांकुर अलंकाराचा समावेश यांतच होतो. उद्योताचें असें मत असलें तरी त्याच्या म्हणण्याप्रमाणेंच अर्थनिष्पत्ति करणारें उदाहरण त्याच्या मताच्या शास्त्रज्ञांनीं दिलें नाहीं कारण परिकरांकुराची कल्पनाच रुय्यकानंतर निघाली.

## २ अप्रस्तुत प्रशंसा



७. प्रशंसा याचा अर्थ स्तुति असाच प्रथम कांहीं दिवस घेतला गेला त्यामुळें अप्रस्तुत गोष्टीची स्तुति ज्यांत केलेली असते ती अप्रस्तुतप्रशंसा असा अर्थ झाला. पण पुढें प्रशंसा म्हणजे सांगणें ( प्र+शंस् ) असा अर्थ झाल्यानें अप्रस्तुताबद्दल सांगणें मग तें निंदाव्यंजक अगर स्तुतीनें युक्त कसेंही असूं शकेल असें मानूं लागले. अधिकारादपेतस्य वस्तुनोऽन्यस्य या स्तुतिः ।
अप्रस्तुतप्रशंसेति सा चैवं कथ्यते यथा ॥

या व्याख्येवरून भामहानें प्रशंसा याचा अर्थ स्तुति असाच घेतला आहे. 'अधिकाराबाहेरील वस्तूच्या स्तुतीनें (अप्रस्तुत गोष्टीच्या स्तुतीनें) दुसऱ्याची स्तुति करणें ती अप्रस्तुत प्रशंसा' असें भामह म्हणतो. उदाहरणार्थ,

जों जों होई छिन्न छिन्न तों मधुर मधुर तो ऊंस ।
शिव्या-शापही साहुनि जगतीं फलद करी पाऊस ॥

येथें प्रस्तुत वर्णन चांगल्या मनुष्याचें करावयाचें असून अप्रस्तुत जे ऊंस व पाऊस त्यांचीच स्तुति गाइली असल्यानें ही भामहाची अप्रस्तुत-प्रशंसा होईल. दण्डीनेंही प्रशंसेचा अर्थ स्तुति असाच घेतला आहे. त्याची व्याख्याः—

अप्रस्तुतप्रशंसा स्यादपक्रान्तेषु या स्तुतिः ।

---

१ मो. केका. २ भा. लं. ३·२८ ३ दिळकांची कविता. ४ का. द. २·३४०.

दण्डीनें उदाहरणही स्तुतियुक्तच दिलें आहे. पूर्वीं समासोक्ति प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें अप्रस्तुतप्रशंसेची याची व्याख्या पाहिल्यावर याची समासोक्ति व अप्रस्तुतप्रशंसा मिळून पुढील लोकांची स्तुतिनिन्दात्मक अप्रस्तुतप्रशंसा होते. कारण त्याच्या समासोक्तींत निन्दा अगर स्तुति कांहींच नसून अप्रस्तुतवर्णनानें अभिप्रेत अर्थ लक्षांत येतो व अप्रस्तुतप्रशंसेंत अप्रस्तुतवर्णनानेंच पण केवल स्तुतियुक्त प्रस्तुत अर्थ निघतो. वस्तुतः समासोक्ति व अप्रस्तुत प्रशंसा या एकमेकींच्या अगदीं विरुद्ध आहेत. समासोक्तींत प्रस्तुतांतून अप्रस्तुत अर्थ निर्माण होतो पण तसा अर्थ निर्माण करण्याचा उद्देश नसतो. अप्रस्तुतप्रशंसेंत अप्रस्तुतांतून प्रस्तुतार्थ सहेतुक निर्माण केलेला असतो. दण्डीनें 'वस्तु किंचिदभिप्रेत्य' असें समासोक्तीच्या व्याख्येंत म्हटलें आहे. त्यामुळें अर्थनिर्मिति हेतुपुरःसर केली आहे असा उघड अर्थ होतो. प्रस्तुत गोष्ट कोणती आहे यावरून समासोक्ति अथवा अप्रस्तुतप्रशंसा ओळखतां येईल. उद्भटानेंही स्तुति हा शब्द कायम ठेवला आहे. त्याची व्याख्या, अधिकारादपेतस्य वस्तुनोऽन्यस्य या स्तुतिः।
अप्रस्तुतप्रशंसेयं प्रस्तुतार्थानुबंधिनी ॥[2]

उद्भटानें सर्वच व्याख्या भामहाची घेऊन भामहांतील दुसऱ्या ओळीचें अंत्यार्ध बदलून 'प्रस्तुतार्थानुबन्धिनी' हें पद घातलें. त्यामुळें व्याख्या अधिक स्पष्ट झाली व प्रस्तुत अर्थाला लागू पडेल असें अप्रस्तुताचें वर्णन करणें असा अर्थ तींत आला. पण यानेंही स्तुति हा शब्द सोडला नाहीं.

वामन--किंचिदुक्तावप्रस्तुतप्रशंसा[3]।

८. वामनाची व्याख्या अगदींच निराळी आहे. 'उपमेयाबद्दल किंचित् सांगणें' म्हणजे प्रस्तुत थोडें सांगून अप्रस्तुताचें अधिक वर्णन करणें व त्यांत अप्रस्तुताची प्रशंसा करणें म्हणजे अप्रस्तुतप्रशंसा असें वामन म्हणतो; पण वामनानें अप्रस्तुत प्रशंसेचें म्हणून दिलेलें पुढील उदाहरण अतिशयोक्तीचें होत आहे.

लावण्यसिंधुरपरैव हि केयमत्र[4]।
यत्रोत्पलानि शशिना सह संप्लवन्ते।
उन्मज्जति द्विरदकुम्भतटी च यत्र।
यत्रापरे कदलिकाण्डमृणालदण्डाः ॥

यांत लावण्यसिंधु हें रूपक असून इतर अतिशयपूर्ण वर्णन आहे. या दृष्टीनें हें उदाहरण अप्रस्तुतप्रशंसेचें होत नाहीं. रुद्रट अप्रस्तुतप्रशंसेलाच अन्योक्ति हें नांव देतो. त्याची व्याख्याः--

---

१ का. सा. ५·५९. २ का. सा. स. ५·५९. ३ का. सू. ४·३·४. ४ का. सू. ४·३.

असमानविशेषणमपि यत्र समानेति वृत्तमुपमेयम्
उक्तेन गम्यते परमुपमानेनेति सान्योक्तिः[1]।

यानें समासोक्तींत समानविशेषण व अप्रस्तुतप्रशंसेंत असमानविशेषण असतें एवढाच या दोन अलंकारांत फरक केला आहे "जेव्हां विशेषणें सारखीं असतां अगर नसतां उक्त उपमानाप्रमाणें उपमेय वाटतें म्हणजे उपमानावरून उपमेय कळतें, तेव्हां अप्रस्तुतप्रशंसा होते." समासोक्तींत विशेषणसाम्याला अधिक महत्व आहे. अप्रस्तुतप्रशंसेंत असमान विशेषणें असतांही उपमानावरून उपमेय सूचित होणें याला महत्त्व आहे असें रुद्रटाचें म्हणणें दिसतें. अन्योक्ति हा शब्द यानें अप्रस्तुतप्रशंसेला वापरला याचें कारण 'अन्य' हा शब्द 'प्रस्तुतादन्य' या अर्थी घातला आहे. 'प्रस्तुतादन्यस्य उक्ति' म्हणजेच अप्रस्तुताबद्दल उक्ति यासाठीं अन्योक्ति हा शब्द बराचसा रूढ आहे.

मम्मटः-- [2]अप्रस्तुतप्रशंसा या सा सैव प्रस्तुताश्रया।

९. 'अप्राकरणिक सांगून प्राकरणिक व्यंजित करणें म्हणजे अप्रस्तुतप्रशंसा.' मम्मटानें या अलंकाराचे पांच भेद केलेः-(१) कार्य (२) निमित्त (३) सामान्य (४) विशेष (५) तुल्य हीं प्रस्तुत असतां अनुक्रमें अप्रस्तुत (१) निमित्त (२) कार्य (३) विशेष (४) सामान्य (५) तुल्य सांगणें. यांपैकीं पांचवा प्रकार श्लेष, समासोक्ति अगर सादृश्यानेंही सांगतां येतो. आतां या भेदांचीं उदाहरणें पाहूंः—

रामा[3]! जे सगरान्वयीं उपजले राजे धरामंडळीं।
त्यांचें सद्यश आजुनी प्रकट तें आहेचि सर्वां स्थळीं।
एकें निर्जर रक्षिले सुरनदी एकें जगीं आणिली।
एकें दीर्घशिलोच्चयें विरचिला अक्षोभ्य सेतू जळीं॥

येथें रामाला यशोराशि कां म्हणावयाचें हें कारण प्रस्तुत आहे पण सगर कुलांतील राजांनीं केलेलें कीर्तिप्रद कार्य हें अप्रस्तुत असतां दिलें आहे. म्हणून ही दुसऱ्या प्रकारची अप्रस्तुतप्रशंसा झाली.

[4]अप्राज्ञेन च कातरेण च गुणः स्याद्भक्तियुक्तेन कः।
प्रज्ञाविक्रमशालिनोऽपि हि भवेत्किं भक्तिहीनात्फलम्।
प्रज्ञाविक्रमभक्तयः समुदिता येषां गुणा भूतये।
ते भृत्या नृपतेः कलत्रमितरे संपत्सु चापत्सु च॥

यांत राक्षसाचें म्हणजे विशेषाचें वर्णन प्रस्तुत असतां अप्रस्तुत सामान्यवर्णन केल्यानें ही चौथ्या प्रकारची अप्रस्तुतप्रशंसा झाली.

कंठीं[5] अडकलिया फांसा। तोंड पसरी गोड घांसा।
कीं सुळीं ओंपलिया माणसा। अंगभोग कायसे॥

---

१ का. लं. ८.७३. २ का. प्र. १०.१५१. ३ श्रीरामकर्णामृत ३८. ४ मुद्राराक्षस ५ मृ. भारीत.

येथें धृतराष्ट्राला इतकें ऐश्वर्य मिळालें असतां तूं दुःखी कां असें विचारलें असतां त्यानें सादृश्यानें वस्तुस्थिति सांगितली म्हणून ही पांचव्या प्रकारची अप्रस्तुतप्रशंसा होय. केलें पात्र सुवर्णाचें कीं विरूपशि खापरी।

लावितां तेथ संहारी तमदीपशिखापरि ॥

येथें मराठी व संस्कृत यांच महत्त्व ही सामान्य गोष्ट प्रस्तुत असतां ती विशेषानें सांगितली म्हणून हा तिसरा भेद झाला.

समर्थ पावतां तेजोहानि । आकाश भरलें नक्षत्रगणीं ।

हास्यविनोदें गर्जोनी। क्रीडा करिती रात्रिंचरें ॥

ही श्लेषानें अप्रस्तुत प्रशंसा झाली. समर्थ याचा उपयोग सूर्य या अर्थीं केला आहे. तसेंच समर्थ ह्मणजे समर्थ पुरुष हाही अर्थ होतो. नक्षत्र-गणीं म्हणजे तारका-समूहांत या एका अर्थाशिवाय न-क्षत्रगणीं म्हणजे भ्याड लोकांत असाही अर्थ होतो. एकंदरींन समर्थ पुरुष नाहींसा झाला असतां भ्याड लोक जमनात व राक्षसी पुरुष हास्य विनोदानें करमणूक करतात असा प्रस्तुतार्थ निघेल. तेव्हां श्लेषानें तुल्यार्थ दाखविणारा हा पांचवा प्रकार झाला.

वाच्यार्था अप्रस्तुतप्रशंसेंतून ( १ ) अनध्यारोप ( २ ) अध्यारोप ( ३ )अंशमान अध्यारोप यामुळें प्रतीयमाना अप्रस्तुतप्रशंसा होत असते. अशा रीतीनें मम्मटानें पुष्कळ भेद केले आहेत; तसेच रुय्यकानेंही केले आहेत. रुय्यक—

अप्रस्तुतात्सामान्यविशेषभावे कार्यकारणभावे सारूप्ये च प्रस्तुतप्रतीतावप्रस्तुतप्रशंसा॥[३]

'अप्रस्तुत गोष्टींतून सामान्य विशेषभाव, कार्याकारणभाव आणि सारूप्य या योगें प्रस्तुत गोष्ट कळणें याला अप्रस्तुत प्रशंसा ह्मणावें. अप्रस्तुतप्रशंसेचे १ कार्यकारण २ कारण-कार्य ३ सामान्यविशेष ४ विशेषसामान्य ५ सारूप्य. हे मुख्य भेद असून सारूप्याचे साधर्म्य व वैधर्म्य असे दोन भेद होतात.

१०. रुय्यकानें वाच्य अप्रस्तुतप्रसंशेचे (१) संभव (२) असंभव (३) उभयरूप हे तीन भेद व शिवाय श्लेषानें होणारा भेद दिले आहे मम्मटापेक्षां वैधर्म्याचा एक भेद रूय्यक अधिक मानतो. मम्मटाचें 'राजन् राजसुता'[५] हें उदाहरण पर्यायोक्ताचें होतें असें रुय्यकाला वाटलें ह्मणून स्वतःचें 'इन्दुर्लिप्त इव'[४] हें उदाहरण त्यानें दिलें आहे पण तेंही अप्रस्तुतप्रशंसेचें होत नाहीं असें दिसेल.

विद्याधरः—[६]सामान्यविशेषत्वे सारूप्ये कार्यकारणत्वे च ।

अप्रस्तुतप्रशंसा निर्दिष्टा प्रस्तुतस्य गम्यत्वे ॥

विद्याधरानें फक्त पांचच भेद मानले आहेत. पोटभेदांत तो शिरला नाहीं.

---

१ मो. रामायण. २ मु. सौ. पर्व. १·२७. ३ अ. सू. ३४. ४ ए. ८·२७. ५ अ. सू. २७. ६ अ. सू. २४.

विश्वनाथः—क्वचिद्विशेषः सामान्यात्सामान्यं वा विशेषतः।
कार्यान्निमित्तं कार्यं च हेतोरथ समात्समम्।
अप्रस्तुतात्प्रस्तुतं चेद्गम्यते पञ्चधा ततः॥

विश्वनाथानें अप्रस्तुतप्रशंसेचे रुय्यकाप्रमाणेंच भेद केले आहेत.

अप्पय्यदीक्षितः—अप्रस्तुतप्रशंसा स्यात्सा यत्र प्रस्तुताश्रया॥

जगन्नाथः—अप्रस्तुतेन व्यवहारेण सादृश्यादिवक्ष्यमाणप्रकारान्यतमप्रकारेण प्रस्तुतव्यवहारो यत्र प्रशस्यते साप्रस्तुतप्रशंसा॥

११. अप्पय्यदीक्षितानें मुख्य पांच भेद केले आहेत व जगन्नाथानें सर्व भेद मान्य केलेले दिसतात. मम्मटानें समासोक्त्यनुग्राहिका अप्रस्तुतप्रशंसेचें 'येनास्याभ्युदितेन०' हें दिलेलें उदाहरण चुकीचें आहे असें जगन्नाथाचें मत आहे. तो म्हणतो अप्रस्तुतप्रशंसा व समासोक्ति हीं परस्पर विरुद्ध. दोंकें अनुग्राह्य अनुग्राहक या नात्यानें राहणें अशक्य आहे. त्या उदाहरणांत समासोक्ति आहे, अप्रस्तुतप्रशंसा नाहीं. सादृश्यावरून होणाऱ्या अप्रस्तुतप्रशंसेचे अनेक भेद होतील असें जगन्नाथाचें मत आहे. अप्पय्यदीक्षितानें प्रस्तुतांकुर या नांवाचा अलंकार मानला आहे.

प्रस्तुतेन प्रस्तुतस्य द्योतने प्रस्तुतांकुरः।

'प्रस्तुत वर्णनानें प्रस्तुत अर्थ स्पष्ट होतो तेव्हां प्रस्तुतांकुर होतो.' या अलंकाराबद्दल यावर जगन्नाथ म्हणतो, अप्रस्तुतप्रशंसा म्हणजे अप्रस्तुताची प्रशंसा असें नसून अप्रस्तुतानें प्रशंसा म्हणजे अप्रस्तुतप्रशंसा होय. प्रस्तुतार्थानें इष्ट प्रस्तुतार्थाचें प्रकाशन यांतही अप्रस्तुतप्रशंसाच आहे. तो निराळा अलंकार मानून अलंकाराचें अशा रीतीनें होणारें आनन्त्य पाहिलें असतां यत्किंचित् फरकानें दुसरा अलंकार मानणें बरोबर नाहीं.

१२. या एकंदर प्रकारांवरून व व्याख्यांवरून असें दिसतें कीं प्रशंसा याचा अर्थ रुद्रटानें प्रथम बदलला कारण अन्योक्ति म्हणण्यांत प्रशंसा असा अर्थ येत नव्हता. रुद्रटानंतर स्तुतिनिन्दा वगैरे कांहींही सांगणें याला प्रशंसा समजूं लागले व अर्थातच समासोक्तीप्रमाणें अप्रस्तुतप्रशंसेचेंही क्षेत्र बरेंच व्यापक झालें.

आतां पर्यायोक्त व अप्रस्तुतप्रशंसा यांत भेद काय आहे तो पाहिला पाहिजे कार्यापासून कारण प्रतीत होणें व वाच्यवाचकांशिवाय बोलणें यांत फरक आहे. स्पष्टपणें कारण प्रस्तुत असून कार्याचें कथन असेल, तेव्हां अप्रस्तुतप्रशंसा एरवीं पर्यायोक्त अलंकार होईल. या दृष्टीनें मम्मटाचें 'राजन् राजसुता०' हें उदाहरण पर्यायोक्ताचेंच होईल. ज्या ठिकाणीं वाच्यार्थ त्याच तऱ्हेचा दुसरा अर्थ प्रगट

---

१ १० ५८–५९ सा. द. २ कु. ६६ ३ र. गं. ४०२ पान. ४ कु. (२८) ६७

करतो तेव्हां पर्यायोक्त अलंकार होतो व प्रस्तुताकरितां अप्रस्तुत गोष्टीचें वर्णन असतें तेव्हां अप्रस्तुतप्रशंसा होते. रुय्यकानें अशा रीतीनें अप्रस्तुतप्रशंसा व पर्यायोक्त यांत अंतर सांगितलें आहे.

कोरी स्वच्छ सफेत कागद कुणी शाईप्रती हांसला ।
शाई जाउनि काळवंडुनि तिनें स्वप्राणची कोंडिला ।
लज्जेनें न हसें करून, अथवा काळेंही ना फांसुनी ।
हास्यातें, लिहिते कशी विमलशी हीं अक्षरें लेखणी ॥

येथें कागदाचे ठिकाणीं हांसणें ही क्रिया असंभवनीय असून कागदावर हांसण्याचा आरोप केला आहे. तद्वतच शाईचें ठिकाणीं लज्जा इत्यादि विकारही संभवनीय नाहींत तरी त्यांचा आरोप केल्यामुळें ही वाच्यांतून प्रतीयमान होणारी अध्यारोपा अप्रस्तुतप्रशंसा झाली.

## ४ अर्थान्तरन्यास.

१३. अर्थान्तरन्यास म्हणजे दुसरा अर्थ ठेवणें किंवा एक अर्थ सांगून त्यावरून दुसरा अर्थ सांगणें.

भामहः—उपन्यसनमर्थस्य यदर्थस्योदितादृते ।
ज्ञेयः सोर्थान्तरन्यासः पूर्वार्थानुगतो यथा ॥[1]

सांगितलेल्या अर्थाहून निराळा पण त्यासारखाच असा अर्थ सांगणें याला अर्थान्तरन्यास म्हणतात. याशिवाय आणखी एक अर्थान्तरन्यास त्यानें मानला तो असा.—

हि शब्देनापि हेत्वर्थप्रथनादुक्तसिद्धये ।
अयमर्थान्तरन्यासः सुतरां व्यज्यते यथा ॥[3]

'बोललेल्या अर्थाची सिद्धता करण्यासाठीं हि शब्द घालून हेत्वर्थ सांगणें याला अर्थान्तरन्यास म्हणावें.'

भामहानें पहिल्या अर्थान्तरन्यासाचें दिलेलें उदाहरण विशेषावरून सामान्य अर्थ सांगणें हा जो अर्थान्तरन्यासाचा प्रकार त्याचें आहे. दुसरें उदाहरण प्रारंभीं दिलेल्या अर्थातील केवळ हेत्वर्थ काढणारें आहे. अर्थान्तरन्यासाचीं उदाहरणें:—

तरुवर[4] सुफलांच्या आगमें नम्र होती
जलदहि जलभारें खालती फार येती ।
सुपुरुष विनयातें भाग्य-कालीं धरीती
उपकृति करित्यांची जाणिजे हीच रीती ॥

१ कांहीं तरी. २ भा. लं. २.७१. ३ भा. लं. २.७३. ४ भ. नी. वामन.

या उदाहरणांतील पहिल्या तीन ओळींत व्यवहारांत दिसणाऱ्या गोष्टी सांगून नंतर चौथ्या ओळींत सर्वांचें मर्म, अगर हेतु सांगितला आहे; म्हणून हें दुसऱ्या अर्थान्तरन्यासाचें उदाहरण झालें.

> होती अत्युग्र कृत्या परि करुनि तिचा घात दावी प्रतापा।
> जेव्हां तें चक्र, पावे बहुत निरखितां त्यातदा विप्रतापा॥
> प्राण-त्राणार्थ धैर्य त्यजुनि मुनि पळे सत्तपःसंपदेतें।
> वेंची व्यर्थ क्षणांत, प्रभु-जनिं रचिलें वैर तें कंप देतें॥[1]

यांत विशेषावरून शेवटचा सामान्यार्थ सांगितला म्हणून हा पहिल्या प्रकारचा अर्थान्तरन्यास झाला. भामहानें अर्थान्तरन्यासाच्या पहिल्या प्रकारांत उक्तार्थ व उक्तार्थाशिवाय सांगितला जाणारा तत्सम अर्थ यांत कोणत्या तऱ्हेचा संबंध असावा हें सांगितलेलें नाहीं; पण दुसऱ्या अर्थान्तरन्यासांत मात्र 'उक्तसिद्धये हेत्वर्थप्रथनात्' म्हटल्यानें समर्थ्यसमर्थक भाव सूचित केला आहे. त्यामुळें भामहानें दिलेल्या उदाहरणाकडे न पाहतां त्याच्या पहिल्या भेदाच्या केवळ व्याख्येकडेच पाहून उदाहरण दिलें तर तें दृष्टान्ताचेंही होण्याचा संभव आहे.

दण्डीः— ज्ञेयः सोर्थान्तरन्यासो वस्तु प्रस्तुत्य किंचन।
तत्साधनसमर्थस्य न्यासो योऽन्यस्य वस्तुनः॥[2]

१४. दण्डीनें अर्थान्तरन्यासाचे आठ भेद केले आहेत (१) विश्वव्यापीः-सर्व पदार्थमात्रांना लागू पडणारा अर्थ समर्थक म्हणून देणें. उदाहरणार्थ,

> खल्वाट चंडकिरणें अतितप्त झाला।
> छायार्थ ताल-तरु-मूल-समीप गेला॥
> तत्काल थोर पडलें फल, तो निमाला।
> ये जेथ दैव-हत येईल तेथ घाला॥[3]

(२) विशेषस्थः—विशिष्ट ठिकाणीं लागू पडणारा. याचें उदाहरण पूर्वीं दिलेलें 'तरुवर सुफलांच्या' हें होईल.

(३) श्लेषयुक्तः—श्लेषानें अर्थान्तरन्यास निघणें. श्लेषानें होणारा अर्थान्तरन्यास हा कित्येक वेळां अर्थान्तरन्यास न होतां सर्वस्वीं बदल होऊन दुसराच अलंकार होण्याचा संभव आहे.

(४) विरोधवान् अर्थान्तरन्यासाचें दण्डीनें दिलेलें उदाहरणः—

जगदानन्दयत्येष मलिनोऽपि निशाकरः।
अनुगृह्णाति हि परान् सदोषोऽपि द्विजेश्वरः॥[4]

यांत द्विजेश्वर शब्दावर श्लेष आहे. त्याचा 'चंद्र' हा अर्थ घेतला तर पुनरुक्तत्वाचा दोष येत आहे. 'ब्राह्मण' असा अर्थ घेतला तर दुसऱ्या

---

१ मो. अंबरीषाख्यान. २ का. द. १०६ ३ भ. ना. वामन. ४ का. द. २.१७५.

ओळीला पहिली पोषक होईल समर्थक होणार नाहीं. कारण ज्या अर्थाचीं न्यास करावयाचा तो समर्थन करण्याइतकाच सबळ पाहिजे तसा दुसरा अर्थ नाहीं. पहिल्या व दुसऱ्या ओळींत सामान्य व विशेष असे दोन तऱ्हेचे अर्थ नसून दोन्ही एकाच स्वरूपाचे आहेत. या दृष्टीनें ही प्रतिवस्तूपमाच झाली. मग ती विरोधगर्भा पाहिजे तर म्हणावी.

( ५ ) अयुक्तकारी अर्थान्तरन्यासांत वाईट गोष्टीपासून फळ वर्णिलेलें असतें याचें उदाहरण 'होती अत्युग्र कृत्या०' हें होईल.

( ६ ) युक्तकारी अर्थान्तरन्यासाचें दण्डीचें उदाहरणः—

अयं मम दहत्यङ्गमम्भोजदलसंस्तरः ।
हुताशनप्रतिनिधिर्दाहात्मा ननु युज्यते ॥

यांत हुताशनप्रतिनिधि दाहात्मा आहे हें योग्यच आहे असें म्हटलें आहे म्हणून हा युक्तकारी अर्थान्तरन्यास. पण वास्तविक शीतोपचारही उष्ण असल्यानें हा विषम अलंकार होईल. यांत अर्थान्तरन्यास हा हेतूही नाही. यानंतर सातवा व आठवा प्रकार हे युक्तायुक्तकारी व विपर्ययार्थान्तरन्यास होत. त्यांचीं दण्डीनें उदाहरणें दिलीं आहेत त्यांपैकीं एक असें—

कुमुदान्यपि दाहाय किमङ्ग कमलाकरः ।
न हीन्दुगृह्येषूग्रेषु सूर्यगृह्यो मृदुर्भवेत् ॥

हें उदाहरण वस्तुतः वैधर्म्यानें होणाऱ्या दृष्टान्ताचें आहे. दण्डीचीं पुष्कळच उदाहरणें विरोधगर्भ अर्थान्तरन्यासाचीं झालीं आहेत; व त्याच्या भेदांचाही अवास्तव विस्तार झाला आहे.

१५. उद्भटः— समर्थकस्य पूर्वं चेद्वचोऽन्यस्य च पृष्ठतः ।
विपर्ययेण वा यत्स्याद्धिशब्दोक्त्यान्यथापि वा ॥
ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासः । प्रकृतार्थसमर्थनात् ॥

( १ ) आधीं समर्थक व नंतर समर्थ्य वचन वर्णिलें असून तो भाव 'हि' शब्दानें व्यक्त करणें ( २ ) समर्थक व समर्थ्य भाव 'हि' शब्दावांचून असणें. ( ३ ) आधीं समर्थ्य व नंतर समर्थक वचन असून यांत 'हि' शब्द असणें ( ४ ) आधीं समर्थक व नंतर समर्थ्य असून यांत 'हि' शब्द नसणें. यांत प्रस्तुत अर्थाचें समर्थन केल्यानें या प्रकारास अर्थान्तरन्यास म्हणावें.

उद्भटानें अर्थान्तरन्यासाच्या प्रकारांत समर्थ्य समर्थकांचीं स्थानें पालटलीं आहेत, त्यामुळें महत्त्वाचें कोणतें हा प्रश्न दर वेळीं येतो म्हणून त्यानें 'हा दृष्टान्ताहून निराळा समर्थ्य समर्थक भाव एवढेंच सांगितलें. पण याला दृष्टान्त व अर्थांतरन्यास या दोहोंतील बरोबर फरक दाखवितां आला नाहीं. याचा परिणाम असा

१ का. द. २·१७७. २ का. द. २·१७९. ३ का. सा. सं. २.२७–२८.

झाला आहे कीं उद्भटाच्या उदाहरणांत दृष्टान्तही दिसतो. अर्थान्तरन्यासांत प्रामुख्यानें सामान्य-विशेष भाव पाहिजे तो उद्भटानें दिला नाहीं.

खळें निंदिति म्हणुनि बुधें टाकावी काय हरिगुणा शक्ति?
दीर नणंदा जाचें साध्वी न त्यागिती स्वपति-भक्ति.॥[1]

हें उदाहरण उद्भटाच्या व्याख्येप्रमाणें अर्थान्तरन्यासाचें होऊं शकेल, कारण यांत पहिलें समर्थ्य व दुसरें समर्थक आहे. पण वास्तविक यांत बिंबप्रतिबिंब भाव असल्यानें हें दृष्टान्ताचें उदाहरण होईल. यावरून असें दिसतें कीं भामह-दण्डी-उद्भट यांना अर्थान्तरन्यासाची समर्पक व्याख्या करतां आली नाहीं. त्याचप्रमाणें वामनालाही करतां आली नाहीं.

१६. वामनः— उक्तसिद्धये[2] वस्तुनोऽर्थान्तरस्यैव न्यसनमर्थान्तरन्यासः " उक्तसिद्धीसाठीं अन्यार्थाचा न्यास म्हणजे अर्थान्तरन्यास. "

रुद्रट— धर्मिणमर्थविशेषं[3] सामान्यं वाभिधाय तत्सिद्ध्यै ॥
यत्र सधर्मिकमितरं न्यस्येत्सोऽर्थान्तरन्यासः ॥

" एकाद्या वस्तूंतील विशेष अगर सामान्य सांगून त्याच्या पुष्ट्यर्थ सधर्मी वस्तूंतील सामान्य अगर विशेष सांगणें याला अर्थान्तरन्यास म्हणावें." आतांपर्यंत सामान्य-विशेषभाव हा शब्दच कोणी वापरलेला नव्हता तो रुद्रटानेंच प्रथम वापरला. विशेषाचें सामान्यानें समर्थन असणें व सामान्याचें विशेषानें समर्थन असणें याचीं उदाहरणें यानें दिलीं आहेत व आणखी एक अर्थान्तरन्यास मुख्य मानून त्याचे दोन भेद केले आहेत:—

पूर्ववदभिधायैकं[4] विशेषसामान्ययोर्द्वितीयं तु ।
तत्सिद्धयेऽभिदध्याद्विपरीतं यत्र सोऽन्योयम् ।

विशेष अगर सामान्य प्रथमतः सांगून सामान्य अगर विशेष अनुक्रमें त्याच्या पुष्ट्यर्थ सांगणें हाही अर्थान्तरन्यास होय. हाच पुढील लोकांचा वैधर्म्यानें होणारा अर्थान्तरन्यास होय. या वैधर्म्यानें होणाऱ्या अर्थान्तरन्यासाचें दिग्दर्शन करण्याचा दण्डीनें प्रयत्न केला होता असें त्याच्या विरोधवान् व विपर्यय या अर्थान्तरन्यासावरून दिसतें; पण त्यांचीं उदाहरणें त्याचें म्हणणें पुढें मांडू शकलीं नाहींत. रुद्रटाचा प्रयत्न मात्र बराचसा यशस्वी झाला, कारण त्याच्या उदाहरणांत बिम्बप्रतिबिम्बभाव नसल्यानें तीं उदाहरणें दृष्टान्ताचीं नसून अर्थान्तरन्यासाचींच होत आहेत.

१७. मम्मटः— सामान्यं[5] वा विशेषो वा यदन्येन समर्थ्यते ।
यत्र सोऽर्थान्तरन्यासः साधर्म्येणेतरेण वा ॥

---

१ मो. रामायण. २ का. सू. ४·३·२१. ३ का. लं. ८·७९. ४ का. लं. ८·८२.
५ का. प्र. १०·१०९.

(१) सामान्य हें विशेषानें तसेंच(२) विशेष हें सामान्यानें समर्थन करीत असतां तें समर्थन, (३) साधर्म्यानें अथवा (४) वैधर्म्यानें सांगणें याला अर्थान्तरन्यास म्हणावयाचें. मम्मटानें रुद्रटाची व्याख्या सुसंघटित व थोडक्यांत मांडली; व अर्थान्तरन्यासाची व्याख्या भामहापासून रुद्रटापर्यंत घडतां घडतां रुद्रटानें बहुतेक पूर्णत्वास आणली व मम्मटानें शेवटचा सफाईचा हात दिला.

तोयाचें परि नांवही न उरतें संतप्त लोहावरी।
तें भासे नलिनीदलावरि पहा सन्मौक्तिकाचे परी।
तें स्वातीस्तव अब्धिशुक्तिपुटकीं मोतीं घडे नेटकें।
जाणा उत्तम-मध्यमाधम दशा संसर्गयोगें टिके॥

'हि'शब्दावांचून विशेषावरून सामान्यकथनाचें हें उदाहरण झालें. 'तरुवर सुफलांच्या' या उदाहरणांत विशेषावरून सामान्य 'हि' शब्दानें दाखविलें आहे. या 'हि' शब्दालाही रुद्रटानेंच रजा दिली. व मम्मटानें पुनः त्या शब्दाला रुजू होऊं दिलें नाहीं. त्याच्या उदाहरणांत 'हि' शब्द असला तरी त्यानें त्यावरूनच भेद पाडले नाहींत. पूर्वीच्या लोकांनीं या 'हि' शब्दाला महत्त्व देण्याचें कारण हेंही असेल कीं, त्यांना वैधर्म्यानें अर्थान्तरन्यास पाहिजे होता, कारण दण्डीनें हा अर्थान्तरन्यास देण्याचा प्रयत्न केला म्हणून त्यानें 'हि' शब्दानें भेद पाडले नाहींत.

दुर्बळ पौरुष सारें, कीं वांछित सर्वही न साधे या।
छेदी पार्थ कुठारें दैवबळें शालशाखि राधेया॥

येथें सामान्याचें विशेषानें समर्थन केलें आहे. यांत वैधर्म्य हें अनुक्त आहे. अर्थान्तरन्यास अप्रस्तुतप्रशंसा किंवा दृष्टांत यांत स्पष्टपणें फरक मम्मटाला करतां आला. समर्थ्यसमर्थकभावापेक्षां सामान्यविशेष भाव अधिक महत्त्वाचा आहे म्हणून सामान्यविशेषभाव व जुन्या ग्रंथकारांनीं आणलेला समर्थ्यसमर्थकभाव हे दोन्हीहि त्यानें आपल्या व्याख्येंत आणले.

रुय्यकः-सामान्यविशेष कार्यकारणभावाभ्यां निर्दिष्टप्रकृतसमर्थनमर्थान्तरन्यासः॥

**१८.** मम्मटानें अर्थान्तरन्यासाचे चारच प्रकार केले. रुय्यकानें कार्यकारकारणावरून दोन भेद पाडले. त्यांचे पुनः साधर्म्यवैधर्म्यानें दोन दोन भेद म्हणून आणखी चार भेदांची भर पाडल्यानें रुय्यकाचे आठ भेद झाले. यानें कार्याचें कारणानें समर्थन ज्यांत आहे असें उदाहरण दिलें आहे तें अर्थान्तरन्यासाचें नसून काव्यलिङ्गाचें वाटतें.

सहसा विदधीत न क्रियाम विवेकः परमापदा पदम्।
वृणुते हि विमृश्य कारिणं गुणलुब्धा स्वयमेव संपदः॥

---

१ वामन-भ. नी. २ मो. कर्णपर्व ६·२०. ३ अ. सू. ३५. ४ अ. सू. पान. १३१.

या उदाहरणांत काव्यलिङ्ग आहे कारण पहिल्या ओळींतील कार्याचें कारण दुसरें असून तीं दोन्ही निरपेक्ष नाहींत. अर्थान्तरन्यासाप्रमाणें त्या दोहोंत निरपेक्षता पाहिजे. कारणाचें कार्यानें समर्थन केल्याचें याचें उदाहरण ' पृथ्वि ! स्थिरीभव ' हें आहे. त्यांत निरपेक्षता नाहीं. तसेंच समर्थ्यसमर्थकभाव नसून त्यांत चौथी ओळ हेतुदर्शक असल्यानें तो काव्यलिङ्ग अलंकारच झाला.

विद्याधर:[1]— सामान्येन विशेष: सामान्यं वा यदा विशेषेण ।
कथित: समर्थ्यतेऽर्थो भवति तदार्थान्तरन्यास: ॥

यानें रुय्यकाचे कार्यकारणावरून होणारे चार भेद घेतले नाहींत. याचें कारण त्यांत काव्यलिंगाचा घोंटाळा होतो हेंच असावेंसें वाटतें.

विश्वनाथ:—सामान्यं[3] वा विशेषेण विशेषस्तेन वा यदि ।
कार्यं च कारणेनेदं कार्येण च समर्थ्यते ।
साधर्म्येणेतरेणार्थान्तरन्यासोऽष्टधा तत: ॥

रुय्यकाचें अंधानुकरण विश्वनाथानें पुष्कळ वेळां केलेलें दिसतें. त्याचप्रमाणें येथेंही रुय्यकानें कार्यकारणावरून केलेले भेद यानें मानले आहेत. त्यानें उदाहरणेंही रुय्यकाचींच घेतल्यानें रुय्यकावर आलेला आक्षेप साहजिकच यांच्यावरही येतो.

अप्पय्यदीक्षित:—उक्तिरर्थान्तरन्यास:[4] स्यात्सामान्यविशेषयो: ॥

अप्पय्यदीक्षितानें सामान्य आणि विशेष यांचें वर्णन करणारा तो अर्थान्तरन्यास होय असें म्हटलें आहे. याची व्याख्या अगदींच चाळणीसारखी झाली आहे. नुसतें सामान्य–विशेषांबद्दल बोलण्यानें अर्थान्तरन्यास होत नाहीं. तें कसें बोलावयाचें हेंही सांगावयास पाहिजे पण तें या व्याख्येंत सांगितलेलें नाहीं. दृष्टान्त, अप्रस्तुतप्रशंसा इत्यादिकांनही सामान्य व विशेष असूं शकेल. या दृष्टीनें याच्या व्याख्येंत शैथिल्य आलेलें दिसतें.

जगन्नाथ:— सामान्येन[5] विशेषस्य विशेषेण सामान्यस्य वा यत्समर्थनं तदर्थान्तरन्यास: ॥

१९. कार्यकारणभावानें होणारा अर्थान्तरन्यास बराचसा काव्यलिंगाच्या क्षेत्रांत जात असल्यानें तो भेद नको असें जगन्नाथही म्हणतो. जगन्नाथानें अर्थान्तरन्यासासारखाच पण ज्यांत इवादि प्रयोग आहे असा 'उदाहरण ' अलंकार मानला आहे. व त्यांत फरक आहे तो असा:—

विशेषवाक्यार्थ दोन प्रकारचा असतो ( १ ) अनुवाद्यांत अंशमात्र विशेष असणें व विधेयांश सामान्यगत असणें ( २ ) अनुवाद्यांश व विधेयांश या दोहोंसही

---

१ अ. स. पान १३२. २ ए. ८·२८. ३ सा. द. १०·६१।६२. ४ कु. (६१) १२०.
५ र. गं. ४७१.

विशेषत्व असणें. पहिली स्थिति उदाहरणालंकारांत असते व दुसरी अर्थान्तरन्या-सांत असते. त्याचें उदाहरणः—

उपकारमेव कुरुते विपद्गतः सद्गुणो नितराम्।
मूर्च्छां गतो मृतो वा निदर्शनं पारदोऽत्र रसः॥[1]

हें उदाहरणालंकाराचें उदाहरण म्हणून जगन्नाथानें दिलें आहे. याला उदाहरण म्हणण्याचें कारण तो असें देतो कीं, "यांत विशेषांश थोडा असून सामान्यगत विधेयच जास्त आहे. यांतील 'निदर्शनं पारदोऽत्र रसः' हीं पदें काढली काढलीं व 'रोगानपहरति पारदः सकलान्' असें म्हटलें कीं तो अर्थान्तरन्यास होईल. कारण यांत विधेय व अनुवाद्य दोन्हीही विशेषांश युक्त आहेत" आतां हा त्यानें दिलेला सूक्ष्म फरक महत्त्वाचा समजून उपमा व अर्थान्तरन्यास यांतून उदाहरणालंकाराला निराळा अलंकार समजणारा जगन्नाथ, व इतर ठिकाणीं डोळ्यांत तेल घालून 'या भेदांत वैचित्र्य नाहीं' 'या अलंकाराला निराळा मानण्याचें कारण नाहीं' असें कित्येक वेळां केवळ फरड्या लेखणीच्या जोरावर म्हणणारा जगन्नाथ एक असतील असें वाटत नाहींसें होतें. यानें मानलेला हा अलंकार जुन्या मताप्रमाणें उपमेचाच होईल व दण्डीनें उपमा दर्शविणाऱ्या शब्दप्रयोगांत 'निदर्शन' हा शब्द घातलाही आहे म्हणजे हा शब्द वापरून उपमा साधते असें तो दर्शवितो. वस्तुतः अर्थान्तरान्यासांतून या अलंकाराला सवता सुभा मिळावयास यांत निदर्शन हें पद फक्त निराळें आहे. जगन्नाथानें प्रस्तुतानें अप्रस्तुताचें व अप्रस्तुतानें प्रस्तुताचें समर्थन करणारीं उदाहरणें दिलींच आहेत, पण याशिवाय अप्रस्तुताचें अप्रस्तुतानें व प्रस्तुताचें प्रस्तुतानें समर्थन करणारें उदाहरणही त्यानें दिलें असून प्रस्तुतही आपाततः अप्रस्तुत कसें होऊं शकतें हें सांगितलें आहे. असो. अप्पय्यदीक्षितानें विकस्वर म्हणून एक अलंकार मानला आहे. परिकरानंतर परिकरांकुर, अप्रस्तुयप्रशंसेनंतर प्रस्तुतांकुर, तद्वतच अर्थान्तरन्यासानंतर हा विकस्वर अलंकार दिला असल्यानें परिकरांकुर प्रस्तुतांकुराप्रमाणेंच याची संभावना करावी लागणार.

'यस्मिन्[2] विशेषसामान्यविशेषाः स विकस्वरः'

म्हणजे आधीं विशेष सांगून त्याच्या पुष्ट्यर्थ सामान्य व पुनः त्याच्या पुष्ट्यर्थ विशेष सांगणें म्हणजे विकस्वर; याचें उदाहरणः—

अनन्त[3]रत्नप्रभवस्य यस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातम्।
एको हि दोषो गुणसंनिपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः॥

या उदाहरणांत वास्तविक अर्थान्तरन्यास व उपमा यांची संसृष्टि स्पष्ट आहे तसेंच कोणतेंही विकस्वराचें उदाहरण अर्थान्तरन्यास व उपमा

---

१ र. गं. ४७१. २ कु. (६२) १२२. ३ कु. पान १६२.

दृष्टान्तासारख्या कोणत्या तरी अलंकारामुळें होणारी संसृष्टीच ठरेल. तेव्हां इतर अलंकारांप्रमाणेंच अर्थान्तरन्यासाला हें विकस्वराचें शेंपूट चिकटविण्याचें कारण नाहीं. जगन्नाथ म्हणतो, " तदपि तुच्छम् ; ' उपकारमेव कुरुते ' इत्युदाहरणालंकारोक्तास्मदुदाहरणे प्राथमिकविशेषस्याभावात्त्वदुक्तो विकस्वरालंकारो न संभवतीति कश्चिदलंकारस्त्वया वाच्यः " अशा रीतीनें अप्पय्यदीक्षित जणुं उदाहरणालंकारच विकस्वर म्हणून स्वीकारतो असा जगन्नाथाला भास होऊन त्यानें त्याला मज्जाव केला; व त्याच्या विकस्वराला संसृष्टींत टाकून 'हा अलंकार नवीन स्वीकारणें योग्य नाहीं' असा नेहमींचाच शेरा दिला. पण जगन्नाथ अप्पय्यदीक्षितसारखाच घसरला आहे हें वरच्या उदाहरणालंकारावरून दिसतेंच आहे. असो. आतां अर्थान्तरन्यास व तत्सम कांहीं अलंकार यांतील फरक पाहूं:—

२०. अर्थान्तरन्यास व दृष्टांत या दोहोंत फरक म्हणजे दोहोंतही समर्थन असलें तरी अर्थान्तरन्यासांत सामान्य–विशेष व विशेष–सामान्य अशी रचना असते. दृष्टान्तांत सामान्य–सामान्य अगर विशेष–विशेष यांमध्यें प्रतिबिंबनच केलेलें असतें. अर्थांतरन्यासांत प्रतिबिंबन नसतें.

शल्य म्हणे रे सूता, बडबड करितोसि फार मद्यपसा ।
गुरु सागर बहु गर्जे, परि मुनिचा लेशही भरे न पसा ॥[1]

येथें वैधर्म्यानें दृष्टांत आहे. कर्णाच्या बडबडीचा पोकळपणा व अर्जुनाचा मोठेपणा हा पुढील अर्धांत प्रतिबिंबित केला आहे. सागराची बडबड ही अगस्तिमुनीपुढें रद्द ठरली. यांत दोन्हीही विशेष गोष्टी असून त्यांत पहिली प्रस्तुत व दुसरी अप्रस्तुत आहे. पहिल्यांसारखेंच साधर्म्य दुसऱ्या ठिकाणीं उपमावाचक शब्द न घालतां अर्थानें प्रतिबिंबित केलें आहे. अर्थान्तरन्यासाचें उदाहरणः—

देवा कुमार आला सोडविल्या धेनु पळविलीं कटकें[3] ।
न वय प्रमाण तेजस्वि–जनीं म्हणती कवी न तें लटकें ॥

यांत पहिल्या ओळींत विशेष सांगून दुसरींत सामान्य सांगितलें आहे. यांत बिम्बप्रतिबिंबन नाहीं. अर्थान्तरन्यासांत विशेषसामान्यांपैकीं एक सूत्रमय असून तें सूत्र निर्माण करणारी गोष्ट म्हणजेच विशेष गोष्ट ही आधीं किंवा नंतर दिलेली असते. दृष्टान्तांत सूत्र नसतें. त्यांत 'हें जसें विशेष आहे तसेंच हेंही विशेष आहे' असें वर दिलेल्या उदाहरणाप्रमाणेंच सांगितलेलें असतें; अगर सामान्या–सामान्यांतही हीच गोष्ट सांगतात. अर्थान्तरन्यास अगर दृष्टान्त या दोहोंतही सामान्य अथवा विशेष सांगणारीं वाक्यें निरपेक्ष किंवा स्वतंत्र असतात. दृष्टो अन्तो यस्मिन् म्हणजे ज्यांत प्रथम उल्लेखिलेल्या गोष्टींचा अंत म्हणजेच स्वरूप बघावयाचें

---

१ र. गं. ४७४. २ मो. कर्णपर्व १०१. १ मो. उत्तर गोग्रहण. १६.

तो दृष्टान्त व अर्थान्तराचा न्यास बोधमय अगर सूत्रमय तत्त्व सांगून करणें तो अर्थान्तरन्यास होय.

**२१.** वस्तुतः काव्यलिङ्ग व अर्थान्तरन्यास यांचा संबंध रुय्यकानें जोडला व त्याचें कारण अर्थान्तरन्यासांत त्यानें कार्यकारणभाव आणला हें होय. त्यामुळें जरी हा प्रकार रुय्यक-विश्वनाथाशिवाय कोणी मानला नसला तरी त्या दोघांनीं मानला आहे म्हणून त्यांच्या मतें होणारा फरक आपण पाहिला पाहिजे. काव्यलिङ्गांत मुख्य गोष्ट कार्य कारणाची सापेक्षता. ही सापेक्षता गुप्तरीत्या असते. अर्थान्तरन्यासांत सापेक्षता नसतेच. म्हणून कार्यकारणभावाचा संबंध अर्थान्तरन्यासांत आणतां उपयोगी नाहीं. कार्यकारणभाव म्हटलें कीं सापेक्षता आलीच. रुय्यकाचीं या अर्थान्तरन्यासाचीं उदाहरणें निश्चित काव्यलिंगाचींच आहेत तरी त्या सारख्याच दुसऱ्या उदाहरणांनीं त्यांतील सूक्ष्म फरक पाहूं:—

यां निजगुरुपुत्रानें आधीं अतिथ्य योग्य मज वाटे ।
कार्य शनव्यासंगीं न त्यागावेंचि साधुच्या वाटे ॥[1]

यांत दुसरी ओळ सूत्रमय आहे. पहिल्या ओळींत विशेष व दुसऱ्या ओळींत सामान्य आहे. तरीही पहिलें वाक्य सापेक्ष असल्यानें त्याला कारण पुरवावें लागलें व तेंच दुसरी ओळ होय. तिच्यामध्यें सांगितलेल्या कारणानें पहिल्या ओळींचें समाधान झालें. यांत गुप्त सापेक्षता आहे. म्हणून इतर गोष्टी हजर असतांही हें काव्यलिंगाचें उदाहरण झालें.

सिंहाचा जो बाल तोही चपेटा
मारी त्याला जो करी मत्त मोठा ।
तेजस्वी जे वृत्ति ऐशीच त्यांची
तेथें नाहीं चाड कांहीं वयाची ॥[2]

यांत पहिला विशेष दुसऱ्या सामान्यावर अवलंबून नाहीं. पहिल्यावरून सामान्य बोध सांगितला आहे. यांत कार्यकारणभाव मानला तरी तो निरपेक्ष आहे. तो न मानतांही अर्थान्तरन्यास होईल. कारण त्यांत सामान्यविशेषभाव किंवा समर्थ्य-समर्थकता आहे. वरील दोन्ही उदाहरणांवरून सापेक्षता व निरपेक्षता हाच या दोन अर्थालंकारांत फरक होय. पण तो न मानल्यास अर्थान्तरन्यास काव्यलिङ्ग होऊं लागेल.

**२२.** अर्थान्तरन्यास व विकस्वर यांकडे पाहतां पहिला शुद्ध असतो व दुसरा संसृष्टीतच होतो. विकस्वराचें अस्तित्व निराळें कसें राहूं शकत नाहीं हें मागें सांगितलेंच आहे.

---

१ मो. कर्णपर्व ११·१३. २ वामन-भ. नी. ३८.

त्वां केला अभिचार साधु–पुरुषीं जो तो तुला बाधला ।
कोणालाहि निजेष्ट–लाभ न सदुच्छेदोद्यमें साधला ॥
पाषाण स्वशिरीं पडेचि गगनीं मित्रासि जो हाणिला ।
कीं पाय ज्वलनीं जळेचि हृदयीं हा भाव कां नाणिला ॥

हें विकस्वराचें उदाहरण होईल. यांत पहिल्या तीन ओळींत अनुक्रमें विशेष, सामान्य, विशेष व चौथींत पुनः विशेष सांगितल्यामुळें हा विकस्वर झाला. पण वस्तुतः यांत पहिल्या दोन ओळींत अर्थांतरन्यास व शेवटीं दृष्टांत आहे म्हणून ही संसृष्टि होत आहे.

जगन्नाथाची उदाहरणाची व्याख्या:—सामान्येन निरूपितस्यार्थस्य सुखप्रतिपत्तये तदेकदेशं निरूप्य तयोरवयवावयविभाव उच्यमान उदाहरणम् ॥

"सामान्यानें सांगितलेल्या अर्थाचा नीट बोध होण्यासाठीं त्याचा एक भाग वर्णून सामान्य विशेषांचा अवयव—अवयवीभाव उच्यमान असणें यास उदाहरण म्हणावें." उच्यमान म्हणण्यानें जगन्नाथ अर्थान्तरन्यासाचें निवारण करूं पाहातो.

प्रभुसीं वैरहि करितां दुष्ट हि पावे प्रसिद्धिला लोकीं; ।
रामद्वेषी सीता दुःखद दशकंठ खळ जसा तो कीं ॥

येथें पहिल्या ओळींत सामान्याचें वर्णन पुढील ओळींत विशेष सांगून केलें आहे. उपमेंत सादृश्य असतें म्हणजे सामान्यविशेषभाव नसतो असें जगन्नाथ म्हणतो पण 'सादृश्यं सुंदरम् ' म्हणण्यांत सामान्य–विशेषांत सुंदर सादृश्य असलें तर त्याला उपमा म्हणतां येणार नाहीं असें नाहीं. सामान्य–विशेषालाच महत्व देऊन अलंकार मानणें झालें तर त्याला उदाहरण न म्हणतां उपमासहाय्यक अर्थान्तरन्यासच कां म्हणूं नये ? एवढाच निराळा अलंकार मानण्यास कारणही सबळ नाहीं. तेव्हां हा उदाहरणालंकार सादृश्यावरून उपमेंत घालणें युक्त नाहीं. अर्थान्तरन्यासोपमा असा पाहिजे तर उपमेचा भेद करावा किंवा यास अर्थान्तरन्यासच म्हणावें.

## ५ पर्यायोक्त.

**२३. पर्यायानें बोलणें म्हणजे सरळ न बोलतां वळणें घेत पण तेंच बोलणें, याला पर्यायोक्त म्हणतां येईल. भामहाची व्याख्या,**

---

१ मो. अंबरीषाख्यान. ७०. २ र. गं. २१३. ३ मो. कर्णपर्व. १०·११.

'पर्यायोक्तं यदन्येन प्रकारेणाभिधीयते'

'निराळ्या तऱ्हेनें बोलणें म्हणजे पर्यायोक्त' ही व्याख्या थोडी अस्पष्ट आहे. ती पुढें घटली असें दिसून येईल. उदाहरणः—

राजेंद्रा अमितौजा वीर युधामन्यु उत्तमौजा ही।
धर्मसहाय, स्वर्गीं जाले देवांस जांवई व्याही॥

येथें 'वीर मेले' एवढेंच सांगावयाचें तें 'देवांस स्वर्गीं व्याही झाले' असें आढे-वेढे घेत सांगितलें.

दण्डीः— अर्थमिष्टमनाख्याय साक्षात्तस्यैव सिद्धये।
यत्प्रकारान्तराख्यानं पर्यायोक्तं तदिष्यते॥

"इष्टार्थकथन न करतांही तोच अर्थ निराळ्या प्रकारानें सांगणें यास पर्यायोक्त म्हणतात." भामहापेक्षां ही व्याख्या अधिक स्पष्ट आहे.

उद्भटः— पर्यायोक्तं यदन्येन प्रकारेणाभिधीयते।
वाच्यवाचकवृत्तिभ्यां शून्येनावगमात्मना॥

भामहाच्या व्याख्येला दुसरी ओळ जोडून उद्भटानें ती यथायोग्य केली. "बोलावयाचें तें वाच्यवाचकाशिवाय सूचकपणें निराळ्या तऱ्हेनें बोलणें." "जें सांगावयाचें तें प्रत्यक्ष न सांगतां निराळ्या तऱ्हेनें सुचविणें." म्हणजे पर्यायोक्त होतो. वाच्यवाचकावांचून असें म्हटल्यानें व्याजोक्ति अगर अप्रस्तुतप्रशंसा इत्यादि अलंकारांची व्यावृत्ति झाली. रुद्रटः—

वस्तुविवक्षितवस्तुप्रतिपादनशक्तमसदृशं तस्य।
यद्जनकमजन्यं वा तत्कथनं यत्स पर्यायः॥

"जी विवक्षित गोष्ट बोलावयाची ती सरळपणें सांगतां येत असतां त्या गोष्टीला असदृश असें कांहीं सांगून ती गोष्ट जन्यजनकत्वाशिवाय सांगणें." हा पर्याय प्रकार म्हणून रुद्रटानें मानला असला तरी इतरांच्या मतें तो पर्यायोक्तच होईल,

मम्मटः— पर्यायोक्तं विना वाच्यवाचकत्वेन यद्वचः।

उद्भटाचीच व्याख्या मम्मटानें अगदीं थोडक्यांत आणली आहे. या अलंकारांत व्यंग्यार्थ असला तरी तो शब्दानें सांगितलेला असतो असें यानें सांगितलें आहे.

रुय्यकः— गम्यस्यापि भङ्ग्यन्तरेणाभिधानं पर्यायोक्तम्।

विद्याधरः— यत्र व्यङ्ग्यस्य सतो हेतोः कार्याभिधानभङ्गीभिः।
स्यादभिधानं सुधियः पर्यायोक्तं विदुस्तदिदम्॥

---

१ भा. लं. ३.८. २ मो. कर्णपर्व ४.१६. ३ का. द. २.२९५. ४ का.सा.सं.४.४७. ५ का. लं. ७.४०. ६ का. प्र. १०.१७५. ७ अ. सू. ३६. ८ ए. ८.२१.

" जेव्हां हेतु हा व्यङ्ग्य असूनही निराळ्या तऱ्हेनें कार्यरूपें मांडला जातो तेव्हा पर्यायोक्त असें म्हणावयाचें. "

विश्वनाथः—पर्यायोक्तं यदा भङ्ग्या गम्यमेवाभिधीयते ॥[1]

अप्पय्यदीक्षितः— पर्यायोक्तं तु गम्यस्य वचो भङ्ग्यंतराश्रयम् ।[2]

जगन्नाथः— विवक्षितस्यार्थस्य भङ्ग्यन्तरेण प्रतिपादनं पर्यायोक्तम्[3]

२४ या सर्व व्याख्या पाहिल्या असतां त्यांत दोन पक्ष दिसतात. भामह, दण्डी, उद्भट, मम्मट व जगन्नाथ यांची व्याख्या पाहतां, बोलावयाचें तें निराळ्या तऱ्हेनें सांगावयाचें, वाच्यवाचकाचा त्यांत उल्लेख करावयाचा नाहीं; पण सांगितलेल्या शब्दांवरून जें सांगावयाचें तें मात्र सूचित व्हावयाचें याला पर्यायोक्त असें ते म्हणतात. रुय्यक व विश्वनाथाची दर्शनी व्याख्या याच अर्थाची आहे. विद्याधरानें कार्य-कारणभावावरून पर्यायोक्त मानला आहे. विश्वनाथानें व्याख्येंत कार्यकारण असे शब्द घातलेले नाहींत. तरी त्याच्या उदाहरणांत कार्यकारणभावच आहे. रुय्यक, विश्वनाथ,व अप्पय्यदीक्षित हे गम्यार्थाचें निराळ्या तऱ्हेनें अभिधान म्हणजे पर्यायोक्त असें म्हणतात. व मम्मट, विद्याधर, जगन्नाथ हे व्यंग्यार्थाला महत्त्व देतात.

भामहाची व्याख्या ही ज्याप्रमाणें अपूर्ण व दुसऱ्या अलंकारांना अवसर देणारी आहे त्याचप्रमाणें दण्डीची व्याख्याही तितकी योग्य झालेली नाहीं; कारण त्याच्या "प्रकारान्तरानें आख्यान" असें म्हणण्यांतही निराळे अलंकार पर्यायोक्तांत प्रवेश करतील, हा दोष प्रथम उद्भटानें नाहींसा केला. ' वाच्यवाचकवृत्तिभ्यां शून्येनाव-गमात्मना ' असें म्हणण्यानें इतर अलंकारांचा निरास करून प्रकारान्तरांत सूचकत्व पाहिजे असें त्यानें सांगितलें. प्रकारान्तरानें म्हणजेच शब्द-व्यापारानें इष्टार्थ कळविणें असें इन्दुराजानें उद्भटाच्या टीकेंत म्हटलें तरी तो शब्दव्यापार गम्यार्थ कीं व्यंग्यार्थ कीं अभिप्रेयार्थ हें त्यानें सांगितलें नाहीं. पण इन्दुराजाच्या लिहिण्याच्या झोंकावरून त्याला गम्यार्थ असेंच म्हणावयाचें आहे. उद्भटानें मात्र याबद्दल स्वतः कांहींच म्हटलें नाहीं.

२५ मम्मटानें आपल्या व्याख्येनंतर दिलेल्या टीकेंत, प्रकारान्तरानें सांगितलेली गोष्ट व्यंग्यार्थामुळेंच इष्टार्थ प्रतीत करते असें सांगितलें आहे. तो व्यंग्यार्थ कसा असावा याबद्दल तो म्हणतो कीं, तें व्यंग्यही शब्दानें सांगितलें जातें त्यामुळें जें सांगावयाचें तेंच व्यंग्य असतें; ज्या तऱ्हेनें तें व्यङ्ग्य होईल अशा रीतीनें तें सांगावयाचें नाहीं. त्याच्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं, वाच्यांतून व्यंग्य निघतें, व्यंग्य होईल अशा तऱ्हेनें वाच्य मांडावयाचें नाहीं. रुय्यक म्हणतो कीं गम्याचें अभिधान म्हणजे पर्यायोक्त. कारण एकच गोष्ट त्याच पद्धतीनें मांडून जरी वाच्य व गम्य होत नसली तरी गम्यापेक्षेनें निराळ्या तऱ्हेनें ती मांडतां येईल. आणि म्हणूनच कार्यादि

---

१ सा. द. १०६१. २ कु. (२९) ६९. ३ र. गं. ४०९.

द्वारानें अभिधान करून गम्यार्थ काढणें म्हणजे पर्यायोक्त. या ठिकाणीं कार्यादि प्रस्तुतच असल्यानें गम्यत्व असूनही अप्रस्तुत-प्रशंसेहून हा अलंकार निराळा होईल. हें जें याचें म्हणणें तेंच विद्याधरानें आपल्या व्याख्येंत गोंविलें आहे; पण विद्याधर व्यंग्यार्थानें इष्टार्थ काढणें याला पर्यायोक्त म्हणतो. पुनः विश्वनाथ गम्यार्थालाच पर्यायोक्तांत महत्त्व देतो. म्हणजे रुय्यक-विश्वनाथ हे कार्यकारणाचे कुंपणांत पर्यायोक्ताला ठेवतात. त्यांचें म्हणणें असें कीं, वाच्य हेंच गम्य होणें झाल्यास तें फक्त प्रस्तुत कार्यादि अगर कारणादि द्वारां होऊं शकेल म्हणून प्रस्तुत कार्यवर्णनानें प्रस्तुतच कारण गम्य असणें व प्रस्तुत कारणानें प्रस्तुतच कार्य गम्य असणें याला पर्यायोक्त म्हणावें. पण हें म्हणणें बरेंचसें विचित्र दिसतें. व त्यावर जगन्नाथानें सर्वांचें मंथन करून चांगला अभिप्राय दिला आहे. तो म्हणतो कीं, पर्यायोक्ताचे अनेक प्रकार असतील, हें व्यवहारांतही दिसतें. (१) प्रस्तुताचें वर्णन निराळ्या प्रकारानें करून प्रस्तुतच अर्थ कळणें व (२) प्रस्तुत कार्य-कारणानें प्रस्तुत कारण-कार्य कळणें, हे दोन्ही प्रकार पर्यायोक्तांत संभवतील; तेव्हां कार्य-कारणाचाच संबंध जोडण्यांत त्याचें क्षेत्र कमी केल्यासारखें होईल. हें जगन्नाथाचें म्हणणें बरोबर दिसतें.

पर्यायोक्तांत व्यंजनाव्यापार असतो कीं लक्षणाव्यापार असतो हा प्रश्न येतो. लक्षणेनें असतो त्याहून निराळा अर्थ ध्यानांत येतो. स्वसिद्धीसाठीं दुसऱ्याला घेणें किंवा दुसऱ्यासाठीं स्वतःला देणें हें कार्य लक्षणेनें होतें.

अर्थव्यंजकताः—

> वक्तृबोद्धव्यकाकूनां वाक्यवाच्यान्यसंनिधेः ।
> प्रस्तावदेशकालादेर्वैशिष्ट्यात्प्रतिभाजुषाम् ॥
> योर्थस्यान्यार्थधीहेतुर्व्यापारो व्यक्तिरेव सः ॥[1]

पर्यायोक्तांत प्रस्तुतांतून प्रस्तुतच निर्माण होत असल्यानें लक्षणेला अवकाश नसून व्यंजनेलाच आहे. जर त्यांत प्रस्तुताला अप्रस्तुतासाठीं किंवा अप्रस्तुताला प्रस्तुतासाठीं स्वत्व खर्च करावयाचें असतें, तर लक्षणेला वाव मिळाला असता, पण तसें नसल्यानें तेथें व्यंजनाव्यापारच आहे. वाच्य गोष्टीनें निघणारा अर्थ व्यंजनेनें सरळपणें लक्षांत येतो.

२६ पर्यायोक्त व अप्रस्तुतप्रशंसा यांतील फरक असाः—

पर्यायोक्तांत दोन्ही गोष्टी प्रस्तुत असतात. अप्रस्तुतप्रशंसेंत गम्य गोष्ट असते ती प्रस्तुत असते व वर्ण्य गोष्ट ती अप्रस्तुत असते. या दृष्टीनें मम्मटाचें 'राजन्

---

१ का. प्र. ३. २१-२२.

राजसुता०' हें उदाहरण पर्यायोक्ताचें होतें असें रुय्यक म्हणतो. पर्यायोक्ताचें उदाहरणः— शूर सकार शकारीं व्हाया दे द्विषदुरांत फटकारा ।

भट भीमेतर असता तरि तेव्हां रक्षिता नच टकारा ॥

दुर्योधनानें शत्रूच्या (भीमाच्या) उदरांत शूर शब्दांतील शकाराऐवजीं सकार होण्यासाठीं (शूर दुर्योधन हा सूर म्हणजे सूर्यासारखा वाटावा म्हणून) फटकारा हाणला. त्यावेळीं भीमा शिवाय इतर कोणी भट (योद्धा) असतां तर त्यानें भट या शब्दांतील टकाराचें रक्षण केलें नसतें. (भट मधून ट गेला कीं भ याचा अर्थ नक्षत्रें असा होतो. अन्य वीरानें भटत्व सोडून भता म्हणजे नक्षत्रता स्वीकारली असती. दुर्योधनरूप सूर्यापुढें नक्षत्र होणें म्हणजे फिकें पडणें. दुर्योधनानें इतका जोराचा फटकारा हाणला कीं भीमाशिवाय इतर योद्धा असता तर तो मूर्च्छितच झाला असता, एवढेंच यांत म्हणावयाचें आहे.)

## ६ व्याजस्तुति.

२७. व्याज म्हणजे मिष अगर निमित्त. व्याजानें स्तुति करणें याचा अर्थ कोणत्या तरी मिषानें स्तुति करणें; म्हणजे निन्दा ही स्तुतिरूप असणें असाही अर्थ होईल.

भामहः—दूराधिकगुणस्तोत्रव्यपदेशेन तुल्यताम् ।
किंचिद्विधित्सोर्या निन्दा व्याजस्तुतिरसौ यथा ॥

'दुसऱ्याच्या अधिक गुणांची स्तुति करण्याच्या निमित्तानें, त्याची बरोबरी करण्याची इच्छा करणाराची निन्दा करणें यास व्याजस्तुति म्हणावयाचें' ही भामहाची व्याख्या पुढील लोकांच्या व्याख्यांहून भिन्न आहे असें दिसतें. पण कोणत्या तरी निमित्ताला पुढें करून बरोबरी करूं पाहणाराची स्पष्ट निन्दा असून तिचें स्तुतीत पर्यवसान करणारें भामहाचें उदाहरण आहे.

रामः सप्ताभिनत्सालान् गिरिं क्रौञ्चं भृगूत्तमः ।
शतांशेनापि भवता किं तयोः सदृशं कृतम् ॥

यांत रामाची अगर भृगूत्तमाची बरोबरी करतांना त्यांचीच स्पष्ट निन्दा दुसऱ्या ओळींत केली आहे. म्हणजे भामहाच्या व्याजस्तुतीला प्रत्येक वेळीं (१) स्पर्धा करूं बघणारें व (२) ज्याशीं स्पर्धा करावयाची तें या दोन्ही गोष्टी आवश्यक आहेत. आणि भामहाच्या व्याख्येंतून निन्देचें स्तुतींत पर्यवसान होणें असा अर्थ निघत नाहीं. पण ही कल्पना दण्डीच्या व्याख्येंत बदललेली दिसते:—

यदि निन्दन्निव स्तौति व्याजस्तुतिरसौ स्मृता ।
दोषाभासा गुणा एव लभन्ते ह्यत्र सन्निधिम् ॥

---

१ मो. गदापर्व ३. १८. २ का. लं. ३·३० ३ का. लं. ३·३१. ४ का. द. २·३४३

" जेव्हां निन्दा करीत असतांच स्तुति होते तेव्हां व्याजस्तुति म्हणावें. या ठिकाणीं दोषांचा आभास हा गुणच दर्शित करतो." यानें श्लेषाविद्ध व्याजस्तुति देऊन त्याचे अनेक प्रकार होतील असें सांगितलें आहे. दण्डीची व्याख्या भामहाच्या व्याख्येपेक्षां पुष्कळच बदलेली दिसते.

उद्भटानें पुष्कळ वेळां भामहाची व्याख्या हुबेहुब घेतलेली असली तरी व्याजस्तुतीची व्याख्या त्यानें बदलून पुढें मांडिली.

शब्दशक्तिस्वभावेन यत्र निन्देव गम्यते।
वस्तुतस्तु स्तुतिः श्रेष्ठा व्याजस्तुतिरसौ मता॥[1]

" जेव्हां शब्दाच्या सरळ स्वभावानें ( अर्थानें ) निन्दा वाटत असतांही वस्तुतः ती स्तुतिच असते, तेव्हां व्याजस्तुति असें म्हणतात." दण्डीच्या " निन्दन्निव स्तौति " या शब्दांतील मर्म उद्भटानें " शब्दशक्तिस्वभावेन " या शब्दांत मांडलें आहे. अजूनपर्यंत निन्देचें स्तुतींत पर्यवसान एवढाच अर्थ होता पण रुद्रटाचे वेळेपासून तो बदलला. वामनानें निन्देचें स्तुतींत पर्यवसान असाच अर्थ केला आहे. वामनः—

संभाव्यविशिष्टकर्माकरणान्निन्दास्तोत्रार्था व्याजस्तुतिः॥[2]

याच्या व्याख्येवर पुष्कळशी भामहाची छटा दिसते. " विशिष्ट कर्म करण्याला समर्थ असतां विशिष्ट साम्यसंपादनानें निन्दा करतांना स्तुति होणें याला व्याजस्तुति म्हणावयाचें." यांतही साम्य दाखविण्याला दुसरी गोष्ट असून तिच्याशीं जिचें साम्य दाखवावयाचें त्या वस्तूची निन्दा करून त्या निंदेचें स्तुतींत पर्यवसान होणें अशींच स्थिति सांगितली आहे.

भामहानें निंदा उघड शब्दांत केल्यानें तेथें स्तुतीला अवकाशच नाहीं. वामनानें तशाच अर्थाचें उदाहरण पण किंचित् बदलल्यानें निंदा ही आपोआप स्तुति होत आहे. त्याचें उदाहरण,

बबन्ध सिंधुं गिरिचक्रवालैर्बिभेद सप्तैकशरेण तालान्।
एवंविधं कर्म ततान रामस्त्वया कृतं तन्न मुधैव गर्वः॥[3]

**१८.** वामनानें भामहाच्या व्याख्येला वळण लावलें. व उघड निंदा न करतां विशिष्ट शब्दरचनेनें किंवा शब्दव्यापारामुळें निंदा ही स्तुतींत पर्यवसित केली, त्यामुळें त्याची व्याजस्तुति इतरांसारखीच झाली. रुद्रटानें व्याजस्तुति हा शब्द न वापरतां श्लेषावर अधिष्ठित असलेल्या अलंकारांत व्याजश्लेष म्हणून अलंकार मानला आहे तो व्याजस्तुतीसारखाच आहे. श्लेषाविद्ध व्याजस्तुति हा दण्डीनें एक भेद केला आहे. तद्वतच याचा हा अलंकार होईलः—

---

१ का. सा. सं. ५·३०. २ का. सू. ४·३·२४. ३ का. सू. ४·३.

यस्मिन्निन्दा स्तुतितो निंदाया वा स्तुतिः प्रतीयेत ।
अन्या विवक्षिताया व्याजश्लेषः स विज्ञेयः ॥[1]

स्तुतीचें निंदेंत व निंदेचें स्तुतींत पर्यवसान होणें याला व्याजश्लेष म्हणावें असें रुद्रटानेंच प्रथम सांगितलें. 'व्याजयुक्त श्लेष' असा हा समास सोडवावा लागेल. ज्यांत युक्ति, कपट, कृत्रिमता आहे असा श्लेष तो व्याजश्लेष. वास्तविक हें नांव यथार्थ होत नाहीं; पण रुद्रटानें वास्तव, औपम्य, श्लेष व अतिशय या चार आधारांवर अलंकार ठेवल्यामुळें श्लेषाच्या सदरांत यणाऱ्या व्याजस्तुतीचा शिरच्छेद होऊन तिला दक्षासारखें श्लेषाचें मस्तक मिळालें. पण त्यामुळें तिचें खरें रूप पालटलें. पण मम्मटानें व्याजस्तुति हेंच नांव ठेवून स्तुतिनिंदा व निंदास्तुति हे रुद्रटानें आणलेले दोन प्रकार मात्र मान्य केले. त्याची व्याख्या,

व्याजस्तुतिर्मुखे निंदा स्तुतिर्वा रूढिरन्यथा ।[2]

व्याजस्तुतीचें उदाहरणः—

धर्मार्थ[3] एकें दातिलें स्थळ । काष्ठें आणुनी वोपितां अनळ ।
तुवां धावोनि उतावेळ । सुकृत-वांटा साधिला ॥

रुय्यकः—स्तुतिनिंदाभ्यां निंदास्तुत्योर्गम्यत्वे व्याजस्तुतिः॥[4]

विद्याधरः—यत्र प्रकान्तायां स्तुतौ कथंचित् प्रतीयते निंदा ॥
निंदायां स्तुतिरथवा सेयं व्याजस्तुतिर्द्विविधा ॥[5]

विश्वनाथः—उक्ता व्याजस्तुतिः[6] पुनः ।
निंदास्तुतिभ्यां वाच्याभ्यां गम्यत्वे स्तुतिनिंदयो॥

अप्पय्यदीक्षितः—उक्तिर्व्याजस्तुतिर्निंदास्तुतिभ्यां स्तुतिनिंदयोः ॥[7]

जगन्नाथः—आमुखप्रतीताभ्यां निंदास्तुतिभ्यां स्तुतिनिंदयोः
क्रमेण पर्यवसानं व्याजस्तुतिः ॥[8]

२९ या एकंदर व्याख्यांचा अर्थ एकच आहे. पण अप्पय्यदीक्षितानें व्याजस्तुतीचे भेद केले ते असे- ( १ ) एकाचीच स्तुति त्याच्याच निंदेंत पर्यवासित होणें ( २ ) एकाचीच निंदा त्याच्याच स्तुतींत पर्यवासित होणें (३) स्तुतीचा विषय भिन्न व निंदा भिन्न विषयाची असणें,( ४ ) निंदेचा विषय भिन्न व स्तुति भिन्न विषयाची असणें असे चार भेद अप्पय्यदीक्षितानें मानले आहेत. पण वास्तविक पहिल्या दोन भेदांशिवाय बाकीचे भेद व्याजस्तुतीचे न होतां अप्रस्तुतप्रशंसेनें आणि समासोक्तीनें होणाऱ्या संकरांत जातील. त्याचप्रमाणें स्तुतीचें निन्देंत पर्यवसान करणारें त्याचें उदाहरण त्या तऱ्हेचें होत नाहीं तें उदाहरण असेंः—

अर्धं दानववैरिणा गिरिजयाप्यर्धं शिवस्याहृतम् ।
देवेत्थं जगतीतले स्मरहराभावे समुन्मीलति[9] ।

---

१ का. लं. १·११ २ का. प्र. १०·१६९. ३ मु. हरिश्चंद्राख्यान ४ अ. सू. ३७.
५ ए. ८·३०. ६ सा. द. १०·६. ७ कु. (३०)७० ८ र. गं. ४१६. ९ कु. पान.११२०

गंगा सागरमम्बरं शशिकला नागाधिपः क्ष्मातलम् ।
सर्वज्ञत्वमधीश्वरत्वमगमत् त्वां मां च भिक्षाटनम् ॥

अप्पय्यदीक्षिताच्या मतें येथें ईश्वराची स्तुतिमिषानें निन्दा केली आहे; कारण 'तूं सर्वज्ञ असूनही माझी विद्वत्ता व दारिद्र्य तूं जाणत नाहींस' असें म्हटलें आहे.पण यांत वास्तविक हा भाव नसून 'मी रक्षणार्ह आहे तर माझें रक्षण कर' अशा तऱ्हेचा अर्थ निघतो म्हणून ही विज्ञप्ति आहे. जगन्नाथानें यावर असेंच मत दिलें आहे.अप्पय्यदीक्षितानें दण्डीचें " सुखं जीवंति हरिणाः " हें अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण व्याजस्तुतीचें आहे असें म्हटलें असून त्याच्या मतें दण्डीचें हें उदाहरण त्याच्या व्याजस्तुतीच्या तिसऱ्या प्रकाराचें होईल. कारण त्यांत आत्मस्थितिनिंदा येते; पण विषय भिन्न असून भिन्न विषयाचें वर्णन होणें यालाच अप्रस्तुतप्रशंसेंत मुख्य स्थान आहे. तेथें निन्दा-स्तुति-पर्यवसानाला महत्त्व देतां येत नाहीं. अप्रस्तुत विषयाचा प्रस्तुताशीं संबंध येणें हेंच त्यांत वैशिष्ट्य असतें. तेव्हां ' सुखं जीवन्ति हरिणाः ' यांतही मुख्य रोख निराळा असल्यानें तें उदाहरण अप्रस्तुतप्रशंसेचें होईल. हाच प्रकार चौथ्या प्रकाराचे बाबतींतही आहे. विषयांची भिन्नता असतां स्तुतिनिन्देला महत्त्व द्यावयाचें व तो व्याजस्तुति अलंकार मानावयाचा असें ठरविलें तर व्याजस्तुति हा भेद अप्रस्तुतप्रशंसेंत घालावा किंवा अप्रस्तुतप्रशंसा म्हणणेच व्याजोक्ति असें ह्मणावें.प्रशंसा ह्मणजे स्तुति असा अर्थ दण्डी घेत होता म्हणून त्याच्या अप्रस्तुतप्रशंसेच्या उदाहरणांत अप्रस्तुताची स्तुति आहे खरी पण त्याला त्यांतून प्रस्तुतार्थ निराळा काढण्यांतच वैचित्र्य वाटतें; मग अप्पय्यदीक्षितानें एकदां अप्रस्तुतप्रशंसेचें इतकें विवरण केल्यावर व्याजस्तुतीला पुनः अप्रस्तुतप्रशंसेचा मुलूख लिहून देणें योग्य होणार नाहीं. आतां ही व्याजस्तुति अप्रस्तुतप्रशंसा अगर समासोक्ति व्याजस्तुतीशीं संकीर्ण होऊं शकेल. कारण त्यांत अप्रस्तुतप्रस्तुताचा संबंध येऊन व्याजाचा भास होण्याचा संभव आहे. रुय्यकानें, ' किंवृत्तान्तैः परगृहगतैः' हें ध्वनिकाराचें उदाहरण व्याजस्तुतीचें नाहीं असें म्हटलें आहे. वस्तुतः त्यांत संकर असल्यामुळेंच ती व्याजोक्ति कीं अप्रस्तुतप्रशंसा हें ओळखूं येत नाहीं.

अप्पय्यदीक्षितानें व्याजनिंदा म्हणून एक निराळा अलंकार मानला त्याचें लक्षण असें:— निंदाया निंदया व्यक्तिर्व्याजनिंदेति गीयते।

उदाहरण, विधिरेवै विशेषगर्हणीयः करटत्वं रट कस्तवापराधः।
सहकारतरौ चकार यस्ते सहवासं सरलेन कोकिलेन॥

वास्तविक निंदेचें निंदेंत पर्यवसान होण्यांत सगें वैचित्र्य नसून एकाची निंदा दुसऱ्याच्या निंदेंतच पर्यवसित होणें यांत वैशिष्ट्य आहे व हा व्याजस्तुतीच्या चौथ्या प्रकाराचा व्यत्यास म्हणून अप्पय्यदीक्षितानें सांगितला आहे. पण यांतही

१ कु. ११४. २ कु. ३१. ६ कु. ११५ पान.

विषयभिन्नत्व आल्यानें ही अप्रस्तुत-प्रशंसाच होईल. अप्पय्यदीक्षिताच्या मतें ही जरी अप्रस्तुत-प्रशंसा होत असली तरी व्याजनिंदाच आधीं लक्षांत आल्यानें अप्रस्तुत-प्रशंसेला गौण स्थान आहे. पण शेवटीं त्यानें तडजोड करून ही व्याजनिंदामूलक व्याजनिंदारूप अप्रस्तुतप्रशंसा आहे व अशीच व्याजस्तुतिमूलक व्याजस्तुतिरूप अप्रस्तुतप्रशंसा होईल असें म्हटलें आहे. पण एवढा अलंकार मानून नंतर तड-जोडीची खटपट न करतां या अलंकाराला जागाच न देणें इष्ट आहे. अप्पय्यदी-क्षिताच्या इतर अनेक अलंकारांच्या पुरतीइतकीच याचीही निर्फलता आहे.

## ७ आक्षेप.



३०. आ+क्षिप् याचा अर्थ शंका काढणें, बोलतांना थांबविणें, सुचविणें असा होतो. यावरून आक्षेप म्हणजे पूर्वोक्ताचा निषेध असा अर्थ होतो. जें बोलावयाचें तें अर्धवट बोलून त्यावर आक्षेप घेण्यानेंच तें पूर्ण सूचित होणें याला आक्षेप म्हणतां येईल. भामहाची व्याख्या:—[1]

> प्रतिषेध इवेष्टस्य यो विशेषाभिधित्सया ।
> आक्षेप इति तं सन्तः शंसन्ति द्विविधं यथा ॥

"विशेषकथनाची इच्छा असतांना इच्छिताचाच प्रतिषेध केल्याप्रमाणें दाखविणें, यास आक्षेप म्हणतात." भामहानें याचे वक्ष्यमाण विषय व उक्तविषय असे दोन भेद केले आहेत. ज्यांत आक्षेप आधीं घेण्यामुळें इष्ट गोष्ट गम्य होते तो वक्ष्यमाण व ज्यांत अर्धवट बोलून मग आक्षेप घ्यावयाचा त्याला उक्तविषय म्हणावयाचें.

> दण्डी:—प्रतिषेधोक्तिराक्षेपस्त्रैकाल्यापेक्षया त्रिधा ।
> अथास्य पुनराक्षेप्यभेदानन्त्यादनन्तता ॥[2]

दण्डीच्या आक्षेपांत पुनः अति विस्तार झालेला आहे. एकदां भेद मानावयाचे झाले कीं लेखणी पिचेपर्यंत दण्डी भेद करतो. प्रतिषेधानें बोलणें यास आक्षेप म्हणावयाचें; पण हा आक्षेप कोणत्या स्वरूपाच्या प्रतिषेधानें होइल तें यानें कांहींच सांगितलें नाहीं. भामहाची व्याख्या याच्यापेक्षां आधिक स्पष्ट व प्रति-षेधाचें स्वरूप दाखविणारी आहे. दण्डीनें आक्षेपाचे एकंदर चोवीस भेद मानले आहेत. लढाईच्या वेळीं रिक्रूटभरती करतांना उचल कीं ने लढाईवर अशी जशी स्थिति तद्वतच जरा आक्षेप दर्शविणारा शब्द दिसला कीं, दण्डीनें त्याचा निराळा चौक पडलाच म्हणून समजावें. ( १ ) वृत्ताक्षेप ( २ ) वर्तमानाक्षेप ( ३ ) भविष्यदाक्षेप ( ४ ) धर्माक्षेप ( ५ ) धर्म्याक्षेप ( ६ ) कारणाक्षेप ( ७ ) कार्याक्षेप ( ८ ) अनुज्ञाक्षेप ( ९ ) प्रभुत्वाक्षेप ( १० )

---

१ भा. लं २.६८. २ का. द. २.१२०.

अनादराक्षेप ( ११ ) आशीर्वचनाक्षेप ( १२ ) परूषाक्षेप ( १३ ) साचिव्याक्षेप ( १४ ) यत्नाक्षेप ( १५ ) परवशाक्षेप ( १६ ) उपायाक्षेप ( १७ ) मूर्छाक्षेप ( १८ ) रोषाक्षेप ( १९ ) अनुक्रोशाक्षेप ( २० ) श्लिष्टाक्षेप ( २१ ) अनुशयाक्षेप ( २२ ) संशयाक्षेप ( २३ ) अर्थान्तराक्षेप ( २४ ) हेत्वाक्षेप. असे चौवीस भेद झाले.

एकाद्या राजशाही वाड्यांत कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नसला म्हणजे घरचींच काय पण बाहेरचींही माणसें आपलें ठाणें बिनहरकत तेथें देतात; तद्वतच आक्षेपांत भेदांचें आनन्त्य झाल्यानें अतिशयोक्ति, प्रतीप इत्यादि अलंकार खुशाल आक्षेपाच्या छायेंत राहूं लागले. एवढे बडे लोकही दुसऱ्याच्या छायेंत आल्या- वर बारीकसारीक लोक आंत येऊन यथेच्छ राहूं लागले तर नवल नाहीं. या सर्वांचें कारण आक्षेपाची व्याख्या ठाकठिकीची झालेली नाहीं. ती शिथिल झाल्यानें तिचे अवयव बेभान झाले. याचा वृत्ताक्षेप म्हणजे उक्तविषयाक्षेप होय. वर्तमानाक्षेप व भविष्यदाक्षेप यांचीं उदाहरणें पाहातां त्यांत आक्षेपाचें सौंदर्य नसून उपमानाच्या वैयर्थ्यांत खरें सौंदर्य असल्यानें तो आक्षेप होत नाहीं. 'कुत कुवलयं कर्णे' या उदाहरणांत, अपाङ्ग असतां कुवलयाची जरूर काय ? असें विचारून 'कुतः करोषि' एवढ्यानें आक्षेप होणार नाहीं. पण आक्षेप म्हणजे कसा आक्षेप हें न ठरविल्यानें, व जेथें जेथें 'कां ! ' असे अडवणुकीचे शब्द येतील तेथें तेथें आक्षेप मानल्यानें त्या अलंकारांत कांहींच सौंदर्य किंवा वैशिष्ट्य राहात नाहीं. धर्माक्षेपाचें उदाहरण,

तव [2]तन्वाङ्गि मिथ्यैव रूढमङ्गेषु मार्दवम् ।
यदि सत्यं मृदून्येव किमकाण्डे रुजन्ति माम् ॥

यांत आक्षेपापेक्षां विरोधाधिष्ठित अलंकार मानणेंच योग्य होईल धर्म्या- क्षेपाचें उदाहरण–[3]सुंदरी सा न वेत्त्येव विवेकः केन जायते

प्रभामात्रं हि तरलं दृश्यते न तदाश्रयः ॥

ही आतिशयोक्ति होईल.कारणाक्षेप व कार्याक्षेप विशेषोक्तींत जातील.अनुज्ञाक्षेप हा आक्षेपच आहे पण अनुज्ञेवर आक्षेप म्हणून अनुज्ञाक्षेप असें नांव द्यावयाचें ठरविलें,तर प्रत्येक क्रियेमागें एकेक आक्षेप तयार होईल. तेव्हां उक्तविषय आक्षेपच म्हणणें ठीक होईल. प्रभुत्वाक्षेप,अनादराक्षेप,आशीर्वचनाक्षेप,परुषाक्षेप,साचिव्याक्षेप, यत्नाक्षेप, परवशाक्षेप, उपायाक्षेप, मूर्छाक्षेप, रोषाक्षेप हीं उदाहरणें आक्षेपाचींच असलीं तरी अनुज्ञाक्षेपाप्रमाणेंच प्रत्येकाचें नामाभिधान करण्यांत वैचित्र्य नाहीं. आक्षेप कोणत्या तऱ्हेनें घ्यावयाचा एवढेंच काय तें त्यांत वैशिष्ट्य आहे. श्लिष्टा-

१ का. द. ३.१२७. २ का. द. २.१२९. ३ का. द. २.१२३.

क्षेपांत उपमानाचें कैमर्थ्य असल्यानें हा प्रतीप होईल. अनुशयाक्षेपांत कांहींच वैचित्र्य नाहीं. संशयाक्षेप हा निश्चयान्त संदेह अलंकारच आहे. अर्थांतराक्षेप हा वैधर्म्यानें दृष्टान्त आहे. हेत्वाक्षेपाचें उदाहरण व्याजस्तुतीचें आहे. अशा तऱ्हेनें दण्डीचे भेद चाळले असतां फारच थोडीं नांवें शिल्लक राहतील. उद्भटः—

प्रतिषेध[1] इवेष्टस्य यो विशेषाभिधित्सया ।
आक्षेप इति तं सन्तः शंसन्ति कवयः सदा ॥

शेवटचे दोन शब्द बदलून ही भामहाचीच व्याख्या आहे. व भामहानें मानलेलेच भेद यानें मानले आहेतः—

वक्ष्यमाणोक्त[2]विषयः स च द्विविध इष्यते ।
निषेधेनैव तद्बन्धो विधेयस्य च कीर्तितः ॥

यानें इष्ट या अर्थी विधेय शब्द घातला आहे. या विधेयाचा उल्लेख शाब्द किंवा आर्थ असा दोन प्रकारें होईल. आर्थ उल्लेख असेल तेव्हां वक्ष्यमाण व शाब्द असेल तेव्हां उक्तविषय आक्षेप असें इन्दुराजानें लिहिलें आहे.

वामन—'उपमानाक्षेपश्चा[3]क्षेपः'

३१. ही व्याख्या अगदीं निराळी आहे. उपमानाचा आक्षेप म्हणण्यानें हा प्रतीप अलंकार होईल. त्याचें 'तस्याश्चेत्' हें उदाहरणही प्रतीपाचेंच होत आहे. उपमानाची आक्षेपानें प्रतिपत्ति होणें असाही सूत्रार्थ आहे असें वामन म्हणतो. पण उपमानाची म्हणजे अप्रस्तुताची प्रतिपत्ति अर्थात् तो अप्रस्तुत-बोध देणारा समासोक्ति अलंकार होईल. त्याचें उदाहरण 'ऐन्द्रं धनुः पाण्डुपयोधरेण' हें समासोक्तीचें आहे. एकूण याचा आक्षेप अगदीं निराळा आहे. रुद्रटः—

वस्तु प्रसिद्धमिति यद्विरुद्धमिति वास्यवचनमाक्षिप्य ।
अन्यत्तथात्वसिद्ध्यै यत्र ब्रूयात्स आ[4]क्षेपः ॥

'जेव्हां एखादी वस्तु प्रसिद्ध अथवा विरुद्ध म्हणून दिलेली असून तिच्याच सिद्धी-साठीं तिच्यावर आक्षेप घेतात, तेव्हां त्याला आक्षेप म्हणावें.' रुद्रटाच्या व इतरांच्या व्याख्यांत फरक आहे. प्रसिद्ध अथवा विरुद्ध गोष्टींचें वैशिष्ट्य दाखविणें हा याच्या आक्षेपांतील विशेष आहे. इतरांच्या आक्षेपांत प्रसिद्ध अगर विरुद्ध वस्तु असणें हा विशेष नाहीं. रुद्रटाचीं दोन्हीं उदाहरणें दृष्टान्तानें आविद्ध दिसतातः—

जनय[5]ति संतापमसौ चंद्रकला कोमलापि मे चित्रम् ।
अथवा किमत्र चित्रं दहति हिमानी हि भूमिरुहः ॥

तवे[6] किं गणयामि गुणानहमलमथवा प्रलापिनी धिङ्‍ माम् ।
कः खलु कुंभैरंभो मातुमलं जलनिधेरखिलम् ॥

---

१ काँ. सा. सं. २.२५. २ का. सा. सं. २.२६. ३ का. सू. ४.३.२७.
४ का. लं. ८.८८. ५ का. लं. ८.८९ ६ का. लं. ८.९०

या दोन्ही उदाहरणांतील दुसऱ्या ओळी या दृष्टान्तासारख्या आहेत व दृष्टा-न्तानें आक्षेप घेतला आहे.

मम्मटः--निषेधो वक्तुमिष्टस्य यो विशेषाभिधित्सया ।
वक्ष्यमाणोक्तविषयः स आक्षेपो द्विधा मतः ॥

विरोधांत ज्याप्रमाणें विरोधाचा केवळ आभास असतो तद्वत् आक्षेपांत निषेधाचा आभास असतो. भामह-उद्भटाच्या व्याख्यांमधून मम्मटानें आपली व्याख्या निर्माण केली. तींत निषेध असा शब्द घातला; पण टीकेंत 'निषेध इव म्हटल्यानें भामह-उद्भटाचाच अर्थ त्यांत आला. त्यामुळें निषेधाभास हा आक्षेपांत अवश्य पाहिजे, दण्डीप्रमाणें केवळ निषेध अगर प्रतिषेध नको हें सिद्ध झालें

रुय्यकः— उक्तवक्ष्यमाणयोः प्राकरणिकयोः विशेषप्रतिपत्त्यर्थं निषेधाभास आक्षेपः ॥

[२] येथें प्रस्तुताचें प्रस्तुतानेंच वर्णन करावयाचें म्हणून निषेध न करतां नुसत आभासच असणें योग्य असें रुय्यक म्हणतो. इष्ट गोष्टीवर आक्षेप घेणें म्हणजे उक्तविषयाक्षेप व इष्टसंबंधीं अन्य सामान्य गोष्टीवर आक्षेप घेणें म्हणजे वक्ष्यमाण विषयाक्षेप होय. उक्तविषयाक्षेपांत (१) वस्तुनिषेध अथवा (२) वस्तुकथन निषेध असतो. वक्ष्यमाणांत जरी वस्तुकथननिषेध असला तरी (१) सामान्य प्रतिज्ञेंत विशेषनिष्ठत्वानें व (२) अंशोक्तींत निराळ्या अंशानें असे दोन प्रकार यांत संभवतात. म्हणून आक्षेपांत (१) इष्टार्थ (२) त्याचा निषेध (३) निषेधाचे असत्यत्व (४) विशेष प्रतिपादन एवढ्या गोष्टी असतात. रुय्यकानें 'अनिष्ट विध्याभासश्च[3]' हा आणखी एक आक्षेपप्रकार सांगितला. यांत अनिष्ट गोष्ट होत आहे असा आभास होतो पण वास्तविक तो निषेधच असतो. 'गच्छ गच्छसि चेत्कान्त' हें दण्डीचें आशीर्वचनाक्षेपाचें उदाहरण रुय्यकानें आपल्या या आक्षेपाचें म्हणून दिलें आहे. "प्रतिषेधोक्तिराक्षेपः" 'प्रत्यक्ष निषेधपर उक्ति' म्हणजे आक्षेप असें म्हणणाऱ्या दण्डीकरतांच बहुधा पुनः पुनः 'निषेधाभास' हा शब्द रुय्यक बजावून सांगत असावा. दण्डीचेंच उदाहरण घेऊन त्यांत निषेध नसून निषेधाभास आहे असें रुय्यकानें दाखविलें आहे. हेमचंद्रानें वामनाचाच अनुकार केलेला दिसतो; कारण त्यानें

'विवक्षितस्य निषेध इवोपमानस्याक्षेपश्चाक्षेपः[4]'

अशी व्याख्या केली आहे. "विवक्षित उपमानावर निषेधाभासानें आक्षेप घेणें व तो विशेषकथनासाठीं घेणें याला आक्षेप म्हणावें." हेमचंद्रानें त्याचे दोन भेद केले (१) निषेधमुखानें विशेष सांगणें व (२) उपमानाचा तिरस्कार दाखविणें. यांपैक

---

१ का. प्र. १०·१६१. २ अ. सू. ३८. ३ अ. सू. ३९. ४ का. शा. ६·१०.

पहिल्या भेदाचे ( १ ) उक्तविषय व ( २ ) वक्ष्यमाणविषय असे दोन भेद केले. वामनाच्या उदाहरणाप्रमाणें याच्या उक्त विषयाच्या उदाहरणाखेरीज बाकी सर्व उदाहरणें प्रतीपाचींच होत आहेत याचें कारण त्याची व्याख्या वामनाप्रमाणेंच केलेली आहे.

विद्याधरः--कमपि विशेष्यं वक्तुं प्रकृतस्योक्तस्य वक्ष्यमाणस्य ।
यः प्रतिषेधाभासः कथितः सोऽयं द्विधाक्षेपः ॥

विद्याधरानें भेदकथनांत सर्वस्वीं अलंकारसर्वस्वाचें अनुकरण केल्यानें पुनः त्याचे भेद सांगण्याची जरूर नाहीं. पण त्याचें वक्ष्यमाण विषयाक्षेपांतील अंशोक्ति प्रतिषेधाचें उदाहरण संशयालंकाराचेंही वाटतें. त्यानें दिलेलें उदाहरण असेंः--

कान्तः किं कैरविण्या कलयति कमलोल्लासने नैष शक्तिम् ।
नाथः किं वासराणामुदयति कुमुदे नैष लक्ष्मीं वितन्वत् ॥
किं कृष्णो न [illegible] पतिं भूयसोक्तेन किं वा ।
ज्ञातः पश्चान्नृसिंह क्षितितलतिलक त्वं चरित्रैर्विचित्रैः ॥

हा निश्चयान्त संदेहालंकार आहे. रुय्यकाचें या भेदाचें उदाहरण बरोबर आहे पण न कळून रुय्यकाचें अनुकरण केल्यानें विद्याधर चकलेला दिसतो.

विश्वनाथः--वस्तुतो वक्तुमिष्टस्य विशेषप्रतिपत्तये ।
निषेधाभास आक्षेपो वक्ष्यमाणोक्तगा द्विधा ॥

अप्पय्यदीक्षितः--आक्षेपः स्वयमुक्तस्य प्रतिषेधो विचारणात् ।

विश्वनाथानें सर्वस्वीं रुय्यकाचेंच अनुकरण केलें आहे. अप्पय्यदीक्षिताची व्याख्या सर्वांत निराळी आहे त्यानें स्वतःच्याच उक्तीचा प्रतिषेध करणें याला आक्षेप म्हटलें आहे. अर्थातच त्यानें केलेले भेदही निराळे आहेत. पैकीं एक प्रकार वर सांगितला. दुसरा प्रकार असा--

'आक्षेपोऽन्यो विधौ व्यक्ते निषेधे च तिरोहिते ।

"ज्या ठिकाणीं इष्ट गोष्ट सांगून निषेध गुप्त असतो तेव्हां त्याला आक्षेप म्हणावयाचें." हा रुय्यकाचा अनिष्टविध्याभ्यास आक्षेप किंवा दण्डीचा आशीर्वचनाक्षेप आहे. "गच्छ गच्छसि" हें या दुसऱ्या प्रकाराचें उदाहरण आक्षेपाचेंच आहे; पण पहिल्या प्रकारचें उदाहरण मात्र आक्षेपाचें नाहीं तें असें--

"चंद्र संदर्शयात्मानमथवाऽस्ति प्रियामुखम्"

या अप्पय्यदीक्षिताच्या उदाहरणांत उपमेयोत्कर्षच अधिक आहे, त्यामुळें हा प्रतीप अलंकार होईल. अप्पय्यावर रुद्रटाची पुष्कळशी झांक दिसते; कारण त्याचें याच भेदाचें "साहित्य पाथोनिधि" हें उदाहरण रुद्रटाच्या छापाचें दिसतें.

---

१ ए. ८·३१. २ ए. ८. ३ सा. द. १०·६५. ४ कु. ( ३२ ) ७३.
५ कु. ७५ श्लोक. ६ कु. ७३ श्लोक.

३३ जगन्नाथः—उपमेयस्योपमानसंबंधि सकलप्रयोजननिष्पादनक्षमत्वादुपमाने कैमर्थ्यमुपमानाधिक्षेपरूपमाक्षेपः ॥

ही व्याख्या देऊन जगन्नाथानें 'इति केचिदाहुः' असें म्हटलें आहे. जगन्नाथानें त्यांतल्या त्यांत वामनाच्या व्याख्येला मान दिलेला दिसतो; कारण त्यानें वामनाचीच व्याख्या स्वतःच्या शब्दांत मांडली आहे. पण वामनानंतर प्रतीपाचा जन्म झाल्यानें प्रतीप व आक्षेप यांत फरक दाखविण्यासाठीं त्यानें 'कैमर्थ्यं उपमानाधिक्षेपरूपम्' असें म्हटलें आहे. याच्या व्याख्येप्रमाणें पाहतां अप्पय्यदीक्षितांचें 'चंद्रसंदर्शयात्मानं' हें उदाहरण आक्षेपाचेंच होईल. असो. यानें पूर्वींच्या सर्व व्याख्या देऊन त्यांतल्या त्यांत रुय्यकावर पुष्कळसे कोरडे ओढले आहेत. अलंकारसर्वस्वकारांचा आक्षेप हा व्याघातासारखाच अलंकार आहे, व्याघाताचाच दुसरा भेद आहे, असें जगन्नाथ म्हणतो.

तदिष्टस्य निषेध्यत्वमाक्षेपोक्तेर्निबन्धनम् ।
सौकर्येणान्यकृतये न निषेधकता पुनः ॥

असें म्हणून त्यानें दोन अलंकारांतील फरक सांगितला आहे. आक्षेप हा ध्वन्यमान होतो प्रत्यक्ष अगर गम्य पण खरा निषेध असतां 'आक्षेप' होत नाहीं असें जगन्नाथानें सांगितलें आहे.

'स[३] वक्तुमखिलान्शक्तो हयग्रीवाश्रितान्गुणान्
योऽम्बुकुंभैः परिच्छेदं ज्ञातुं शक्तो महोदधेः ॥

हें ध्वनिकाराचें उदाहरण ध्वन्याक्षेपाचें नाहीं असें रुय्यकानें म्हटलें आहे. कारण त्याच्या मतें यांत स्पष्ट निषेध आहे. यावर जगन्नाथ म्हणतो " रुय्यक जो निषेध विध्याभास मानतो तो आक्षेपध्वनि होय. ध्वनिशिवाय आक्षेपांत सौंदर्य नाहीं. प्राचीनांनीं आक्षेप मानला म्हणून रुय्यकानें मानला. पण रुय्यकानें मानला म्हणून तो सर्वांनीं मानावा असें मुळींच नाहीं. त्यापेक्षां ध्वनिकारांचेंच म्हणणें अधिक युक्त आहे." या सर्वांवरून व त्याच्या व्याख्येनंतर दिलेल्या 'इति केचिदाहुः' या शब्दांवरून जगन्नाथास आक्षेप विशेष पसंत नसून तो ध्वनिकारांप्रमाणें फार तर ध्वन्याक्षेप मानावयास तयार आहे. आक्षेपाच्या सबंध प्रकरणांत टोलवाटोलवी शिवाय त्यानें कांहींही सांगितलें नाहीं.

३४ एकंदरींत आक्षेपाच्या व्याख्या निरनिराळ्या आहेत. कित्येक निषेधोक्ति म्हणजे आक्षेप म्हणतात. कित्येक निषेधाभास उत्पन्न करणारी उक्ति म्हणजे आक्षेप समजतात. आक्षेपाचीं उदाहरणें,

( १ ) मोहें[४]ळ कृष्ण सुरसमय, गोपी सरघाचि, त्यासि त्या चुकल्या
काय क्लेश वदावा ? झुकल्या शोकें, स्वजीवना मुकल्या ॥

१ र. गं. ४२१. २ अ. सू. १४२. ३ अ. सू. १४४. ४ मो. मंत्र भागवत १०·३१८.

(२) हें[1] असो आघवी बोली। सांग पां सर्पफणीची साउली।
ते शीतल होईल केतुली। मूषकासी॥

(३) त्या अस्त्रें[2] अभिमंत्रित भगदत्तांकुश तुला न सोसविता;
अथवा तुझेंचि उर हें, भाव सख्या! त्वन्मनीं नसो सवता॥

या सर्वांत निषेधाभास म्हणजे आक्षेप हीच व्याख्या योग्य वाटते. कारण खऱ्या निषेधांत काव्य नाहीं, व प्रतीपरूप आक्षेपांत नाविन्य नाहीं.

रामा[3] पूर्वील राजेश्वर गयनहुषातुल्य जे शत्रुतापी।
त्यांचें आहे पुराणीं यश अजुनि वरी श्रेष्ठ पुण्यप्रतापी।
तूझ्या कीर्तीसि त्यांचें यश सम तुळितां भानुखद्योतमानें।
किंवा पक्षींद्रसाम्या मशकगणन ते सज्जना काय माने॥

येथें रामाच्या कीर्तीची तुलना करून नंतर दृष्टान्तानें आक्षेप घेतला आहे.

## ८ व्यतिरेक



३५ प्रतीप (प्रतिगताः आपो यत्र तत्) म्हणजे नेहमींच्या विरुद्ध होणें. उपमान व उपमेय यांच्यांत स्थानविरोध येणें म्हणजे प्रतीप; व व्यतिरेक म्हणजे वरचढ असणें यावरून व्यतिरेकांत गुणांचा वरचढपणा अगर श्रेष्ठत्व दाखविलें गेलें पाहिजे तर तो व्यतिरेक होईल; न दाखविल्यास प्रतीप होईल.

भामहः—उमापनवतोऽर्थस्य यद्विशेषनिदर्शनम्।
व्यतिरेकं[4] तमिच्छन्ति विशेषापादनाद्यथा॥

या व्याख्येंतील 'उपमानवतोऽर्थस्य' या शब्दांनीं जरा शैथिल्य आलें आहे. उपमान ज्याला आहे तें उपमानवान म्हणजे उपमेय. तेव्हां उपमेयाच्या अर्थाचें विशेषनिदर्शन असा व्याख्येचा अर्थ होतो. त्याचप्रमाणें उपमानवान् असा जो पदार्थ म्हणजे उपमानाचे स्थानीं असणारी वस्तु तिचें विशेषदर्शन असाही अर्थ होईल. पण उदाहरण देतांना मात्र भामह उपमेय व उपमान या दोहोंतील फरक सांगतो या दृष्टीनें तें व्यतिरेकाचेंच उदाहरण होत आहे. व त्यांत उपमेयाचें विशेषदर्शन झालें आहे.

दण्डीः—शब्दोपात्ते प्रतीते वा सादृश्ये वस्तुनोर्द्वयोः।
तत्र यद्भेदकथनं व्यतिरेकः[5] स कथ्यते॥

सादृश्य हें स्पष्ट असो वा प्रतीत असो त्यांत भेद सांगितलेला असल्यास व्यतिरेक होतो असें म्हणून दण्डीनें व्यतिरेकाचे भेद केले आहेत, ते असेः—

(१) एकव्यतिरेकः—एकांतील भेद सांगणें.

---

१ नि. मा. ४३. २ ज्ञानेश्वरी ५.१७. ३ मो. द्रोणपर्व २.७४. ४ भा. लं. २.७५. ५ का. द. २.१८०.

( २ ) उभयव्यतिरेकः—दोहोंतील भेद सांगणें.

( ३ ) सश्लेषव्यतिरेकः—श्लेषावर व्यतिरेक आधिष्ठित असणें.

( ४ ) आक्षेप व्यतिरेकः—आक्षेप घेऊन व्यतिरेक असणें.

( ५ ) सहेतु व्यतिरेक.

हे शब्दोपादान सादृश्यव्यतिरेकाचे पांच भेद झाले.

प्रतीयमान सादृश्याचे भेदः—( १ ) केवळ भेद सांगणें व ( २ ) आधिक्य-दर्शन असणें. याशिवाय सजातिव्यतिरेक व सदृशव्यतिरेक असे दोन भेद दण्डीनें दिले आहेत.

दण्डीनें 'शब्दोपात्ते प्रतीते वा सादृश्ये' असें म्हणून व्यतिरेकाचें विना-कारण विभजन केलें आहे. वस्तुतः भेदकथन हेंच व्यतिरेकांत विशेष आहे. यासाठीं उपमान व उपमेय हे शब्द वापरले असते म्हणजे पुरेसें झालें असतें. पण दण्डीला विस्तार हा आधिक प्रिय आहे. इतकेंही करून व्यतिरेकांत उपमा-नाचें आधिक्य की उपमेयाचें हें त्यानें व्याख्येंत सांगितलें नाहीं. मात्र त्याच्या उदाहरणावरून भामहाप्रमाणेंच तो उपमेयाधिक्य सांगतो असें वाटतें. त्याचा सजातिव्यतिरेक हा भेद पुढें मानल्या गेलेल्या 'विशेषालंकाराचा भेद होईल. प्रतीय-मानसादृश्याचीं दोन्हीं उदाहरणें प्रतिवस्तूपमेसारखीं वाटतात. दण्डीनें इतके भेद करण्यांतही त्याला कसली तरी अडचण भासत असावी, व या अडचणींतून पुढें प्रतीप अलंकार आला असावा. मात्र दण्डीच्या व्यतिरेकांत प्रतीपाचा मागमूसही लागत नाहीं. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें प्रतीप त्याच्या उपमेंतच दिसतो. एकंदरींत दण्डीनें इतके भेद न करतां व्यतिरेकाचें सामान्य लक्षण दिलें असतें तरीही सजातिव्यतिरेकाशिवाय इतर भेदांची उदाहरणें व्यतिरेकाचीं झालीं असतीं.

उद्भटः—विशेषापादनं यत्स्यादुपमानोपमेययोः ।
निमित्तादृष्टिदृष्टिभ्यां व्यतिरेको द्विधा तु सः ॥
यो वैधर्म्येण दृष्टान्तो यथेवादि समन्वितः ॥
व्यतिरेकोत्र सोपीष्टो विशेषापादनान्वयात् ॥
श्लिष्टोक्तियोग्यशब्दस्य पृथक्पृथगुदाहृतौ ।
विशेषापादनं यत्स्याव्द्यतिरेकः स च स्मृतः ॥

दण्डीच्या व्याख्येंतील प्रथमार्ध निष्फल असल्यानें उद्भटानें त्याला रजा दिली. 'उपमान व उपमेय यांतील विशेष-कथन म्हणजे व्यतिरेक.' त्याचे दोन भेदः—( १ ) आधिक्याचें कारण न सांगणें व ( २ ) आधिक्याचें कारण सांगणें. याशिवाय ( १ ) यथा-इव इत्यादि पदें असतां वैधर्म्यानें दृष्टांत

---

१ का. सा. सं. २.२९.३०. २ का. सा. सं. २.३१.

दिलेला असल्यास त्यांतही विशेषकथन होत असल्यानें तो व्यतिरेकच होतो. ( २ ) जेव्हां निरनिराळ्या रीतीनें उच्चारिलेला शब्द विशेषकथन करील तेव्हांही तो व्यतिरेक होतो. दण्डीच्या व्याख्येचें शैथिल्य सोडलें तर असें दिसतें कीं त्याच्या व्याख्येवरून पुष्कळांना सूचना मिळाली आहे. उद्भटाची व्याख्या पाहिली तर तींत इतका व्यवस्थितपणा आहे कीं दण्डीपासून याला कांहीं मार्ग मिळाला असेल असें वाटत नाहीं. पण वस्तुतः दण्डीच्या व्यतिरेकांतूनच उद्भटाला चालना मिळाली आहे. श्लेषावर अधिष्ठित असलेला व्यतिरेक दण्डीनें मानला आहे तद्वत‍च तो उद्भटानें मानला आहे पण उद्भटानें ' विशेषापादन ' हे शब्द पुनः सांगितले ते दण्डीनें सांगितले नाहींत. निमित्त सांगणें व न सांगणें ह्मणजेच शब्दोपात्तनिमित्त व गम्यमानानिमित्त किंवा प्रतीयमान-निमित्त हे भेदही दण्डीच्या प्रतीयमानानिमित्त व शब्दोपात्तव्यतिरेकावरून त्याला सुचले आहेत. पण दण्डीनें ते शब्द सादृश्यासाठीं वापरले व यानें निमित्तासाठी वापरले म्हणून उद्भटाची व्याख्या बरोबर झाली. व दण्डीचें केवळ शब्दजाल वाटलें. त्याचप्रमाणें दण्डीच्या आक्षेपव्यतिरेकांतून जें वैधर्म्य डोकावतें तें उद्भटानें सुव्यवस्थितपणें मांडलें. पण 'वैधर्म्यानें दृष्टान्त' हा जो पुढें दृष्टान्तभेद झाला आहे त्यांत व यांतील दृष्टान्तांत फरक आहे. यांत दृष्टान्त म्हणजे उपमेला घेतलेलें उदाहरण अगर वस्तु असा अर्थ आहे; व तीवर आक्षेप घेऊन उपमेयाधिक्य दाखविणें याला व्यतिरेक म्हणावें असा भाव आहे. यावरून हें उघड दिसतें कीं दण्डीची कल्पना यानें सजविली.

> चौगुणीनें जरि पूर्ण–शीतभानू । नळाऐसा तरि कलानिधी वानूं ।
> प्रतापाचा जो न मावळे भानू । तयासारीखा दुजा कोण वानूं ॥[1]

या ठिकाणी वैधर्म्यानें दृष्टान्तच आहे. उद्भटाच्या 'यथा' 'इव' शब्दाप्रमाणें यांतही ' ऐसा ' हा शब्द आहे तरी ही उपमा न होतां व्यतिरेकच होत आहे.

दण्डीच्या आक्षेप–व्यतिरेकाचें उदाहरण पुढील होईलः—

> भाग्यभरें बहु भारी भासे सृंजयपुरी, जशी अलका;
> पर इंतहि धन वाढे, म्हणउनि दृष्टान्त होय हा हलका ॥[2]

'पर' म्हणजे पण. या शब्दानें आक्षेप घेतला आहे व जरी या शब्दानें उपमा वाटण्याचा संभव आहे तरीही हा व्यतिरेक झाला आहे. उद्भटाच्या उदाहरणांतही 'जरि' 'तरि' या शब्दांनीं आक्षेप येत आहे, यावरून दण्डीचा व उद्भटाचा हा भेद सारखाच आहे असें दिसतें. निमित्तादृष्टिव्यतिरेक व निमित्तदृष्टिव्यतिरेक यांचीं उदाहरणें म्हणजेच शब्दोपात्त व प्रतीयमान व्यतिरेकाचीं उदाहरणें होत.

---

१ र. पं. नलदमयंती. २ मो. द्रोणपर्व ४·६०.

एकैका हरिमार्गे दशशत ज्या भरिति घट सुधेनु तिघे।
ज्यांच्या पयें म्हणावें, करुनि अयज्ञोचिते सुधे, 'नुति घे.' ॥

येथें 'अयज्ञोचिते' म्हणण्यांत कारण गम्यमान आहे 'नुति घे' यांतही कमीपणा गम्यमान आहे म्हणून हा निमित्तादृष्टि व्यतिरेक होईल. दण्डीनें एकव्यतिरेकाचें उदाहरण देतांना एका गोष्टींतील भेदकथन केल्यानें दण्डीचा तो भेद व उद्भटाचा आतां सांगितलेला भेद हे एकच होतील.

देवर्षि[2] म्हणे, 'राया! श्रवण तुवां तो नसेल शिबि केला।
ज्याच्या कीर्तिहुनि उणी म्हणति सुकवि अमृत वर्षि शिबि केला ॥

यांत 'उणी म्हणति' याच पदानें स्पष्ट कारण सांगितलें गेलें व नंतर 'अमृतवर्षि शिबिकेला' म्हणण्यानें उणेपणांत अधिक भर घातली, म्हणून हें निमित्तदृष्टि—व्यतिरेकाचें उदाहरण होईल.

यावरून दण्डीपासून उद्भटाला कसा मार्ग मिळाला हें दिसतें. वामनानें थोडक्यांतच सर्व आटोपतें घेतलें. उद्भटाच्या व्याख्येंतून उपमेयाचें आधिक्य म्हणजे व्यतिरेक असा नुसता ध्वनि निघतो पण उद्भटानेंही स्पष्ट शब्दांत सांगितलें नाहीं तें वामनानें सांगितलें.

उपमेयस्य गुणातिरेकत्वं व्यतिरेकः[3] ॥

वामनाची व्याख्या त्रोटक आहे. त्यानें गम्यमानगुण व्यतिरेक हा एक भेद केल्यानें तो प्रतीप होण्याचा संभव आहे. त्यानें जें उदाहरण दिलें आहे त्यांत मात्र प्रतीप दर्शित होत नाहीं. कारण त्यांत गुण गम्यमान नसून विशेषणें घातल्यानें गुण हा उक्तच झाला आहे. त्याचें उदाहरण असें आहेः—

कुवलयवनं[4] प्रत्याख्यातं नवं मधु निन्दितम् ।
हसितममृतं भग्नं स्वादोः पदं रससंपदः ।
विषमुपहितं चिन्ताव्याजान्मनस्यपि कामिनाम् ।
चतुरमधुरैर्लीलातन्त्रैस्तवार्धविलोकितैः ॥

शेवटच्या चरणांतील विशेषणांनीं गुण उक्त झाला आहे. वामनानें गम्यमान व शब्दोपात्त हे व्यतिरेकाचे भेद केले आहेत.ते उद्भटाच्या निमित्तदृष्टि व निमित्तादृष्टि या भेदांवरून केले असावेत.

३६. रुद्रटः— यो गुण उपमेये स्यात्तत्प्रतिपन्थी च दोष उपमाने ।
व्यस्तसमस्तन्यस्तौ तौ व्यतिरेकं[5] त्रिधा कुरुतः ।
यो गुण उपमाने वा तत्प्रातिपन्थी च दोष उपमेये ।
भवतो यत्र समस्तौ व्यतिरेकोऽयमन्यस्तु ॥

---

१ मो. २ मो. द्रोणपर्व ४·९३. ३ का. सू. ४·३·२२. ४ का. सू. ४.३·५६.
५ का. लं. ७.८६–८९.

रुद्रटानें अर्जुनपर्यंतच्या व्यतिरेकाच्या व्याख्येंत पुष्कळ फरक केला. उपमान व उपमेय यांपैकीं उपमेयाचें उपमानाशीं आधिक्य असावें असा अर्थ व्याख्यांतून व उदाहरणांतून निघत होता. पण यानें स्पष्ट शब्दांत दोन स्थिति सांगितल्याः—

( १ ) उपमेयाच्या ठिकाणीं गुण असून तद्विरोधी गुण उपमानांत असणें, व ( २ ) उपमानाच्या ठिकाणीं गुण असून तद्विरोधी गुण उपमेयांत असणें.

म्हणजे उपमानाधिक्य अगर उपमेयाधिक्य या दोहोंसही हा व्यतिरेक म्हणतो. मात्र रुद्रटानें 'क्षीणः क्षीणोऽपि शशी' हें दिलेलें उदाहरण तो स्वतः उपमानाधिक्याचें म्हणत असतां वस्तुतः तें उपमेयाधिक्याचेंच आहे. रुद्रटाचें हेंच उदाहरण मम्मटानें उपमेयाधिक्याचें म्हणून दिलें आहे व रुद्रटाचें म्हणणें खंडून काढलें आहे. रुद्रटानें सांगितलेल्या दोन भेदांपैकीं पहिल्याचे पुनः तीन उपभेद सांगितले आहेतः ( १ ) उपमेयाच्या ठिकाणीं गुण सांगून उपमानांत दोष न सांगणें ( २ ) उपमानांतील दोष सांगून उपमेयांत गुण न सांगणें व ( ३ ) गुणदोष दोन्ही सांगणें.

रुद्रटाच्या मुख्य भेदांपैकीं दुसऱ्या भेदांत उपमानगुण व उपमेय-दोष हे दोन्ही सांगावे लागतात. रुद्रटाचें दुसऱ्या भेदाचें 'क्षीणः क्षीणोपि०' हें उदाहरण चुकीचें असण्याचें कारण हें कीं, यौवनाचें महत्त्व अधिक म्हणून अल्पकालीनता व चंद्राचें महत्त्व कमी म्हणून पुनः पुनः क्षयवृद्धि असें दाखविल्यामुळें उपमेयच श्रेष्ठ ठरतें. या दृष्टीनें या दुसऱ्या भेदाचें वैयर्थ्य वाटूं लागतें.

रुद्रटाच्या 'साम्य' अलंकाराचा दुसरा भेद हा व्यतिरेकाचा व पहिला भेद प्रतीपाचा आहे; साम्याची व्याख्याः--

( १ ) अर्थक्रियया यस्मिन्नुपमानस्येति साम्यमुपमेयम् ।
तत्सामान्यगुणादिककारणया तद्भवेत्साम्यम् ॥

( २ ) सर्वाकारं यस्मिन्नुभयोरभिधातुमन्यथा साम्यम् ।
उपमेयोत्कर्षकरं कुर्वीत विशेषमन्यत्तत् ॥

पहिल्या भेदांत 'अर्थक्रियेनें' हें विशेष पद घातलें तरी अर्थ क्रियेनें उपमान व उपमेय यांत केवळ साधर्म्य नसून सर्वस्वी साम्य आहे, असें म्हटलें आहे. उदाहरण पहातां हाच अर्थ दिसतोः--

अभिसर रमणं किमिमां दिशमैन्द्रीमाकुलं विलोकयसि ।
शशिनः करोति कार्यं सकलं मुखमेव ते मुग्धे ॥

या उदाहरणांत उपमानाशीं उपमेय सर्वस्वी बरोबरी करतें म्हणून उपमानाचा अपकर्ष गम्य राहून हा प्रतीप होतो.

मृगं मृगांकं सहजं कलंकं बिभर्ति तस्यास्तु मुखं कदाचित् ।
आहार्यमेवं मृगनाभिपत्राभियानशोभेण तयोर्विशेषः ॥

---

१ का. लं. ८. १०५-१०७. २ का. लं. ८. १०६-१०८.

हें उदाहरण दुसऱ्या भेदाचें असून त्यांत स्पष्टपणें उपमेयोत्कर्ष सांगितल्यामुळें तो उघड व्यतिरेकच होतो.

३७. मम्मटः—उपमानाद्यदन्यस्य व्यतिरेकः स एव सः ॥[1]

"उपमानाहून निराळें असणारें जें उपमेय त्याचें आधिक्य असणें म्हणजे व्यतिरेक." मम्मटानें उद्भटाकडे पाहून आपल्या व्यतिरेकाचा पुष्कळ विस्तार केला आहे; व त्यांत उद्भटापेक्षांही दण्डीचीच छटा अधिक दिसते.

( १ ) उपमेयाधिक्याचें व उपमानापकर्षाचें कारण सांगणें.

( २ ) उपमेयाधिक्याचें व उपमानापकर्षाचें कारण न सांगणें.

( ३ ) उपमेयाधिक्याचेंच फक्त कारण सांगणें.

( ४ ) उपमानापकर्षाचेंच फक्त कारण सांगणें.

हे चार भेद झाल्यावर औपम्य हे शाब्द व आर्थ असण्यावरून प्रत्येकीं दोन दोन भेद म्हणजे आठ भेद होतात. पुनः औपम्य आक्षिप्त असतां वरीलप्रमाणें चार भेद होतात म्हणजे बारा भेद व श्लेष असतांही हे बारा भेद म्हणजे व्यतिरेकाचे चौवीस भेद झाले. हे भेद पाहिले असतां दण्डीचे सर्व भेद घेऊन शिवाय मम्मटानें वर उल्लेखिलेल्या हेतूवरून चार भेद केले आहेत असें दिसतें. दण्डीप्रमाणेंच मम्मटानें व्यतिरेकाचे बाबतींत आपली विस्ताराची तहान भागविलेली दिसते. मात्र दण्डीपेक्षां याच्या सांगण्यांत सुव्यवस्था अधिक असते. रुद्रटाचें अनुकरण करून रुय्यक म्हणतो,

भेदप्राधान्ये उपमानादुपमेयस्य आधिक्ये विपर्यये वा व्यतिरेकः ॥[2]

उपमान व उपमेय यांत भेदप्राधान्य असून उपमानाचें आधिक्य अगर उपमेयाचें आधिक्य दाखविण्यामुळें व्यतिरेक होतो असें म्हणून रुय्यकानें रुद्रटाप्रमाणेंच 'क्षीणः क्षीणोपि' हें उदाहरण उपमानाधिक्याचें दिलें आहे; पण रुद्रटाप्रमाणें व्यतिरेकाचे व्यस्त समस्त इत्यादि भेद त्यानें केलेले नाहींत.

विद्याधरः—उपमानादुपमेयं यत्राधिक्यस्य गोचरीभवति ।
सति भेदप्राधान्ये व्यतिरेकोऽयं समाख्यातः ॥[3]

विद्याधरानें रुय्यकाचें मत प्रमाण न धरतां भेदप्राधान्य असतां उपमेयाचें उपमानाहून आधिक्य दिसणें म्हणजे व्यतिरेक अशी व्याख्या केली व त्याचें उदाहरण देऊन एक श्लेषाधिष्ठित व्यतिरेकाचेंही उदाहरण दिलें आहे. 'चौगुणीनें जरि' हें या प्रकरणीं पूर्वीं दिलेलें उदाहरण या भेदाचें होऊं शकेल.

विश्वनाथः—आधिक्यमुपमेयस्योपमानान्न्यूनताथवा ॥[4] व्यतिरेक,

---

१ का. प्र. १०. १५९. २ अ. सू. २८. ३ ए. ८.२०. ४ सा. द. १०.५२.

यानें उपमानाचें अगर उपमेयाचें आधिक्य याला व्यतिरेक म्हटलें आहे. म्हणजे मम्मटानें उपमेयाधिक्यच फक्त सांगितलें आहे. व यानें रुय्यकाची व्याख्या घेतली आहे पण तो व्यतिरेकाचे भेद मात्र मम्मटाप्रमाणें २४ करून शिवाय आणखीही कांहीं भेद करतो.(१) दोहोंतील कारण उक्त. (२) दोहोंतील कारण अनुक्त. (३) एकाचें कारण उक्त. (४) दुसऱ्याचें कारण उक्त. हे चार भेद मम्मटाप्रमाणेंच आहेत. औपम्य हें गम्य, शाब्द व आर्थ असणें या दृष्टीनें प्रत्येकीं तीन भेद पडून वरील चार भेदांचे बारा भेद होतात. पुनः श्लेषावरून हेच बारा भेद होऊन एकंदर भेदांची संख्या २४ होते. यांत औपम्य गम्य असणें हा भेद मम्मटाहून निराळा आहे. अशा रीतीनें उपमानोत्कर्षाचे चोवीस भेद होतात त्याचप्रमाणें उपमेयोत्कर्षाचे होतात. म्हणून विश्वनाथाचा व्यतिरेक ४८ प्रकारचा होतो.

३८. 'व्यतिरेको विशेषश्चेदुपमानोपमेययोः[1] ॥

अशी अप्पय्यदीक्षितानें व्याख्या केली. 'उपमान व उपमेय यांपैकीं कोणाचेंही आधिक्य असतां व्यतिरेक होतो.' हे दोन भेद केल्यावर ज्यांत आधिक्य अगर न्यूनत्व कांहींच निष्पन्न होत नाहीं असा अनुभयपर्यवसायी व्यतिरेकभेद अप्पय्यदीक्षितानें मानला आहे. परंतु ज्या व्यतिरेकांत उत्कर्ष उक्त असो किंवा अनुक्त असो त्याचें उपमेयोत्कर्ष अगर उपमानोत्कर्ष यांत पर्यवसान झालेंच पाहिजे. असें असत। अनुभयपर्यवसायी व्यतिरेक अलंकारांत व्यतिरेकत्व राहातच नाहीं कारण तेथें कोणाचाच उत्कर्ष नसतो.

दृढतरनिबद्धमुष्टेः कोशनिषण्णस्य सहजमलिनस्य ।
कृपणस्य कृपाणस्य च केवलमाकारतो भेदः ॥

या अप्पय्यदीक्षिताच्या अनुभयपर्यवसायी व्यतिरेकाच्या उदाहरणांत उपमान अगर उपमेय यांपैकीं कोणाचाच उत्कर्ष विशेष दाखविला नाहीं; म्हणून याला व्यतिरेकभेद म्हणणें कितपत योग्य आहे हा प्रश्नच आहे.

जगन्नाथः— उपमानादुपमेयस्य गुणविशेषवत्त्वेनोत्कर्षो व्यतिरेकः ॥

उपमेयोत्कर्षानेंच व्यतिरेक होतो, उपमानाच्या उत्कर्षानें होत नाहीं, कारण उपमानोत्कर्षाचें उदाहरण हें अन्तीं उपमेयोत्कर्षाचेंच होतें असें जगन्नाथानें म्हटलें आहे. जगन्नाथानेंही मम्मटाचेच २४ भेद मान्य केलेले दिसतात.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून असें दिसून येईल कीं 'भेद स्पष्ट सांगणें' व 'भेद मुळींच न सांगणें,' हाच व्यतिरेक व प्रतीपांत फरक आहे. दोहोंतही उपमेयोत्कर्ष करणारा भेद दिलेला नसतो,व्यतिरेकांत तो निदान सूचित असतोच, रुद्रट व रुय्यक उपमानोत्कर्षानेंही व्यतिरेक होतो असें मानतात. भामह, दण्डी

---

१ कु. (२०) ५७. २ कु. पान ७२·१. ३ र. गं. ३४६.

यांच्या व्याख्यांत स्पष्टपणें नाहीं, तरी त्यांच्या उदाहरणांवरून उपमेयोत्कर्ष हाच व्यतिरेक म्हणण्याकडे त्यांचा कल आहे, तसेंच रुय्यक, रुद्रट व विश्वनाथ यांखेरीज बाकी सर्वजण स्पष्टपणें म्हणतात. प्रतीप व व्यतिरेक यांत सामान्य गोष्ट उपमेयोत्कर्ष असतां व्यतिरेक व प्रतीप हे दोन मानण्याचें कारण नाहीं, कारण निमित्त अनुक्त असतां प्रतीपाचाच भास होतो. तसेंच उत्कर्षांत सौम्यता असेल तेथें प्रतीप भासतो. तेव्हां व्यतिरेक हा मुख्य मानून प्रतीप हा त्याचा पोटभेद मानावा किंवा प्रतीप मुख्य व व्यतिरेक पोटभेद समजावा. पण व्यतिरेकाची सर्वांगीण व्याप्ति बघतां प्रतीप हाच पोटभेद मानणें युक्त होईल. आतां हें प्रकरण संपविण्यापूर्वीं हें सांगणें अवश्य आहे कीं दण्डीचे उत्प्रेक्षितोपमा, निंदोपमा हे भेद अनुक्रमें प्रतीप व व्यतिरेकासारखे वाटतात. दण्डीनें दिलेलें उत्प्रेक्षितोपमेचें उदाहरणः— मय्येवास्या मुखश्रीरित्यलामिन्दोर्विकत्थनैः ।

पद्मेऽपि सा यदस्तीवेत्यसावुत्प्रेक्षितोपमा ॥[1]

निन्दोपमेचें दण्डीनें दिलेलें उदाहरणः—

पद्मं बहुरजश्चन्द्रः क्षयी ताभ्यां तवाननम् ।
समानमपि सोत्सेकमिति निन्दोपमा स्मृता ॥[2]

याशिवाय दण्डीच्या आणखी कांहीं उपमाभेदांत प्रतीप व व्यतिरेकाचा गंध येतो.

## ९ सहोक्ति.

३९. एकाहून अधिक गोष्टींबद्दल सहभाव सांगणें याला सहोक्ति म्हणतां येईल. ( सह+उक्ति=बरोबर सांगणें ) भामहः—

तुल्यकाले क्रिये यत्र वस्तुद्वयसमाश्रये ।
पदेनैकेन कथ्येते सहोक्तिः सा मता यथा ॥[3]

" दोन वस्तूंच्या सम वेळीं घडणाऱ्या क्रिया एका पदानेंच सांगतात तेव्हां सहोक्ति होते. " उदाहरणार्थ,

साप्तार्श्रु शिर वृषाचें प्रथम क्षोणीतळीं गळालें हो ।
मग सकुसुम वृष्टि तनु; सधर्मभय शत्रुबळ पळालें हो. ॥[4]

आसाश्रु व शिर, वृष्टि व तनु, धर्मभय व शत्रुबळ, या वस्तुद्वयांच्या क्रिया तुल्यकाळीं घडलेल्या आहेत व त्या क्रिया वस्तुद्वयांत समाश्रित आहेत म्हणून ही सहोक्ति झाली.

दण्डी।— सहोक्तिः सहभावस्य कथनं गुणकर्मणाम्[5]

---

१ का. द. २·२५. २ का. द. २·३०. ३ भा. लं. २·३९. ४ मो. कर्णपर्व ४९·५३.
५ का. द. २·३५१.

(१) गुण अथवा (२) कर्म अथवा (३) गुणकर्म यांचें सहभावानें कथन याला सहोक्ति म्हणावयाचें." भामहापेक्षां दण्डींचीच व्याख्या अधिक चांगली वाटते. कारण क्रियांचेंच एका पदानें कथन असतां सहोक्ति होते किंवा त्या क्रिया दोनच वस्तूंचा आश्रय घेणाऱ्या असाव्या असा निर्बंध अयोग्य आहे; कारण तीन अगर अधिक वस्तु असतांही त्यांच्या समाश्रयानें राहणाऱ्या क्रियांचें कथन करून सहोक्ति होऊं शकेल. याचें उदाहरण वर दिलेंच आहे. सहभाव कथन हें गुण, क्रिया, कर्म यांपैकीं कोणांतही संभवेल, असें असतांही क्रियेपुरताच विशिष्ट निर्बंध घालून सहोक्तीचें राज्य संकुचित होईल. या दृष्टीनें दण्डीनें 'गुणकर्मणाम्' म्हणावयास नको होतें. उद्भटानें भामहाचीच री ओढली आहे. त्याची व्याख्या,

तुल्यकाले क्रिये यत्र वस्तुद्वयसमाश्रिते ।
पदेनैकेन कथ्येते सा सहोक्तिर्मता सताम् ॥

इन्दुराजानें टीकेंत दीपक सहोक्तींत फरक दाखविला आहे. दीपकांत तुल्य-कालीनत्व नसतें. सहोक्तींत एककालनित्व नसून समकालनित्व असतें. सहोक्तींत समभावच मुख्य असतो तो दीपकांत दाखविलेला नसतो. सहोक्तींत कविप्रतिभेनेंच शोभा येईल. नाहीं तर केवळ सह शब्दाचा उपयोग करून 'रामा सह गोविंदा गेला' असें म्हणण्यानें सहोक्ति होणार नाहीं.

वामनः—वस्तुद्वयक्रिययोस्तुल्यकालयोरेकपदाभिधानं सहोक्तिः ॥

वामनाची व्याख्या म्हणजे सूत्रमय केलेली भामहाचीच व्याख्या होय. रुद्रटानें भामहाच्या 'तुल्यकाले' या शब्दाची फोड केली आहे.

**४०.** रुद्रटानें सहोक्तीचें वास्तवालंकारांत व औपम्यालंकारांत असें दोन ठिकाणीं विवेचन केलें आहे. वास्तवालंकारांतील सहोक्ति तीन प्रकारची दिली आहे:—

(१) जशा तऱ्हेचा प्रधान अर्थ असेल तसाच दुसरा अर्थ समजून त्यांविषयीं समान उक्ति असणें.

(२) एकानें ज्या रीतीनें गोष्ट केली तीच सहार्थानें सांगणें.

(३) अन्योन्य निरपेक्ष असे समानधर्मीय अर्थ समकालीं घडले असें सांगणें त्यानें औपम्यालंकारांतील सहोक्ति दोन प्रकारची दिली आहे:—

(१) क्रियेमध्यें अतिशयाधिक्य आहे हें माहीत असणारा जो क्रियार्थ (म्हणजे उपमानार्थ) तो उपमेयार्थाबरोबर असा दाखविणें कीं ते दोन्ही अर्थ समान-कालीं घडणाऱ्या क्रियांचे अर्थ असे दिसावे.

(२) एका कर्त्यानें अनेक कर्माश्रित केलेली क्रिया असतां त्यांतील एकाच कर्माचें दुसऱ्या कर्माबरोबर वर्णन करणें.

---

१ का. सा. सं. ५·१६    २ का. सू. ४·३·२८

अशा रीतीनें रुद्रटाची सहोक्ति पांच प्रकारची झाली. रुद्रटानें अतिशयालंकारांत सहोक्ति मुळींच घातली नाहीं. पण त्यानें मानलेल्या प्रकारांत अतिशय आहे असें पाहून रुय्यकानें रुद्रटाचींच उदाहरणें देऊन अतिशयोक्तिमूला सहोक्ति केली व रुद्रटाचें इतर म्हणणें व्याख्यारूपानें पुढें ठेविलें. म्हणून रुद्रटाच्या औपम्यालंकाराच्या सहोक्तींतून उपमेयोपमानभाव त्यानें घेतला. पण त्यांत तो सपशेल फसला. रुद्रटाच्या वर्गवारींत चूक असली तरी व्याख्यांत तो चुकला नाहीं. त्यानें सहोक्तीच्या व्याख्या मात्र लांबलचक केल्या आहेत. सहार्थानें काय काय गुंफितां येईल हें सांगण्यासाठीं त्यानें प्रत्येक गुंफिल्या जाणाऱ्या गोष्टींसाठीं स्वतंत्र व्याख्या दिली. पण त्याचें थोडक्यांत मंथन मम्मटानें केलें. त्याची व्याख्या—

"सहोक्तिः सा सहार्थस्य बलादेकं द्विवाचकम्"[1]

रुद्रटाच्या वास्तवालंकारांतील सहोक्तीच्या दोन्ही व्याख्यांच्या उदाहरणांत कार्यकारणपौर्वापर्यविपर्यय व संबन्ध नसतां संबन्ध दर्शविणारी अतिशयोक्ति असल्यानें रुय्यकानें अतिशयोक्तिमूला सहोक्ति असें नांव ठेऊन तिचीं उदाहरणें रुद्रटापासून जशींच्या तशींच दिलीं. रुद्रटानें सहोक्ति ही दोन सदरांत घालण्याचें कारण असें दिसतेः—

'भवदपराधैस्सार्धं संतापो वर्धतेतरां तस्याः'[2]

या उदाहरणांत अपराधाबरोबर राग येणें हें वस्तुरूपकथन आहे. त्याचप्रमाणें

'कुमुददलैस्सह संप्रति विघटन्ते चक्रवाकमिथुनानि'[3]

'मिथुनानि' यांतही कुमुददल उघडण्याचे वेळींच चक्रवाक विघटित होतात कारण या दोन्ही गोष्टी रात्रीं घडतात. वरील दोन्ही उदाहरणांत वस्तुस्वरूपकथन असल्यानें यानें ही सहोक्ति वास्तवालंकारांत घातली असावी. पण रुय्यकाची काव्यमय दृष्टि यांत 'मोठा आशय' पाहूं लागल्यानें हीं वर्णनें त्याला अतिशयोक्तिमूला सहोक्तीची वाटलीं. म्हणजे दृष्टिकोण बदलल्यामुळें सहोक्तीचें मूळ अधिष्ठानही बदललें. रुय्यकाला मालासहोक्ति रुद्रटाच्या तिसऱ्या प्रकारावरून सुचली असावी. मम्मटाची व्याख्या वर दिलीच आहे. 'एक अर्थ प्रगट करीत असतां सह शब्दासारख्या शब्दांनीं अनेक अर्थ बरोबरच सांगतात तेव्हां सहोक्ति होते." या मम्मटाच्या व्याख्येंत 'अर्थ' हा एकच शब्द घातल्यानें गुणधर्मक्रियेच्या त्रैगुण्यांत सांपडलेली सहोक्ति मुक्त झाली. उदाहरणः—

सहित विजयलक्ष्मी जानकी भाज रामा।[4]
वर्णनें प्रगट लज्जा लंघिती भूमिसीमा ॥

---

1 का. प्र. १० १७. 2 का. लं. ७. १६. 3 का. लं. ७. १८. 4 मु. बालकांड. १०२

४१. रुय्यकः—उपमानोपमेययोरेकस्य प्राधान्यनिर्देशेऽपरस्य सहार्थसम्बन्धे सहोक्तिः॥[1]

रुय्यकाच्या वर्गवारींत हा अलंकार गम्यौपम्याश्रयांतील भेदप्रधान अलंकारांपकीं एक म्हणून मानला गेला आहे; म्हणून यानें उपमान व उपमेय असे शब्द घातले आहेत.

" उपमान व उपमेय यांपैकीं एकाचा प्राधान्यानें निर्देश करून दुसऱ्याचा सहार्थसंबंध लावणें याला सहोक्ति म्हणावयाचें." सह बरोबर ज्याची तृतीया असेल तें उपमान व अर्थानें प्रधानत्व येणारें तें उपमेय समजावयाचें. सहोक्ति अतिशयमूल असतां, ( १) कार्यकारण–प्रतिनियम–विपर्ययरूपा, (२) अभेदाध्यवसायरूपा श्लेषभित्तिका ( ३ ) अभेदाध्यवसायरूपा हे अतिशयोक्तीचे प्रकार देऊन त्या प्रकारांनीं होणाऱ्या कर्तृसाहित्यांचीं व कर्मसाहित्याचीं उदाहरणें रुय्यकानें दिलीं आहेत. याशिवाय मालासहोक्तीचेंही उदाहरण दिलें आहे.

रुय्यकानें प्रस्तुताप्रस्तुत, उपमानोपमेय, कार्यकारणभाव यांचें स्तोम पुष्कळ ठिकाणीं विनाकारण माजविलें आहे. त्याचप्रमाणें सहोक्ति अलंकारांतही झालें आहे. पण अतिशयोक्ति ही सर्वच अलंकारांत असते असें असतां प्रत्येक अलंकाराचे वेळीं तिचा स्वतंत्र नामनिर्देश करून दाखविणें अनिष्ट आहे.

प्रसिद्धदूराधिकक्रियो योऽर्थः।[2]
यस्य समानक्रिय इति कथ्येतान्यः समं तेन॥

या रुद्रटाच्या व्याख्येनें क्रियांचा पौर्वापर्य–विपर्यय आहे असें सिद्ध होत आहे. मग पुनः अतिशयोक्तीने आपली वंशावळ सहोक्तीच्या घरीं न वाचणेंच बरें.

रुय्यकानें, कार्यकारण–प्रतिनियम–विपर्ययरूपा–अतिशयोक्तिमूला सहोक्ति मानल्यामुळें जगन्नाथाचा रुय्यकावर जळफळाट झाला; तरी 'सहोक्ति 'सह' य शब्दानेंच जगत असल्यानें अतिशयोक्तींतील कार्यकारण-पौर्वापर्य-विपर्ययाचा 'सह' शब्दाचा भाग सहोक्तीला दिला तरी हरकत नाहीं. तेथें अतिशयोक्ति न मानणेंच युक्त होईल. त्याचप्रमाणें यांत उपमानोपमेयांचा संबंध न लावतां मम्मटानें केलेली मोघम व्याख्याच सहोक्तीला बरेंच अंगण खेळावयास देईल. नाहींतर ती एकेजागीं रोगट होण्याचा संभव आहे. 'साताश्रु शिर ' हें अगदीं प्रारंभीं दिलेलें उदाहरण उपमानोपमेयभाव न दाखवतां सहार्थ दाखवितें व तरीही तो सहोक्ति अलंकार होतो.

विद्याधरः—प्राधान्येन निबद्धं यत्तुपमानोपमेययोरेकम्।
अन्यत् सहार्थसहितं भवति सहोक्तिस्तदाख्याता॥[3]

यानें रुय्यकाचेंच अनुकरण केलें आहे. व त्याच्याच सारख्या अतिशयोक्तिमूला सहोक्तीचीं विद्याधरानें दोन उदाहरणें दिलीं आहेत.

---

१ अ. सू. २९. २ का. लं. ८.९८. ३ ए. ८. २१.

विश्वनाथः—सहार्थस्य बलादेकं यत्र स्याद्वाचकं द्वयोः ।
सा सहोक्तिर्मूलभूतातिशयोक्तिर्यदा भवेत् ॥[1]

विश्वनाथानें रुय्यकाचा उपमानोपमेय संबंध गाळून मम्मटाची व्याख्या स्वशब्दांत मांडली; व रुय्यकानें अतिशयोक्तीचा केलेला मोठा प्रस्ताव विश्वनाथानें आपल्या व्याख्येंतच गोंवून टाकला.

अप्पय्यदीक्षितः—सहोक्तिः सहभावश्चेद् भासते जनरंजनः ॥[2]

जगन्नाथः—गुणप्रधानभावावच्छिन्नसहार्थसंबंधः सहोक्तिः ॥[3]

गुणप्रधानभावानें मर्यादित असलेल्या अर्थात सहार्थसंबंध असणें यास सहोक्ति म्हणतात. पूर्वी सांगितल्याप्रमाणें कार्यकारणभावानें होणाऱ्या अतिशयोक्तिमूला सहोक्तीला जगन्नाथानें अतिशयोक्तीच म्हणावें असें सांगितलें आहे. रुय्यकानें मालासहोक्तीचें दिलेलें उदाहरण धर्मैक्यामुळें सहोक्तीचें होणार नाहीं असें जगन्नाथ म्हणतो.

**४१.** या एकंदर विवेचनांवरून आपणांस एवढें सार दिसतें कीं सहोक्तींत उपमानोपमेयभावाचें बंधन व्यर्थ आहे. कारण त्या भावाशिवाय इतर ठिकाणींहि सहोक्ति दिसते. त्याचप्रमाणें अतिशयोक्ति सर्व अलंकारांचाच प्राण आहे, या दृष्टीनें सहोक्तींतही ती कित्येक वेळां दिसेल अगर कित्येक वेळां अनुप्राणक दुसरा अलंकार असेल, अशा वेळीं ' सह ' शब्दाकरितां मानलेली, सहभावाकरितां मुद्दाम निर्माण केलेली सहोक्ति इतर अलंकारांना श्रेष्ठ ठरूं देणार नाहीं. या दृष्टीनें मम्मटाची व्याख्या योग्य ठरेल. मालासहोक्तीचें उदाहरणः—

उभित सह मुनींची रोमराजी विनोदें ।
नमित सह नृपांचीं शीसरंभारविंदें ।
सह जनकविकल्पा स्फाळिलें चाप नेटें ।
सहित मन सितेचें चाप ओढीत चोटें ॥[4]

यांत धर्मैक्य नसल्यानें व पुष्कळ अर्थांचा सहभाव असल्यानें ही मालासहोक्ति होईल. मालासहोक्तींत सहार्थसंबंधानें अनेक गोष्टी असून त्यांत धर्मभिन्नता असते. सहोक्तींत दोनच गोष्टींत धर्मैक्यानें सहार्थसंबंध असतो.

## १० विनोक्ति.

**४३.** सहोक्ति म्हणजे सहार्थानें शोभा येणें व विनोक्ति म्हणजे विना अर्थानें शोभा येणें. अमुक गोष्ट अमक्यावांचून शोभत नाहीं अगर शोभते असें शोभादायक रीतीनें सांगणारी उक्ति ती विनोक्ति होईल.

---

१ सा. द. १०. ५५. २ कु. ( २१ ) ५८. ३ र. गं. ३५७. ४ मु. बालकांड ९५.

वामन रुद्रटापर्यंत अलंकारांचें साम्राज्य वाढलें नव्हतें. वाढलेल्या राज्यांत खंबीरपणा यावा म्हणून रुद्रटानें स्वराज्याची स्थापना करून चतुःप्रधानमंडळ नेमलें. पण कालाबरोबर विचार बदलतात तद्वत् पुढें या मंडळाला कारभार उरकेना म्हणून रुय्यकानें पुनर्घटना केली. या मध्यंतरींच्या काळांत पूर्वींच्या प्रत्येक अलंकाराला व्यतिरेकी अलंकार मानला गेल्यानें व त्यांतूनही आणखी कांहीं अलंकार मानले जाऊन त्यांचें स्वतंत्र अस्तित्व जाणवूं लागल्यानें अलंकारांचें साम्राज्य दुप्पटीपेक्षांही जास्त झालेलें आपणास दिसतें. कांहीं अलंकारांचा उदय रुद्रटाचे अगर मम्मटाचे आधीं नव्हताच; त्या नंतर कांहीं अलंकार उगवले. विनोक्ति हा अलंकार सहोक्तीचा व्यतिरेकी म्हणून मम्मटाचे वेळीं मानला गेला. रुद्रटाच्या चतुस्सीमेंत तो कोठेंच नव्हता.

मम्मटः—विनोक्तिः[1] सा विनान्येन यत्रान्यः सन्न नेतरः ॥

उदाहरणार्थः—दुग्धपूर तो नसतां निजरूपीं क्षीरसिंधु तो जैसा।
वसंत आला नाहीं तरि तो उद्यानभाग जैसा ॥

दुग्धपूर नसतां क्षीरसिंधु आणि वसंत नसतांही उद्यानभाग शोभादायक वर्णिले आहेत, म्हणून हा विनोक्ति अलंकार झाला.

" अमृतकराचा[3] उदय न होतां रजनीसमयहि जैसा।
तुमच्या विरहें आजि जहाला कवण देश तो ऐसा ॥

चंद्रावांचून रजनी शोभत नाहीं असें सांगितल्यानें ही विनोक्ति झाली. वर दिलेल्या दोन्ही उदाहरणांत उपमा आहे पण स्वतंत्र ओळी पाहतां त्यांत विनोक्तीच आहे.

रुय्यकः—विना किंचिदन्यस्य सदसत्त्वाभावो विनोक्तिः[4]।

विद्याधरः—एकेन विना[5] किंचिद्यत्रान्यत् स्यात्सतोऽसतो यद्वा ॥

विश्वनाथः—विनोक्तिर्यद्विनान्येन[6] नासाध्वन्यदसाधु वा ॥

विश्वनाथ व रुय्यक यांनीं विनोक्ति व सहोक्ति ही विना व सह या शब्दांवाचूनही होईल असें म्हटलें आहे. पण ते शब्द नसले तरी विना याअर्थीं वर्जित, व्यक्त इत्यादि व सहार्थी साकं, समं इत्यादि शब्द घातले पाहिजेतच. विनोक्ति व सहोक्ति यांचा अर्थ 'विना' आणि 'सह' याअर्थीं कोणचेही शब्द घालून उक्ति असा आहे. मग रुय्यक–विश्वनाथाच्या या विशिष्ट टीपेला महत्त्व राहत नाहीं. सहभाव अगर विनाभाव हा अजिबात गम्य राहून हे अलंकार झाले असते तर या टीपेला महत्व आहे, पण तसें होत नाहीं.

---

१ का॰ प्र. १०·१७१, २–३ र. पं. नलदमयंती. ४ अ. सू. ३०. ५ ए. ८·२२.
६ सा. १०·५५.

अप्पय्यदीक्षितः—विनोक्तिश्चेद्विना किंचित्प्रस्तुतं हीनमुच्यते ।
तच्चेदू किंचिद्विना रम्यं विनोक्तिः सापि कथ्यते ॥

जगन्नाथः—विनार्थसंबंध्येव विनोक्तिः ॥

ही विनोक्ति स्वतंत्र, त्याचप्रमाणें इतर अलंकारांना अनुकूलही असते. वर दिलेल्या उदाहरणांतील विनोक्ति उपमानुकूला होईल. जगन्नाथानें दीपक प्रतिवस्तूपमा, श्लेष इत्यादि अलंकारांनीं युक्त अशी विनोक्ति दिली आहे.

दिसली तयांस तिथुनी मनोहरा ।
वनभूमि ती विविध-पुष्प सुंदरा ।
तिलकें दिसे तरी खरी विलासिनी ।
तिलका-विना न कांत कामिनी ॥[3]

ही दृष्टान्तानुकूला विनोक्ति आहे. श्लोकांत शेवटी दृष्टान्त स्पष्ट आहे.

वरील व्याख्यांपैकीं अप्पय्यदीक्षिताच्या व्याख्येंतील 'प्रस्तुन' हा शब्द बरोबर नाहीं; कारण या अलंकारांत प्रस्तुत गोष्टीचेंच विनार्थभावानें वर्णन असतें असें नाहीं. अप्पय्यदीक्षिताचीं उदाहरणेंही इतकीं सुंदर नाहींत.

## ११ निदर्शना.

४४. दर्शन म्हणजे देखावा अथवा उदाहरण. निःशेष दर्शन तें निदर्शन. एकाद्या वाक्याचा अर्थ दुसऱ्या वाक्यांत निःशेषपणें दिसणें याला निदर्शन म्हणतां येईल. निदर्शना अलंकारांतही हीच स्थिति असते.

कित्येक वेळां आपणांस 'निदर्शना' हें नांव न दिसतां अलंकारकर्त्यांनीं 'विदर्शना' हें नांव दिलेलें दिसतें. विशेषेण दर्शनं यस्याः सा विदर्शना. दुसऱ्या उदाहरणांत पहिल्याचें विशेष दर्शन होणें ह्मणजे विदर्शना असा अर्थ होतो.

भामहाची व्याख्याः— क्रिययैव विशिष्टस्य तदर्थस्योपदर्शनात् ।
ज्ञेया निदर्शना नाम यथेव वतिभिर्विना ॥[4]

" उपमावाचक शब्दावांचून विशिष्ट गोष्टीच्या क्रियेनेंच त्याचा अर्थ दर्शित करणें " म्हणजे क्रिया चालू असतां त्या क्रियेंतून विशिष्ट अर्थाचें उपदर्शन पुढें मांडणें म्हणजे निदर्शना होय. उदाहरणार्थः—

होतां[5] पयोद-पटलीं क्रम-पूर्व लोप ।
सांगे जना घन-रवें ह्मणें इंद्र-चाप ।
" आयुष्य अल्पचि असो परि लोकमान्य
हावोनि जा मिळविण्या परलोक धन्य ॥ "(किंचित् फरकानें )

---

१ कु.(२२)५९ २ र. गं. ३६५ ३ सा. व. वि. ५·२३ ४ भा. ल. ३·३२.
५ राधारमण.

इंद्रचापाचा लोप होत असतांच तें 'अल्पायुष्य असतांही लोकमान्य होऊन जा' असें सांगतें. 'अल्पायुष्य असतांही लोकमान्य होऊन जा' या विशिष्ट अर्थाची निष्पत्ति येथें झाली म्हणून ही निदर्शना झाली.

दण्डीः--अर्थान्तरप्रवृत्तेन किंचित्तत्सदृशं फलम् ।
सदसद्वा निदर्श्येत यदि स्यात्तन्निदर्शनम्[1] ॥

" एक अर्थविशेष वर्णित असतां तत्सदृश सत् किंवा असदर्थ यांचा निर्देश करणें याला निदर्शना म्हणतात." दण्डीची ही व्याख्या ठाकठिकीची झाली नाहीं. निदर्शनेंत मुख्य गोष्ट म्हणजे गम्यौपम्यभाव होय. एका अर्थांतून तत्सदृश भाव काढणें अशी स्थिति दुसऱ्या अलंकारांतही असते. या दृष्टीनें दण्डीचें सन्निदर्शनेचें उदाहरण इतरांच्या मतें निदर्शनेचें होणार नाहीं --

उदयन्नेष सविता पद्मेष्वर्पयति श्रियम् ।
विभावयितुमृद्धीनां फलं सुहृदनुग्रहम्[2] ॥

'समृद्धीचें फळ सुहृदनुग्रह हें असावें हें दाखविण्यासाठीं सूर्यानें स्वतः उगवून कमलांनाही शोभा आणली' असें सांगितलें. येथें ' विभावयितुं ' या शब्दानें हेतु प्रधान वाटतो; कारण केवळ दाखविण्यासाठीं असें केलें म्हणण्यांत दाखविण्याच्या हेतूला महत्त्व येतें, म्हणून हा अलंकार निदर्शना व्हावयाचा नाही. 'विभावयितुं' या ऐवजी 'विभावयत्' असें पद घातलें तर ती निदर्शना होईल, कारण त्यांत क्रिया मुख्य असून तत्सदृश्य अर्थ ओघानें दृष्टीस पडतो. दण्डीच्या व्याख्येंत हेतूकरतां क्रिया आहे. दण्डीचें दुसरें उदाहरणही असेंच आहे.

उद्भटः--अभवन्वस्तुसंबंधो भवन्वा यत्र कल्पयेत् ।
उपमानोपमेयत्वं कथ्यते सा विदर्शना[3] ॥

जेव्हां दोन गोष्टींतील शक्य अगर अशक्य संबंध उपमेंत पर्यवासित होतो तेव्हां विदर्शना होते. उद्भटानें या ठिकाणीं भामहाचा आधार बराच सोडला आहे. वस्तु-संबंध हा भेद मात्र भामहाच्या व्याख्येवरून त्यानें घेतला आहे. वस्त्वसंबंध हा त्याचाच स्वतंत्र भेद आहे. उद्भटानें उदाहरण मात्र वस्त्वसंबंध निदर्शनेचें दिलें आहे. उद्भटानें निदर्शना हा शब्द कोणापासून घेतला किंवा काय हें सांगतां येणार नाहीं. उद्भटाची व्याख्या बरीच संघटित झाली आहे. व पुढें मम्मटानेंही हिचा अनुकार केला आहे.

वामनः--क्रिययैव स्वतदर्थान्वयख्यापनं निदर्शनम्[4] ॥

---

१ का. द. २. ३४८. २ का. द. २. ३४९. ३ का. सा. सं. ५.६१.
४ का. सू. ४.३.२०.

"स्वतःच्या क्रियेनेंच तदर्थान्वयसंबंधीं दुसऱ्या अर्थाचें प्रतिपादन करणें म्हणजे निदर्शना." ही व्याख्या भामहाच्या व्याख्येसारखीच झाली. रुद्रटाचे काव्यालंकारांत हा अलंकार आढळत नाहीं.

४१. मम्मटः—अभवन्वस्तुसंबंध उपमा परिकल्पकः ॥
स्वस्वहेत्वन्वयस्योक्तिः क्रिययैव च सापरा ॥

मम्मटानें उद्भटाची व्याख्या फोडून अधिक स्पष्ट केली. (१) असंबंधी गोष्टीशीं उपमाभाव पर्यवसित होणें, (२) क्रियेनें स्वतःचें स्वरूप व त्याचें कारण यांचा संबंध जाणविणें, असे निदर्शनाचे दोन प्रकार यानें दिले. मम्मटानें माला-निदर्शनाही दिली आहे.

सर्पातें बिसतंतुनें सुदृढ तो बांधावया इच्छितो, ।
किंवा वज्रमणी शिरीषकुसुमें भेदावया पाहतो, ।
किंवा तो मधुबिंदुनें मधुरता क्षाराब्धिला आणितो ।
जो मूर्खासि सुभाषितें वश करूं ऐसें म्हणीं बोलतो ॥

'मूर्खाला सुभाषितानें वश करणें' ही क्रिया व पहिल्या तीन ओळींत सांगितलेल्या निरनिराळ्या क्रिया यांत उपमा-भाव येतो म्हणून, ही मालानिदर्शना झाली.

रुय्यकः—संभवतासंभवता वा वस्तुसंबन्धेन गम्यमानं प्रतिबिम्बकरणं निदर्शना ॥[3]

रुय्यकानें गम्यमान प्रतिबिम्बकरण असें शब्द घातल्यानें याची व्याख्या इतरांपेक्षां थोडी निराळी झाली. औपम्यभाव व प्रतिबिम्बभाव यांत फरक आहे. प्रतिबिंब म्हणजे मुळाची जणुं प्रतिकृतीच असते. औपम्यभावांत प्रतिकृति म्हणण्याइतकें साम्य नसतें. संभवणारा वस्तुसंबंध व असंभव वस्तुसंबंध इतरांप्रमाणेंच देऊन नंतर यानें ही निदर्शना पदार्थवृत्ति व[4] वाक्यार्थवृत्ति असते असें म्हटलें आहे.

त्वत्पादनखरत्नानां यदलक्तकमार्जनम् ।
इदं श्रीखंडलेपेन पाण्डरीकरणं विधोः ॥

हें वाक्यार्थगताचें उदाहरण दृष्टान्ताचें नसून निदर्शनेचें आहे असें रुय्यक म्हणतो. पण वास्तविक हें उदाहरण दृष्टान्ताचेंही नाहीं व निदर्शनेचेंही नाहीं. कारण यांत अभेद स्पष्ट आहे. हें मुख चंद्रच आहे असें म्हणण्यांत ज्याप्रमाणें रूपक होतें त्याप्रमाणें जें अलक्तकमार्जन तें पाण्डरीकरण आहे असें म्हणून अभेद दाखविला गेल्यानें हें रूपकाचेंच उदाहरण होईल.

निदर्शना
- पदार्थगत
  - असंभववस्तुसंबंध—संभववस्तुसंबंध (१, २)
- वाक्यार्थगत.
  - असंभववस्तुसंबंध—माला.—शृंखला (३, ४, ५)

---

१ का. प्र. १०·१४९-१५० २ वामन-४. नी. ३ अ. सू. २७. ४ अ. सू. ८२.

याप्रमाणें रुय्यकानें भेद केले आहेत. रुय्यक म्हणतो की, वाक्यार्थगत निदर्शनेंत प्रस्तुताचा गुण अप्रस्तुतांत असणें असंभवनीय असतांही तो दिसणें एवढ्यानेंच निदर्शना होत नसून अप्रस्तुताचा गुण प्रस्तुतांत असणें असंभवनीय असतांही तो दिसणें, यामुळें ही निदर्शना होईल.

विद्याधरः— प्रतिबिंबनस्य करणं संभवता यत्र वस्तुयोगेन ।
गम्यमसंभवता वा निदर्शना सा द्विधाभिमता ॥[1]

यानें रुय्यकाचें इतकें अनुकरण केलें आहे कीं वाक्यार्थगताचें याचें उदाहरण बरोबर असतांही 'त्वत्पादनख०' या उदाहरणासंबंधीं रुय्यकानें दिलेली टीका यानें आपल्या उदाहरणाखालीं दिली आहे. जणुं याचेंही उदाहरण कोणी दृष्टान्ताचे सदरांत घातलें होतें !

विश्वनाथः— संभवन्वस्तुसंबंधोऽसंभवन्वापि कुत्रचित्[2] ।
यत्र बिम्बानुबिम्बत्वं बोधयेत्सा निदर्शना ॥

विश्वनाथानेंही रुय्यकाचें अनुकरण केलें आहे. मात्र त्याच्या पदार्थ व वाक्यार्थगत वृत्तीला विश्वनाथानें एकवाक्यगा व अनेकवाक्यगा असें नांव दिलें आहे.

अप्पय्यदीक्षितः—वाक्यार्थयोः सदृशयोरैक्यारोपो निदर्शना[3] ॥

यानें ऐक्यारोप ह्मणून रूपकव्यावृत्ति केली पण 'यद्दातुः सौम्यता सयं पूर्णेन्दोरकलंकता[4]' या त्याच्या उदाहरणांत ऐक्यारोप नसून अभेदाचा आरोप दिसतो; म्हणून तें उदाहरण रूपकाचेंच होईल. अप्पय्यदीक्षितानें (१) वाक्यार्थवृत्ति (२) पदार्थवृत्ति (३) क्रियेनें सदसदर्थाचें बोधन असे तीन भेद केले आहेत. रुय्यकानें ज्याला पदार्थवृत्ति म्हटलें आहे त्याला हा वाक्यार्थवृत्ति म्हणतो, व ज्याला वाक्यार्थवृत्ति असें रुय्यक म्हणतो त्याला यानें पदार्थवृत्ति म्हटलें आहे. अप्पय्यदीक्षिताची पदार्थवृत्ति व वाक्यार्थवृत्ति यांबद्दलची कल्पना बरोबर आहे. तो म्हणतो विशिष्ट पदार्थांवर विशिष्ट धर्माचा आरोप असल्यास, वाक्यार्थनिदर्शना व उपमानोपमेयांमध्यें एकावर दुसऱ्याच्या धर्माचा आरोप असल्यास ती पदार्थ निदर्शना होते. अप्पय्यदीक्षितानें माला व शृंखला या निदर्शनाभेदांचीही उदाहरणें दिलीं नाहींत. या फरकाशिवाय त्याचे विचार रुय्यकाप्रमाणेंच आहेत. पण याची व्याख्या मात्र बरोबर नाहीं.

जगन्नाथः-- उपात्तयोरर्थयोरार्थाभेद औपम्यपर्यवसायी निदर्शना[5] ॥

अप्पय्यदीक्षिताच्या शब्दांनीं त्यांच्या व्याख्येंत झालेला घोंटाळा जगन्नाथाच्या व्यवस्थित मांडणीनें नाहींसा झाला. 'संपादित अर्थांतील आर्थ अभेद जेव्हां उपमेंत पर्यवसित होतो तेव्हां निदर्शना होते.' उदाहरणः—

---

१ ए. ८·१९ २ सा. द. १०·७१ ३ कु. (१९) ५४ ४ कु. पान ६३ श्लोक ५४.
५ र. ग. ३३९

सकैळ रिपु वधुनि एकाकरवीं ब्य ! तूंचि राज्य हारविता, !
नक्षत्रत्व समस्तां देइल, आतां धरील हा रविता ॥

यांत अंत्यार्ध हें उपमेंत पर्यवसित झालेलें असल्यानें हा निदर्शनालंकार झाला.

## १२ प्रतिवस्तूपमा.



४५. एका वस्तूला दुसऱ्या वस्तूची उपमा देणें त्याला प्रतिवस्तूपमा म्हणतां येईल. ही उपमा सर्व वाक्य दुसऱ्या वाक्याशीं उपमा-भावानें असतां होते असें पुढें दिसून येईल. भामहानें प्रतिवस्तूपमेची केलेली व्याख्या,

समानवस्तुन्यासेन प्रतिवस्तूपमोच्यते ।
यथेवानभिधानेऽपि गुणसाम्यप्रतीतितः ॥
साधुसाधारणत्वादिर्गुणोऽत्र व्यतिरिच्यते ।
स साम्यमापादयति विरोधेऽपि तयोर्यथा ॥

प्रतिवस्तूपमा हा भामहानें स्वतंत्र अलंकार मानला नाहीं. उपमाभेदांतच प्रतिवस्तूपमेची गणना केली आहे. 'यथा' 'इव' इत्यादि उपमावाचक शब्दांवांचूनही गुणसाम्य दृष्टीस आणून समान वस्तु उपमेदाखल दिलेली असते त्यास प्रतिवस्तूपमा म्हणावयाचें. 'यथेवानाभिधानेऽपि' म्हणण्यांत 'यथा' 'इव' यांचा प्रयोग असतांही प्रतिवस्तूपमा होईल असा अर्थ होतो. पुढील शास्त्रज्ञांनीं इवादि प्रयोग प्रतिवस्तूपमेंतून वर्ज्य केला आहे. भामहानें तिला उपमाभेदांत घातल्यानें 'यथा' 'इव' यांना पूर्णपणें वर्ज करण्याचें कारणच भामहाला पडलें नाहीं. भामहाच्या वेळीं दृष्टान्त मानला गेला नसल्यानें भामहाच्या प्रतिवस्तूपमेच्या उदाहरणांत दृष्टान्ताची छटा दिसतेः—

कियन्तः सन्ति गुणिनः साधुसाधारणश्रियः ।
स्वादुपाकफला नम्राः कियन्तो वाध्वशाखिनः ॥

यांत समान वस्तु न्यासापेक्षां प्रतिबिंबन अधिक दिसतें.

दण्डीः—वस्तु किंचिदुपन्यस्य न्यसनात्तत्सधर्मणः ।
साम्यप्रतीतिरस्तीति प्रतिवस्तूपमा यथा ॥

" एका वस्तूचा प्रस्ताव करून ( दुसरी ) तिच्या जवळ ठेवल्यानें सधर्मी वस्तूशीं साम्य प्रतीत होऊं लागलें तर प्रतिवस्तूपमा म्हणतात." दण्डीचें उदाहरणही दृष्टांतासारखें वाटतें.

नैकोऽपि त्वादृशोऽद्यापि जायमानेषु राजसु ।
ननु द्वितीयो नास्त्येव पारिजातस्य पादपः ॥

---

१ मो. गदापर्व १·९६ २ भा. लं. १· ३४–३५. ३ भा. लं. १·३६. ४-५ का. द. २·४६-४७.

पहिल्या ओळींत विशिष्ट गुणांनीं राजाचें असलेलेंएकमेवत्व दाखविलें असून तें दुसऱ्या ओळींत पारिजाताच्या एकमेवत्वांत प्रतिबिंबित होत आहे त्यामुळें निर्माण होणारें साम्य हें दृष्टान्ताप्रमाणेंच दिसतें.

४६ .उद्भट:—उपमानेंसंनिधाने च साम्यवाच्युच्यते बुधैर्यत्र ।
उपमेयस्य च कविभिः सा प्रतिवस्तूपमा गदिता ॥
प्राकरणिकेतरत्वात्स्थित्यैकश्चोपमेयतां लभते ।
उपमानत्वं चापर इत्युपमा वाचिशून्यत्वम् ॥

उद्भटानें दृष्टांत मानला असल्यानें त्याच्या व्याख्येंत एकदम फरक झालेला आपणांस दिसतो. याच्या व्याख्येंत सधर्मत्वाला अधिक महत्व दिलेलें आहे. साम्य हें धर्मातच पाहिजे, सबंध वाक्यांत असण्याचें कारण नाहीं, हें त्यानें अधिक स्पष्ट केलें. " उपमान व उपमेय यांतील साधर्म्य दाखविणारा शब्द अनेक वेळां उच्चारला गेला तर प्रतिवस्तूपमा होते. पुष्कळ शब्द असल्यानें जरी साधर्म्यवाचक शब्द घातला नसला तरी प्राकरणिक व अप्राकरणिक भाव स्पष्ट असला पाहिजे म्हणजे उपमान व उपमेय यांतील नातें निश्चित करतां येतें, " असें उद्भट म्हणतो. याच्या व्याख्येंत एक गोष्ट चमत्कारिक वाटते ती ही की, साधर्म्यवाचक शब्द न घालतां साधर्म्य अनेक वेळां सांगून उपमानोपमेयभाव जागृत कसा राहील ? याला उत्तर म्हणून त्यानेंच 'प्राकरणिकेतरत्व०' इत्यादि पुस्ती जोडली आहे. त्यामुळें हें सिद्ध झालें कीं प्रतिवस्तूपमेंत साधर्म्यवाचि शब्द नसतो.

उद्भटाचें उदाहरण पाहिलें असतां, साधर्म्यदर्शक शब्द त्यानें अनेक वेळां घातला नाहीं; त्याची प्रतिवस्तूपमा दोनच वाक्यांत झाली आहे. दृष्टान्ताचा जन्म झाल्यानें त्याच्या उदाहरणांत दृष्टान्त दिसत नाहीं. यानें भामह–दण्डीप्रमाणें प्रतिवस्तूपमा हा उपमेचा भेद न मानतां प्रतिवस्तूपमा हा स्वतंत्र अलंकार मानला आहे. प्रतिवस्तूपमेंत सधर्माचें पुनरुच्चरण हेंच मुख्य असतें, या दृष्टीनें हा अलंकार निराळा केला गेला.

" वामनः– उपमेयस्योक्तौ समानवस्तुन्यासः प्रतिवस्तु ॥

" उपमेयरूप वाक्यार्थाचे ठिकाणीं समान वाक्यार्थ ठेवणें याला प्रतिवस्तूपमा म्हणावयाचें. " वामनाचें उदाहरण बरोबर असलें तरी व्याख्या स्पष्ट नाहीं. ती त्यानें टीकेंत स्पष्ट केली आहे. वामनानें दोनच वाक्यार्थ प्रतिवस्तूपमेंत असतात असें सांगितलें आहे; व त्या वाक्यार्थांत साम्य असतें असें टीकेंत म्हटल्यामुळें दृष्टान्ताची व्यावृत्ति झाली. पण यानें धर्माचें पुनरुच्चरण पाहिजे असें म्हटलेलें नाहीं.

---

१ का. सा. सं. १. २२–२३. २ का. सू. ४·३·२.

**४७.** रुद्रटानें प्रतिवस्तूपमा ही उपमाभेद म्हणून अगर स्वतंत्र अशी मानली नाहीं तरी त्याचा उभयन्यास हा अलंकार प्रतिवस्तूपमेसारखा वाटतो. त्याची व्याख्याः—

सामान्यावव्यर्थौ स्फुटमुपमायाः स्वरूपतोपेतौ।
निर्दिश्येते यस्मिन्नुभयन्यासः स विज्ञेयः[1] ॥

'सामान्य असे दोन अर्थ स्पष्टपणें उपमेंत पर्यवसित झालेले दाखवितात तेव्हां उभयन्यास अलंकार होतो.' याच्या उदाहरणांत भामहाच्या प्रतिवस्तूपमेची छटा दिसते. पण यानें भामहाच्या उदाहरणांत दिसणारें दृष्टान्ताचें स्वरूप पालटून टाकल्यानें याचा उभयन्यास प्रतिवस्तूपमेसारखाच दिसत आहे. त्याचें उदाहरणः—

सकलजगत्साधारणविभवा भुवि साधवोऽधुना विरलाः।
सन्ति कियन्तस्तरवः सुस्वादुसुगंधिचारुफलाः[2] ॥

येथें प्रतिबिम्बन नसून समान अर्थाचा वस्तुन्यास आहे. सामान्यौ हें पद अर्थान्तरन्यासाची व्यावृत्ति करण्यासाठीं घातलें आहे. अर्थान्तरन्यासांत सामान्य व विशेषभाव असतो. दोन्ही अर्थ सामान्य नसतात. उभयन्यासाचें विवेचनही तो अर्थान्तरन्यासानंतर ताबडतोब करतो. याच्या उभयन्यासांतील बरेच शब्द मम्मटाच्या प्रतिवस्तूपमेंत दिसतात.

भोजः— प्रतिवस्तूक्तिरप्यस्मिन्नृज्वी वक्रा च कथ्यते।
दृष्टान्तोक्तेश्च सा छायां प्रपंचोक्तेश्च गाहते[3] ॥

भोजानें प्रतिवस्तूपमा ही उपमेचाच पोटभेद पण तो दृष्टान्ताची किंवा प्रपंचोक्तीची छाया असणारा पोटभेद मानला आहे. भोजानें 'शुद्धान्तदुर्लभमिदं०, हें उदाहरण प्रतिवस्तूचें दिलें आहे व तेंच रुय्यकानें निदर्शनेचें म्हणून दिलें आहे. दृष्टान्ताची छाया असलेल्या प्रतिवस्तूक्तीचें भोजाचें वर दिलेलें उदाहरण वास्तविक निदर्शनेचेंच आहे; कारण त्यांत वस्त्वसंबंध उपमेंत पर्यवसित झाला आहे, व त्यांतील दोन्हींहि वाक्यें परस्परापेक्षी आहेत. दण्डीनंतर काश्मीरवासीयेतर असा भोजच दुसरा धरला तर दण्डीच्या प्रतिवस्तूपमेंत भोजाला दृष्टान्ताची छाया दिसल्यानें त्यानें प्रतिवस्तूपमेंत दृष्टान्ताची अगर प्रपंचोक्तीची छाया असते असें म्हणून प्रतिवस्तूपमेचें विवेचन केलें.

**४८.** मम्मटः— सामान्यस्य[4] द्विरेकस्य यत्र वाक्यद्वये स्थितिः

रुद्रटाच्या उभयन्यासांतून यानें आपली व्याख्या रूपास आणली. "जेथें एकाच साधारणधर्माचें दोन वाक्यांत दोन ठिकाणीं कथन असतें तेथें प्रतिवस्तूपमा होते" यानें 'एकस्य सामान्यस्य' म्हणून दृष्टान्ताचा निरास केला. मम्मटाच्या व्याख्येवरून असें दिसतें कीं भामहापासून रुद्रटापर्यंत प्रतिवस्तूपमा बनत असतां शेवटीं योग्य मुशींत तिला मम्मटानेंच ओतली. मम्मटाच्या मालाप्रतिवस्तूपमेचें उदाहरणः—

---

१ का. लं. ७·८४. २ का. लं. ७·८५. ३ सं. क. भ. ४·४०. ४ का. प्र. १०·१५४.

[1]तूं गुणहीन गुणागुण कैसा गा! जाणसील? अंधानें।
कैसें नाट्य पहावें, कीं स्वर्गीं सुख असत्यसंधानें॥

न जाणणें, न पाहणें, न मिळविणें यांत साम्य असल्यानें ही मालाप्रतिवस्तूपमा झाली, मम्मटाचीच प्रतिवस्तूपमेची व्याख्या पुढें शब्दभेदानें रूढ झाली असें दिसतें.

रुय्यकः—वाक्यार्थगतत्वेन सामान्यस्य वाक्यद्वये पृथङ्निर्देशे प्रतिवस्तूपमा[2]॥

विश्वनाथः—प्रतिवस्तूपमा[3] सा स्याद्वाक्ययोर्गम्यसाम्ययोः।
एकोऽपि धर्मः सामान्यो यत्र निर्दिश्यते पृथक्॥

विद्याधरः—वाक्यार्थगतत्वेन स्यात्सामान्यं पृथग्विनिर्दिष्टम्॥
यस्यां द्वेधा तज्ज्ञैः सा प्रतिवस्तूपमा[4] समाम्नाता॥

अप्पय्यदीक्षितः—वाक्ययोरेकसामान्ये प्रतिवस्तूपमा[5] मता॥

जगन्नाथः—वस्तुप्रतिवस्तुभावापन्नसाधारणधर्मकवाक्यार्थयोरार्थमौपम्यं प्रतिवस्तूपमा[6]॥

४९. या सर्वांनीं साधर्म्य व वैधर्म्यानें होणाऱ्या प्रतिवस्तूपमेचीं उदाहरणें दिलीं आहेत; व त्यांपैकीं कित्येकांनीं माला प्रतिवस्तूपमेचींही दिलीं आहेत. अप्पय्यदीक्षितानें शब्दभेद असतांही एकाच अर्थामुळें समानधर्म दर्शविणारें उदाहरण दिलें आहे, तें बिम्बप्रतिबिंबत्वानें दृष्टान्ताचें होतें. तें उदाहरण असें—

तवा[7]मृतस्यंदिनि पादपंकजे निवेशितात्मा कथमन्यदिच्छति।
स्थितेऽरविंदे मकरन्दनिर्भरे मधुव्रतो नेक्षुरसं समीक्षते॥

यांत धर्माचेंच ऐक्य नसून धर्म, उपमेय या सर्वांचेंच प्रतिबिंबन आहे.

कर्ण[8] म्हणे गुणवद्गुण जाणे गुणवंत, अगुण नेणेचि।
प्रसवे तीच अभिज्ञा, शल्या, तैसी न वांझ वेणेची॥

हें प्रतिवस्तूपमेचें उदाहरण आहे, कारण पहिल्या ओळींतील 'जाणें' व 'नेणें' या अर्थीं दुसऱ्या वाक्यांत 'अभिज्ञा'व 'न अभिज्ञा' हे शब्द घातल्यामुळें समान धर्माचें दोन वाक्यांत कथन झालें आहे. याशिवाय यांत उपमानोपमेयभावाची व्याप्ति होत नसून साधर्म्य व वैधर्म्य हीं दोन्ही आहेत. यावरून प्रतिवस्तूपमेंत अर्थसाम्य असतें व त्यामुळेंच उपमान व उपमेय कळतें. पण औपम्यभाव उक्त नसतो. उपमेंत उपमानोपमेय व इव हीं कधीं असतात अथवा कधीं नसतात. पण प्रतिवस्तूपमेंत तीं केव्हांच कथित नसतात. त्याचप्रमाणें साधारण धर्म हा उपमेंत कधीं उक्त व कधीं गम्य असतो. प्रतिवस्तूपमेंत तो सदैव उक्तच असला पाहिजे; व तोही दोन

१ मो. कर्णपर्व. २७·१५ २ अ. सू. २५ ३ सा. द. १०.५० ४ ए. ८·१७ ५ कु. (१७) ५२ ६ र. गं. ३३० ७ कु. ६० पनि. ८ मो. कर्णपर्व २७·१४.

वाक्यांत उक्त पाहिजे. उपमेंत एकच वाक्य असतें. दृष्टान्तांत केवळ धर्मच नव्हे तर उपमेय व इवादींचेंही प्रतिबिंबन पाहिजे असतें.

न्याहाळुनी पाहतां नयनीं। भैमी ओळखिली लक्षणीं।
प्रपंचनिष्ठांमाजि ज्ञानी। आत्मनिष्ठ वोळखे ॥[1]

## १३ दृष्टान्त.

५०. हा अलंकार पूर्वींच्या ग्रंथांत नाहीं. काव्यदृष्टान्त हा स्वतंत्र अलंकार प्रथमतः उद्भटानें मानला. तत्पूर्वी दृष्टान्त हा प्रतिवस्तूपमेंतच सामावलेला कसा होता हें प्रतिवस्तूपमेच्या विवेचनाचे वेळीं दिलेंच आहे. ज्यांत इष्टार्थाचा अन्त किंवा इष्टार्थाचें प्रतिबिंबन बघावयास मिळतें तो दृष्टान्त होय.

उद्भटः— इष्टस्यार्थस्य[2] विस्पष्टप्रतिबिम्बनिदर्शनम्।
यथेवादिपदैः शून्यं बुधैर्दृष्टान्त उच्यते ॥

" इच्छिलेल्या ह्मणजेच प्रस्तुत असणाऱ्या अर्थाचें जसेंचे तसेंच स्वरूप उपमादर्शक शब्दावांचून दाखविणें " यास दृष्टान्त म्हणतात.

उ.:— कर्णसहस्रें[3] हि न जें कार्य घडे, तें घडेल शल्यकरें।
एकें अमृतकरेंचि व्योम धवळतें, न तें उडुप्रकरें ॥

येथें शल्यकर व अमृतकर, उडुप्रकर व कर्णसहस्र, तसेंच व्योम धवळणें व कार्य घडणें, यांत बिम्बप्रतिबिंबन आहे. तसेंच उपमान, उपमेय व साधारण धर्म उक्त असून तद्वाचक शब्द मात्र उक्त नाहीं. सबंध वाक्य दुसऱ्या वाक्यांत आपलें स्वरूप पाहूं शकतें ह्मणून हा दृष्टान्त झाला. आतां उद्भटाच्या व्याख्येंत चूक आहे ती अशी कीं, इष्टार्थाचें प्रतिबिंबन म्हणण्यांत मर्यादा राहात नाहीं. इष्टार्थ हा कधीं समानधर्मच असूं शकेल, अशा वेळीं इष्टार्थ हा शब्द योग्यपणें लागत नाहीं. त्यांत दुसरे अलंकार सामावूं शकतील. वामनानें हा अलंकार मानला नाहीं.

रुद्रटः— अर्थविशेषः पूर्वं यादृङ्ग न्यस्तो विवक्षितेतरयोः।
तादृशमन्यं न्यस्येद्यत्र पुनः सोऽत्र दृष्टान्तः[4] ॥

" एक अर्थविशेष जसा मांडला असेल तसाच दुसरा मांडणें याला दृष्टान्त म्हणतात. " यानें प्रतिबिंबन हा शब्द घातला नसला तरी एक अर्थविशेष ज्या पद्धतीनें मांडला असेल त्याच पद्धतीनें दुसरा अर्थ मांडणें म्हणजे प्रतिबिंबनच होय. व पहिल्या वाक्याच्या सबंध मांडणीचेंच प्रतिबिंबन होत असल्यानें उद्भटासारखी पळ-

---

१ मु. वनपर्व ८. ३१. २ का. सा. सं. ६·७५. ३ मो. कर्णपर्व २९·३६.
४ का. लं. ८·९३.

वाट यांत सांपडत नाहीं. रुद्रटानें प्रस्तुनाचा आधीं किंवा नंतर न्यास असणें यावरून दोन भेद केले आहेत. रुद्रटाचा उभयन्यास व दृष्टान्त यांत फरक म्हणजे उभयन्यासांत दोन्ही सामान्यच अर्थ असतात व दृष्टांतांत दोन्ही विशेष असतात. पण या अलंकारांतील हा फरक उदाहरणांत पाहतां स्पष्ट दिसत नाहीं. उभयन्यासाच्या उदाहरणांतही आधीं सामान्य व मग विशेष सांगितलें आहे.

५१. मम्मटः— दृष्टान्तः[1] पुनरेतेषां सर्वेषां प्रतिबिम्बनम् ॥

रुद्रटाच्या व्याख्येंतून यानें सार काढलें तें म्हणजे "पहिल्या वाक्यांतील साधारण धर्म इत्यादि सर्वांना दुसऱ्या वाक्यांत प्रतिबिंबित करणें म्हणजे दृष्टान्त." रुद्रटाच्या व याच्या म्हणण्यांत कांहींच फरक नाहीं. केवळ मम्मटानें स्पष्ट शब्दांत 'एतेषां सर्वेषाम्' असें म्हटलें एवढेंच. मम्मटानें साधर्म्यानें तसेंच वैधर्म्यानेंही होणाऱ्या दृष्टान्ताचें उदाहरण दिलें आहे.

वर्गे[2] अंध म्हणुनि कांहीं पहिली पडली विचारणा; परि तो ।
आला मना कलंक न चंद्राच्या गुणगणा वृथा करितो ॥

हा वैधर्म्यानें दृष्टान्त होईल.

रुय्यकः—तस्यापि प्रतिबिंबतया निर्देशे दृष्टान्तः[3] ॥

विद्याधरः—बिम्बप्रतिबिम्बत्वं यद्युपमानोपमेययोर्भवति ।
धर्मस्यापि तदानीं दृष्टान्तः[4] कथ्यते द्विविधः ॥

विश्वनाथः—दृष्टान्तस्तु[5] सधर्मस्य वस्तुनः प्रतिबिम्बनम् ॥

अप्पय्यदीक्षितः—चेद्बिम्बप्रतिबिम्बत्वं दृष्टान्तस्तदलंकृतिः[6] ॥

जगन्नाथः—प्रकृतवाक्यार्थघटकानामुपमादीनां साधारणधर्मस्य
च बिम्बप्रतिबिम्बभावे दृष्टान्तः[7] ॥

मम्मटानें दृष्टान्ताची व्याख्या पूर्णत्वाला नेली. या सर्वांनीं त्याचाच व्याख्यार्थ आपल्या व्याख्यांत आणला आहे. दृष्टान्त व अर्थान्तरन्यासांतील फरक अर्थान्तरन्यासप्रकरणांत सांगितला आहे. प्रतिवस्तूपमेंत व दृष्टान्तांत काय फरक आहे तें पाहूं:—

रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं ।
नाहीं हानि कदापि अन्य कविही तें वर्णितां प्राकृतीं ॥
मुक्तांचा रचिलाचि हार वहिला जो रेशिमाच्या गुणें ।
तो कार्पासगुणें करूनि करितां काय प्रभेला उणें ॥

---

१ का. प्र. १०·१५५ २ मो. आ. पर्व. १७–१२. ३ अ. सू. २६. ४ ए. ८–१८.
५ सा. द. १०–५२. ६ कु. (१८) ५३. ७ र. गं. [illegible] रामायण.

यांत पहिल्या अर्थाचें दुसऱ्यांत प्रतिबिंबन असल्यानें हा दृष्टान्त झाला. दृष्टान्तांत उपमेय, साधारण धर्म इत्यादि उपमेचे जे घटक त्या सर्वांचें दुसऱ्या ठिकाणीं प्रतिबिंबन असतें; मात्र इवादि शब्द वर्ज्य असतात.

प्रतिवस्तूपमेंत फक्त साधारणधर्माचें प्रतिबिंबन असतें. रा. चनहटी म्हणतात, " The वाचकशब्द if present will make the alamkara (दृष्टान्त) amount to उपमा, and the साधारणधर्म if stated will make it प्रतिवस्तूपमा. " पण दृष्टान्तांत सर्वांचेंच प्रतिबिंबन असल्यानें साधारणधर्म सांगूनही दृष्टान्त प्रतिवस्तूपमा होऊं शकणार नाहीं:—

पंकांत पद्म न मिळे, काकांच्या दुर्गुणा सिके न पिक,
चंदन परगंध न घे, होय तृणामाजि तृणाचि काय पिक !

येथें साधारण धर्माचेंच बिंबन असल्यानें ही प्रतिवस्तूपमा झाली. पण यांतील साधारण धर्म काढून हा दृष्टान्त होणें शक्य नाहीं. तद्वतच दृष्टान्तांत साधारण धर्म घालून प्रतिवस्तूपमा होणें शक्य नाहीं.

साधर्म्यानें होणाऱ्या दृष्टान्ताचें उदाहरणः—

झाले पांच सुरद्रुमसुम सुत, आनन्द पांडुचा पिकला ।
पिक लाभला बहु दिसां आम्रांला, सुरभि ज्यांमध्यें टिकला ॥

वैधर्म्यानें होणाऱ्या दृष्टान्ताचें उदाहरणः—

गायें म्हणे भगवंता, आज्ञा नसतां तुझी न मद्धरणीं ।
काळहि बळी किती हा न तृणबळें वह्नि होय बद्ध रणीं ॥

५२. दृष्ट अथवा प्रत्यक्ष हें मीमांसेंतील षट्प्रमाणांपैकीं एक प्रमाण आहे. मैत्र्युपनिषदांत तीन प्रमाणें दिलीं आहेत त्यांपैकीं हें एक आहे. ' न विना प्रमाणेन प्रमेयस्य उपलब्धिः' असें म्हटलें आहे. ' ' प्रमाणावांचून प्रमेय सिद्ध होत नाहीं. ऋग्वेदांत ( १, ३१, ५१ ) सायनानें उपमा ही दृष्टान्त म्हणून दिलेली आढळते. तेथें दृष्टान्त म्हणजे उदाहरणार्थ असा अर्थ आहे. ऋग्वेदांतील भाष्यांत पुष्कळ वेळां उपमा ही प्रतिबिम्बन किंवा दृष्टान्त या अर्थी म्हटली आहे. यावरून उपमेंतून दृष्टान्त कसा न कळत निघाला आहे हें दिसून येतें. दृष्ट अथवा प्रत्यक्ष प्रमाणानें उक्तसिद्धि होत असल्यानें याला दृष्टान्त असें म्हणतात.

## १४ तुल्ययोगिता.

५३. तुल्य योग म्हणजे समानकाळीं योग येणें. जींत समानकाळीं घडणाऱ्या क्रियांचें वर्णन असतें ती तुल्ययोगिता होईल.

---

१ मो. आ. पर्व. २ मो. आ. पर्व ३०·१. ३ मो.

भामहः— न्यूनस्यापि विशिष्टेन गुणसाम्यविवक्षया ।
तुल्यकार्यक्रियायोगादित्युक्ता तुल्ययोगिता ॥

"समान कार्यक्रियेमुळें न्यून गोष्टीचेंही विशेष गोष्टीशीं गुणसाम्य सांगितलेलें असतें तेव्हां तुल्ययोगिता म्हणावयाचें." भामहाची व्याख्या पुढील ग्रंथकाराच्या व्याख्येहून पुष्कळच निराळी आहे. पुढील ग्रंथकारांनीं तुल्ययोगितेंत उपमानोपमेयभावाबद्दल कांहींच सांगितलें नाहीं. भामहानें 'न्यूनस्यापि विशिष्टेन' या शब्दांनीं उपमानोपमेयभाव व्यक्त केला. मात्र समक्रियेच्या बंधनानें त्यांचें साम्य सांगण्यांत येतें हा त्यानें या अलंकारांतील विशेष सांगितला. भामहाचें उदाहरणः—

शेषो हिमगिरिस्त्वं च महान्तो गुरवः स्थिराः ।
यद्लंघितमर्यादाश्चलंतीं बिभृथ क्षितिम् ॥

या उदाहरणांत प्राकरणिक व अप्राकरणिक या दोन्ही गोष्टी आहेत. त्यांत उपमाभाव दर्शित केलेला असला तरी उपमेय व उपमानें एकाच तोडीचीं आहेत असें दाखविलें आहे. पुढील ग्रंथकारांच्या तुल्ययोगितेंत प्राकरणिक किंवा अप्राकरणिक यांत साधारण धर्म एकदांच सांगतात. या उदाहरणांत साधारण धर्म एकच नसून अधिक आहेत. क्रिया मात्र एकदांच सांगितली आहे; या दृष्टीनें जरी हें दीपकाचें उदाहरण होण्यासारखें असलें तरी यांत उपमानोपमेयभावानंतर यत् या शब्दानें कार्यकारणभावाला चालना मिळाल्यानें दीपक अलंकाराला गौणत्व येतें. "The तुल्ययोगिता of these writers, therefore, does not very much differ from दीपक. Modern authors like मम्मट would certainly include it under दीपक" असें जरी रा. बनहट्टींनीं म्हटलें तरी मम्मटाच्या सूक्ष्म निरीक्षणाला भामहाचें या अलंकाराचें उदाहरण प्रथम उपमानोपमेयभाव व्यक्त करणारें, नंतर कार्यकारणभाव सांगणारें व शेवटीं कदाचित् दीपकाचें असें वाटलें असतें. तें निश्चितपणें दीपकांत घातलें नसतें. एवढें मात्र खरं कीं भामहाची तुल्ययोगिता व पुढील लोकांची तुल्ययोगिता यांत पुष्कळ अंतर आहे.

दण्डीः— विवक्षितगुणोत्कृष्टैर्यत्समीकृत्य कस्यचित् ।
कीर्तनं स्तुतिनिन्दार्थं सा मता तुल्ययोगिता ॥

"विवक्षित म्हणजेच प्रस्तुत गोष्टीच्या गुणांचा उत्कृष्टाच्या ( अप्रस्तुताच्या ) गुणाशी समत्वानें योग आणून त्या योगानें प्रस्तुताची स्तुति अथवा निन्दा करणें याला तुल्ययोगिता म्हणतात" भामहापेक्षां दण्डीनें जास्त म्हटलें तें एवढेंच कीं, "स्तुति, निन्देचें कथन करणें" या शिवाय दोघांच्यांत कांहीं फरक नाहीं. दण्डीचें उदाहरण मात्र रा. बनहट्टी म्हणतात त्याप्रमाणें कोणालाही दीपकाचेंच वाटेल. आतां भामह-

१-२ भा. लं. ३·२६-२७. ३ का. द. २·३३०.

दण्डी व पुढील ग्रंथकारांत मुख्य भेद असा कीं, उपमान व उपमेयांत कांहींही फरक नाहीं, तीं एकाच दर्जाचीं आहेत असें अप्रत्यक्षपणें दाखविणें हा भामह-दण्डीचा मुख्य हेतु असल्यानें ते दोहोंचाही उल्लेख समभावानें करतात; पुढील लोकांचा फक्त प्रस्तुत गोष्टी अगर अप्रस्तुत गोष्टी यांत एकदांच एक धर्म दाखविणें हा मुख्य उद्देश असल्यानें त्यांत उपमानोपमेय-भावाचा प्रश्नच येत नाहीं. अशा रीतीनें दोघांचे उद्देशच निराळे असल्यानें गुणसाम्यप्रतीति करीत असतां दण्डीचीं उदाहरणें दीपकासारखी वाटूं लागलीं. पण भामह मात्र दण्डीसारखीच व्याख्या करीत असला तरी त्याच्या उदाहरणांत दण्डीपेक्षां वैलक्षण्य कसें आहे हें दाखविलेंच आहे.

५४. उद्भटः— उपमानोपमेयोक्तिशून्यैरप्रस्तुतैर्वचः।
साम्याभिधायि प्रस्तावभाग्भिर्वा तुल्ययोगिता[1] ॥

"प्रस्तुत अगर अप्रस्तुत यांत उपमानोपमेय-भाव कांहींहि न दाखवितां त्यांतील साम्य दाखविण्यासाठीं जेव्हां एक शब्द घालतात तेव्हां तुल्ययोगिता होते." या व्याख्येंतील 'उपमानोपमेयोक्तिशून्यैः' हे शब्द निरर्थक आहेत. एकदां अप्रस्तुतैः किंवा प्रस्तावभाग्भिः म्हटलें म्हणजे अप्रस्तुत अप्रस्तुतांत अगर प्रस्तुत प्रस्तुतांत उपमानोपमेयभाव नाहीं हें सिद्ध होतें; कारण उपमान म्हणजे अप्रस्तुत व उपमेय म्हणजे प्रस्तुत; मग उपमानोपमान अगर उपमेयोपमेय यांत उपमाभाव कसा असेल? असो. याची व्याख्या बाल्य ओलांडून प्रौढत्वाच्या सीमेवर आहे. मम्मटानें तिला पूर्णत्वाला नेली.

वामनः—विशिष्टेन साम्यार्थमेककालक्रियायोगस्तुल्ययोगिता[2] ॥

वामनाची व्याख्याही दण्डीच्या व्याख्येकडे कलती आहे. विशिष्टाचें म्हणजेच उपमानाचें उपमेयाशीं एककालिक क्रियायोगानें साम्य दाखविणें याला तुल्ययोगिता म्हणावयाचें. यांत एका क्रियेनें दोन गोष्टी बद्ध होतात तरी त्या विशिष्ट—न्यून म्हणजे अप्रस्तुत—प्रस्तुत अशाच गोष्टी बद्ध होतात. अर्थात् हिचें उदाहरण दीपकाचेंच उदाहरण होऊं लागेल. साम्य दाखविणें हाच भामह—दण्डीप्रमाणें वामनाचाही उद्देश आहे. ही वामनाची व्याख्या दण्डीच्या तुल्ययोगोपमेसारखी आहे. दण्डीची तुल्ययोगोपमेची व्याख्याः—

अधिकेन समीकृत्य हीनमेकक्रियाविधौ।
यद्ब्रुवन्ति स्मृता सेयं तुल्ययोगोपमा यथा[3] ॥

वास्तविक दण्डीच्या तुल्ययोगितेंत व तुल्ययोगोपमेंत फरक एवढाच कीं, तुल्ययोगोपमेंत एका क्रियेंत उपमानोपमेयाचें साम्य दाखवितात, व तुल्ययोगितेंत एकाच क्रियायोगाचे वेळीं साम्य दाखवितात असें नाहीं. खरें पाहतां

---

१ का. सा. सं. ५.५८. २ का. सू. ४.३.२६. ३ का. द. २.४८.

तुल्ययोगोपमेची व्याख्या तुल्ययोगितेची व तुल्ययोगितेची व्याख्या तुल्ययोगोपमेची असें दण्डीनें करावयास पाहिजे होतें. तसें करण्यांतही त्याची व्याख्या अगर उदाहरण दीपकाकडे झुकलें असतें, तरी 'एकक्रियाविधौ' हे शब्द तुल्ययोगितेंत अधिक महत्त्वाचे असून त्यांनी तुल्ययोगितेची व्याख्या योग्य झाली असती. कारण तुल्ययोगितेंत एकक्रियाविधिचेंच जेवढें अधिक महत्त्व आहे, तेवढें तुल्ययोगोपमेंत नाहीं. त्याचें तुल्ययोगोपमेचें उदाहरण दीपकाशीं तंतोतंत जुळतें:—

दिवो जागर्ति रक्षायै पुलोमारिर्भवान् भुवः ।
असुरास्तेन हन्यन्ते सावलेपास्त्वया नृपाः ॥

वामनानें दण्डीची तुल्ययोगोपमेचीच व्याख्या हुबेहुब पण स्वशब्दांत मांडली आहे व तिला नांव मात्र तुल्ययोगिता ठेवलें आहे असें दिसून येईल. रुद्रटानें तुल्ययोगितेंत व दीपकांत पूर्वीच्या ग्रंथकारांनी कांहीं फरक दाखविला नाहीं असें पाहूनच जणुं तुल्ययोगिता मानली नाहीं.

मम्मटः—नियतानां सकृद्धर्मः सा पुनस्तुल्ययोगिता ॥

'नियत म्हणजे केवळ प्राकरणिक किंवा केवळ अप्राकरणिक यांच्यांतील धर्म एकदांच सांगणें, याला तुल्ययोगिता म्हणावयाचें.' ही व्याख्या उद्भटाच्या व्याख्येचें उत्क्रान्तशेष स्वरूप होय. 'नियतानाम्' म्हणण्यानें दीपकाची व्यावृत्ति झाली. उदाहरणः—

वसंत आम्रा, सहकार कोकिला, करी जनांना पिक मत्त विभ्रमें ।
परंपरा-प्राप्त मदापगा अशी वनांतुनी त्या अनपायिनी भ्रमें ॥

यांत वसंत, सहकार व पिक हीं अप्रस्तुतें 'मत्त करणें' या एकाच क्रियेनें बद्ध झालीं असून तो क्रियागुण एकदांच सांगितला आहे.

अबोध्य संताप, अतर्क्य वेदना, अतींद्रिय भ्रांति मनोमयी गती।
विलक्षणीं या नव लक्षणीं तदा ज्वराकुल प्राणिसमूह वागती ॥

येथें प्रस्तुत गोष्टी एका 'विलक्षण' धर्मानें बद्ध आहेत.

५५. रुय्यकः—औपम्यस्य गम्यत्वे पदार्थगतत्वेन प्रस्तुतानामप्रस्तुतानां वा समानधर्माभिसंबंधे तुल्ययोगिता ॥

रुय्यकाच्या, व्याख्येप्रमाणें पाहिलें तर औपम्यभावच तुल्य योगितेंत नसतांना औपम्याचें गम्यत्व तरी कसें शक्य आहे? साधारणधर्म आला कीं औपम्य आलेंच म्हणून त्यानें हें पद घातलें असावें.

---

१ का. द. २ ४९. २ का. प्र. १०-१५८. ३ सा. व. वि. ६-२६. ४ सा. व. वि. ६-२९ ५ अ. सू. २३.

रुय्यकानें प्रस्तुतच किंवा अप्रस्तुतच अशा गोष्टींचीं गुण व क्रिया या योगानें होणाऱ्या तुल्ययोगितेचीं एकंदर चार उदाहरणें दिलीं आहेत. मम्मटानें क्रियारूप धर्माचींच फक्त दोन उदाहरणें दिलीं आहेत.

[1]विद्याधरः— औपम्यगम्यतायां प्रकृतानां तुल्यधर्माभिसंबंधे
अप्रकृतानामथवा चतुर्विधा तुल्ययोगिता ज्ञेया ॥

[2]विश्वनाथः— पदार्थानां प्रस्तुतानामन्येषां वा यदा भवेत् ।
एकधर्माभिसंबंधः स्यात्तदा तुल्ययोगिता ॥

अप्पय्यदीक्षितः—वर्ण्यानामितरेषां वा धर्मैक्यं तुल्ययोगिता[3] ।

अप्पय्यदीक्षितानें ही व्याख्या इतरांच्या सारखीच केली व
' हिताहिते वृत्तितौल्यमपरा तुल्ययोगिता[4],

ही आणखी एक तुल्ययोगिता सरस्वती-कंठाभरणांतून घेतली आहे. पण या व्याख्येंत तुल्ययोगितेचें सामान्य लक्षण अजिबात सुटत असल्यानें ही तुल्ययोगिता होत नाहीं. या व्याख्येंत तुल्ययोगिता म्हणजे समान वागणें असा अर्थ होतो, तो तुल्ययोगितेच्या सर्वमान्य व्याख्येंत नाहीं. त्याचप्रमाणें दण्डीची तुल्ययोगिता अप्पय्यदीक्षितानें स्वशब्दांत सांगून जयदेव तिलाच सिद्धि म्हणतो असें सांगितलें आहे. यानें दण्डीची व्याख्या स्वशब्दांत मांडली ती अशीः—

गुणोत्कृष्टैः समीकृत्य वचोऽन्या तुल्ययोगिता[5] ॥

अप्पय्यदीक्षितानें ही व्याख्या देऊन तिला कोणी दीपकही म्हणतात असें सांगितलें आहे. दण्डीनंतर कित्येक पिढ्या जाऊन त्यांत दीपक-तुल्ययोगितेंतील फरक निश्चित झाल्यावरही दण्डीची चुकीची व्याख्या स्वशब्दांत तुल्ययोगिता म्हणून देणें यांत अप्पय्यदीक्षिताची जुन्याला चिकटण्याची अवास्तव आवड दिसते. त्या चुकीचा स्वीकार करून त्यानें त्या खंडूनही टाकल्या नाहींत.

जगन्नाथः—प्रकृतानामेवाप्रकृतानामेव वा गुणक्रियादिरूपैकधर्मान्वयस्तुल्ययोगिता[6] ॥

जगन्नाथानें अर्थान्तरन्यास युक्त, व्यङ्ग्या, श्लेषयुक्त अशीही तुल्ययोगिता दाखविली आहे.

**५६.** भामह-दण्डीचे वेळीं तुल्ययोगितेंत औपम्यभावालाच अधिक प्राधान्य होतें. उद्भटानें "उपमानोपमेयोक्तिशून्यैः" असें पद घालून औपम्यभाव उक्त तरी नसावाच असें सांगितलें. मम्मटानें औपम्यभावाचा उल्लेखही केला नाहीं. याचा अर्थ त्याला तो नकोच होता. रुय्यकानें औपम्यभाव गम्य असतां

१ ए. ८·१५. २ सा. द. १०·४८. ३ कु. (१४) ४५. ४ कु. ४७ ह.
५ चं. लो. ५·४८ ६ र. गं. ३१७.

तुल्ययोगिता होते असें पुनः म्हटलें. विद्याधर त्याचाच अनुयायी आहे. विश्वनाथ, अप्पय्यदीक्षित व जगन्नाथ यांनीं औपम्यभावाबद्दल व्याख्येंत उल्लेख केला नाहीं. जगन्नाथ टीकेंत मात्र 'औपम्यमत्र गम्यम्' असें म्हणतो. आतां वास्तविक पाहतां औपम्यभावाचा येथें प्रश्नच येत नाहीं. 'योगपट्टो जटाजालं' इत्यादि उदाहरणें घेतलीं तर यांत औपम्यभाव कोठें दिसतो ? साधारण धर्म म्हटला कीं औपम्य आलेंच असें नाहीं. मात्र उपमान व उपमेय म्हटलें कीं तीं सामान्य धर्मानेंच बद्ध असतात. सामान्य धर्मानेंच त्यांना उपमानोपमेयत्व येतें, पण औपम्यभाव हा दोन वस्तूंत असणार. या वस्तूच जर उपमेय–उपमान या नात्यानें हजर नसल्या तर औपम्यभाव त्यांत कसा दिसणार ? या दृष्टीनें पाहतां 'औपम्यस्य गम्यत्वे' या शब्दांची रुय्यकानें पुनः स्थापना केली पण ती विशेष महत्त्वाची नाहीं. तुल्ययोगितेचें उदाहरणः—

त्वरें घालितां जानकी माळ कंठीं ।
पडूं लागली अंबरीं पुष्पवृष्टी ।
जयो राघवा, राजया भाज सीता ।
नृपां लाज, त्या वैरियां वाढ चिंता ॥[1]

## १५ दीपक.

५७. दीपक शब्द दीप् धातूवरून आला आहे. 'दीपयतीति दीपकः' आजूबाजूंस प्रकाशवितो तो दीपक होय. भरतानें चारच अलंकार सांगितले त्यांपैकीं दीपक हा एक आहे. दीपक हा अतिशय जुना अलंकार आहे. या अलंकाराचीं उदाहरणें वेदांतही सांपडूं शकतात.

वृषायमाणोऽवृणीत सोमं त्रिकद्रुकेष्वपिबत्सुतस्य ।
आ सायकं मघवादत्त वज्रमहन्नेनं प्रथजामहीनां ॥[2]

यांत मघवा हा शब्द दीपाप्रमाणें दोन्ही ओळींत असून तो अवृणीत, अपिबत्, व अहन् या क्रियांचें दीपन करतो म्हणून हा दीपकालंकार होईल. यांत क्रिया दीपित केल्यानें हें क्रियादीपकाचें उदाहरण होईल. या अलंकाराची भरताची व्याख्या,

नानाधिकरणार्थानां शब्दानां संप्रकीर्तितम्[3] ।
एकवाक्येन संयोगात्तद्दीपकमिहोच्यते ॥

'निरनिराळ्या संबंधार्थी शब्दांचा एका वाक्याशीं संयोग सांगितला गेला असतां दीपक अलंकार होतो.' भामहानें दीपकाची व्याख्या अशी केली नाहीं पण तो म्हणतोः—

---

१ मु. बालकांड १०१. २ ऋक्संग्रह १·३२·१. ३ ना. शा. १६·५६.

आदिमध्यान्तविषयं त्रिधा दीपकमिष्यते ।
एकस्यैव त्र्यवस्थत्वादिति तद्भिद्यते त्रिधा ॥
अमूनि कुर्वतेऽन्वर्थामस्याख्यामर्थदीपनात् ।

"एकच शब्द जेव्हां वाक्यांत आदि, मध्यें अथवा अन्तीं राहून सबंध वाक्यार्थावर प्रकाश पाडील तेव्हां दीपक म्हणावयाचें." हा प्रकाश पाडणारा शब्द कोणत्या स्वरूपाचा असावा हें भामहानें स्पष्ट शब्दांत सांगितलें नाहीं. पण त्याचीं तिन्हीं उदाहरणें क्रियादीपकाचींच आहेत व त्यांपैकीं 'मदो जनयति' हें उदाहरण मालादीपकाचें होईल.

दण्डीः—जातिक्रियागुणद्रव्यवाचि नैकत्रवर्तिना ।
सर्ववाक्योपकारश्चेत्तदाहुर्दीपकं यथा ॥

भामहानें दीपकरूप असणाऱ्या शब्दाचें स्वरूप सांगितलें नव्हतें तें यानें सांगितलें. "जाति, क्रिया, गुण, द्रव्य यांचा वाचक शब्द एके ठिकाणीं राहून एक अगर अनेक वाक्यार्थांचा संबंध लावील तेव्हां त्याला दीपक म्हणतात." तो शब्द वाक्याच्या आरंभीं, मध्यें किंवा अन्तीं असण्यानें जाति, क्रिया, द्रव्य, गुण-दीपकाचे बारा भेद होतात. हे सर्व भेद अनेक वाक्यांतही संभवतात; याशिवाय श्लिष्टार्थदीपक, मालादीपक, विरुद्धार्थदीपक, एकार्थदीपक असे भेद देऊन शेवटीं असेच आणखीही भेद विचक्षणांनीं पाडावे असें दण्डीनें सांगितलें आहे. दण्डीनें एकार्थदीपकाचें दिलेलें उदाहरण पाहतां अन्त्य जाति दीपकाचें उदाहरण होईलः—

हरत्याभोगमाशानां गृह्णाति ज्योतिषां गणम् ।
आदत्ते चाद्य मे प्राणानसौ जलधरावली ॥

त्यांत 'जलाधरावली' ही जाती असल्यामुळें हें जातिदीपक होत आहे, तेव्हां हा एकार्थदीपकाचा निराळा भेद पाडण्याचें कारण नाहीं. यानें दीपकभेदाचें आनन्त्य मानलें तरी दीपकाचे मुख्य भेद दोनच आहेत. धर्म एकच व एकदांच असून तो (१) उपमानोपमेयांना अगर (२) कारकांना दीपित करील तेव्हां दीपक होईल. मग तो धर्म जाति, क्रिया इत्यादि कोणत्याही स्वरूपाचा असो.

५८. उद्भटः—आदिमध्यान्तविषयाः प्राधान्येतरयोगिनः ।
अन्तर्गतोपमाधर्मा यत्र तं दीपकं विदुः ॥

"ज्या धर्मावरून उपमानोपमेयभाव अर्थसामर्थ्यानें जाणला जातो अशा धर्मांची सांगड असणें याला दीपक म्हणतात." तुल्ययोगितेच्या सर्वस्वीं उलट

१ भा. लं. १·२५–२६. २ का. द. २–९७. ३ का. द. २·१११.
४ का. सा. सं. १·१४.

असें दीपकाचें लक्षण उद्भटानें दिलें आहे. तुल्ययोगिता ' उपमानोपमेयोक्ति शून्य ' अशी असते. म्हणजे ती उपमाभाव नसतां होते. दीपकांत ' अन्तर्गतोपमाधर्म ' म्हणजे उपमाभाव असतो. तुल्ययोगिता अप्रस्तुत **किंवा** प्रस्तावभाक् अंशांनीं होते तर दीपक प्रधान **आणि** त्याशिवाय इतर अंशांनीं होतो. 'प्राधान्येतरयोगिन् ' हें पद दीपकाची समत्वबुद्धि दाखविण्यासाठीं आहे. दीपकांत एक उपमेय व अनेक उपमानें असतात. उपमेंत व दीपकांत फरक हाच कीं दीपकांत धर्म हा एकदांच आदि, मध्यें किंवा अन्तीं उक्त असतो. या दृष्टीनें उपमेंतून दीपक नुकतेंच फुटलेलें दिसतें. ' उपमाधर्माः ' ' आदिमध्यान्तविषयाः ' असें अनेकवचन घातल्यानें ही प्रतिवस्तूपमा होऊं शकेल. तिचें निवारण करण्यासाठीं टीकेंत ' अत्र धर्माणामेकवारमुपनिबन्धो द्रष्टव्यः ' असें म्हटलें तरी धर्माः–विषयाः असें म्हटल्यावर ' सकृद् वृत्ति ' असा अर्थ कसा घ्यावयाचा हा प्रश्न येतो. त्याचप्रमाणें ' प्राधान्येतर–योगी धर्म ' म्हटल्यावर ' अन्तर्गतोपमा ' या पदाचें पुनरुक्ती-मुळें निरर्थकत्व ठरतें; कारण प्रधान व गौण म्हणजेच उपमान व उपमेय यांना जोडणारा धर्म हा अन्तर्गत उपमाभाव सुचवीलच.यानें भामहाचें अनु-करण करून आदिमध्यान्त हेच भेद पाडले असले तरी पुढें हे भेद गौण होऊन क्रियादीपक व कारकदीपक हेच मुख्य भेद मानले गेलेले दिसतात. एकंदरींत उद्भटाच्या दीपकाला अजून झिलई द्यावयाची राहिली आहे. ती पुढें मम्मटानें दिल्यावर याच्या व्याख्येंत आलेली द्विरुक्ति अगर वचनदोष नाहींसा झाला आहे.

५९. वामनः— उपमानोपमेयवाक्येष्वेका क्रिया दीपकम्[1] ।

तत् त्रिविधम् । आदिमध्यान्तवाक्यवृत्तिभेदात् ॥

वामनानें उपमान वाक्यें व उपमेय वाक्यें यांमध्यें एक क्रिया दीपाप्रमाणें असणें याला दीपक म्हटलें आहे. दण्डीनेंही वाक्यदीपक दिलें आहे.पण वामनानें त्याशिवाय दुसरा भेदच मानला नाहीं; व क्रियाच फक्त दीपक होईल असा याच्या व्याख्येचा रोख आहे. थोडक्यांत म्हणजे हा फक्त क्रियादीपक मानतो.

रुद्रटः— यत्रैकमनेकेषां वाक्यार्थानां क्रियापदं भवति ।

तद्वत्कारकमपि तदेतदिति दीपकं द्वेधा[2] ॥

' एक क्रियापद त्याचप्रमाणें एक कारक अनेक वाक्यार्थांचें जेव्हां अनुक्रमें क्रियापद आणि कारक होतें तेव्हां दीपक अलंकार होतो. ' रुद्रटानें कारक-दीपक व क्रियादीपक असे दोन भेद केले व पुनः आदिमध्यान्तानें प्रत्येकीं तीन भेद मानून एकंदरींत सहा भेद केले. रुद्रटाच्या क्रियादीपकाच्या आदिमध्य या भेदांचीं ' कांता ददौति मदनं ' व ' तारुण्यमंशु मदनम् ' हीं उदाहरणें मालादी-

---

१ का. सू. ४·३·१८. २ का. लं. ७·६२. ३·४ का. लं. ७·६४–६७.

पकाचीं वाटतात. रुद्रटानें औपम्यभावाबद्दल कांहींच सांगितलें नाहीं. त्याच-प्रमाणें 'वाक्यार्थानां' म्हणण्यांत वाक्यार्थ प्रस्तुत कीं अप्रस्तुत कीं दोन्ही तऱ्हेचा हें स्पष्ट होत नाहीं. पण यानें केवळ प्रस्तुत अगर केवळ अप्रस्तुत अर्थांनीं होणारी तुल्ययोगिता मानलीच नसल्यानें तुल्ययोगितेचींही उदाहरणें दीपकांत येऊं शकतील. त्याप्रमाणें त्याच्या उदाहरणांत कांहीं केवळ प्रस्तुत, कांहीं केवळ अप्रस्तुत व कांहीं दोन्हीही असे वाक्यार्थ दीपित झालेले दिसतात. रुद्रटानेंच प्रथम कारक व क्रियादीपक असे दोन भेद मानलेले दिसतात.

मम्मटः—सकृद्वृत्तिस्तु धर्मस्य प्रकृताप्रकृतात्मनाम् ।
सैव क्रियासु बह्वीषु कारकस्येति दीपकम् ॥[1]

यानें 'प्रकृताप्रकृतात्मनाम्' म्हटल्यानें औपम्यभाव आलाच. 'प्राकरणिक अगर अप्राकरणिकांत धर्माचें एकवारच कथन असेल तर किंवा अनेक क्रियांत कारकाचें एकदांच कथन असेल तर दीपक अलंकार होतो.' मम्मटानें कारकदीपकाचें दिलेलें उदाहरण दीपकाच्या सामान्य व्याख्येला बाधक आहे. कारण दीपक-तुल्ययोगितेंत मुख्य फरक असा आहे कीं, दीपकांत प्रस्तुत **आणि** अप्रस्तुत अर्थ असतात तर तुल्ययोगितेंत केवळ प्रस्तुत **अथवा** केवळ अप्रस्तुत असतात. दीपकांत ही गोष्ट मुख्य मानल्यावर कारकदीपकाचें 'स्विद्यति कूणति वेल्लति' हें उदाहरण प्राकरणिक व अप्राकरणिकांचें कसें होऊं शकेल ? व यांत औपम्यभाव कोठें धरावयाचा ? या उदाहरणांत दीपकांत अवश्य असणाऱ्या दोन्हीही गोष्टी नाहींत. अशा वेळीं नुसता दीपकासारखा शब्द कसा चालेल ? अशा पेंचांत हें आलेलें उदाहरण तुल्ययोगितेचेंच समजण्यास हरकत नाहीं. या बाबतींत जगन्नाथाचें म्हणणें विचारार्ह आहे. तें पुढें पाहूं.

रुय्यकः—( औपम्यस्य गम्यत्वे पदार्थगतत्वेन समानधर्माभिसंबंधो )
प्रस्तुताप्रस्तुतानां च दीपकम् ॥[2]

यानें आदिमध्यान्त क्रियादीपक व कारकदीपक मानलें आहे. हेमचंद्र हा रुय्यकाप्रमाणेंच दीपकाची व्याख्या करतो. त्यानें तुल्ययोगिता अलंकार मानला नसला तरी प्रकृत किंवा अप्रकृत गोष्टींचा एकक्रियाभिसंबंध हा दीपकांत येत नाहीं, असें त्यानें स्पष्ट सांगितलें आहे. व याच दृष्टीनें मम्मटाचें 'पाण्डुक्षामं वदनं'[3] हें तुल्ययोगितेचें, 'कुमुदकमलनील'[4] व 'स्विद्यति कूणति'[5] हीं उदाहरणें दीपकाचीं नव्हेत असें तो म्हणतो. त्याच्या मतें हे केवळ जातिचमत्कार आहेत म्हणूनच तो कारकदीपक मुळींच मानीत नाहीं.

विद्याधरः—मिलितानां तु तथैषां दीपकमित्युच्यते षोढा ।
एतदलंकृतियुगलं कथितं तावत् पदार्थगत्वेन ॥[6]

---

१ का.प्र. १५६. २ अ. सू. २४. ३ का. प्र. पान ६४१. ४ का. प्र. पान ६४३. ५ का. प्र. पान ६४४. ६ ए. ८·१६.

विश्वनाथः– अप्रस्तुतप्रस्तुतयोर्दीपकं तु निगद्यते ।
अथ कारकमेकं स्यादनेकासु क्रियासु चेत् ॥

अप्पय्यदीक्षितः—वदन्ति वर्ण्यावर्ण्यानां धर्मैक्यं दीपकं बुधाः ॥

जगन्नाथः—प्रकृताप्रकृतानां चैकसाधारणधर्मान्वयो दीपकम् ॥

६०. तुल्ययोगितेहून दीपक निराळा मानूं नये असें जगन्नाथाचें मत आहे, कारण प्रकृत व अप्रकृत दीपकांत असतात, आणि तुल्ययोगितेंत प्रकृत अथवा अप्रकृत असतात, एवढाच दोहोंत फरक आहे. साधारण धर्माची सकृदावृत्ति हा दोहोंतही विशेष आहे, व त्यांतच सौंदर्य आहे. पूर्वीच्या अलंकारकर्त्यांनीं दीपक तुल्ययोगितेंत फरक केला असला तरी उदाहरणें देतांना दोन्ही अलंकारांचा घोंटाळा झालाच आहे. तेव्हां तुल्ययोगितेचेच ( १ ) प्रकृतांच्या धर्माची सकृत् आवृत्ती ( २ ) अप्रकृतांच्या धर्माची सकृत् आवृत्ति ( ३ ) प्रकृताप्रकृतांच्या धर्माची सकृत् आवृत्ति असे तीन भेद करावे. जगन्नाथाचें हें मत पुष्कळमें विचारार्ह आहे. कारक-दीपकही स्वतंत्र भेद मानूं नये असें त्याचें मत आहे. दीपक अलंकार स्वतंत्र न मानतां तुल्ययोगितेचेच तीन भेद मानणें यांत जास्त तथ्य आहे.

दण्डीनें मालादीपक हा भेद दीपकाचा म्हणूनच मानला आहे. बाकी सर्वांनीं तो निराळा अलंकार म्हणून मानला आहे. त्याचप्रमाणें दण्डीनें आवृत्ति नांवाच्या अलंकाराचें दीपकानंतर ताबडतोब विवेचन केलें आहे. अप्पय्यदीक्षितानेंही आवृत्तिदीपक मानलें आहे. आवृत्तिदीपकांत दीपकवत् असणाऱ्या शब्दाची आवृत्ति होते. याचे दण्डीनें ( १ ) अर्थावृत्ति ( २ ) पदावृत्ति ( ३ ) उभयावृत्ति असे भेद केले आहेत. ( १ ) अर्थावृत्ति म्हणजे शब्द निराळा भासून अर्थ मात्र एकच असणें ( २ ) पदावृत्ति म्हणजे पद तसेंचें तसेंच पुनः पुनः येणें ( ३ ) उभयावृत्ति म्हणजे अर्थावृत्ति व पदावृत्ति या दोन्ही एकांत असणें. पण वास्तविक दीपकांत सकृद्वृत्ति महत्त्वाची असल्यानें त्याच्या उलट समानधर्मी शब्द पुनः पुनः उच्चारला जाण्यानें आवृत्ति अलंकार हा प्रतिवस्तूपमाच होईल. अप्पय्य-दीक्षितानें या अलंकाराला आवृत्ति न म्हणतां आवृत्तिदीपक असें म्हटलें आहे; व याचा दीपकाशीं संबंध नाहीं म्हणून सांगितलें आहे. अर्थात् त्याचें आवृत्तिदीपक म्हणजे प्रतिवस्तूपमाच होईल. दीपक व प्रतिवस्तूपमा यांत मुख्य भेद धर्माचें उपादान एकदांच असणें व अनेकदां असणें हाच होय. दीपक–तुल्ययोगितेच्या उदाहरणांत मात्र व्याख्येबरहुकूम फरक राहात नसल्यानें व त्या दोहोंतही सकृत् वृत्ति ही मुख्य गोष्ट असल्यानें तो अलंकार एकच मानणें युक्त होईल. दीपकाचे आदिमध्यान्त भेद पुढें पुढें विशेष ग्रहणीय वाटले नाहींत;

---

१ सा. द. १०·४९. २ कु ( १५ ) ४९. ३ र. गं. ३२२.

तद्वतच कारकदीपकही जातिचमत्काराचाच प्रकार ठरून त्यांतील दीपकाला लागणारा औपम्यभाव नष्ट होतो. दण्डीचे जाति, गुण, द्रव्य हे भेदही कोणी मानले नाहींत. कारक-दीपक व क्रियादीपक हे दोनच भेद प्रामुख्यानें मानले गेले. त्यांतही कारक-दीपकाला फांटा मिळण्याचा संभव दिसतो.

अप्पय्यदीक्षितानें कारकदीपक हा अगदीं स्वतंत्र अलंकार मानून एक कारक हें पुष्कळ क्रियांना बद्ध करीत असतां तेथें दीपक छायामात्र असतें म्हणून कारकदीपक असें त्याला म्हटलें आहे. यांत सर्व गोष्टी प्रकृत असल्यानें त्याला दीपक म्हणतां येणार नाहीं. त्याची गणना तुल्ययोगितेंत होईल व कारकदीपक तुल्ययोगितेंत सामावत असल्यानें तो स्वतंत्र अलंकार मानण्याचें कांहीं कारण नाहीं. जगन्नाथाचे विचार व हेमचंद्राचे विचार यांत बरेचसें साम्य आहे. तो दीपक मानतो व तुल्ययोगिता मानीत नाहीं. जगन्नाथ दीपक नको तुल्ययोगिताच ठेवावी असें म्हणतो. म्हणजे नांव ठेवण्यांत मतभेद असला तरी तपशिलांत भेद नाहीं, उलट विलक्षण साम्य आहे. तेव्हां वस्तुतः तुल्ययोगिता किंवा दीपक यांपैकीं कोणतेंही नांव देऊन त्या दोघांना एकत्र समाविष्ट करावे.

उदाहरणें:--

( १ ) अर्जुनकर्णशरासनघन जनिनामिनविग्रह शरधारा[1] ।
तापविती, कांपविती, निर्मित तटिनी जपासुमाकारा ॥

( २ ) आखु[2], बिडाल; श्वान व्याघ्र; शृगाळ द्विपारि; शशक करी; ।
विष अमृत; सत्य अमृतहि; तूं पार्थ, तयां तुम्हां नसेचि सरी ॥
मोकलिती[3] निर्द्रव्या वेश्या, अफळद्रुमासिही पक्षी ।
अबळा नृपा प्रजासी, मृगकुळ, दग्धा वनाहि, जें रक्षी ॥
कर्में[4] गमनैषध वनांतरीं । चंद्र कलंकी क्षीरांबुसागरीं ।
नहुष सर्प, कपाळीं त्रिपुरारी । मांडव्यमुनी शूळपीडित ॥

---

१ मो. कर्णपर्व २·१७. २ मो. कर्णपर्व २७·१३. ३ मो. मंत्र भागवत. १०-५९६.
४ मु. सौ. पर्व. १·५९.

# प्रकरण १३ वें

## सादृश्यगर्भअभेद-प्रधान अलंकार

### १ अपह्नुति.

१. गेल्या प्रकरणांत सादृश्य गर्भातील गम्यौपम्याश्रयी अलंकार पाहिले. या प्रकरणांत अभेद-प्रधान अलंकारांचा विचार करूं. अप + ह्नु = लपविणें अगर झांकून टाकणें, या अर्थावरून ज्या अलंकारांत एक वस्तु लपवून तत्सम दुसरी वस्तु सांगितली जाते त्याला अपह्नुति अलंकार असें म्हणूं लागले. भामहाची व्याख्या,

> अपह्नुतिरभीष्टा च किंचिदन्तर्गतोपमा।[1]
> भूतार्थापह्नवादस्याः क्रियते चाभिधा यथा ॥

ज्यांत उपमाभाव गुप्त आहे व खऱ्या अर्थाचा निह्नव केलेला आहे त्याला अपह्नुति म्हणतात. अपह्नुति अलंकारांत खरा अर्थ व त्याला लपविणारा अर्थ यांत औपम्यभाव असावा लागतो, व त्यांत स्पष्टपणें खऱ्या अर्थाचा निषेध व दुसऱ्या अर्थाची स्थापना केलेली असते. उ:--

> सेतु[2] न तो यत्पतिनें स्वसुता नेली जशी वृकें एणी ।
> त्या लंकेची श्री-भू-देवीनें ओढिली असे वेणी ॥

यांत सेतु असूनही तो सेतु नाहीं असें म्हणून त्यावर वेणीचा आरोप केला आहे. म्हणजे भूतार्थनिह्नव झाला आहे म्हणून याला अपह्नुति म्हणावयाचें. सेतु व वेणी यांत कृष्णवर्णामुळें व लांबपणामुळें औपम्यभाव आहे. भामहानें उदाहरण अपह्नुतीचेंच दिलें असलें तरी व्याख्येंत एक गोष्ट स्पष्ट केली नाहीं. त्यानें भूतार्थनिह्नव म्हटलें आहे पण खऱ्या अर्थाचा निषेध ही अपह्नुतीला लागणारी मुख्य गोष्ट त्यानें सांगितलेलीच नाहीं, त्यामुळें त्याच्या व्याख्येंत अतिशयोक्ति अगर रूपकही येऊं शकेल. कारण व्याख्येप्रमाणें पाहतां ' सेतु न ' या शब्दांना महत्त्व नाहीं पण ते शब्द नसले तर ही ओळ अतिशयोक्ति अलंकाराची होईल. 'सेतु न' या शब्दानें

---

१ भा. लं. ३·२०.    २ मो. व. पर्व. २२.

निषेध होतो व निषेधामुळें अतिशयोक्ति अलंकाराप्रमाणें प्रस्तुत अर्थाचें पूर्ण निगरण न होतां दोन्हीही अर्थ उक्त असून प्रस्तुताचा निषेध होऊन ती अपह्नुति होते. हा अतिशयोक्ति व अपह्नुतींत फरक आहे.

१. दण्डीः—अपह्नुतिरपह्नुत्य किंचिदन्यार्थदर्शनम् ॥[1]

दण्डीनें प्रस्तुतार्थाचा अपह्नव करून दुसऱ्या अर्थाचें दर्शन असें म्हटलें असलें तरी अपह्नुतींत अपह्नव करणारी वस्तु व अपह्नुत वस्तु यांत औपम्यभावाची गरज आहे, ही गोष्ट यानें विचारांत घेतलेली नाहीं असें त्याच्या उदाहरणांवरूनही दिसत आहे. यानें दिलेलीं कांहीं उदाहरणें चुकीचीं वाटतात. अपह्नुति अलंकारांत अपह्नव हा मुख्य आहे. मग तो कोणत्याही रूपानें स्पष्ट पाहिजे तो निषेध नसेलच तर अपह्नुति न होतां त्या अलंकाराचें रूपकांतही पर्यवसान होईल. उ०:–'सेतु न तो' या उदाहरणांत केवळ सेतु ही वेणी असें निषेध नाहींसा करून म्हटलें तर ती अपह्नुति न होतां रूपक होईल.

चन्दनं चंद्रिका मन्दो गन्धवाहश्च दक्षिणः ।[2]
सेयमग्निमयी सृष्टिर्मयि शीता परान् प्रति ॥

हें उदाहरण विषयापह्नुतीचें म्हणून दण्डीनें दिलें आहे. पण यांत विरोधाशिवाय दुसरें कांहीं नाहीं. या ठिकाणीं शैशिर्याचा अपह्नव केला आहे म्हणून ही विषयापह्नुति असें म्हणतां येत नाहीं; कारण यांत स्पष्ट अपह्नव केलेला नाहीं. अपह्नुत व अपह्नव करणारें औष्ण्यप्रकाशन यांत औपम्यभाव नाहीं. तेव्हां हें अपह्नुतीचें उदाहरण होऊं शकत नाहीं. यानें अपह्नुतीचे विषयापह्नुति, स्वरूपापह्नुति हे भेद करून उपमापह्नुति, रूपकापह्नुति इत्यादि अनेक भेद शक्य आहेत असें म्हटलें आहे. यांपैकीं स्वरूपापह्नुतीचें उदाहरण बरोबर आहे. कारण यांत अपह्नव 'नाम नामतः' या शब्दांनीं केला आहे. तें उदाहरण असें–

अमृतस्यंदिकिरणश्चंद्रमा नाम नामतः ।[3]
अन्य एवायमर्थात्मा विषदिष्यन्दिदीधितिः ॥

३. उद्भटः—अपह्नुतिरभीष्टा च किंचिदन्तर्गतोपमा ।[4]
भूतार्थापह्नवेनास्या निबंधः क्रियते बुधैः ॥

'भूतार्थापह्नवान्' या शब्दाऐवजीं 'भूतार्थापह्नवेन' व 'क्रियते चाभिधा यथा' ऐवजीं 'निबन्धः क्रियते बुधैः' असे शब्द घातले आहेत, एवढाच काय तो भामहांत व उद्भटांत फरक आहे. बाकी अर्थदृष्ट्या दोन्ही व्याख्या सारख्याच आहेत. उद्भटावरील टीकेंत रा. बनहट्टी म्हणतात कीं, Here though he (वामन) does not state whether the अपह्नव

१ का. द. २·३०४. २–३ का. द. २·३०५–३०७. ४ का. सा. सं. ५·५५.

is to be made of उपमेय or उपमान. Yet his example shows that he means the अपह्नव of उपमेय and of nothing else.

वामन— 'समेन[1] वस्तुनान्यापलापोऽपह्नुतिः'

वामनाची व्याख्या पाहतां उपमानानें ( समेन वस्तुना ) उपमेयाचा ( अन्याचा) अपलाप करणें म्हणजे अपह्नुति असा व्याख्येचा स्पष्ट अर्थ आहे. भग वामनाच्या उदाहरणावरून त्याला 'असें म्हणावयाचें होतें' असें अनुमान काढण्याची जरूरी नाहीं.

रुद्रटः— अतिसाम्यादुपमेयं[2] यस्यामसदेव कथ्यते सदपि ।
उपमानमेव सदिति च विज्ञेयापह्नुतिः सेयम् ॥

'जेव्हां अतिसाम्यामुळें उपमेय विद्यमान असतांही तें अविद्यमान आहे सांगून त्या ऐवजी उपमान विद्यमान आहे असें सांगतात तेव्हां अपह्नुति होते.' याची व्याख्या अपह्नुतीच्या जवळ जवळ आहे; पण त्याचें उदाहरण मात्र उपमेचेंच वाटतें:—

नव[3]बिसकिसलयकोमलसकलावयवा विलासिनी सैषा ।
आनंदयति जनानां नयनानि सितांगुलेखेव ॥

यांत उपमेशिवाय अन्य अलंकार दिसत नाहीं.

मम्मटः—प्रकृतं यन्निषिध्यान्यत्साध्यते सा त्वप[4]ह्नुतिः ॥

"जी प्रकृताचा निषेध करून अप्रकृत पुढें ठेवते ती अपह्नुति होय." मम्मटाची व्याख्या अधिक स्पष्ट आहे. अपह्नव म्हणजे लपविणें एवढाच अर्थ अजूनपर्यंत अपह्नुतींत येत होता; पण यानें निषेधानें अपह्नव असें स्पष्टपणें म्हटल्यानें इतर अलंकार यांत डोकाऊं शकले नाहींत. मम्मटानें अपह्नुतीचीं उदाहरणें देऊन अपह्नव निरनिराळ्या शब्दांत करतां येतो असें दाखविलें आहे. जसें:—

सृष्टी[5]ही हिम–मिषें तरूंवर नव मोत्यांची जाळी । घाली

यांत वास्तविक 'हिम' ही प्रस्तुत खरी गोष्ट असून 'सृष्टि हिमाच्या मिषानें मोत्यांची जाळी घालते' असें म्हणण्यांत उपमेयाचा 'मिष' शब्दानें निषेध होऊन उपमानाची स्थापना झाली म्हणून ही अपह्नुति झाली.

४. रुय्यकः—विषयापह्नवे[6]ऽपह्नुतिः

यानें ( १ ) अपह्नवपूर्वक आरोप ( २ ) आरोपपूर्वक अपह्नव ( ३ ) छलादि असत्यप्रतिपादकांनीं अपह्नवनिर्देश असे तीन भेद केले आहेत. पहिले दोन वाक्यभेदानें व तिसरा एकवाक्यत्वानें संभवतो असें रुय्यक म्हणतो. यानें 'ज्योत्स्नाभस्मच्छुरण०' हें उदाहरण आरोपपूर्वक अपह्नुतीचें दिलें आहे. पण हेंच उदाहरण

---

१ का. सू. ४·३·५. २ का. लं. ८·५७. ३ का. लं. ८·५८. ४ का. प्र. १०·१४६. ५ बालकवि. ६ अ. स. २०.

मम्मटानें रूपकाचें म्हणून दिलें आहे. वस्तुतः यांत पहिल्या तीन ओळींत रूपक व चौथीत अपह्नुति आहे. व त्यांतही रूपकच प्रधान आहे.

विद्याधरः—कलयति विषयेऽपह्नवमारोप्यं यत्र भासते सुतराम्
आहुरपह्नुतिमेतां बन्धच्छाया त्रयी चास्याः ॥

रुय्यकाचें यानें नेहमींप्रमाणेंच सर्वस्वीं अनुकरण केलें आहे.

विश्वनाथः—प्रकृतं प्रतिषिध्यान्यत्स्थापनं स्यादपह्नुतिः ।
गोपनीयं कमप्यर्थं द्योतयित्वा कथंचन ।
यदि श्लेषेणान्यथा वान्यथयेत्साप्यपह्नुतिः ॥

विश्वनाथानें अपह्नुतीचे (१) आरोपपूर्वक अपह्नव (२) अपह्नवपूर्वक आरोप असे दोन भेद केले आहेत व त्याशिवाय श्लेषानें किंवा निराळ्या रीतीनें गोपनीय अर्थ प्रकट करणें यालाही अपह्नुति म्हणतात असें तो म्हणतो. पण ही अपह्नुति व्याजोक्ति अगर वक्रोक्ति या सदरांत घालावी लागेल. कारण तींत औपम्यभाव नाहीं. अपह्नुतींत निषेधासह अपह्नव व औपम्यभाव या दोन गोष्टींना महत्त्व असल्यानें औपम्यभावाला फांटा देऊन इतर अलंकार अपह्नुतींत शिरूं देणें इष्ट होणार नाहीं. औपम्यभावाचें जाडें बंधन अपह्नुतींत पाहिजेच या दृष्टीनें अपह्नुतीचा विश्वनाथानें मानलेला दुसरा प्रकार ही अपह्नुतीच नव्हे. विश्वनाथानें याला अपह्नुतींत घेण्याचें कारण एवढेंच कीं व्याजोक्तींत वक्त्याची प्रथमतःच गोपनाबद्दल खटपट असते (मागाहून कधीं कधीं अटोकाट प्रयत्नांतीही खरी गोष्ट बाहेर पडते) व अपह्नुतींत वक्ता आधीं बोलतो व नंतर उक्त गोष्टीला निराळें वळण लावतो. हा अपह्नुतिप्रकार विश्वनाथानें हेमचंद्रापासून घेतलेला असावा; कारण हेमचंद्रानें व्याजोक्ति न मानतां अपह्नुतींतच व्याजोक्ति सामाविली आहे.

५. अप्पय्यदीक्षितः—शुद्धाऽपह्नुतिरन्यस्यारोपार्थो धर्मनिह्नवः ॥

अप्पय्यदीक्षितानें शुद्धापह्नुतींत धर्मनिह्नव करतात असें म्हटलें असलें तरी
'नायं सुधांशुः किं तर्हि व्योमगंगासरोरुहम् ॥

या उदाहरणांत धर्मनिह्नव नसून ही विषयानिह्नवानेंच अपह्नुति झाली आहे. यावरून धर्मनिह्नव हें अपह्नुतीचें लक्षण नसून विषयनिह्नव हेंच पाहिजे. वर सांगितलेल्या शुद्धापह्नुतीशिवाय हेत्वपह्नुति, पर्यस्तापह्नुति, भ्रान्तापह्नुति, छेकापह्नुति व कैतवापह्नुति असे आणखीही पांच भेद अप्पय्यदीक्षितानें सांगितले आहेत.

'स एव युक्तिपूर्वश्चेदुच्यते हेत्वपह्नुतिः'

---

१ ९.८·११. २ सा. १० ३८–३९. ३ कु. (११) २७. ४ कु. २७ श्लो. ५ कु. २८ श्लो.

'तोच धर्मनिषेध जर उपमेयाचे ठिकाणीं युक्तीनें केला जाईल तर हेत्वपह्नुति होते.' तिचें उदाहरण,

'नेन्दुस्तीव्रो न निश्यर्कः सिंधोरौर्वोयमुत्थितः'

यांत धर्मनिषेध नसून चंद्र अगर सूर्य या विषयांचा निषेध असल्यानें हें अपह्नुतीचें उदाहरण झालें तेव्हां हेत्वपह्नुति म्हणण्यांत विशेष अर्थ नाहीं. पर्यस्तापह्नुति म्हणजे वर्णनीय धर्माचा प्रतिषेध करून त्या धर्माचा दुसऱ्यावर आरोप करणें; याचें उदाहरण,

नायं सुधांशुः किं तर्हि सुधांशुः प्रेयसीमुखम् ॥

वस्तुतः यांत अपह्नुति नसून रूपकच होत आहे. कारण हा सुधांशु नाहीं तर प्रियामुख हा सुधांशु आहे असें म्हणण्यांत मुख व चंद्र यांत अभेद दिसतो, व तो निषेधापेक्षां अधिक बलिष्ठ आहे. हेंच जर हा चंद्र नाहीं प्रियामुख आहे असें म्हटलें असतें तर ही अपह्नुति झाली असती. असो. यानें पर्यस्तापह्नुति, शुद्धा व हेतु अशी दोन प्रकारची मानली आहे. चौथ्या भ्रान्तापह्नुति या प्रकारांत प्रथम भ्रान्ति असून ती नाहींशी करावयाची असते:--

तापं करोति सोत्कंपं ज्वरः किं न सखि स्मरः

या उदाहरणांत सखीची भ्रान्ति सत्यकथनानें नाहींशी केली म्हणून ही भ्रान्तापह्नुति असें म्हटलें आहे. पण सत्यकथन व अपह्नुति या दोन गोष्टी एके ठिकाणीं संभवत नाहींत. अपह्नुतींत सत्यापलापच पाहिजे या दृष्टीनें भ्रान्तापह्नुतीला अपह्नुतीत स्थान नाहीं. अप्पय्यदीक्षितानें भ्रान्ति कल्पित असून ती सत्यकथनानें नाहींशी करणें हा भ्रांतापह्नुतीचा एक भेद सांगितला आहे. व त्याचें उदाहरण 'न पद्मं मुखमेवेदं' हें दिलें आहे. पण याबद्दलही असेंच म्हणतां येईल कीं हें पद्म आहे कीं काय अशी भ्रान्ति झालेल्या व्यक्तीला 'हें पद्म नाहीं तर मुखच आहे' असें सत्य सांगण्यामुळें अपह्नुतीला अवश्य असणारा सत्यापलाप राहात नाहीं. याच भेदाला दण्डीनें तत्त्वाख्यानोपमा म्हटलें आहे. व एका दृष्टीनें अपह्नुतींत तद्विरुद्ध प्रकार लादण्यापेक्षां दण्डीची तत्त्वाख्यानोपमाच अधिक बरी वाटते

छेकापह्नुतिरन्यस्य शंकातस्तथ्यनिह्नवे ।<br>प्रजल्पन् मत्पदे लग्नः 'कान्तः किं ?' न हि नूपुरः ॥

इतरांच्या शंकेसाठीं सत्यार्थनिह्नव करणें म्हणजे छेकापह्नुति होय उदाहरणांत, 'जल्पना करीत माझ्या चरणाशीं विनीत झाला' असें एकीचें भाषण दुसरीनें ऐकून 'कोण पति का ?' असा प्रश्न विचारला तेव्हां वस्तुतः पतीच विनीत झाला असतांही 'तो नूपुर विनीत झाला' असें म्हणते म्हणून ही छेकापह्नुति गणली आहे. पण

---

१ कु. २८ श्लो. २ कु. ३१ श्लोक. ३ कु. पान ३३. ४ कु. ३१ श्लोक.

वस्तुतः ही वक्रोक्ति होईल, कारण यांत बोललेल्या वचनाचा अर्थ निराळा घेतला व तो पुनः निराळ्या गोष्टींत पर्यवसित केला आहे. येथें वक्रोक्तीचेंच सौंदर्य अधिक आहे. असो. अशा रीतीनें छेकापह्नुति ही विशेष गणण्याचें कारण नाहीं. कैतवापह्नुति म्हणजे छल, मिष इत्यादि शब्दांनीं निषेध करणें हा मात्र अपह्नुतीचा प्रकारच होईल. यावरून अप्पय्यदीक्षिताच्या अपह्नुतींत पांच भेदांचें केवळ अवडंबर आहेसें दिसतें.

६. जगन्नाथः— उपमेयतावच्छेदकनिषेधसामानाधिकरण्येनारोप्यमाणमुपमानतादात्म्यमपह्नुतिः ॥[1]

या व्याख्येंत उपमेय हें उपमेय नाहीं असें ठरविण्यासाठीं, त्याचा निषेध करण्यासाठीं उपमान ठेवलें गेल्यानें उपमेय व उपमान यांचा विरोध आहे असें वाटतें. रूपकांत एकदेशीयत्व असल्यानें त्या दोहोंचा विरोध वाटत नाहीं. अनुग्राह्य अनुग्राहक भावामुळें हिचे सावयवा व निरवयवा असे भेद पडतील असें जगन्नाथ म्हणतो. यानें रुय्यकाप्रमाणेंच इतर भेद उदाहरणांसह दिले आहेत. पण त्यांत विशेष वैचित्र्य नाहीं अपह्नुति ही छायामात्र असतां इतर अलंकारांना बाजूस सारून अपह्नुति प्रधान होऊं शकत नाहीं, असें तो म्हणतो, हें रुय्यकाला उद्देशून आहे. कारण त्यानें 'ज्योत्स्ना भस्म' हें अपह्नुतीचें उदाहरण मानलें आहे.

७. दण्डीची तत्त्वाख्यानोपमा, अप्पय्यदीक्षिताची छेकापह्नुति व विश्वनाथाचा निश्चय नांवाचा स्वतंत्र अलंकार हीं वस्तुतः एकच होत. यांत भ्रांतीचें निरसन असून निश्चित गोष्ट, अथवा सत्य सांगितलेलें असतें.

विश्वनाथः——अन्यान्निषिध्य प्रकृतस्थापनं निश्चयः पुनः

अप्पय्यदीक्षितः——छेकापह्नुतिरन्यस्य शंकातस्तथ्यनिह्नवे ।[3]

दण्डीः——इति विस्पष्टसादृश्यात् तत्त्वाख्यानोपमैव सा ॥[4]

अप्पय्यदीक्षितानें तर दण्डीची तत्त्वाख्यानोपमा ती त्याची छेकापह्नुति असें स्पष्टपणें म्हटलें आहे. दण्डी व अप्पय्यदीक्षित यांनीं भ्रान्ति ही कल्पित अगर गृहीत धरली आहे. व विश्वनाथाच्या उदाहरणांत ती उक्त आहेः—

वदनमिदं न सरोजं नयने नेन्दीवरे एते ।[5]
इह सविधे मुग्धदृशो भ्रमर मुधा किं परिभ्रमसि ॥

येथें दुसऱ्या ओळींत भ्रान्ति स्पष्ट आहे, अशा स्थितींत नुसत्या प्रकृतस्थापनेला महत्त्व नसून भ्रांति आहे म्हणून प्रकृत-स्थापनेला महत्त्व आहे तेव्हां हा

---

१ र. गं. २७८. २ सा. द. १०·३९. ३ कु. ३१ श्लोक. ४ का. द. २·३६. ५ सा. द. पान २९.

भ्रांतिमान् अलंकारच समजणें इष्ट आहे असें रा. काणे म्हणतात तें बरोबर वाटतें. त्याचप्रमाणें भ्रांतिमान् अलंकारांत भ्रांनि ही गृहीत धरली, तर दण्डीची तत्त्वाख्यानोपमा व अप्पय्यदीक्षिताची छेकापह्नुति भ्रांतिमान् अलंकारांतच जाते. नाहीं तर उपमेच्या सदरांत बसते, कारण त्यांत नुसतें औपम्यभाव सांगणें एवढेंच तत्त्व आहे.

तुहिनकर[1] नव्हे, हें बीज चिंतालतेचें;
विकसित अथवा हें पुष्प उद्वेगतेचें;
अभिनव मदनाचें छत्र किंवा उभारे,
युवतिजन जयाच्या दर्शनें मात्र भागे ॥

चंद्राचा स्पष्ट निषेध करून त्यावर चिंतालता, उद्विग्नतेचें पुष्प, मदनाचें छत्र असे वेगवेगळे आरोप यांत केले आहेत.

रामा[2] ! नोहे हे लंकापुरी। प्रत्यक्ष काळव्याघ्राची दरी ।
तेथें तुम्ही मानववीरीं । येइजे हें अपूर्व वाटे ॥

लंकापुरीचा स्पष्ट निषेध करून काळव्याघ्राच्या दरीचा आरोप केल्यानें ही अपह्नुति झाली. आतां अप्पय्यदीक्षिताच्या छेकापह्नुतीचें उदाहरण घेऊं:—

नवजलधरः[3] संनद्धोयं न दृप्तनिशाचरः ।
सुरधनुरिदं दूराकृष्टं न तस्य शरासनम् ।
अयमपि पटुर्धारासारो न बाणपरंपरा ।
कनकनिकषस्निग्धा विद्युत्प्रिया मम नोर्वशी ॥

राजाला भ्रान्तीनंतर पुनः सत्य गोष्टीची जाणिव झाली आहे, भ्रान्तीनंतर सत्यबोध होण्यांतच वैचित्र्य असल्यानें हें उदाहरण अप्पय्यदीक्षिताच्या छेकापह्नुतीचें होईल पण वस्तुतः हा भ्रान्तिमान् अलंकारच आहे.

अनेक[4]-रत्नावालि-बद्ध-सेतू । मंदाकिनी-मंडन-मुख्य-हेतू ।
असे, दिसे भव्य कमान त्याची । न मूर्ति ही इन्द्र-शरासनाची ॥

हा आरोपपूर्वक अपह्नव आहे.

## २ उत्प्रेक्षा



८. ईक्ष्-पाहाणें; उत्प्र+ईक्ष्=कल्पना करणें, मानणें, तर्क करणें. यावरून या अलंकाराला उत्प्रेक्षा असें नांव मिळालें आहे. उत्प्रेक्षेचीं उदाहरणें बाण व कालिदास यांच्या ग्रंथांत सर्वत्र विखुरलेलीं आहेत, इतकेंच नव्हे तर ऋक्संग्रहांतही सुंदर उदाहरणें आढळतात.

---

१ सामराज रुक्मिणीहरण ३·१०७. २ मु. शतमुखरावणाख्यान. १८.
३ विक्रमोर्वशीय ४·७. ४ राधारमण.

एषा शुभ्रा न तन्वो विदानोर्ध्वेव स्नाती दृशये नो अस्थात् ।
अप द्वेषो बाधमाना तमांस्युषा दिवो दुहिता ज्योतिषागात् ॥

रा. चित्रावांच्या भाषांतराप्रमाणें उर्ध्वेव यांतील 'एव' हा शब्द 'जणुं काय' या अर्थी आहे. आपलें निर्मळ शरीर दाखवावें **म्हणूनच कीं काय** ही उषा निर्मला अलंकृता स्त्रीप्रमाणें दिसणारी पूर्व दिशेस आमच्या दृष्टीस पडत आहे इ. आपण सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां वेदांत पुष्कळ अलंकार सांपडतात, पण त्यांचें नामाभिधान झालेलें नव्हतें. भरतानें या अलंकाराची व्याख्या केलेली नाहीं. मेधावीनें उत्प्रेक्षेची व्याख्या केली तीवरून भामहानें व्याख्या केली असावी असें दिसतें.

भामहः— अविवक्षितसामान्या किंचिच्चोपमया सह ।
अतद्गुणक्रियायोगादुत्प्रेक्षातिशयान्विता ।

सामान्य न सांगतां किंचित् उपमेनें अतद्गुणाचा आरोप केला असतां अतिशयानें युक्त अशी उत्प्रेक्षा होते. गुणांचा आरोप म्हटल्यानें रूपक होण्याचा संभव आहे म्हणून, 'उपमया सह' असें म्हटलें आहे.

दण्डीः—अन्यथैव स्थिता वृत्तिश्चेतनस्येतरस्य वा ।
अन्यथोत्प्रेक्षते यत्र तामुत्प्रेक्षां विदुर्यथा ॥

चेतन अगर अचेतनाची मूलतः असलेली वृत्ति निराळ्या तऱ्हेनें कल्पिणें याला उत्प्रेक्षा म्हणतात.

'मन्ये शङ्के ध्रुवं प्रायो नूनमित्येवमादिभिः ।
उत्प्रेक्षा व्यज्यते शब्दैरिव शब्दोऽपि तादृशः ॥

उत्प्रेक्षेंत 'मन्ये' 'शङ्के' याप्रमाणेंच 'इव' हा शब्दही 'जणुं काय' या अर्थी येतो. संस्कृतप्रमाणें मराठींतही कित्येक शब्द असें आहेत कीं ते उपमावाचकच आहेत असें सांगतां येणार नाहीं. दण्डीनें 'लिम्पतीव तमोऽङ्गानि वर्षतीवाञ्जनं नभः' हें उत्प्रेक्षेचें उदाहरण ठरविण्यांतच पुष्कळ श्लोक खर्च केले आहेत. त्याचें म्हणणें असें आहे कीं, यांत कोणाला उपमा अलंकार वाटत असला तरी यांत उत्प्रेक्षा अलंकारच आहे. कारण उपमान व उपमेय हें तुल्यधर्मत्वावर असतें त्यायोगें उपमा होते. पण येथें लिम्पति आणि तम यांत तुल्यधर्मत्व कोठें आहे? कारण क्रिया ही तुल्यधर्मत्वानें नामाशीं संयोगी कशी होईल? लिम्पति व तम यांचा क्रियापद व कर्ता असा संबंध आहे म्हणून त्यांत उपमा नाहीं. दण्डीचें हें

१ ऋ. ५-८०-१८. २ भा. लं. २-९१. ३ का. द. २-२२१. ४ का. द. २-२३४.

म्हणणें बरोबर आहे. पण 'लिम्पतीव' हा सबंध श्लोक मात्र उत्प्रेक्षा व उपमा यांची संसृष्टि होईल.

९. पहिला अर्ध स्वशब्दांत मांडून भामहाचीच व्याख्या उद्भटानें घेतली ती अशीः—

(१) साम्यरूपाविवक्षायां वाच्येवाद्यात्मभिः पदैः।
अतद्गुणक्रियायोगादुत्प्रेक्षातिशयान्विता ॥

(२) लोकातिक्रान्तविषया भावाभावाभिधानतः।
संभावनेयमुत्प्रेक्षा वाच्येवादिभिरुच्यते ॥

भामहाच्या व्याख्येंतील 'किंचिच्चोपमया सह' या शब्दांचें 'वाच्येवाद्यात्मभिः पदैः' म्हणून यानें विवरण केलें. या व्याख्येशिवाय आणखी जी एक व्याख्या उद्भटानें केली आहे त्या व्याख्येंत दण्डीच्या व्याख्येची छटा आहे.

(१) "जेव्हां साम्य न सांगतां केवळ गुण व क्रिया यांयोगें प्रकृताचे ठिकाणीं अप्रकृत इवादि शब्दांनीं अतिशयानें ठेवलें जातें तेव्हां उत्प्रेक्षा होते. किंवा (२) चेतनाचेतनाची संभाव्य कल्पना करणें म्हणजे उत्प्रेक्षा होय." उद्भटाच्या दुसऱ्या व्याख्येंतून मम्मटानें आपली व्याख्या तयार केली. कारण या दोन्ही व्याख्यांचा इत्यर्थ एकच आहे. उद्भटानें उत्प्रेक्षेंत इवादि असतात असें सांगितलें आहे पण इन्दुराजानें उद्भटाच्या 'वाच्या उत्प्रेक्षा उच्यते' या शब्दांवरून मनकवडेपणानें गम्या उत्प्रेक्षेचें स्वतःच उदाहरण दिलें आहे.
उद्भटाच्या दोन्हीं उदाहरणांत इवादिप्रयोग आहे.

चांपेकेळीपरिसही सरलत्व नाकीं।
तीचा धरी अधर विद्रुमभावना कीं।
भासे मनांत मज बिंबफळ भ्रमानें।
की सत्य चंचुपुट वोढविलें शुकानें ॥

उद्भटाच्या 'इव' शब्दाचा अर्थ 'भासे कीं सत्य' एवढ्यांत येतो.

संजयसूत नृपाच्या जाय प्रक्षीणबांधवीं सदनीं; ।
जाणों प्रियजनशोकाजगराच्या उघडल्या महावदनीं ॥

इन्दुराजाच्या म्हणण्याप्रमाणें इवादि वाच्य बसतां होणारी उत्प्रेक्षाः—

रक्तनदीच्या स्नानें पानें गंधेंहि वीर ते भुलले।
दिसती वसंतसमयीं किंशुकतरु कटककाननीं फुलले ॥

भामह-दण्डीच्या व्याख्यांचें उद्भटानें एकीकरण करून ठेवलें आहे.

---

१-२ का. सा. सं. ३·३९।४०. ३ र. पं. नलदमयंती. ४-५ मो. कर्णपर्व १·४-३१·६४.

वामनः—अतद्रूपस्यान्यथाध्यवसानमतिशयार्थमुत्प्रेक्षा।[1]

'स्वाभाविक गोष्टीचा अतिशयासाठीं निराळ्याच तऱ्हेनें अध्यवसाय करणें म्हणजे उत्प्रेक्षा' अध्यवसाय म्हणजे निगरण अगर गिळून टाकणें उत्प्रेक्षेंत पूर्णपणें निगरण नसून ती निगरणाजवळ आलेली असते. तेंच निगरण झाल्यास ती उत्प्रेक्षा अतिशयोक्ति होईल. तिची व्यावृत्ति करण्यासाठीं यानें वृत्तींत 'इवादि' शब्द उत्प्रेक्षा दाखवितात असें म्हटलें आहे. पण व्याख्येंत तसें म्हटलें नसल्यानें व्याख्या सदोष झाली आहे.

१०. रुद्रटः—[2] अतिसारूप्यादैक्यं विधाय सिद्धोपमानसद्भावम्।
आरोप्यते च तस्मिन्नतद्गुणादीति सोत्प्रेक्षा॥
सान्येत्युपमेयगतं यस्यां संभाव्यतेत्यदुपमेयम्।
उपमानप्रतिबद्धा परोपमानस्य तत्त्वेन॥
यत्र विशिष्टे वस्तुनि सत्यसदारोप्यते समं तस्य।
वस्त्वन्तरमुपपत्त्या संभाव्यं सा परोत्प्रेक्षा॥

जेव्हां (१) अतिसाम्यामुळें सिद्ध उपमानाचा गुण उपमेयाच्या ठिकाणीं नसतांही आरोपिला जातो किंवा (२) उपमेयाच्या ठिकाणीं असणारें दुसरें उपमेय उपमानामध्यें असणाऱ्या दुसऱ्या उपमानाशीं ताद्रूप्यानें संभवतें किंवा (३) विशिष्ट वस्तूच्या ठिकाणीं तत्सम निराळी संभाव्य वस्तु आरोपिली जाते तेव्हां उत्प्रेक्षा होते. यानें दिलेलीं सर्व उदाहरणें उत्प्रेक्षेचींच आहेत. या प्रकारांत एकच गोष्ट मुख्य आहे, व ती म्हणजे प्रकृताचे ठिकाणीं अप्रकृताचें कल्पन; ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन मम्मटानें आपली व्याख्या अगदींच आंखडली.

मम्मटः— संभावनमथोत्प्रेक्षा[3] प्रकृतस्य समेन यत्॥

रुद्रटानें अतिशयालंकारांत उत्प्रेक्षा दिली आहे ती पाहूं.

यत्रातितथाभूते[4] संभाव्येत क्रियाद्यसंभाव्यम्।
संभूतमतद्वति वा विज्ञेया सेयमुत्प्रेक्षा॥

'जेथें एकादी क्रिया असंभाव्य असेल तेथें ती संभाव्य समजणें किंवा असंभाव्य असतांना संभूत म्हणजे झालेली आहे असें दाखविणें यास उत्प्रेक्षा म्हणावें. याचीं रुद्रटानें दोन उदाहरणें दिलीं त्यांपैकीं दुसऱ्यांत इवादि गम्य आहेत. 'एकाद्या गोष्टीचें एक कारण नसतांही तें आहे असा आरोप करणें' हा तिसरा उत्प्रेक्षाभेद त्यानें दिला आहे. वास्तविक हे तिन्ही प्रकार असंभाव्य गोष्टीची संभावना करणें या एकाच भेदाचे होतील. पूर्वींच्या भेदांतही हेंच सार असल्यानें उत्प्रेक्षेचे असे भेद कोणी केले नाहींत. या तीन भेदांत अतिशय असल्यानें याची उत्प्रेक्षा दोन सदरांत राहिली आहे.

---

१. का. सू. ४·३·९. २ का. लं. ८·३२–३४–३६. ३ का. प्र. १०·१३७.
४ का. लं. ९·११.

" संभावनम् " म्हटल्यानें अभेद अगर निगरण येत नाहीं त्यामुळें रूपक व अतिशयोक्ति यांचा निरास होतो.

११. रुय्यकः—अध्यवसाये व्यापारप्राधान्ये उत्प्रेक्षा[1] ॥

वामनानें व्याख्येंत अध्यवसाय शब्द वापरून घोंटाळा केला व तो 'इवादि' शब्दानें उत्प्रेक्षेचें द्योतन होतें असें टीकेंत म्हणून नाहींसा केला. रुय्यकानें निगरणाच्या मार्गांत असलेली ती उत्प्रेक्षा असें ह्मटलें आहे. त्यामुळें अध्यवसाय असाही अर्थ होत नाहीं. व्यापारप्राधान्ये म्हटल्यानें अतिशयोक्ति होत नाहीं. रुय्यकानें उत्प्रेक्षेचा फारच मोठा पसारा पसरला आहे. वाच्योत्प्रेक्षा व प्रतीयमानोत्प्रेक्षा असे प्रथम दोन भेद करून नंतर वाच्योत्प्रेक्षेचें छप्पन व गम्यमानोत्प्रेक्षेचे शहाण्णव भेद केले. त्याशिवाय छलादि शब्दांनीं सापह्नव उत्प्रेक्षा होते व तिचे असेच भेद पाडून उत्प्रेक्षेचे अनन्त भेद पडतील असें यानें म्हटलें आहे.

( १ ) प्रतीयमानोत्प्रेक्षाः– १ जाति २ क्रिया ३ गुण ४ द्रव्य यांवरून हिचे चार भेद होतात. पुनः प्रत्येकीं भाव, अभाव असे दोन भेद म्हणजे आठ भेद झाले. त्या सर्वांचें गुण व क्रियेवरून प्रत्येकीं दोन भेद पडून सोळा भेद होतात. त्यांचे पुनः प्रत्येकीं निमित्तोपादान व निमित्तानुपादान असे दोन दोन भेद पडतात म्हणून बत्तीस भेद झाले. त्या भेदांचे हेतु, स्वरूप, फल यांनीं प्रत्येकीं त्रिविधत्व झाल्यानें एकंदर ९६ भेद झाले.

( २ ) वाच्योत्प्रेक्षाः—वाच्योत्प्रेक्षेचे ( १ ) स्वरूपोत्प्रेक्षा ( २ ) फलोत्प्रेक्षा ( ३ ) हेतूत्प्रेक्षा हे मुख्य तीन भेद.




१ अ. सू. २१.

स्वरूपोत्प्रेक्षेंतील जातीप्रमाणेंच क्रिया, गुण व द्रव्य यांचे प्रत्येकीं आठ भेद मिळून बत्तीस भेद झाले.

फलोत्प्रेक्षेंत द्रव्योत्प्रेक्षा नाहीं म्हणून आठ भेद कमी व तिचे निमित्तावरून दोन दोन भेद पडत नाहींत म्हणून फलोत्प्रेक्षेचे एकंदर बारा भेद झाले. तसेच हेतूत्प्रेक्षेचेही बारा भेद एकूण वाच्योत्प्रेक्षा छप्पन्न प्रकारची झाली. याशिवाय यानें श्लिष्टशब्द-हेतुका, उपमोपक्रमोत्प्रेक्षा इत्यादि भेद दिले आहेत. सर्व भेद पाहतां त्यांत वैचित्र्य मुळींच नाहीं. काव्यांतील सरसत्वांत गणितीसारखें रूक्ष विवेचन अलंकारांना बाधक होईल. या ठिकाणीं दण्डीनें रुय्यकाचे मस्तकावर हात ठेवल्याचा भास होतो. असो.

१२. विद्याधरः— अप्रकृतत्वेन स्यादध्यवसायो गुणाभिसंबंधात् ।
साध्यः प्रकृतस्य यदा कथितोत्प्रेक्षा[1] तदा तज्ज्ञैः ॥

विद्याधर व रुय्यक उत्प्रेक्षेंत लक्षणेला ठाव देतात. मम्मटानें लक्षणेबद्दल कांहींच सांगितलें नाहीं. विद्याधरानें रुय्यकाचेंच अनुकरण केलें आहे तसेंच विश्वनाथानेंही केलें आहे. विश्वनाथानें भेद रुय्यकाप्रमाणेंच केले आहेत.

विश्वनाथः— भवेत्संभावनोत्प्रेक्षा[2] प्रकृतस्य परात्मना ।

अप्पय्यदीक्षितः— संभावना स्यादुत्प्रेक्षा[3] वस्तु-हेतुफलात्मना ।
उक्तानुक्तस्यदाद्यात्र सिद्धासिद्धास्पदे परे ॥

अप्पय्यदीक्षितानें उत्प्रेक्षेचे फक्त सहा भेद केले आहेत. 'दुसऱ्याच्या धर्मसंबंधरूप निमित्तानें एकावर दुसऱ्याच्या ऐक्याची कल्पना करणें ती उत्प्रेक्षा होय' असें तो म्हणतो. उत्प्रेक्षेचे हेतु, फल व स्वरूप यावरून मुख्य तीन भेद पडतात. हेतूत्प्रेक्षा व फलोत्प्रेक्षा यांचे प्रत्येकीं सिद्धाश्रया व असिद्धाश्रया असे दोन दोन भेद पडतात व स्वरूपोत्प्रेक्षेचे उक्तपदार्था व अनुक्तपदार्था असे दोन भेद; एकूण उत्प्रेक्षेचे सहा भेद होतात असें अप्पय्यदीक्षित म्हणतो. यांच्या पोटभेदांत विशेष वैचित्र्य नाहीं.

जगन्नाथः—तद्भिन्नत्वेन तदभाववत्वेन या प्रमितस्य पदार्थस्य रमणीय तद्वृत्ति तत्समानाधिकरणान्यतरतद्धर्मसंबंधनिमित्तकं तत्त्वेन तद्वत्त्वेन वा संभावनमुत्प्रेक्षा[4] ॥

उत्प्रेक्षेचे भेद सांगतांना जगन्नाथानें रुय्यकाप्रमाणें भेद दिले आहेत पण तो हेतु, स्वरूप, फल या तीन उत्प्रेक्षाभेदांतच वैचित्र्य आहे असें म्हणतो. व वास्तविक पाहिलें तर अनेक भेद मानण्यांत अलंकार-वैचित्र्य नष्ट होतें. असो. आता उत्प्रेक्षेचीं उदाहरणें पाहूं:—

गुणोत्प्रेक्षाः—वैदर्भीच्या[5] अवलोकनें । सोज्वळ झालीं नृपाळवदनें ।
कीं त्या मुखचंद्राचीं किरणें । नेत्रकुमुदें तयांचीं ॥

---

१ प्र. ८·१२. २ सा. द. १०·४०. ३ कु. (१२) ३३. ४ र. गं. २८५.
५ मु. वनपर्व ६·१११.

जात्युत्प्रेक्षाः-- भोंवतें पाहे नरनायक। तंव तपीं ब्राह्मण एक।
ब्रह्मवंशीं जाणों अर्क। तपोतेजें विराजे ॥

हेतूत्प्रेक्षाः-- अंतरीं पेटला हुताशन। म्हणोन श्वासोच्छ्वास ऊष्ण।
अश्रुधारा उभय नयन। शांतविती सिंचनें ॥

ही प्रतीयमान हेतूत्प्रेक्षा आहे.

द्रव्योत्प्रेक्षाः-- भासे उषा विमल मंगलमूर्ति साची।
मुद्रा खुले सुखद चारु दिगंगनेची।
सारी छटा पसरली गगनांत लाल।
मांगल्यसूचक जणों उधळी गुलाल ॥

उत्प्रेक्षाः-- मुंडांवळी रुचिर उज्ज्वल मौक्तिकांची।
कांती करी द्विगुण आननपंकजाची।
भासे मनोरम नवोत्पल तें प्रफुल्ल।
मुक्तामिषें चमकती दंवबिंदु गोल ॥

श्लिष्टशब्दहेतुकाः--चंद्रप्रभा गिरि-शिरांवरि फांकतात।
ज्यांच्या लपे तम भयार्त गुहोदरांत।
राजाच तो मन उदार करून ठेवी।
डोक्यावरी कर जणों अभयास दावी ॥

क्रियोत्प्रेक्षाः-- दोन बाजुस उभे अचल-स्थिती।
राक्षसांसम भयंकर दीसती।
राजमार्ग-गत वस्तुंस पाहती।
हर्म्य कान जणुं देउनि ऐकती ॥

## ३ उल्लेख.



१३. उल्लेख अलंकार मम्मटापर्यंत मानलेला नाहीं. रुय्यकः—

एकस्यापि निमित्तवशादनेकधा ग्रहणं उल्लेखः ॥

निमित्तवशात् एकाचाच अनेक प्रकारें उल्लेख करणें यांस उल्लेख म्हणावयाचें. लिख् = लिहिणें, उल्लिख् = खणणें, उजळा देणें, असा अर्थ होतो. व उल्लेख म्हणजे निर्देश किंवा उच्चार. उल्लेख अलंकारांत एकच गोष्ट **अनेकांकडून** अनेक

---

१ मु. वनपर्व ४·९०. २ मु. वनपर्व ६·५०. ३ श्री. ज. वि. २६·२. ४ श्री. ज. वि. ३८·१६. ५ यशवंतराय १६·९. ६ यशवंतराय ३·७. ७ अ. सू. १९.

दृष्टींनीं निरानिराळी निर्देशिलेली असते अगर एकच गोष्ट **निरानिराळ्या अंगांनीं** निरानिराळी निर्देशिली जाते. म्हणजे एकांत गृहीतृभेद व एकांत विषय-भेद असे दोन प्रकार रुय्यकानें मानले आहेत.

विद्याधरः— तत्र निमित्तभेदादेकमनेकैरनेकधा यत्र ।
उल्लिख्यते स धीरैरुल्लेखः कथ्यतेऽन्वर्थः ॥[1]

विश्वनाथः— क्वचिद्भेदाद्ग्रहीतॄणां विषयाणां तथा क्वचित् ।
एकस्यानेकधोल्लेखो यः स उल्लेख उच्यते ॥[2]

अप्पय्यदीक्षितः— बहुभिर्बहुधोल्लेखादेकस्योल्लेख इष्यते ।
एकेन बहुधोल्लेखेऽप्यसौ विषयभेदतः ॥[3]

जगन्नाथः— एकस्य वस्तुनो निमित्तवशाद्यदनेकैर्ग्रहीतृभिरनेकप्रकारकं ग्रहणं तदुल्लेखः ॥[4]

रुय्यकाची व्याख्या शब्दमात्र फरक करून सर्वांनीं पुढें स्वीकारली आहेः—

[5]जो रामा प्रियभक्तसा, तदनुजा दायादसा मत्सरी, ।
सीतेला भयहेतुसा, मुनिवरां भक्ति-स्थली-केसरी ।
पक्ष्यांना मधु मूर्तसा, वनमृगां आप्तेष्टसा वाटला ।
रामातें बघुनी तदीय सहसा प्रेमें गळा दाटला ॥

या ठिकाणीं उल्लेख संकीर्ण आहे. गृहीतृभेदानें प्रत्येकाकडून हनुमानासंबंधीं निरनिराळें ग्रहण केलें गेलें असल्यानें हा उल्लेख झाला व मधून मधून उपमा-रूपकाच्या लहरी असल्यानें तो संकीर्ण अलंकार झाला.

[6]जो पाहे सदसद्विचार हृदयीं, जोपा जनाचीं करी ।
जो पावे समयीं, विशेष गणिला जो पावनाभीतरीं ।
सोपा जो सकळां द्विजां, सुमतिचा सोपा, सदा लाभतो ।
कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो ॥

हें रूपकयुक्त उल्लेखाचें उदाहरण होईल. उल्लेख अलंकार भ्रान्तिमान्, अतिशयोक्ति अगर रूपक वाटण्याचा संभव आहे म्हणून हा अलंकार मानणारांनीं त्यांत असा फरक सांगितला आहे कीं, रूपकांत प्रत्येक वेळीं आरोपाची जाणीव असते उल्लेखांत गृहीतृभेदानें ग्राहकाला आरोपाची जाणीव नसते. रूपकाप्रमाणें यांत आरोप नसतोच तर प्रत्येकाच्या दृष्टीला तो खराच असा दिसतो. मग दृष्टीला निराळा म्हणून हा भ्रांतिमान् होईल असें वाटतें; पण तसेंही नाहीं, कारण यांत भ्रांति नसून अनेकांचा एकच विषय अनेक तऱ्हेनें घेण्याचा

---

१ ए. ८·१०. २ सा. द. १०·३७. ३ कु. ७. ४ र. गं. २७०.
५ सा. व वि. २·६२. ६ र. पं. नलदमयंती १५.

विच्छित्तिविशेष आहे. अतिशयोक्तींत निगरण असतें; त्यामुळें विषय नाहींसाच होतो, तसें यांत नसतें. गृहीतभेद अगर विषय-भेद असून नानात्वामुळेंच हा निराळा अलंकार होतो, असें हे लोक म्हणतात. कित्येकांचें मत हा अलंकार नेहमींच संकीर्ण असणार असें पडतें. यावर रुय्यक-विश्वनाथ म्हणतो, संकीर्णत्व असतांही उल्लेखाचेंच वैशिष्ट्य असल्यानें हा उल्लेख अलंकार होईल. जगन्नाथानें शुद्ध उल्लेखाचें उदाहरण दिलें आहे.

हरि[1] नरहरिरूपें क्रूर दैत्यां समस्तां,
परम सुलभ शांत श्रीकर स्वात्मभक्तां।
स्वचरणशरणानें सौम्य ही शीघ्र तो कीं,
जननिभय मनीं कां मानिजे व्याघ्रतोकीं ? ॥

या उदाहरणांत पहिल्या तीन ओळींत शुद्ध उल्लेख आहे.

गंभीर-भीमाकृति-दर्शनें जो पाषंडचित्ताप्रति कूट वाटे,
भासे चमत्कारनिधी तटस्थां, श्रद्धापरां देवनिधान मोठें ॥

येथें उल्लेखांशीं भ्रान्तिमान् संकीर्ण झाला आहे.

## ४ भ्रान्तिमान्.



१४. भ्रान्तिमान् अलंकार रुद्रटापर्यंत कोणी मानलेला दिसत नाहीं. तरीही दण्डीच्या उपमा भेदांतील मोहोपमा हा भेद भ्रान्तिमान् अलंकारासारखाच आहे:—

शशीत्युत्प्रेक्ष्य[3] तन्वङ्गि त्वन्मुखं त्वन्मुखाशया।
इन्दुमप्यनुधावामीत्येषा मोहोपमा स्मृता ॥

तुझें मुख चंद्रच आहे असें वाटून मी चंद्राकडे धांवत जातों, असें म्हणण्यांत मुखांतील साम्य चंद्रांत दिसल्यानें चंद्राचे ठिकाणीं मुखाची भ्रांति झालेली आहे; म्हणून ही मोहोपमा झाली. पण हाच इतरांच्या मतें भ्रांतिमान् अलंकार होय.

रुद्रटः—अर्थविशेषं[4] पश्यन्नवगच्छेदन्यमेव तत्सदृशम्
निस्संदेहं यस्मिन् प्रतिपत्त्या भ्रांतिमान्स इति ॥

एकादा अर्थविशेष पाहून त्या ठिकाणीं दुसरा तत्सदृश अर्थविशेष आहे असें निःशंकपणें वाटणें याला भ्रांतिमान् म्हणतात.

उ—[5]भृंगें वि-राजित नवीं अरविंद-पत्रें।
पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें।
घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं।
आहा वृथा उतरलों भिजलों विलोकीं ॥

---

१ वामन-नृहरिदर्पण. १  २ सा. द. वि. ३·२१.  ३ का. द. २·२५.
४ का. लं. ८·८६.  ५ र. पं. नलदमयंती.

येथें अरविंद-पत्राच्या ठिकाणीं तत्तुल्य नेत्रांचें निःशंकपणें ग्रहण केल्यानें हा भ्रांतिमान् अलंकार झाला.

मम्मटः-- भ्रांतिमानन्यसंवित्तत्तुल्यदर्शने[1] ।

रुय्यकः--सादृश्याद्वस्त्वन्तरप्रतीतिर्भ्रान्तिमान् ।

विद्याधरः-- वस्त्वन्तरप्रतीतिर्विलसति सादृश्यहेतुका यत्र ।
तं भ्रान्तिमन्तमेतं[3] ब्रुवतेऽलंकारपारदृश्वानः ॥

विश्वनाथः--साम्यादतस्मिंस्तद्बुद्धिर्भ्रान्तिमान्[4]प्रतिभोत्थितः ॥

अप्पय्यदीक्षितः-- स्यात्स्मृतिभ्रान्तिसंदेहैस्तदंकालंकृतित्रयम्[5] ॥

जगन्नाथः--सदृशे धर्मिणि तादात्म्येन धर्मान्तरप्रकारकोऽनाहार्यो निश्चयः
सादृश्यप्रयोज्यश्चमत्कारी प्रकृते भ्रान्तिः[6] ॥
सा च पशुपक्ष्यादिगता यस्मिन् वाक् संदर्भेऽनूद्यते स भ्रांतिमान् ॥

ही भ्रांति म्हणजे खरा मोह अगर वेड नव्हे.कविप्रतिभेनें ही भ्रांति निर्माण व्हावयाची असते.भ्रांतिमान् व संदेह यांत फरक आहे.संदेहांत अन्य वस्तूबद्दल संशय घ्यावयाचा असतो, पण अन्यवस्तुप्रतीति खरी असें वाटत नसतें. भ्रान्तिमान्अलंकारांत अन्य-वस्तुप्रतीति ही खरीच वाटत असते. संदेहांत आलेल्या संशयाचा कधीं निरास केलेला असतो व कधीं नसतो. भ्रांतिमानांत संशय नसून निश्चितपणेंच एका वस्तूचे ठिकाणीं दुसरीचें ग्रहण होत असतें. रूपकांत व भ्रांतिमानांत फरक असा कीं, रूपकांत आरोपाची मनाला जाणीव असते. भ्रांतिमानांत आरोप नसून भ्रमानेंच मनुष्य ती वस्तु निराळ्या तऱ्हेनें कल्पीत असतो.

पूर्वदिशेवर लाल रंग हा कोण कुठुनि उधळी ।
[7]किंवा फुटली तिच्याच हृदयीं प्रेमाची उकळी ॥

येथें पूर्वेच्या रक्तवर्णाबद्दल संशय घेतले आहेत पण त्यांत मनाला खरोखर चुकीची भावना होऊन प्रेमाची उकळी अगर रंग उधळलेला वाटला नाहीं.

हंसा विलोकुनि सुधाकर अष्टमीचा ।
त्यां मानिला निटिल-देश तिचाच साचा ।
शंखद्वयीं धरुनि कौंकुम कीरवाणी ॥
लावावया तिलक लांबविला स्वपाणी ॥

यांत अष्टमीच्या चंद्राकडे पाहून भ्रमानें दमयंतीचा तो भालप्रदेश आहे असें खरोखरच वाटल्यामुळें हा भ्रांतिमान् झाला.

---

१ का. प्र. १०·२००. २ अ. सू. १८. ३ ए. ८·९. ४ सा. द. १०·३६. ५ कु. ८·९·१०. ६ र. गं. २६६. ७ गोविंदाग्रज. ८ र. पं. नलदमयंती.

# ५ संदेह.

१५. भ्रांतिमान् अलंकारानंतर कविप्रतिभेनेंच रम्यता येणारा असा सन्देह अलंकार विचारांत घेऊं. संदेह म्हणजे संशय. ज्यांत खऱ्या गोष्टीबद्दल निरनिराळे संशय घेतलेले असतात त्याला संदेह म्हणतात.

भामहः— उपमानेन तत्त्वं च भेदं च वदतः पुनः ।
ससन्देहं वचः स्तुत्यै स सन्देहं विदुर्यथा ॥[1]

"उपमेयाचे ठिकाणीं उपमानाचें ऐक्य आणि भेद, उपमेयाच्या स्तुतीसाठीं सांगणारें संशययुक्त वचन, त्याला ससन्देह म्हणावें." उपमानाचें ऐक्य वर्णन केलें तर रूपक अथवा दुसरा अलंकार होईल म्हणून ऐक्य व भेद संशयानें सांगत जाणें असें म्हटलें आहे. भामहानें स्तुत्यै हें पद घातलें तें पुढील लोकांनीं घातलेलें नाहीं. कारण उपमेयाच्या स्तुतीसाठींच संशय घ्यावयाचा असतो असें म्हणतां येत नाहीं.

दण्डीनें हा अलंकार मानला नाहीं. पण त्याची संशयोपमा व निर्णयोपमा म्हणजे संदेह अलंकार होय असें त्यांचीं उदाहरणें पाहतां दिसतें:—

किं पद्ममन्तर्भ्रान्तालि किं ते लोलेक्षणं मुखम् ।
मम दोलायते चित्तमितीयं संशयोपमा ॥

न पद्मस्येन्दुनिग्राह्यस्येन्दुलज्जाकरी द्युतिः ।
अतस्त्वन्मुखमेवेदमित्यसौ निर्णयोपमा ॥[2]

पहिल्या उदाहरणांत संशय घेतला असून त्याचा निरास झालेला नाहीं. दुसऱ्यांत संशय घेतला असून त्यासंबंधीं निर्णय स्पष्ट आहे. पुढील अलंकारकर्त्यांनीं मानलेला संदेह अलंकाराचा निश्चयान्तसंदेह हा भेद बहुधा याच्या निर्णयोपमेवरूनच घेतला असावा.

उद्भटः— उपमानेन तत्त्वं च भेदं च वदतः पुनः ।
ससंदेहं[3] वचः स्तुत्यैः ससन्देहं विदुर्बुधाः ॥

ही व्याख्या 'बुधाः' या पदाशिवाय जशीची तशीच भामहापासून घेतलेली आहे.

अलंकारान्तरच्छायां यत्कृत्वा धीषु बन्धनम् ।
असंदेहेऽपि संदेहरूपं[4] संदेह नाम तत् ॥

खरा संदेह नसूनही इतर अलंकारांच्या सौंदर्यवृद्धीसाठीं केवळ दिखाऊ संदेह दाखवितात तेव्हां त्यास संदेह अलंकार म्हणतात. उद्भटानें निश्चयान्त संदेह मानला नाहीं.

---

१ भा. लं. ३·४७. २ का. द. २·२६-२७. ३-४ का. सा. सं. ६·६९।७०.

कल्पलतावर फुलें बहरतां सडा परागांचा ।
काय तरंगे स्वर्गंगा–जलिं तांबुस रंगाचा ॥[1]

येथें वास्तविक अरुणाबद्दल संशय नसतांही कविप्रतिभेनें संशय उत्पन्न केला आहे. या ठिकाणीं संभावना किंवा कल्पना केलेली असल्यानें उत्प्रेक्षेची छायाही येथें पडत आहे. म्हणून याला उद्भटाच्या मतें संदेह अलंकार म्हणावयाचें.

वामनः––उपमानोपमेयसंशयः सन्देहः[2]

वामनानें ससंदेह हें नांव न वापरतां संदेह म्हटलें आहे. 'उपमान कोणतें व उपमेय कोणतें याबद्दल संशय घेणें याला संदेह म्हणतात.' वामनानें संदेहाचा एकच प्रकार केला आहे.

१६. रुद्रटः—वस्तुनि यत्रैकस्मिन्ननेकविषयस्तु भवति संदेहः ।
प्रतिपत्तुः सादृश्यादनिश्चयः संशयः स इति ॥
उपमेये सदसंभव विपरीतं वा तथोपमानेऽपि ।
यत्र स निश्चयगर्भस्ततोऽपरो निश्चयान्तोऽन्यः ॥
यत्रानेकत्रार्थे संदेहस्त्वेककारकत्वगतः ।
स्यादेकत्वगतो वा सादृश्यात्संशयः सोऽन्यः ॥[3]

(१) एका वस्तूचे ठिकाणीं सादृश्यामुळें अनेक वस्तूंचा संशय घेतात तेव्हां अनिश्चय संशय असें म्हणतात.

(२) उपमेय तसेंच उपमान यांच्या ठिकाणीं सत् व असत् गोष्टींचा संशय घेणें यालाही संशय म्हणतात. हा निश्चयगर्भ व निश्चयान्त अशा दोन प्रकारचा आहे.

(३) जेव्हां एका कारकाच्या निरनिराळ्या धर्मांचें निरनिराळ्या ठिकाणीं सादृश्य बघून उपमान कारक कीं उपमेय कारक असा संशय घेतला जातो म्हणजे उपमान व उपमेय यांचें ऐक्य असतां उपमान कोणतें व उपमेय कोणतें हें कळत नाहीं तेव्हांही संशय अलंकार होतो. उ०:––

(१) पारिजात फुलले सुरकाननीं हीं फुलें विलसती गमलें मनीं ।
कीं हिरेजडित सुंदर सुंदरी । भूषणें विमल कांति निशा धरी ॥[4]

(२) आकाशभूमि गिरिकंदरीं पूर्ण साचे । ओघांवरि पडाति ओघच चंद्रिकांचे ॥
क्षीराब्धिच्या उठाति या लहरीच काय । कीं सर्व चन्दनरसांत बुडून जाय ॥[5]

(३) किंवा माझी चोरुनि नेली मोत्याची माला ।
म्हणुनि नभःश्री रुसली आली लाली गालांला ॥[6]

---

१ गोविंदाग्रज. २ का. सू. ४·३·११. ३ का. लं. ८·५८·५९।६४. ४ यशवंतराय ३·४ ५ य. रा. ६ का. क.

रुद्रटानें सन्देहाचें संशय अलंकार असें नांव ठेविलें. याच्या पहिल्या व दुसऱ्या भेदांत ते भिन्न भेद मानण्याइतका फरक नाहीं. सर्व भेदांचा इत्यर्थ एवढाच आहे कीं, उपमान व उपमेय यांच्या ठिकाणीं संशय घेणें. यानें भेद मानले तसे मानूं लागल्यास अनेक भेद पडूं लागतील. पण यानें निश्चयान्त व निश्चयगर्भ असे दोन संदेहभेद दिले आहेत ते पुढेंही मानलेले आहेत.

मम्मटः—[1]ससंदेहस्तु भेदोक्तौ तदनुक्तौ च संशयः ॥

मम्मटानें संशयाचे उक्त व अनुक्त असे प्रथमतः दोन भेद करून ज्यांत संशय उक्त आहे अशा संदेहाचे निश्चयान्त व निश्चयगर्भ असे दोन भेद केले आहेत.

रुय्यकः—[2]विषयस्य सन्दिह्यमानत्वे संदेहः ॥

रुय्यकानें मम्मटाप्रमाणेंच शुद्ध, निश्चयगर्भ व निश्चयान्त हे तीन भेद मानून त्याशिवाय ज्याचा आरोप करावयाचा तें भिन्नाश्रयी असणें असा एक भेद केला आहे.

रञ्जिता नु विविधास्तरुशैला नामितं नु गगनं स्थगितं नु ।
पूरिता नु विषमेषु धरित्री संहृता न ककुभस्तिमिरेण ॥

रुय्यकाच्या मतें येथें आरोप्यमाण भिन्नाश्रयी असल्यानें हें संदेहाचें उदाहरण आहे. वास्तविक अंधाराच्या कर्तृत्वाबद्दल माहिती असतांही रञ्जिता, नामितं, पूरिता इत्यादि कल्पना केल्या असल्यानें ही उत्प्रेक्षा म्हणणेंच योग्य होईल, तरीही कल्पनेपेक्षां संशयाचाच खेळ येथें अधिक वठून दिसतो म्हणजे 'नु' हें उत्प्रेक्षा-दर्शक असलें तरी तें संशयार्थींच तेथें शोभत आहे. म्हणून रुय्यकाचें मत ग्राह्य आहे. रुय्यकानें हा प्रकार रुद्रटापासून घेतला असावा. कारण रुद्रटाचा तिसरा भेद असाच आहे.

विद्याधरः—[3]किसलयति कविः प्रतिभावशतः प्रकृतार्थभित्तिकं यत्र ।
संशयमप्रकृतेऽर्थे [4]संदेहोऽयं समाख्यातः ॥

विद्याधरानें रुय्यकाचेच सर्व भेद घेऊन संदेह अलंकारानें संसृष्टि अगर संकर होतो असें सांगितलें आहे.

विश्वनाथः—संदे[5]हः प्रकृतेऽन्यस्य संशयः प्रतिभोत्थितः ।

अप्पय्यदीक्षितः—स्यात्स्मृतिभ्रान्तिसंदे[6]हैस्तदङ्कालंकृति त्रयम् ॥

जगन्नाथः—सादृश्यमूला भासमानविरोधका समबला नानाकोट्यवगाहिनी धी रमणीया [7]ससंदेहालंकृतिः ॥

---

१ का. प्र. १०·१३८. २ अ. सू. १७. ३ अ. सू. पान ४२. ४ ए. ८·८.
५ सा. द. १०·३५. ६ कु. ८·९·१०. ७ र. गं. २५६.

जगन्नाथानें ससंदेहाचीं वरील सर्व प्रकारची उदाहरणें देऊन त्याशिवाय लक्ष्य, वाच्य, ध्वनि इत्यादींनीं युक्त अशीं अलंकारांचीं उदाहरणेंही दिलीं आहेत. संदेह व भ्रान्तिमान् यांतील फरक पूर्वीं सांगितलाच आहे. संदेहांत प्रतिभा असल्याशिवाय चारुताप्रतीति होणार नाहीं. यांत उपमेयाचे ठिकाणीं अनेक उपमानांचा अगर एका उपमानाचा संशय घेणें ही मुख्य क्रिया आहे. उपमान व उपमेय यांत भेद आहे हें यांत निश्चित माहीत असतें. उद्भटानें या अलंकाराला संदेह व ससंदेह अशी दोन्हीं नांवें वापरलीं आहेत. वामन, रुय्यक, विद्याधर, विश्वनाथ, जगन्नाथ त्याला सन्देह म्हणतात व रुद्रट संशय म्हणतो.

स्मरण, भ्रान्तिमान् व संदेह या अलंकारांत उपमानोपमेयभावाचें महत्त्व आहेसें दिसतें. ज्याचें स्मरण व्हावयाचें व ज्यावरून स्मरण व्हावयाचें त्यांत उपमानोपमेयत्व असतें. तसेंच भ्रांति अगर संदेह यांतही ज्याची भ्रान्ति व ज्यामुळें भ्रान्ति असते त्या दोहोंतही उपमानोपमेयत्व असतें. ही सामान्य गोष्ट तिन्हींही अलंकारांत आहे.

## ६ परिणाम

१७. या अलंकाराची व्याख्या मम्मटापर्यंत झालेली नाहीं. रुय्यकानें याची व्याख्या केलेली दिसते. परिणाम म्हणजे एकाद्या गोष्टीचा दुसऱ्या गोष्टीशी संबंध आल्यानें दुसऱ्या गोष्टीवर झालेली विशिष्ट क्रिया अगर आलेली स्थिति, याला परिणाम म्हणतात. परिणाम हा अलंकारही यावरून आला असला पाहिजे. रूपकांत आरोपाशिवाय तादृश फल नसतें पण रूपकांतील आरोपामुळें विशिष्ट गोष्ट घडत असेल तेव्हां परिणाम म्हणतां येईल. या दृष्टीनें रुय्यकानें केलेली व्याख्या—

आरोप्यमाणस्य प्रकृतोपयोगित्वे परिणाम[1] :।

आरोप ज्याचा करावयाचा त्यायोगें जर प्रकृताला कांहीं फायदा झाला तर त्याला परिणाम म्हणावयाचें. या परिणामाचे सामानाधिकरण्य व वैयधिकरण्य यामुळें दोन भेद होतात. रुय्यक म्हणतो [illegible] येथेंहि व्यवहारसमारोपंच करावयाचा असतो.

विद्याधरः—तं परिणा[2]मं द्विविधं कथयन्त्यारोप्यमाणरूपतयः।
परिणमति यत्र विषयः प्रस्तुतकार्योपयोगाय ॥

विश्वनाथः— विषयात्मतयारोप्ये प्रकृतार्थोपयोगिनि।
परि[3]णामो भवेत्तुल्यातुल्याधिकरणो द्विधा।

---

१ अ. सू. १६. २ ए. ८०७. ३ सा. द. १०·३४–३५.

विद्याधरानें रुय्यकाचा मार्ग सर्वस्वीं स्वीकारला नाहीं. विश्वनाथानें रुय्यकाच्या दोन भेदांशिवाय 'अधिकारूढ वैशिष्ट्य' परिणाम हा एक तिसरा भेद मानला आहे.

अप्पय्यदीक्षितः—परिणामः क्रियार्थश्चेद् विषयी विषयात्मना ॥

अप्पय्यदीक्षितानें परिणामाचा एकच प्रकार मानला आहे.

जगन्नाथः— विषयी यत्र विषयात्मनयैव प्रकृते प्रकृतोपयोगी न स्वातंत्र्येण स परिणामः ॥

उः— दुष्टाचरणाच्या विवरीं । गांधार प्रवेशिनां, शरीरीं ।
अनर्थसर्पे दंशूनि, नगरी । दंडपाणीची दाखविली ॥

यांत शेवटच्या चरणांत पर्यायोक्त अलंकार आहे. व आरंभींच्या ओळींत वैयधिकरण्यानें परिणाम आहे. हेंच 'दुष्टाचरण–विवरीं' असें असतें तर दोन्ही शब्दांची एकच विभक्ति होऊन सामानाधिकरण्य होईल पण विभक्ति निराळी असून 'प्रवेशिनां' या पदानें उपमानाचा आरोप उपमेयाशीं पूर्ण ऐक्य करतो असें दिसतें म्हणून हा वैयधिकरण्यानें परिणाम झाला. आतां परिणाम व रूपक यांत फरक पाहण्यासाठीं रूपकाचें उदाहरण घेऊं.

भारतकथाक्षीरनिधी । श्रवणें निवारे सर्व व्याधी ।
नाश पावोनि ब्रह्मानंदीं । सावकाश विवरण ॥

यांत कथेवर क्षीरनिधीचा आरोप आहे पण त्यांचें ऐक्य नाहीं, कारण श्रवण कथेचेंच हें शक्य असल्यानें श्रवणें हा शब्द क्षीरनिधीशीं मैत्री न करतां प्रकृत कथेशींच करतो. यासाठीं प्रकृताला अनुपयोगी म्हणून हा परिणाम अलंकार नसून रूपकच होईल.

जनकां झाला संकेतबोधू । म्हणे 'चढला तारुण्यसिंधू' ।
भ्रतारकामनेचा इंदू । संकल्पव्योमीं उगवला ॥

यांत उपमानाचा आरोप हा प्रकृतोपयोगी आहे, म्हणून हा परिणाम अलंकार झाला.

१८. आतां वर दिलेल्या सर्व व्याख्या पाहतां आपणांस असें दिसेल कीं जगन्नाथाची व्याख्या ही सर्वांत जास्त स्पष्ट आहे. रुय्यकाच्या व्याख्येंतील 'प्रकृतोपयोगित्व' याचा अर्थ प्रकृतकार्याला उपयोगी कीं 'प्रकृताचे ठिकाणीं ऐक्यरूपानें' उपयोगी हें स्पष्ट होत नाहीं. जगन्नाथानें रुय्यकाचीं उदाहरणें याच दृष्टीनें चांगलीं नाहींत असें सांगितलें आहे. कारण वरील दोन्ही अर्थांना लागू पडतील अशीं त्याचीं उदाहरणें नाहींत. विद्याधराची व्याख्या तर अगदींच निराळी आहे. 'ज्या ठिकाणीं विषय हाच आरोप्यमाण झाल्यामुळें प्रकृतकार्याचे उपयोगी पडतो तेथें परिणाम अलंकार होतो.' असें विद्याधर

१ कु. (६) २२. २ र. गं. २४८. ३ मु. सौ. पर्व १·६२. ४ मु. सौ. प. १·१.
५ मु. व. पर्व. ६·५९.

म्हणतो. यांत आरोपित झाल्यानें उपयोगी पडणें हें अगदींच गौण वाटतें. उपयोगी पडण्यासाठींच आरोपित असण्यानें परिणाम अलंकार होईल. विश्वनाथानें रुय्यकाचेच बरेचसे शब्द घेतल्यानें त्याच्या व्याख्येंतून रुय्यकापेक्षां अधिक अर्थ निघत नाही. अप्पय्यदीक्षिताची व्याख्या बरीच स्पष्ट आहे. "उपमान उपमेयाशीं ऐक्य पावून क्रियोपयोगी होतें तेव्हां परिणाम होतो.' "उपमेयाशीं विलीन होणें व त्यायोगें उपयोगीं पडणें" हा जो परिणामांतील विशेष तो अप्पय्यदीक्षितानेंच प्रथम सांगितला; तदनंतर जगन्नाथाची व्याख्याही त्याच्यासारखी आहे. "उपमान जेव्हां उपमेयाशीं ऐक्यभावानें निबद्ध होऊन प्रकृताचे उपयोगी येतें तेव्हां परिणाम अलंकार होतो. उपमान स्वतंत्रपणें उपयोगी पडत नाहीं." जगन्नाथानें ही व्याख्या अगदीं स्पष्टपणें केली आहे. विद्याधराच्या मताप्रमाणें यांपैकीं कोणाचेंच मत दिसत नाहीं. एकंदरींत परिणामाची व्याख्या जगन्नाथाचे वेळीं पूर्णत्वाला गेली. रूपक व परिणाम यांत भेद दर्शविणारीं उदाहरणें वर दिलींच आहेत. त्यांत भेद काय असतो तें पाहूं:—

रूपकांत उपमानाचा उपमेयाशीं अभेद वर्णिलेला असतो. पण त्यायोगें उपमेयाला आणखी कोणतीही गोष्ट मिळावितां येत नाहीं. परिणामांत उपमेयाचा उपमानाशीं नुसता आरोप नसून ऐक्य असतें. व तें स्वतःच्या क्रियेनें प्रकृताला म्हणजे उपमेयाला उपयोगी पडतें. घरांत त्रयस्थ पाहुणा येणें व नातेवाईकच पाहुणा येणें यांत त्रयस्थ पाहुणा हा शोभेलाच असतो पण नातेवाईक पाहुणा कामधंद्यालाही उपयोगी पडतो. व तसाच रूपक परिणामांत फरक आहे. रूपक हा शोभेचा पाहुणा परिणाम हा शोभेला तर आहेच पण उपयोगीही आहे. परिणाम व एकदेशविवर्तिरूपक यांत काय फरक आहे तें रूपक प्रकरणांत पाहूं.

## ७ रूपक

१९. रूपक अलंकाराचीं उदाहरणें वेदांतही आढळतात. या अलंकाराची व्याख्या मात्र फार जुन्या काळीं केलेली नाहीं. वैयाकरणी लोकांच्या मतें 'रूपं पश्यति' या अर्थी 'रूपयति' असा प्रयोग होतो. रूपक शब्दाची रूपयतीति रूपकं, अशी व्युत्पत्ति दिल्यास रूपक याचा अर्थ, एका वस्तूस दुसऱ्याच्या स्वरूपांत पाहाणारें तें रूपक, असा होईल. या रूपकाचें वेदांतून एक उदाहरण घेऊं:—

इंद्रस्य[1] वज्रो मरुतामनीकं मित्रस्य गर्भो वरुणस्य नाभिः ।
सेमां नो हव्यदातिं जुषाणो देव रथ प्रतिहव्या गृभाय ॥

---

१ ऋ. २९·५५.

या ऋचेंत रथास, इंद्राचें वज्र, देवांचें मुख, सूर्याचा गर्भ व वरुणाची नाभि असें म्हटलेलें असल्यानें आपण रथास वज्र, मुख इत्यादि स्वरूपांत पाहातों. रथांत व या गोष्टींत भेद आहे असें आपणांस वाटत नाहीं: दुसऱ्याच्या रूपांत मूळ रूप आपण पाहातों. तसेंच निराळ्या स्वरूपांत पहात असतांही रथाला ' हा रथ ' असें समजण्यास आपण विसरत नाहीं. रूपकाचीं उदाहरणें उपनिषदांतही आहेत.

उदाहरणार्थः— उर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ॥[1]

असें म्हणण्यांत ईश्वराला अश्वत्थाच्या स्वरूपांत आपण पाहातों ह्मणून याला रूपक ह्मणतां येईल. एकंदरींत रूपकाची कल्पना रम्यत्वानें प्राचीन कालींही दृग्गोचर होते. तरी उपमेइतकें प्राचीनत्व त्याला नाहीं. रूपकांची व्याख्या इतर अलंकारांच्या मानानें प्राचीन आहे. भरतानें मानलेल्या अगर निर्देशिलेल्या चार अलंकारांत रूपक हा अलंकार आहे. त्याची व्याख्याः—

> स्वैविकल्पैर्विरचितं तुल्यावयवलक्षणम् ।
> किंचित्सादृशसंपन्नं यद्रूपं रूपकं तु तत् ॥[2]

सदृशता ही गुणांत व आकृतींत असते. उपमेंत गुण व आकृतीचे बाबतींत एका वस्तूचें दुसऱ्या वस्तूंशी सादृश्य असतें. उपमेंत व रूपकांत स्पष्टपणें जरी नाहीं, तरी पुष्कळच ठळक रेघ भरतानें ओढली आहे. व ही रेघ किंवा हा फरक ' तुल्यावयवलक्षणम' या पदानें दाखविला आहे. उपमेंत सादृश्य स्पष्ट असतें; रूपकांत सादृश्य सांगितल्यावांचून स्पष्ट होत नाहीं. म्हणून भरतानें आपल्या व्याख्येंत ' स्वविकल्पैर्विरचितं तुल्यावयवलक्षणम् ' असें म्हटलें आहे. म्हणजे सादृश्य स्पष्ट नसतां कवीनें स्वतःच्या कल्पनेनें दोन गोष्टींच्या अवयवांत साम्य दाखवावयाचें. स्वरूप म्हटलें की अवयव आलेच. 'तुल्यावयवलक्षणम् ' म्हणण्यानें स्वरूपांतील अवयवांचें तुल्यत्व दाखवावयाचें असा भाव निघतो. म्हणून भरताच्या व्याख्येंत किंचित् शैथिल्य असलें तरी त्याच्या व्याख्येवरून व उदाहरणावरून त्यानें रूपक सावयवच मानलें आहे असें दिसतें. त्याच्या उदाहरणासारखेंच उदाहरण घेऊं:—

> नरव्याघ्रें आपुले अंगें । त्रासूनि भूपाळें कस्तुरीमृगें ।
> कीर्ति—कस्तुरी भरली वेगें । या ब्रह्मांडकरंडीं ॥[3]

सावयव रूपक म्हणजे प्रस्तुत गोष्टीला ज्या अप्रस्तुत गोष्टीचें स्वरूप दिलें असेल,त्या अप्रस्तुत गोष्टीशीं संबंधी असणाऱ्या गोष्टींचें, प्रस्तुताशीं संबंधीं असणाऱ्या गोष्टींना स्वरूप देणें. वरील ओंवींत भूपाळांना कस्तुरी--मृग या स्वरूपांत पाहिल्यावर भूपाळाशीं संबद्ध असणाऱ्या कीर्तीला कस्तुरी—मृगांशीं संबद्ध असणाऱ्या कस्तुरीचें स्वरूप दिलें. कीर्तीचा व्याप ब्रह्मांडांत असल्यानें कीर्तीशीं संबंध

---

१ क. उ.    २ ना. शा. १६·५७.    ३ मु. हरिश्चंद्राख्यान. ५ अ.

असणाऱ्या ब्रह्मांडाला कस्तूरीशीं संबंध असणाऱ्या करंड्याचें स्वरूप दिलें. यावरून सावयव स्वरूप दाखवून भरतानें रूपक साधलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

२०. भरतानें 'तुल्यावयवलक्षणं रूपम्' असें म्हणून उपमा व रूपक यांत फरक केला पण तो जास्त स्पष्टपणें भामहानें मांडला. त्याची व्याख्या:—

उपमानेन यत्तत्त्वमुपमेयस्य रूप्यते ।[1]
गुणानां समतां दृष्ट्वा रूपकं नाम तद्विदुः ।।

'गुणानां समतां दृष्ट्वा' या पदाला येथें महत्त्व आहे. उपमेंत गुणाकृति-साम्य असतें. रूपकांत आकृति-साम्य नसल्यानें साम्याची कल्पना गुणामुळेंच उत्पन्न करणें हें मुख्य काम असतें, व यासाठींच 'भामहानें गुणांमधील साम्य पाहून उपमेयास उपमानांच्या रूपांत पाहणें याला रूपक म्हणावयाचें' अशी व्याख्या केली आहे. भामहानें रूपकाचें उदाहरण दिलें तें असें:—

सीकराम्भोमदसृजस्तुङ्गा जलददन्तिनः ।[2]
निर्यान्तो मदयन्तीमे शक्रकार्मुककारणम् ॥

या उदाहरणांतील 'सीकराम्भोमदसृजः' ही ओळ भामहानें श्लेषाचेंही उदाहरण म्हणून दिली आहे. मग भामहाच्या रूपक व श्लेष या अलंकारांत फरक काय असें वाटण्याचा संभव आहे म्हणून भामह म्हणतो,

लक्षणं रूपकेऽपीदं लक्ष्यते काममत्र तु ।[3]
इष्टः प्रयोगो युगपदुपमानोपमेययोः ॥

म्हणजे रूपकाचें व श्लेषाचें उदाहरण व व्याख्या एकच वाटण्याचा संभव असला तरी श्लेषांत उपमान व उपमेय यांपैकीं कोणतेंहि स्थान कोणालाही द्यावें पण रूपकांत उपमान तेंच उपमान व उपमेय तेंच उपमेय राहिलें पाहिजे. वरील उदाहरण श्लेषाचें म्हटलें तर जलद, दन्तिन् यांपैकीं कोणतेंही उपमान अगर उपमेय होऊं शकेल; पण रूपक म्हटलें म्हणजे जलद हें उपमेय व दन्तिन् हें उपमान यांत बदल करतां येणार नाहीं. भामहानें श्लेषांत व रूपकांत फरक दाखविला आहे खरा, पण त्याची श्लेषाचीच व्याख्या तितकीशी व्यवस्थित नसल्यानें हा फरक टिकाऊ राहिलेला नाहीं. त्यानें केलेली श्लेषाची व्याख्या अशीः—

उपमानेन यत्तत्वमुपमेयस्य साध्यते ।[4]
गुणक्रियाभ्यां नाम्ना च श्लिष्टं तदभिधीयते ॥

या व्याख्येंत 'उपमानाचें व उपमेयाचें गुण, क्रिया व नांव यामुळें एकच रूप असणें' हें श्लिष्टाचें लक्षण सांगितलें. रूपकांत 'साध्यते' बद्दल 'रूप्यते' असें

१ भा. लं. २·२१. २ भा. लं. २·२३. ३ भा. लं. ३·१५. ४ भा. लं. ३·१४.

पद घालून पुढें "गुणानां समतां दृष्ट्वा रूपकं नाम तद्विदुः" असें म्हटलें आहे. श्लेषांतील दुसऱ्या ओळींत दर्शनी एकरूपता असावी असें सांगितलें व रूपकांत एकरूपता नव्हे तर स्वरूपसाम्य असावें एवढा दोहोंत फरक ठेवला आहे. भामहाचा श्लेष ह्मणजे ती उपमेचीच लवचीक व्याख्या आहे. उपमान व उपमेय यांचीं हवी तशीं स्थानें पालटणारी उपमा किंवा त्या स्थानांत लवचीकपणा असतां होणारी उपमा ह्मणजे भामहाचा श्लेष. इतरांच्या श्लेषांत व भामहाच्या श्लेषांत फरक पडतो. कारण याचा श्लेष उपमा व रूपक या दोन्ही दुरडींवर हात ठेवून आहे. परंतु दुसरे शास्त्रज्ञ श्लेषाला उपमाभाव आवश्यक आहे असें समजत नाहींत. उपमाभावावांचूनही त्यांचा श्लेष होतो. एकाच शब्दाचे अनेक अर्थ होणें म्हणजे श्लेष असें ते समजतात. तर भामह, उपमान व उपमेय अर्थासाठीं दोन गोष्टी उक्त असून त्यांपैकीं कोणतीही वस्तू उपमान अगर उपमेय होऊं शकणें या गोष्टीस श्लेष म्हणतो. शब्दाचे अनेक अर्थ होणें या गोष्टीला त्याच्या श्लेषांत महत्वच नाहीं. अशा रीतीनें भामहाच्या रूपक व श्लेषातील फरक पाहिल्यानंतर भामहानें मानलेले रूपकभेद पाहूं (१) समस्तवस्तुविषय (२) एकदेशविवर्ति हे दोन भेद भामहानें केले. समस्तवस्तुविषय म्हणजे एका प्रस्तुत गोष्टीलाच नव्हे तर तिच्यासंबंधी अशा इतर गोष्टींनाही अनुक्रमें अप्रस्तुत गोष्ट व अप्रस्तुत गोष्टीशीं संबंध ठेवणाऱ्या इतर गोष्टींचीं स्वरूपें देणें. 'नरव्याघ्रे' या वर दिलेल्या मुक्तेश्वराच्या उदाहरणांत समस्तवस्तुविषय रूपक आहे. आतां एकदेशविवर्ति म्हणजे प्रस्तुत व तत्संबंधी गोष्टींपैकीं कांहींना, अप्रस्तुत गोष्ट व तत्संबंधीं कांहीं गोष्टींचीं स्वरूपें शब्दांत देऊन बाकी स्वरूपें अनुक्त ठेवणें. समस्तवस्तुविषयांत सर्वांचीं स्वरूपें शब्दांत दिलेलीं असतात. एकदेशवर्ति रूपकांत कांहीं स्वरूपें उक्त व कांहीं अनुक्त असतात.

विद्युज्जिव्हा लांबवोनी। जलधर–हनुवटी खालवोनी॥
इंद्रचाप–भुज उभारोनी। जांभई देतें अंतरिक्ष॥[1]

येथें विद्युत्, जलधर, आणि इंद्रचाप या प्रस्तुत गोष्टींना अनुक्रमें जिव्हा, हनुवटी व भुज यांचीं रूपें दिलीं व या रूपांमुळेंच साहजिकपणें अंतरिक्षावर पुरुषाचा आरोप आला. म्हणजे यांत कांहीं रूपें उक्त व कांहीं अनुक्त आहेत, म्हणून हें एकदेशविवर्ति रूपक झालें. या एकदेशविवर्ति रूपकाचा व समस्तवस्तुविषय रूपकाचा धागा भरताच्या 'तुल्यावयवलक्षणम्' या पदांत आहे. भरतानें दिलेलें रूपकाचें उदाहरण समस्तवस्तुविषय रूपकाचें होईल, व एकदां समस्तभावाची जाणीव झाल्यावर असमस्त भाव यावयाचाच. व याप्रमाणें भामहानें एकदेशविवर्ति हा भेद निर्माण केला. असो.

भामहाची ही व्याख्या अग्निपुराणांत आढळते. तिच्याच जोडीला दुसरीही रूपकाची व्याख्या अग्निपुराणांत आहे व ती दण्डीच्या व्याख्येसारखीच आहे.

---

१ मृच्छकटिक–गडबोले.

उपमैवं तिरोभूतभेदा रूपकमुच्यते ।

अशी दण्डी व्याख्या करतो. ' ज्यांत भेद लपविला आहे अशी उपमा म्हणजे रूपक ' असा व्याख्येचा अर्थ होईल. दण्डीनें ' गुणसाम्य ' वगैरे सारखे कांहींही शब्द घातले नाहींत. यानें रूपकाचे अठरा भेद केले आहेत.

( १ ) व्यस्त. ( २ ) समस्त. ( ३ ) सकल. ( ४ ) अवयव. ( ५ ) अवयवि. ( ६ ) युक्त. ( ७ ) अयुक्त. ( ८ ) विषम. ( ९ ) सविशेषण. ( १० ) विरुद्ध. ( ११ ) हेतु. ( १२ ) श्लिष्ट. ( १३ ) उपमा. ( १४ ) व्यतिरेक. ( १५ ) आक्षेप. ( १६ ) समाधान. ( १७ ) रूपक. ( १८ ) अपह्नव. याशिवाय एकाङ्ग, व्यङ्ग, त्र्यङ्ग इत्यादि अनेक भेद पडतील असें तो म्हणतो. दण्डीच्या या भेदांत अगदींच वैचित्र्य नाही.

' मुखेन्दुरपि ते चण्डि मां निर्दहति निर्दयम् ।
भाग्यदोषान्ममैवेति तत् समाधानरूपकम् ॥[१]

" मला तुझा मुखेंदु निर्दयपणें जाळीत आहे. हें माझेंच दुर्दैव." हें समाधानरूपक कां तर या उदाहरणांत शेवटीं समाधान करून घेतलें ह्मणून. अशा कारणानें जर समाधानरूपक मानावयाचें तर दुःख वाटलें ह्मणून दुःखरूपक, रडूं आलें ह्मणून रोदनरूपकही मानण्यास अवसर सांपडेल. पण त्यांत वैशिष्ट्य नाही. तेव्हां उगीच भेदाचा फुगा फुगविण्यांत अर्थ नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येक अलंकाराला रूपकाचा आधार असतां किंवा रूपकाला दुसरा अलंकार आधार असतां तो तो स्वतंत्र भेद न मानतां संकर, संसृष्टि अगर जो अलंकार होईल तो मानणें इष्ट नाहीं. तर येथेंही केवळ रूपक असेंच ह्मटलेलें बरें,नाहीं तर अनवस्था प्रसंग यावयाचा.रूपकाचा आधार भिन्न अलंकारांना असतां दण्डीनें तो तो अलंकार रूपकभेदच गणला आहे.पण अशा रीतीनें भेद मानूं लागल्यास पुष्कळच अलंकार रूपकाचा पांगुळगाडा घेऊन बसतील. आतां या दृष्टीनें दण्डीच कोणते भेद वजा होतात तें पाहूंः—रूपकविषमांत व विरुद्ध-रूपकांत अङ्गाङ्गिभाव आहे. हेतुरूपक ह्मणजे विश्वनाथाचा उल्लेख अलंकार होईल. कारण 'गाम्भीर्येण समुद्रोऽसि '[२] हें दण्डीचें हेतुरूपकाचें उदाहरण तेंच विश्वनाथाचें उल्लेखाचें आहे. श्लिष्टरूपक हें श्लिष्टपरंपरितरूपक होईल. उपमारूपक व व्यतिरेक-रूपक हीं दोन्हीहि मुख्यतः उपमा व व्यतिरेकच होतात असें उदाहरणावरून दिसेल.

उपमारूपक— अयमालोहितच्छायो मदेन मुखचंद्रमाः ।[३]
सन्नद्धोदयरागस्य चन्द्रस्य प्रतिगर्जति ॥

व्यतिरेकरूपक— चंद्रमाः पीयते देवैर्मया त्वन्मुखचंद्रमाः ।[४]
असमग्रोऽप्यसौ शश्वदयमापूर्णमण्डलः ॥

पहिल्या उदाहरणांत प्रतिगर्जति या पदानें व दुसऱ्या उदाहरणांतील दुसऱ्या ओळीनें हीं उदाहरणें अनुक्रमें उपमा व व्यतिरेकांचींच वाटतात. आक्षेपरूपक

---

१ का. द. २·६६. २ का. द. २·९२. ३ का. द. २·८९. ४ का. द. २·९०.

व समाधानरूपक यांना आक्षेप व समाधान ही पुरवणी व्यर्थ आहे. रूपक-रूपक हा प्रकार पुढें अप्पय्यदीक्षितानें मानला आहे.

नैतन्मुखमिदं पद्मं न नेत्रे भ्रमराविमे ।
एतानि केसराण्येव नैता दन्तार्चिषस्तव ॥

दण्डीनें हें उदाहरण अपह्नवरूपकाचें दिलें आहे पण यांत स्पष्टपणें निषेध करून आरोप केलेला असल्यानें ही अपह्नुतीच झाली आहे. व यावरून दण्डीला अपह्नुतीची स्पष्ट कल्पना नव्हती कीं काय असें वाटूं लागतें. याच्या या रूपक विस्तारांतलि व्यस्त, समस्त, सकल, अवयव, अवयवि व सविशेषण हे भेद मात्र नवीन दिशा दाखविणारे झाले कारण त्याच्या या भेदांतच पुढील भेदांचा पाया आहे. पण आपला ग्रंथ कोणालाही चोट शिरकाविण्यास जागा न मिळेल इतका सविस्तर असावा या कल्पनेनेंच बहुधा त्यानें इतका व्याप पसरला कीं त्या व्यापाला व्यवस्थितपणा राहिला नाहीं. पण उद्भटानें मात्र तसा व्यवस्थितपणा आणला.

श्रुत्यासंबंधविरहाद्यत्पदेन पदान्तरम् ।
गुणवृत्तिप्रधानेन युज्यते रूपकं तु तत् ॥

अशी उद्भटानें रूपकाची सुसंबद्ध व्याख्या केली. केवळ ऐकून ज्या दोन गोष्टीचा कांहीही संबंध लागणार नाहीं अशा प्रस्तुत व अप्रस्तुत गोष्टींपैकीं ज्यांतील गुण ठळकपणें दिसत आहे अशा अप्रस्तुत गोष्टीशीं प्रस्तुत गोष्टीचा संबंध आणून दोहोंना सदृशस्वरूप दिलें जातें तें रूपक होय. भरतापासून किंचित् अस्पष्ट राहात आलेल्या रूपकाच्या कल्पनेला उद्भटानें स्पष्ट स्वरूप दिलें. यानें रूपकाचे चार भेद केले. (१) समस्तवस्तुविषय (२) एकदेशविवर्ति (३) माला व (४) एकदेशवृत्ति. समस्तवस्तुविषय व एकदेशविवर्ति म्हणजे काय हें आपण पाहिलेंच आहे. यानें समस्तवस्तुविषयक मालारूपक मानलें आहे पण तें यानंतर कोणीं मानलें नाहीं. उद्भटाचा एकदेशवृत्ति हा भेद म्हणजेच पुढील अलंकारशास्त्रज्ञांचें श्लिष्टपरंपरितरूपक होय. एकदेशविवर्ति व एकदेशवृत्ति यांत भेद असा आहे कीं, एकदेशविवर्तींत लक्षणाप्राधान्य व एकदेशवृत्तींत श्लेषप्राधान्य असतें. याच्या 'एकदेशवृत्ति स्यात्पररूपेण रूपणात्' या वाक्यांतलि 'पररूपेण रूपणात् ' हे शब्द कोड्यांत टाकणारे आहेत असें रा. बनहट्टींचें मत आहे. पण वस्तुतः त्यांत कोडें वाटत नाहीं. उपमानाच्या रूपानेंच उपमेय रूपित होणें म्हणजे उपमान व उपमेय एकाच शब्दांनीं प्रतीत होणें; यासाठीं श्लेष आवश्यक आहे व म्हणून यांत श्लिष्टपरंपरित रूपक अगदीं उघड दिसतें. आतां उद्भटाच्या व्याख्येकडे पाहतां यानें नेहमींची वृत्ति सोडून या ठिकाणीं भामहाला न अनुसरतां अगदीं स्वतंत्र व्याख्या केलेली दिसते. पण ती तितकी योग्य झाली नाहीं. केवळ श्रुतीनें ज्यांचा संबंध लागणार नाहीं अशा उपमानाचा

---

१ का. द. २·९४. २ का. सा. स. १·११.

उपमेयाशीं गुणसंबंध जोडला जातो तेव्हां रूपक म्हणावयाचें असें उद्भट म्हणतो, पण हा गुणसंबंध कशानें लक्षांत येईल हें स्पष्ट होत नाहीं. कांहीं असलें तरी उद्भटाची व्याख्या प्रगतीपर आहे; व त्यांत पूर्वीच्या अलंकारकर्त्यांपेक्षां दोष कमी असून त्यानें मानलेले भेद पाहतां पुढील लोकांनीं त्याचाच ऐवज घेतलेला दिसतो. गुणांची समता हें शब्दवैशिष्ट्य एव्हांपासून सर्वांनीं उचललेलें आहे वामनाची व्याख्या पाहातां त्याच्या सूत्रमय व्याख्येंतही त्यानें हे शब्द वर्ज्य केले नाहींत;

'उपमानोपमेयस्य गुणसाम्यात्तत्त्वारोपो रूपकम्'[1]

वामनाची ही व्याख्या भामहाचें वळणावर आहे. वामनानें पाणिनीच्या सूत्राकडे पाहून व्याख्या केली आहे असें वाटतें. त्यानें टीकेंत मुखचंद्र ही उपमाच गणिली आहे कारण समासांमुळें चंद्रादींचें मुखाशीं रूपक होत नाहीं असें तो म्हणतो व त्यानें आपल्या रूपकाचें उदाहरण अगदी समास विरहित उपमानोपमेयांचें असें दिलें आहे. यानें ज्या पाणिनीच्या सूत्राचा आधार घेतला असावा तें सूत्र असें:—

'उपमितं व्याघ्रादिभिः साम्यान्याप्रयोगे'[2]

'साधारण धर्माचा उल्लेख नसेल तरच व्याघ्र इत्यादि उपामानाशीं उपमेयाचा समास होतो.' अर्थात् हा सामान्य धर्म उक्त नसेल तर पुरुषव्याघ्रः ही उपमा होईल. तेव्हां या लुप्तोपमेच्या भीतीनेंच त्यानें आपलें उदाहरण उपमान व उपमेय याचा समास न करतां दिलें आहे. त्याच्या [illegible] उदाहरण पुढील होईलः—

ऊर्ध्व मूळ वृक्षाचे[3] । अधःशाखा विस्तार त्याचे ।
सत्यवेद पर्ण त्याचे । जाणे तो अर्थवक्ता ।

यांत वेद, पर्ण इत्यादि उपमेय उपमानांचा समास झालेला नाहीं. वामनानें भामहाची व्याख्या पुढें ठेवली आहे पण त्याच्या व्याख्येंत हा विशेष आहे. वामनापर्यंत उपमान उपमेयाचा अभेद अशा तऱ्हेचा शब्द कोणी घातला नव्हता. रुद्रटानें त्याला सुरवात केलेली दिसते.

यत्र गुणानां साम्ये सत्युपमानोपमेययोरभिदा ।
अविवक्षितसामान्या कल्प्यत इति रूपकं[4] प्रथमम् ॥

सामान्य गुण कांहींही न सांगतां गुणांमध्यें साम्य असून उपमान व उपमेय यांच्यामध्यें अभेद दाखविणें हा रूपकाचा एक प्रकार होय. रुद्रटानें हा भेद वामनासारखा केला आहे; यांत समास नाहीं. यानंतर दुसऱ्या प्रकारांत समासानें होणारें रूपक सांगितलें आहे. हे दोन्ही प्रकार सामान्य होत. समासोपमेंत उपमान अप्रधान असतें. समासोक्तरूपकांत उपमेय अप्रधान म्हणजे गौण असतें. समासोक्त रूपकाची व्याख्याः—

---

१ का. सू. ४·३·६. २ सि. कौ. २·१·५५. ३ मु. भगवद्गीता १५·१.
४ का. लं. ८·३१.

उपसर्जनोपमेयं कृत्वा तु समासमेतयोरुभयोः ।
वक्तुं प्रयुज्यते तद्रूपकमन्यत्समासोक्तम् ॥

याशिवाय रूपकाचे पुनः सावयव, निरवयव व संकीर्ण असे विषय-भेद म्हणून सांगितले आहेत; व त्यांचे समानवस्तु० व एकदेश० असे दोन भेद पाडिले आहेत. समासोक्त रूपकांत उपमेय अप्रधान करून उपमेय व उपमान यांचा समास करतात. उ:- 'दुर्जन एव पन्नगः' म्हणण्यांत उपमेयाचें गौणत्व असतें पण 'दुर्जनः पन्नग इव' म्हणण्यांत दुर्जन हें उपमेय प्रधान राहातें. रुद्रटानें जे विशेष भेद केले ते पुढीलप्रमाणें:- सावयवरूपक हें तीन प्रकारचें आहे. सावयव म्हणजे प्रस्तुत गोष्ट व तिच्यासंबंधीं गोष्टी यांवर रूपकें चढविणें. (१) प्रस्तुत गोष्ट व तिच्याशीं नैसर्गिक संबंधी गोष्टी असतील तर (२) प्रस्तुत गोष्ट व तिच्याशीं कृत्रिम संबंध लावलेल्या गोष्टी असतील तर (३) कृत्रिम व अकृत्रिम दोन्ही संबंध असणाऱ्या गोष्टी असतील तर; अशा तीन प्रकारें सावयव रूपक होतें. निरवयवरूपक चार तऱ्हेनें होतें. (१) शुद्ध (२) माला (३) रशना (४) परम्परित. संकीर्ण रूपकाचे हे तीन भेद आहेत:- (१) उपमेयाचे अवयव अकृत्रिम असून त्यांवर अवयव अवयविभाव नसणारीं उपमानें आरोपित करणें (२) उपमेय व त्याशीं कृत्रिम संबंध असणाऱ्या गोष्टींवर निःसंबंधीं रूपकें देणें.

(३) कांहीं कृत्रिम व कांहीं अकृत्रिम संबंध असणाऱ्या उपमेयावर वरील प्रमाणेंच निस्संबंधी उपमानें आरोपित करणें. आतांपर्यंत पाहिलेले हे सर्व भेद समस्तविषयरूपकाचे झाले. यानंतर रुद्रटानें एकदेशिरूपकाचें फक्त उदाहरण दिलें आहे. त्यांत उपमेय म्हणून असणारी जी प्रस्तुत गोष्ट तिच्यावर आरोप न करतां केवळ तिच्याशीं संबद्ध असलेल्या गोष्टींवर, अप्रस्तुत गोष्टीशीं संबद्ध असलेल्या गोष्टीचा आरोप करतात. रुद्रटाचे बरेचसे भेद दण्डीच्या भेदाप्रमाणें आहेत असें दिसतें.

| रुद्रट | | दण्डी |
|---|---|---|
| सावयव समस्तरूपकाचा कृत्रिम-अवयव भेद | = | समस्तव्यस्तरूपक |
| ,, ,, अकृत्रिम-अवयव भेद | = | असमस्त-रूपक. |
| समासोक्तरूपक | = | सकलरूपक |
| सावयव संकीर्णरूपकाचा पहिला भेद | = | अवयवरूपक |
| निरवयव शुद्धरूपक | = | अवयवि, एकाङ्ग, द्यङ्ग इ. |
| एकदेशिरूपक | = | विषमरूपक |
| निरवयव शुद्धरूपक | = | सविशेषणरूपक |
| परम्परितरूपक | = | श्लिष्टरूपक |

---

१ का. लं. ८·३९.

दिङ्मात्र दर्शनासाठीं थोडीं उदाहरणें घेऊं:—

> जयांच्या ज्ञानोदकाचा वारा । झगटे मनोरूप तरुवरा ।
> अविद्या कुसुमीं जीवभ्रमरा । नित्य मुकता स्वभावें ॥[1]

यांत उपमान व उपमेय या दोहोंचेही अवयव आहार्य–कृत्रिम–आहेत; मात्र उपमानांपैकीं तरुवराचा कुसुम हा सहजावयव आहे. भ्रमर हा उपमानाचा कृत्रिम अवयव, तद्वतच वारा हाही कृत्रिम होय. ज्ञान, मन, अविद्या व जीव हेही आहार्य अवयवअवयवि होत.

> अहंकारद्रुम दुर्योधन, । शकुनी शाखा, । खांदी कर्ण, ।
> पुष्पफळें दुःशासन । मूळ राजा धृतराष्ट्र ॥[2]

यांत उपमानाचे सहजावयव असून उपमेय निरवयव आहे. मालारूपकाचें उदाहरण:—

> रघूराजिया माझिया प्राणलिंगा ।
> मनोपद्मिनी कोमला नीळभृंगा ।
> तुवां सांडिल्यानंतरें राजहंसें ।
> दिसे ओस कांतार हें देह तैसें ॥[3]

यांत एका रघुराजावर प्राणलिंग, नीळभृंग, राजहंस असे आरोप केल्यामुळें हें मालारूपक झालें. दण्डी–रुद्रटाचे हे भेद पाहतां मम्मटानेंही दण्डी–रुद्रटाचें बरेंचसें अनुकरण केलें असें वाटतें. मम्मटाची रूपकाची व्याख्या:—

> तद्रूपकमभेदो य उपमानोपमेययोः ॥[4]

" उपमान व उपमेय यांत अभेद दिसला तर रूपक होतें. " यानें या रूपकाचे केलेले भेद असे:—




साङ्ग म्हणजे सावयव व निरङ्ग म्हणजे निरवयव रुद्रटानेंही हेच भेद दिले आहेत. मालारूपक म्हणजे रुद्रटाचे मालासमस्तवस्तु रूपक आहे व शुद्ध म्हणजे इतर कोणत्याही शब्दाशीं संबंध नसणारें रूपक होय याचें परंपरित रूपक म्हणजे एकाला एक

---

१ मु. आ. पर्व १·१४.  २ मु. आ. पर्व १·१२४.  ३ मु. अयोध्याकांड.
४ का. प्र. १०·१३९.

रूप दिल्यानें दुसऱ्याला दुसरें चढवावेंच लागणें व तें जुळेल असेंच द्यावें लागणें. साङ्ग रूपकांत प्रत्यक्ष अंगांना रूपक द्यावें लागतें. परंपरितांत मुख्यावर केलेला आरोप परंपरेनें इतरांवर न्यावा लागतो. हेंच उद्भटाचें एकदेशवृत्ति रूपक होईल. मम्मटाला रशनारूपकांत वैचित्र्य वाटलें नाहीं.

अंजनीतनयकायांबरीं । वीर नक्षत्रांचिया हारी ।[1]
अवयवसंधि पर्वनागारीं । बैसते झाले समस्त ॥

हें परंपरित रूपकाचें उदाहरण आहे. कारण अंजनीतनयाच्या कायेला अंबर म्हटल्यावर वीरांना नक्षत्राचें रूपक द्यावेंच लागलें.

विद्युज्जिव्हा लांबवोनी । जलधर हनुवटी खालवोनी ।[2]
इंद्रचाप-भुज उभारोनी । जांभई देतें अंतरिक्ष ॥

हें एकदेशविवर्ति रूपक झालें. कारण अंतरिक्षावर पुरुषाचा आरोप गुप्त ठेवून तत्संबंधी गोष्टींवर परस्पर आरोप आहेत.

सूर्य-किरण मृग-समुदाय । निस्तेज होउनी पावले भय ।[3]
लपावया शोधित ठाय । अभ्रें आड करोनी ॥

पहिल्या ओळींतील स्वतंत्र रूपकामुळें हें निरङ्ग शुद्ध रूपक होत आहे.

शवमांस मत्तजंबुक तूं गजमुक्ताशसिंह तो विष्णु ।[4]
तूं शशक, पार्थ गजपति, कीं दानव तूं सिताश्व तो विष्णु ॥

यांत एकेका उपमेयाला अनेक उपमानांनीं रूपकें दिलीं आहेत. म्हणून हें मालारूपक झालें.

दुष्यंत जधीं राजा झाले रिपुनृप तधींच नक्षत्रें ।[5]
भरत तरि रवीच, परी तें यश केलें कधींच न क्षत्रें ॥

येथें राजा या शब्दावर श्लेष असल्यानें पुढील रूपकें परंपरेनें द्यावीं लागलीं म्हणून हें श्लिष्ट परंपरित रूपक झालें. अशा रीतीनें हे मम्मटानें भेद केले आहेत. उद्भटाच्या व्याख्येंत सुसंगति नव्हती ती मम्मटानें आणली. रुय्यकानें अलंकाराचे भेद, अभेद, भेदाभेद, वगैरे भेद पाडल्यानें त्याला प्रत्येक वेळीं अलंकाराची व्याख्या सांगून भेदाभेद भेद, अथवा अभेद यांचा तट घालावा लागतो. रुय्यकाच्या व्याख्येपेक्षां मम्मटाची व्याख्या सुटसुटीत आहे. रुय्यकाची व्याख्याः--

'अभेदप्राधान्ये आरोप आरोपविषयानपह्नवे रूपकम्'[6]

उपमेंत उपमान व उपमेयांत भेद असतो व त्याचवेळीं चेतोहर सादृश्य असतें. उपमानोपमेयांत अभेद असून अभेदानें आरोप करून उपमेयाला न लपवितां त्याशीं

---

१ मु. श. रा. २ गडबोले वृ. क. ३ मु. व. पर्व १० अ. ४ मो. कर्णपर्व २७.६. ५ मो. आदिपर्व १२.९०. ६ अ. स. १५.

उपमानाचें ऐक्य करणें याला रूपक म्हणावें असें रुय्यक म्हणतो. त्यानें पहिलीं पदें अपह्नुति व उपमा यांच्या निरासासाठीं घातलीं आहेत. मम्मटानें केलेले आठ भेद व शिवाय वैधर्म्य रूपक व एकदेशविवर्ति परंपरित रूपक मानून आणखीही असे भेद होतील असें रुय्यकानें म्हटलें आहे. यानें परिणाम अलंकार मानल्यानंतर याच्या उदाहरणांतील निरवयव केवल रूपकाचें उदाहरण वस्तुतः रूपकांत येणें शक्य नाहीं. तें उदाहरण असें:—

> [1]दासे कृतागसि भवत्युचितः प्रभूणाम् ।
> पादप्रहार इति सुंदरि नास्मि दूये ,।
> उद्यत्कठोरपुलकाङ्कुरकंटकाग्रै– ।
> र्यद् भिद्यते तव पदं ननु सा व्यथा मे ॥

येथें पुलकावर कंटकाचा आरोप केला असतां परिणाम अलंकार होणार नाहीं पण 'भिद्यते' या पदानें उपमान व उपमेय यांचें केवळ आरोपित ऐक्य नसून उपमान हें स्वतःच्या क्रियेनें उपमेयाला उपयोगी पडतें म्हणून हा परिणाम अलंकार होतो. त्याचप्रमाणें श्लिष्टपरंपरिताचें उदाहरण किंचित् उत्प्रेक्षेसारखें वाटत असल्यानें त्यांत रूपकाचें अभेदत्व राहात नाहीं:—

> [2]आभाति ते क्षितिभृतः क्षणदानिभेयम् ।
> निस्त्रिंशमांसल–तमालवनान्तलेखा ।
> इन्दुत्विषो युधि हठेन तवारिकीर्ती– ।
> रादाय यत्र रमते तरुणः प्रतापः ॥

यांत रूपक आहे पण उत्प्रेक्षेमुळें तें संकीर्ण होत आहे. त्याचप्रमाणें,

> ' किं पद्मस्य[3] रुचिं न हन्ति नयनानन्दं विधत्ते न किन् ।
> वृद्धिं वा झषकेतनस्य कुरुते नालोकमात्रेण किम् ॥
> वक्त्रेन्दौ तव सत्ययं यदपरः शीतांशुरभ्युद्गतो ।
> दर्पस्यादमृतेन चेदिह तदप्यस्त्येव बिंबाधरे ॥

या उदाहरणांतही रूपकापेक्षां व्यतिरेकाचेंच सौंदर्य अधिक आहे. रूपकापासून परिणाम अलंकार निराळा करण्यांत विशेष अर्थ नाहीं असें त्या दोहोंतील फरक पाहूं गेल्यास दिसून येईल. प्रकृतोपयोगित्व हें जर रूपकामुळेंच साधत आहे तर परिणाम हा निराळा अलंकार न समजतां रूपकांतच तो सामावला असतां रूपकाची शोभा अधिक वाढेल आणि बारीक दृष्टीनें पाहिल्यास दीपक–तुल्ययोगितेंत जसा फक्त व्याख्येंतच फरक राहातो, उदाहरणांत राहूं शकत नाहीं तसेंच रूपक परिणामांतही उदाहरणें देतांना व्याख्येंतील निर्बंध राहात नाहीं या दृष्टीनें हे दोन अलंकार एकच करणें इष्ट आहे. अलंकारांचा पसारा फारच वाढून यमकाच्या

---

१ अ. सू. ३३ पान. २ अ. सू. पान ३४. ३ अ. सू. पान ३४.

अतिरिक्ततेनें त्यांतील चारुता जाऊन त्याची जशी पुढें अगदींच उपेक्षा केली गेली तशीच स्थिति यावयाची म्हणून गुंजभर फरकानें दोन अलंकार निराळे करण्यांत अर्थ नाहीं. उलट दृग्गोचर होणाऱ्या सामान्य तत्त्वानें जेवढे अलंकार एका व्यापक नांवानें एकत्र आणतां येतील तितके आणले पाहिजेत. रुय्यकाचें अनुकरण पुढील ग्रंथकर्त्यांनीं केलेलें आहे.

२१. विद्याधर— तद्रूपकमारोपे यत्रापह्नूयते न तद्विषयः।

विश्वनाथ— रूपकं रूपितारोपाद्विषये निरपह्नवे ॥

या दोघांनींही रुय्यकाचे भेद मानले असून विश्वनाथानें अधिकारूढवैशिष्ट्य-रूपक या नांवाचा आणखी एक भेद मानला आहे. याच्या मतें 'दासे कृतागसि' हें उदाहरण रूपकाचेंच आहे कारण तो म्हणतो 'पुलकांकुरकण्टकाग्रैर्भिद्यते' असें म्हणून प्रस्तुताबद्दल कांहींही सांगितलें जात नाहीं अर्थात् तें प्रस्तुत कार्यो-पयोगी नाहीं म्हणून हा परिणाम अलंकार नव्हे. पण वस्तुतः तें प्रस्तुतच आहे. रूपक ज्यावर चढवावयाचें तें प्रस्तुतच असतें व या दृष्टीनें इतर कोणतेंही प्रस्तुत असलें तरी रूपकाच्या दृष्टीनें 'पुलकांकुर'च प्रस्तुत ठरतो. व त्याशीं उपमानानें पूर्ण ऐक्य केल्यानें तो परिणाम अलंकारच व्हावयास पाहिजे. नाहीं तर इतक्या सूक्ष्म फरकानें अलंकारांत बखेडा माजण्यापेक्षां रूपक परिणाम एक करणें हा उत्तम मार्ग आहे. असो. विश्वनाथाचें अधिकारूढवैशिष्ट्यरूपक रूपकभाव सोडून व्यतिरेकाकडेच धांव घेतांना दिसतें. कारण,

इदं वक्त्रं साक्षाद्विरहितकलंकः शशधरः।

असें म्हणणें ह्मणजे शशधर या उपमानाला थोडा कमीपणा आणणेंच होय. विश्वनाथानें समासाभावी वैधर्म्यानें त्याचप्रमाणें वैय्यधिकरण्यानें रूपकाचीं उदाहरणें दिलीं आहेत. समासाभावी रूपक हें वामनाच्या रूपकासारखेंच होईल.

वैय्यधिकरण्यान रूपकः—आर्तजनांचा पारिजात। ऐकोनि आलों अभाग्यवंत।
भाग्यतेचें अतिथ्य। तुवां केलें पाहिजे ॥

यांत भाग्यतारूप अतिथ्य असें रूपक असून भाग्यता व अतिथ्य यांची विभक्ति एक नाहीं म्हणून हें वैय्यधिकरण्यानें रूपक झालें.

हें भोजनेंविण अंचवणें। कीं कर्दळी न पळतां खांडणें।
शुष्क नदींचें पोहणें। वाळुवंटीं पैं जसें ॥

हें वैधर्म्य रूपकाचें उदाहरण आहे. यांत परमात्म्यांच्या ध्यानाचें वेड असणें यालाच भोजनावांचून अंचवणें, शुष्क नदींत पोहणें इत्यादि रूपें दिलीं आहेत.

---

१ ए. ८०३. २ सा. द. १०२८. ३ सा. द. पान २१. ४-५ मु. श. म. रा. १०७३-७९.

व भोजन झालें नसतांही आंचविणें अशासारख्या वैधर्म्यानें गोष्टी रूपित केल्यामुळें हें वैधर्म्यानें रूपक झालें. वस्तुतः हें वैधर्म्य म्हणजे 'द्वौ नञौ प्रकृतार्थं गमयतः' अशा तऱ्हेचें नकाराला रजा देऊन होकार प्रस्थापित करणारें आहे. पण सरळ घांस न घेतां डोक्यामागून हात पुढें आणण्याइतका द्राविडी प्राणायाम केल्यानें या रूपकाला वैधर्म्यरूपक हें निराळें नामाभिधान मिळालें आहे. या रूपकाच्या कसरती आहेत. या कसरतीचा शेवटीं असा परिणाम झाला आहे कीं अप्पय्यदीक्षितानें रूपकाचें रूपकत्वही नाहींसें केलें आहे.

२१. अप्पय्यदीक्षितः— विषय्यभेदताद्रूप्यरंजनं विषयस्य यत् ।
रूपकं[1] तत् त्रिधाऽधिक्यन्यूनत्वानुभयोक्तिभिः ॥

यानें अभेदरूपक व ताद्रूप्यरूपक असे दोन मुख्य भेद करून त्यांचे प्रत्येकीं उपमानाचें आधिक्य वर्णन, न्यूनत्व वर्णन, आधिक्य व न्यूनत्व वर्णनाचा अभाव यावरून तीन भेद केले आहेत. पण याचे हे भेद अगदींच चमत्कारिक वाटतात. जेथें अभेदाचें वर्णन हेंच प्रधान आहे तेथें न्यूनत्व अगर अधिकत्व आणणें कितपत योग्य आहे ? त्यामुळें रूपकांत रूपकत्व राहात नाहीं असें अप्पय्यदीक्षिताचीं उदाहरणें पाहतां दिसून येईल:—

अयमास्ते[2] विना शंभुस्तार्तीयीकं विलोचनम् ॥

हें न्यूनत्वाचें उदाहरण आहे, पण तिसरा डोळा कुरूपता आणील या दृष्टीनें उपमानाला कमीपणा येत असल्यानें हा व्यतिरेक होईल.

अस्यां[3] मुखेन्दुना लब्धे नेत्रानंदे किमिन्दुना ।

असें म्हणण्यांत चंद्राचें व्यर्थत्व सांगितलें गेल्यानें प्रतीप सिद्ध होतो.

साध्वीयमपरा[4] लक्ष्मीरसुधासागरोदिता ।

ही सुधासागरांतून निर्माण न झालेली लक्ष्मीच आहे असें म्हणण्यांत लक्ष्मीला कमीपणा येत असल्यानें हा व्यतिरेक होतो.

अयं कलंकिनश्चन्द्रात्[5] मुखचंद्रोऽतिरिच्यते ॥

यांत चंद्राला कलंकी म्हणून उपमानाला बाध आणणें हीच मुख्य क्रिया घडते. एकूण या उदाहरणांत रूपक उपकारी आहे पण मुख्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. अप्पय्यदीक्षितानें स्वतःच म्हटलें आहे कीं त्याचें न्यून ताद्रूप्यरूपक म्हणजे वामनाची विशषोक्ति होय. अप्पय्यदीक्षिताचीं दुसरीं उदाहरणेंही अगदीं बेचव आहेत. असो. या सर्वांच्या मुळाशीं त्याच्या व्याख्येंतील दोष होय. विषयी व विषय किंवा उपमान व उपमेय यांत अभेदता असणें म्हणजेच रूपक होय. केवळ ताद्रूप्य असून रूपक होणार नाहीं.

---

१ कु. ( ) १८. २ कु. १९ श्लो. ३ कु. २० श्लो. ४ कु. २१ श्लो. ५ कु. १ श्लो.

**१३.** जगन्नाथाची—उपमेयतावच्छेदकपुरस्कारेणोपमेये शब्दान्निश्चीयमानमुपमानतादात्म्यं रूपकम् ॥ तदेवोपस्कारकत्वाविशिष्टमलंकारः ॥

उपमेयभाव ज्यांत वेगळा केला आहे अशा उपमेयाच्या ठिकाणीं शब्दांनीं उपमानाचें तादात्म्य निश्चित करणें यास रूपक म्हणतात. हेंच रूपक उपकारी झालें असतां ज्यास उपकारी होईल तो तो अलंकार त्या ठिकाणीं समजावा.

जगन्नाथानें आपली व्याख्या निर्दोष करून सर्वांच्या व्याख्यांवर टीका केली आहे. त्याची व्याख्या न्यायशास्त्रानें अलंकृत झाल्यासारखी दिसते जगन्नाथानें त्याच्या पूर्वीं मानले गेलेले भेद दिले असून साधारण धर्माचे अनुगामी, बिम्बप्रतिबिंबभावापन्न, उपचारित इत्यादि प्रकार सांगितले आहेत. रूपकांत भेद पूर्णपणें पडून झाल्यावर धर्माकडे दृष्टि वळली आहे एवढाच त्याचा अर्थ. पूर्ण वाढलेल्या अलंकारांची बुद्धिमान लोकांच्या हातीं अधिक चिकित्सा झालेली आहे. उपमेचाही शेवटीं असाच प्रकार झालेला आढळेल. उत्प्रेक्षादि प्रकरणांतहि आपण हेंच पाहिलें. आतां रूपकाचीं उदाहरणें घेऊन हें विवेचन संपवूं.

त्या[2] चातकां कृपा–घन, चकोरकां यादवेंदु हरि दोघां—
भेटाया जाय दयासागर त्या प्रेम–भक्ति–सरिदोघां ॥
त्यजिते[3] कृष्ण–सुरद्रुम मुनि–शुक वरिते प्रपंच–किंशुक ते ।
त्यजिते जरि न विषय–फळ, मुकतेच सुखासि, समय हा चुकते ॥

रूपकापह्नुतीचें उदाहरणः—

शक्रवाक्येंदुरश्मिस्पर्शें । रंभावदन कुमुद विकासे ।
हात जोडणीयाचेनी मिसें । संकोचली करपद्में ॥

---

१ र. गं. २२४. २–३ मो. कृष्णविजय ८७ ४ मु. शुकरंभासंवाद.

# प्रकरण १४ वें

—:0:—

## भेदाभेद-प्रधान अलंकार

### १ उपमा.

१. उपमेची पूर्वपीठिकाः—उपमा हा अलंकार केव्हांपासून गणला जाऊं लागला याचें विवेचन रा. व्ही. एस. सोवनी यांनीं History and significance of Upama या निबंधांत केलें आहे. उपमा हा अलंकार सर्वांत जुना अलंकार आहे. वेदांत उपमेचीं उदाहरणें आढळतात येवढेंच नव्हे, तर उपमा हा शब्दही वापरलेला दिसतो. ऋग्वेदांत उपमा शब्द वापरला आहे असें रा. सोवनी यांनीं म्हटलेंच आहे. त्याशिवायही कांहीं ठिकाणीं उपमा शब्द आढळतो. तो येणेंप्रमाणें:--

गणानां त्वा गणपतिं हवामहे । कविं कवीनामुपमश्रवस्तमं ॥

यांतील उपमश्रवस्तमं यावर टिका करतांना सायणाचार्यानें म्हटलें आहे कीं, 'उपमीयतेऽनयेत्युपमा । सर्वेषामन्नानामुपमानं श्रवोऽन्नं यस्य स तथोक्तः । अतिशयेनोपमश्रवा उपमश्रवस्तमः । माङ्‌ माने । अतश्चोपसर्गे करणे ङः ।
तेव्हां या ठिकाणीं 'उपम' हें उपमान या अर्थी वापरलेलें आहे. उपमा या अर्थीच पण प्रतिमा हा शब्द यजुर्वेदांत सांपडतो.

न तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद्यशः

या ऋचेंतील 'प्रतिमा' या शब्दाचा उवटाचार्यानें आपल्या भाष्यांत 'प्रतिमानभूतं' असा अर्थ केला आहे व महीधरानें 'उपमाभूतं' असा अर्थ दिला आहे. यापुढें दोन मंत्रांत दोन उपमा आहेत व त्यांबद्दल उवटाचार्यानें 'द्वे उपमे' असे शब्द वापरले आहेत. येथपर्यंत उपमा या शब्दाबद्दल लिहिलें. पण रा. सोहोनी म्हणतात, त्याप्रमाणें वेदकालचे शेवटीं उपमा ही अलंकार म्हणून ओळखली जात असली पाहिजे या उपमेचा विचार मैत्र्युपनिषदांत केला आहे. त्यांत सहा उपमांबद्दल विवेचन केलें आहे. काश्यप, यास्क, गार्ग्य यांनीं उपमेसंबंधीं विचार केला असून काश्यपानें उपमेचे बारा व यास्कानें सहा भेद केले.

उपमा हा शब्द वैय्याकरणापासून अलंकारकर्त्यांनीं घेतला आहे. पाणिनीनें समास-विवरण व प्रत्ययविवरण करतांना निरानिराळ्या ठिकाणीं उपमान हा शब्द

---

१ य. २३·१९. २ य. ३२·३.

वापरला आहे. त्यावरून आपल्याला असेंही म्हणण्यास हरकत नाहीं का उपमा हा शब्द व्याकरणांतून ज्या ज्या ठिकाणांहून घेतला त्या त्या ठिकाणावरून उपमेनें आपलें राज्य वाढविलें. कारण उपमेचे भेद हे बहुतेक समास, प्रत्यय इत्यादिकांवरून पुढें पडले आहेत. व्याकरणानें उपमेचें प्रधानपद कसें स्वीकारलें हें बघण्यासाठीं आपण पाणिनीचीं उपमानावरून दिलेलीं सूत्रें पाहूं.

( १ ) उपमानानि[1] सामान्यवचनैः ॥

( २ ) उपमितं[2] व्याघ्रादिभिः सामान्याप्रयोगे ॥

( ३ ) उपमानादाचारे[3] ॥

( ४ ) उपमानाच्च[4] ॥

( ५ ) उपमानं[5] शब्दार्थप्रकृतावेव ॥

( ६ ) उपमानादप्राणिषु[6] ॥

( ७ ) उपमाने[7] कर्मणि च ॥

यावरून व्याकरणानें सप्तसूत्रांनीं उपमेला बरीच मदत केली. उपमेंत तत्पुरुष, बहुव्रीहि, कृदन्त, तिङन्त यांवरून पडणाऱ्या भेदांचा प्रवेश या सूत्रांवरूनच झाला असेल. कारण प्रथम उपमेचा विचार करणारे यास्क वगैरे सोडले तर भरतापासून कांहीं काळ आपल्याला व्याकरणावरून भेद दिसत नाहींत पण पुढें मात्र हे भेद घेतले ते व्याकरणावरूनच घेतले. वेदांतून मंथन करून पाणिनीनें उपमान काढलें व त्याच्या सूत्रांवरून उपमान, उपमित, सामान्यवचन ( धर्म ), हीं उपमेचीं अंगें अथवा उपमेचे घटक झाले आहेत. यास्क हा पाणिनीच्या पूर्वीच उपमेवर लिहिणारा असल्यानें पाणिनीच उपमान, उपमित, सामान्यवचन हे शब्द त्याच्यांत दिसत नाहींत. पण त्यानें एवढें मात्र म्हटलें आहे कीं उपमान हें कमी प्रतीचें अथवा श्रेष्ठ दर्जाचेंही असतें. यास्काच्या निरुक्तांत उपमेलाच सदृश असें नांव देऊन गार्ग्यानें अशी व्याख्या केलेली आढळतेः— "यदतत्तत्सदृशमिति गार्ग्यः" म्हणजे यावेळीं उपमा हा शब्द त्यानें वापरलेला नाहीं. असो. यास्काच्या उपमेचे भेद असेः— ( १ )कर्मोपमाः—इव, यथा, न, चित्, नु आणि आ हे शब्द वापरून उपमान दर्शविणारी. ( २ ) भूतोपमाः— उपमित उपमान होणें. ( ३ ) रूपोपमाः— रंग अथवा आकार या बाबतींत उपमित उपमानाशीं साम्य पावणें.( ४ ) 'था' युक्त उपमा. ( ५ ) सिद्धोपमाः— हीच व्याकरण, न्याय मीमांसा यांतील 'अतिदेश' होय. ( ६ ) लुप्तोपमा. रा. सोवनींनीं म्हटलें आहे कीं सिद्धोपमा म्हणजेच पुढील परिणाम अलंकाराचा व्यत्यास होय. लुप्तोपमा हा भेद पुढें रूपक म्हणून मम्मट

---

१ सि. कौ. २·१·५५. २ सि. कौ. २·१·५६. ३ सि. कौ. ३·१·१०. ४ सि. कौ. ५·४·१३७. ५ सि. कौ. ६·२·८०. ६ सि. कौ. ५·४·९७. ७ सि. कौ. ३·४·४५.

वगैरेनीं घेतला आहे. ही थोडक्यांत उपमेचा पूर्वपीठिका पाहिली असतां येवढें कळतें कीं अनुप्रास इत्यादिकांची जशी वेदकालीन मंत्रद्रष्ट्यांना गोडी होती तद्वतच उपमेचीही होती. इतर अलंकारही त्यांत सांपडतील पण उपमेंतील उपमान हा शब्द वापरूनही उपमा दिल्या गेल्या आहेत. वेदांतील उपमेचीं उदाहरणें:—

(१) दश रात्रीरशिवेना नव द्यूनवनद्धं श्नथितमप्स्वन्तः
विप्रुतं रेभमुदनि प्रवृक्तमुन्निन्यथुः सोममिव स्रुवेण

ही इव शब्दानें कर्मोपमा झाली. यांत सोम ज्याप्रमाणें पळीनें काढतात त्याप्रमाणें त्या लपलेल्या राक्षसाला काढला असें म्हणण्यांत किती सार्थ उपमा दिल्यासारखी वाटते.

( २ ) यच्चिद्धि ते विशो यथा प्र देव वरुण व्रतं मिनीमसि द्यविद्यवि ।

ही यथा घालून कर्मोपमा झाली.

( ३ ) इंद्रो अस्माँ अरदद्वज्रबाहुरपाहन्वृत्रं परिधिं नदीनां ।

यांत इंद्राला वज्रबाहु ह्मणण्यानें ही रूपोपमा झाली. वज्रासारखे बाहु असणारा इंद्र यांत आकारानें उपमेयांचें उपमानाशीं साम्य आहे. वेदांमध्यें अशा रीतीनें बरींच उदाहरणें आढळतील. उपनिषदांतही उपमेचीं उदाहरणें आहेत. उपमेचें भगवद्गीतेंतील उदाहरणः—

यथा[४] नदीनां बहवोंबुवेगा समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥

मैत्र्युपनिषदांत आवाजाचें सात प्रकारें साम्य सांगून तीं सात उपमानें आहेत असें सांगितलें आहे. ह्मणजे उपमा हा शब्द प्रथमतः उच्चारला तेव्हांच त्यांत सादृश्याची कल्पना आहे. 'कविं कवीनामुपमश्रवस्तमं' हें वेदवाक्य वर दिलें आहे. त्यांतही या अन्नासारखें अन्न नाहीं असें ह्मणण्यांत तुलना करून सांगण्याची बुद्धि आहेच. म्हणजे सादृश्य हा उपमेंतील भाग मुख्य आहे. तो अगदीं सर्वांचे लक्षांत आलेला आहे. मैत्र्युपनिषदांत फक्त आवाजाचें साम्य सांगितलें. पुढ गार्ग्याची व्याख्या पाहतां 'जें तें नाहीं त्याशीं सदृश' म्हणजेच उपमा या पलिकडे उपमेची व्याख्या गेली नाहीं.

काश्यपाचे बारा भेद यास्कानें-आपल्या सहा भेदांत सामाविले आपण त्यांत रंग-सादृश्य व आकार-सादृश्य उपमेंत घेतलेलें पाहिलें. यावरून असें दिसतें कीं सादृश्य या शद्बानें कोणाचें समाधान झालें नसल्यानें रंग-रूप सादृश्यावरून भेद करण्याचें

---

१ १·११६·५·२४ ऋक्संग्रह. २ ऋक्संग्रह. ३ ऋक्संग्रह. ४ भगवद्गीता ११·२८.

कित्येकांचे मनांत आलें. सादृश्यासाठीं साधारण धर्म, सामान्यवचन हे शब्द पाणिनीनेंच पारिभाषिक म्हणून प्रथमतः वापरल्यानें तेथें सादृश्याचा अर्थ स्पष्ट झालेला दिसतो. त्यानंतर सादृश्याचे प्रकार कोणीं केले नाहींत. पाणिनीनें आपल्या सूत्रांत या सर्वांचें विवेचन केलें. यांत एवढें सिद्ध झालें कीं नुसतें सादृश्य म्हणण्यानें विशेष हानि होत नाहीं. कोणतेंही सादृश्य सादृश्य या सदरांत बसूं शकेल.

१. भरताची व्याख्याः—

यत्किंचित्काव्यबन्धेषु सादृश्येनोपमीयते ।
उपमा नाम सा ज्ञेया गुणाकृतिसमाश्रया ॥[1]

‘ जेव्हां एकादी गोष्ट दुसरीशीं गुण व आकृति यांच्या सादृश्यानें उपमित केली जाते तेव्हां उपमा होते. ’ वास्तविक ‘ सादृश्य ’ शब्दानंतर ‘ गुणाकृतिसमाश्रया ’ या शब्दांचें वैयर्थ्य ठरतें; तसेंच किंचित् सादृश्य म्हटल्यानें पुढील अलंकारकर्त्यांचे सादृश्य, असादृश्य, भेद, अभेद यांवर अधिष्ठित असे पुष्कळच अलंकार यांत सामावतील व उपमा ही सर्व अलंकारांची जननी हें म्हणणें अगदीं सार्थ होईल. पण यावेळीं अलंकारांची संख्याच माफक असल्यामुळें व उपमेची व्याख्याही नवीनच असल्यानें भरताचे दोषही क्षम्य आहेत. यानें उपमेचे केलेले भेदः—

( १ ) एक उपमेय व एक उपमान असणें.
( २ ) एक उपमान व अनेक उपमेयें असणें.
( ३ ) अनेक उपमानांना एक उपमेय असणें.
( ४ ) अनेक उपमानांना अनेक उपमेयें असणें.

यांतील दुसऱ्या भेदाचे पांच प्रकार त्यानें केले आहेत. ( १ ) प्रशंसनीय गोष्टीची उपमा ( २ ) निंद्य गोष्टीची उपमा ( ३ ) काल्पनिक उपमा ( ४ ) दोन गोष्टींत सादृश्य असतांना उपमा व ( ५ ) किंचित्सादृश्यानें उपमा. किंचित् सदृशी हा भेद आरंभीं व्याख्येंतच आला आहे. व सदृशी हा चौथा भेद आहेच तेव्हां या ठिकाणीं किंचित् असदृशी असा पाठ बरोबर होईल. याच्या व्याख्येचे मुख्य भेद पहातांना ‘ बहुभिः ’ हा शब्द घोंटाळा उत्पन्न करतो. कारण मुख्य भेदांपैकीं पहिल्या व दुसऱ्या भेदांत ‘ बहुभिः ’ याचा अर्थ एकाच प्रकारच्या अनेक वस्तू असा ‘अनेकवचनीं ’ घेतलेला दिसतो. फक्त तिसऱ्याच भेदाचे वेळीं बहुभिः म्हणजे अनेक निरनिराळ्या वस्तु असा अर्थ दिसतो. त्याचप्रमाणें दुसऱ्या भेदांतील अनेक उपमेयें व एक उपमान किंवा उपमेयसमूह व एक उपमान हा भेदसुद्धां थोडा आक्षेपार्ह ठरेल. निदान पुढच्या लोकांनीं तो मान्य केलेला दिसत नाहीं, एवढें खरें. कारण उपमा–दोषांत वचनदोषही असणारच

१ ना. शा. १६·२.

व या दृष्टीनें एक उपमान अनेक उपमेयांना लावणें हा वचनदोष होईल. त्याचप्रमाणें यानें दुसऱ्या भेदाचे पाडलेले पोटभेद, काल्पनिक उपमा हा भेद सोडतां, विशेष हृद्य नाहींत. काल्पनिक उपमा या भेदांत मात्र वैचित्र्य आहे. भरतानें या ठिकाणीं भेदांचें संपुष्टत्व न दाखवितां आणखी भेद 'काव्यलोकतः' बघावे असें म्हटलें आहे. म्हणजे यानें भेद दिले असते तर ते दण्डीच्या वळणावर गेले असते असें दिसतें. भरताच्या पोटभेदांचें वाढलेलें स्वरूप अग्निपुराणांत आहे. त्यांत जे थोडे अलंकार दिले आहेत त्यांत उपमेचें विवेचन फारच मोठें आहे कदाचित् दण्डीच्याही उपमाभेदांचा आधार अग्निपुराणाला असेल.

३. अग्निपुराणांतील उपमेची व्याख्या:—

> उपमा[1] नाम सा यस्यामुपमानोपमेययोः ।
> सत्ता चान्तरसामान्ययोगित्वेऽपि विवक्षितम् ॥
> किंचिदादाय सारूप्य लोकयात्रा प्रवर्तते ।
> समासेनासमासेन सा द्विधा प्रतियोगिनः ॥

"उपमान व उपमेय यांत सामान्य योग असतांही किंचित् सादृश्यानें जी पुढें येते ती उपमा होय." अग्निपुराणांत या उपमेचे केलेले भेद पुढीलप्रमाणें दिले आहेत:—

**अग्निपुराण.**

उपमा

समासा — असमासा.

धर्मवस्तूपमा (गम्यधर्म — उक्तधर्म), विपर्यासोपमा, अद्भूपमा, परस्परोपमा, सदृशी, अतिशायिनी उपमा, संशयोपमा, व्यतिरेकोपमा

किंचित्सदृशी, निश्चयोपमा, मालोपमा, समुच्चयोपमा, नियमोपमा, प्रशंसोपमा, विक्रियार्थोपमा

निंदोपमा, विक्रियोपमा, कल्पितोपमा, अनियमोपमा, मोहोपमा, गमनोपमा, अद्भुतोपमा

[1] अ. पु. ३४४·६१७.

हे भेद पाहिले म्हणजे अग्निपुराण दण्डीला गुरु करून घेतांना दिसतें. असो. या भेदांतून भरताच्या 'किंचिच्चसदृशी' उपमेचा धागा लागतो, कारण भरतापासून अग्निपुराणानें ती ओळ जशीच्या तशीच घेतली आहे.

अग्निपुराणः—प्रशंसा[१] चैव निन्दा च कल्पिता सदृशी तथा।
किंचिच्चासदृशी ज्ञेया उपमा पञ्चधा पुनः ॥

भरतः—प्रशंसा[२] चैव निन्दा च कल्पिता सदृशी तथा।
किंचिच्चासदृशी ज्ञेया ह्युपधा ( मा ) पञ्चधा पुनः ॥

अग्निपुराणांत प्रत्येक शब्द भरतापासून घेतलेला दिसतो. तेव्हां अग्निपुराणाच्या दुसऱ्या ओळींतील किंचिच्चासदृशी हेंही पद असेंच भरताच्या व्याख्येंत असलें पाहिजे. मागाहून त्याच्या तोंडीं 'किंचिच्च सदृशी' हे शब्द कोणी घातले असावेत. भरतानें नाट्यशास्त्राचें विवेचन करतांना त्याला पाहिजेत तेवढेच उपमाभेद घातले. आतां त्याच्या 'बहुभिः' या पदाचाही घोंटाळा अग्निपुराणाशीं ताडून पाहातां नाहींसा होणार आहे. अग्निपुराणानें समुच्चयोपमा व बहूपमा हे जे दोन उपमाभेद घातले आहेत तेच भरताच्या उपमाभेदांपैकीं दोन भेद होत. हें सर्व ताडून पाहण्यासाठीं दोघांच्याही व्याख्या घेऊं:—

भरतः—तुल्यं[३] ते शशिना वक्त्रमिति ह्येककृता भवेत्।
एकस्य बहुभिः सा स्यादुपमा नाटकाश्रया ॥
शशाङ्कवत्प्रकाशन्ते ज्योतींषीति भवेत्तु या।
एकस्यानेकविषया सोपमा परिकीर्तिता ॥
श्येनबर्हिणभासानां तुल्योर्थ इति या भवेत्।
एकस्य बहुभिः साम्यादुपमा नाटकाश्रया ॥
तुल्यं ते शशिना वक्त्रमित्येकेनेकसंश्रया।
बहूनां बहुभिर्ज्ञेया घना इव गजा इति ॥

अग्निपुराण—समुच्चयोपमा[४]ऽतोऽन्यधर्म बाहुल्यकीर्तनात्।
बहोर्धर्मस्य साम्येऽपि वलक्षण्यं विवक्षितम् ॥
यत्रोपमा स्यात् बहुभिः सदृशैः सा बहूपमा।

भरताचा पहिला भेद एक उपमान व एक उपमेय यांनींच झाल्यानें त्यासंबंधीं विचार करावयास नको. पण पुढील तीन भेदांपैकीं पहिले दोन भेद म्हणजे अग्निपुराणांतील समुच्चयोपमा व तिसरा भेद म्हणजे बहूपमा होय. पण अग्निपुराणानें हे भेद आत्मसात् करतांना भरताच्या शब्दांतील गोंधळ नाहींसा केला. अग्निपुराणाच्या 'अन्यधर्म बाहुल्य कीर्तन' 'बहोर्धर्मस्य' या पदांत व भरताच्या नुसतें 'बहुभिः' म्हणण्यांत पुष्कळच अंतर आहे. त्याचप्रमाणें अग्निपुराणाच्या 'बहुभिः'

---

१ अ. पु. ३४४·२१. २ ना. शा. १६·९. ३ ना. शा. १६·४|५|६|७.
४ अ. पु. ३४४·१३|१४.

सदृशोः ' व भरताच्या ' बहूनां बहुभिः ' असें म्हणण्यांतही फरक आहे. अग्निपुराणाच्या शब्दांत जास्त स्पष्टता आहे. भरतानें ते शब्द थोडक्यांत आणण्यासाठीं ' बहुभिः ' हें पद सर्वांकरतांच मंजूर करून वाचकांचा घोंटाळा केला. तो उलगडण्यासाठीं भरत–अग्निपुराणाचा मेळ असा घालतां येईलः—

| अग्निपुराण | | भरत |
|---|---|---|
| अन्यधर्म बाहुल्यकीर्तन | == | एकस्य बहुभिः साम्यात् |
| बहोर्धर्मस्य | == | एकस्य बहुभिः सा स्यात् |
| बहुभिः सदृशः बहूपमा | == | बहूनां बहुभिः |

अग्निपुराणानें ' बहोः ' असें म्हणून एकाच प्रकारच्या वस्तुसमूहाच्या षष्ठीचें एकवचन दिलें व भरतानें ' बहुभिः ' म्हणून तिसऱ्या भेदांत अनेक प्रकारच्या अनेक वस्तु असें म्हटलें आहे कीं काय असा भास होतो. कारण ' श्येनबर्हिणभासानां ' असें म्हणण्यांत प्रत्येक जातीचा एक अगर अनेक पक्षीही असणें संभवनीय आहे व हें षष्ठीचें अनेकवचन असल्यानें अनेक जातीच्या अनेक पक्ष्यांशीं वस्तू उपमित केली असा अर्थही होईल. पण अग्निपुराणानें भरताच्या ' बहुभिः ' पदाबद्दल 'बहोः' म्हणून भरताच्या पदांत होणारा वचनांचा घोंटाळा नाहींसा केला. मात्र भरताच्या अगर अग्निपुराणाच्या या भेदांत वचनदोष उत्पन्न होतो व असे भेद पुढें मानलेले नाहींत.

४. भामहः— विरुद्धेनोपमानेन देशकालक्रियादिभिः ।
उपमेयस्य यत्साम्यं गुणलेशेन सोपमा[1] ॥

भामहानें उपमानाला मर्यादा घालण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. पूर्वींच्या व्याख्येंत ' रामाप्रमाण राम आहे ' असें म्हटलें तरी उपमाच झाली असती. कारण उपमान व उपमेय यांना तीं एकच असलीं तरी निर्बंध नव्हता. अलंकार शास्त्रज्ञांचेंच शब्द सांगावयाचे म्हटल्यास ' गौरिव गवयः ' यांत उपमेचें वैलक्षण्य नाहीं असें दिसतें, तसेंच भरताच्या व्याख्येंत वैलक्षण्य आणावयास कांहींही बंधन नव्हतें. पण भामहानें 'देश, काल व क्रिया यांनीं भिन्न असणारें असें जें उपमान त्याचें गुणलेशानें, उपमेयाशीं साम्य सांगणें म्हणजे उपमा होय,' असें म्हटल्यामुळें ' गौरिव गवयः ' ही उपमा होणार नाहीं. उपमा ही यथा व इव शब्दांनीं सादृश्य दाखविते असें भामहानें म्हटलें आहे. पुढें दण्डीची व्याख्या पाहिली तर त्यानें– ' यथा ' ' इव ' सारख्या उपमावाचक शब्दांची फारच मोठी यादी दिली आहे. व त्यावरून त्यानें उपमेचें बरेंच निरीक्षण केलें असावें असें वाटतें. भामहानें ' यथेवशब्दौ ' म्हटल्यानें इतर शब्दांची व्यावृत्ति केल्याप्रमाणें वाटतें. अग्निपुराण हें भामह व दण्डी या तत्कालीन दोन्ही मतांच्या दोघां पुरस्कर्त्यांचें मत देत आहेसें दिसतें. अग्निपुराणांत समासा व असमासा उपमेचे

---

१ भा. लं. २·३०

प्रत्येकीं तीन भेद आहेत, तेही भामहाच्या भेदांप्रमाणेंच यथा, इव व वत् यांनीं होणारेच असावेत. अग्निपुराणानें ते स्पष्टपणें सांगितले नाहींत. भामहानें समासाख्या उपमा, यथा व इव शब्दांवाचून तसेंच वत् प्रत्ययानें क्रियासाम्य दाखवूनही होते असें म्हटलें आहे. उद्भटानें पुढ व्याकरणावरून अनेक भेद पाडले त्याला स्फूर्ति भामहानें दिली असावी. भामहानें व्याकरणाला उपमेंत किंचिन्मात्र रिघाव दिला आहे. भामहाचा तिसरा भेद प्रतिवस्तूपमा होय. या प्रतिवस्तूपमेला स्वतंत्र अलंकार म्हणून पुढें मानिलें आहे. भामहानें प्रतिवस्तूपमेचे दोन भेद केले (१) यथा-इव यांवांचून. व (२) यथा-इव यांना युक्त. पुढें स्वतंत्र अलंकार म्हणून मानलेल्या प्रतिवस्तूपमेंत इवादि वर्ज्य मानले आहेत. असो. भामहानें आपल्या ग्रंथांत कांहा ओळी दण्डीला उद्देशून लिहिल्या असाव्या असें मत आहे. त्यांपैकीं कांहीं ओळी उपमाविवेचनाचे वेळीं दिल्या आहेत. पण त्या वस्तुतः दण्डीलाच उद्देशून असतील असें म्हणण्याचें कारण नाहीं. त्या त्याच्याच मताच्या दुसऱ्या व्यक्तीलाही उद्देशून असतील. त्या ओळी अशाः—

> यदुक्तं त्रिप्रकारत्वं तस्याः कैश्चिन्महात्मभिः ।
> निन्दाप्रशंसाचिख्यासा भेदादत्राभिधीयते ॥
> सामान्यगुणनिर्देशात् त्रयमप्युदितं ननु ।
> मालोपमादिः सर्वोऽपि न ज्यायान् विस्तरो मुधा ॥[1]

यांतील निन्दा, प्रशंसा, माला हे उपमाभेद दण्डीनें व भरतानेंही दिले आहेत. आचिख्यासा मात्र दण्डीनेंच दिला आहे.पण 'आचिख्यासा'मानणारे शास्त्रज्ञ तत्पूर्वींही पुष्कळ असताल. यासंबंधीं थोडकें विवेचन 'अलंकार शास्त्राच्या इतिहास' प्रकरणीं केलेंच आहे. अग्निपुराणानें भामह-दण्डींपासून उपमा घेतांना ' आचिख्यासा ' हा वादाचा भेद गाळूनच टाकला आहे. भामह व दण्डी या दोघांनीं दिलेले उपमेचे भेद, या दोन पक्षांतील वादाचे भेद गाळून अग्निपुराणानें दिले असावेत. असो. भामहानें मेधाविपासून उपमेचे सप्तदोष घेतले आहेत. (१) हिनता (२) असंभव (३-४) लिङ्गवचोभेद (५) विपर्यय. (६) असादृश्य (७) उपमानाधिक्य. नुसतें सादृश्य जणूं व्याख्यत चालणार नाहीं हें दाखविण्यासाठीं भामहानें एक श्लोक दिला आहेः—

> सर्वं सर्वेण सारूप्यं नास्ति भावस्य कस्यचित् ।
> यथोपपत्तिकृतिभिरुपमा सुप्रयुज्यते ॥[2]

या श्लोकांत उपमा योजतांना तारतम्य ठेविलें पाहिजे असेंच त्यानें सांगितलें.

**५.** दण्डीः-यथा कथंचित् सादृश्यं यत्रोद्भूतं प्रतीयते ।
उपमा[3] नाम सा ॥

---

१ भा. ल. २·३७।३८. २ भा. लं. २·४३. ३ का. द. २·१४.

यानें उपमेचे बत्तीस भेद केले आहेत. शास्त्रज्ञांनीं मानले तसे अनेक स्वतंत्र अलंकार मानणें झाल्यास याच्या व्याख्येंतही अतिव्याप्तीचा दोष आहे. कारण 'यथा कथंचित् सादृश्य' पुष्कळच अलंकारांत प्रतीत होतें. त्यामुळें उपमेला बंधन कशाचेंच नाहीं. याची व्याख्या व अग्निपुराणांतील उपमेची व्याख्या तंतोतंत जुळते; पण याचे उपमाभेद हे अग्निपुराणांतील भेदांपेक्षांही जास्त आहेत. त्यामुळें दण्डीची उपमा फारच मोठा संसार मांडून बसल्यासारखी दिसते. मात्र या भेदांना इतर अलंकारांच्या वाढीमुळें पुढ कांहींच महत्त्व राहिलें नाहीं. दण्डीनें पुष्कळसे स्वतंत्र अलंकारही मानले व इतर अलंकारांच्या भेदांना प्रवेश देणारे उपमा भेदही मानले त्यामुळें त्याची उपमा ही पुष्कळ अलंकारांची आश्रयदाती आहे.

| दण्डीचे उपमा भेद | == | इतरांचे उपमा भेद व इतर अलंकार |
|---|---|---|
| ( १ ) धर्मोपमा | | पूर्णोपमा |
| ( २ ) वस्तूपमा | | ( अर्ध्या उदाहरणांत ) धर्मलुप्तोपमा |
| ( ३ ) विपर्यासोपमा | | प्रतीप |
| ( ४ ) अन्योन्योपमा | | उपमेयोपमा |
| ( ५ ) नियमोपमा | | व्यङ्ग्य उपमेयोपमा |
| ( ६ ) अनियमोपमा | | ,, |
| ( ७ ) समुच्चयोपमा | | समुच्चय |
| ( ८ ) अतिशयोपमा | | व्यतिरेक |
| ( ९ ) उत्प्रेक्षितोपमा | | प्रतीप |
| ( १० ) अभ्दुतोपमा | | अतिशयोक्ति |
| ( ११ ) मोहोपमा | | भ्रांतिमान् |
| ( १२ ) संशयोपमा | | ससंदेह |
| ( १३ ) निर्णयोपमा | | ,, |
| ( १४ ) श्लेषोपमा | | श्लेषोपमा ( श्लेष + उपमा ) |
| ( १५ ) समानोपमा | | भङ्गश्लेषोपमा ( ,, ) |
| ( १६ ) निन्दोपमा | | व्यतिरेक |
| ( १७ ) प्रशंसोपमा | | प्रतीप |
| ( १८ ) आचिख्यासोपमा | | उपमा |
| ( १९ ) विरोधोपमा | | |
| ( २० ) प्रतिषेधोपमा | | व्यतिरेक |
| ( २१ ) चटूपमा | | व्यतिरेक |
| ( २२ ) तत्त्वाख्यानोपमा | | ( विश्वनाथाचा ) निश्चय |
| ( २३ ) असाधारणोपमा | | अनन्वय |

| दण्डीचे उपमा भेद | == | इतरांचे उपमा भेद व इतर अलंकार |
|---|---|---|
| ( २४ ) अभूतोपमा | | अतिशयोक्ति |
| ( २५ ) असंभावितोपमा | | |
| ( २६ ) बहूपमा | | मालोपमा |
| ( २७ ) विक्रियोपमा | | उत्प्रेक्षा |
| ( २८ ) मालोपमा | | मालोपमा |
| ( २९ ) वाक्यार्थोपमा | | उत्प्रेक्षा + उपमा |
| ( ३० ) प्रतिवस्तूपमा | | दृष्टान्त |
| ( ३१ ) तुल्ययोगोपमा | | तुल्ययोगिता |
| ( ३२ ) हेतूपमा | | लुप्तोपमा |

अशा रीतीनें दण्डीच्या उपमेंत, पुढें स्वतंत्र अलंकार म्हणून मानलेले अलंकार आहेत. मेधावीनें जे दोष म्हणून दिले आहेत त्यालाच उद्देशून कदाचित् दण्डी म्हणत असावा कीं,

न[1] लिङ्गवचने भिन्ने न हीनाधिकतापि वा ।
उपमादूषणायालं यत्रोद्वेगो न धीमताम् ॥

कदाचित् वचनदोषामुळें बहुवचनीं उपमान व एकवचनीं उपमेय हा उपमेचा भेद पुढें मानला नाहीं असें पूर्वीं सांगितल आहे. दण्डीनें स्वतःही तो उपमाभेद घेतला नाहीं. पण त्यानें उद्वेगकारक लिङ्ग, भेद व वचन भेद नसतील तर ते उपमा दोष मानण्याचें कारण नाहीं असें म्हटलें आहे. मात्र त्यानें अदोषत्व सिद्ध करतांना जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यापैकीं कांहीं उपमेचीं नाहींत असें दिसतें. उदाहरणार्थः—

प्राणा[2] इव प्रियोऽयं मे विद्या धनमिवार्जिता ।

यांत ' प्राणाः ' व ' विद्या ' यांत उपमानोपमेयभाव नाहीं. विद्येला प्राणाची अगर प्राणाला विद्येची उपमा देतां येणार नाहीं. कारण उपमान म्हणजे तुलनेचें विशिष्ट प्रमाण. त्या विशिष्ट प्रमाणानें मापिलें जाणारें जें तें उपमेय. विद्या व प्राण यांत अशा तऱ्हेचा संबंध न आल्यानें ही उपमा होऊं शकत नाहीं. दण्डी लिङ्गवचनदोष मुळींच मानीत नाहीं असें नाहीं. असो. यापुढें अवास्तव भेद फारसे कोणी न मानल्यामुळें हे स्वतंत्र अलंकार म्हणून वाढीस लागून स्वतंत्र अलंकारांचें क्षेत्र पुढें पुढें पुष्कळच वाढलें.

६. उद्भटः—यच्चेतोहारि साधर्म्यमुपमानोपमेययोः ।
मिथो विभिन्नकालादि शब्दयो[3]रुपमा तु तत् ॥

उद्भटानें अजून घडत आलेल्या सादृश्याला ' चेतोहारि ' हें विशेषण वापरलें. यापूर्वीं हा आवश्यक शब्द कोणी घातला नव्हता. हा शब्द

---

१ का. द. २-५२. २ का. द. २-५१. ३ का. सा. सं. १-१५.

घातल्यावर ' मिथो विभिन्नकालादि शब्दयोः ' या शब्दांचें वैशिष्ट्य रहात नाहीं. कारण या शब्दांनीं ' गौरिव गौः ' ही उपमा मानण्याची प्रवृत्ति नष्ट होते तद्वतच ती ' चेतोहारि ' या शब्दांनेंही होते. पण उद्भटानें भामहाच्या व्याख्ये-पासून एकदम बाजूस सरण्याचें धारिष्ट दाखविलें नाहीं. अजूनपर्यंत उपमेच्या व्याख्येंत सादृश्य हा शब्द होता. उद्भटानें ' साधर्म्य ' हा शब्द वापरला आहे. यांपैकीं युक्त शब्द कोणता हें मागाहून पाहूं. उद्भटापासून उपमाभेदांना अगदीं निराळें वळण लागल. इतर अलंकारांना अवकाश देणारे सर्व उपमाभेद गाळून केवळ व्याकरणाच्या भेदांवर अधिष्ठित असे उपमाभेद झालेले दिसतात. उपमेंत व्याकरणाला फारच मोठें अधिष्ठान मिळालेलें दिसतें. उद्भटानें समासा असमासा हे मुख्य भेद न मानतां पूर्णा लुप्ता हे मुख्य भेद मानले. त्याचे उपमा भेद असेः—




पूर्णोपमेचे ५ भेद लुप्तोपमेचे १२ भेद एकूण उद्भटानें उपमेचे सतरा भेद केले. यास्काच्या उपमाभेदांत उद्भटाच्या कांहीं भेदांचें मूळ सांपडतें. व कांहीं भेद त्यानें भामहावरून घेतले असावे. समासगा, तद्धितगा, श्रौती, आर्थी हे भेद भामहावरून

सुचण्यासारखे आहेत. बाकी त्यानें स्वतंत्र बुद्धीनें पाडले आहेत; व ते शेवटपर्यंत सर्वांनीं घेतले आहेत. मम्मटानें त्यांत भर घातली आहे. पण तीही व्याकरणदृष्ट्या पडणाऱ्या उपमाभेदांचीच होय.

पूर्णोपमाः— उपमेंत मुख्य घटक उपमान, उपमेय, साधारण धर्म व तद्वाचक शब्द हे होत. ज्या उपमेंत हे चारही घटक उक्त असतील ती पूर्णोपमा होय.व जींत यांपैकीं एक,दोन अगर तीन घटक अनुक्त असतील ती लुप्तोपमा होय. पूर्णोपमेचे भेद—

( १ ) वाक्यगा म्हणजे एका वाक्यांत चार घटक असतां होणारी उपमा. हिचे श्रौती व आर्थी असे दोन भेद आहेत. श्रौती म्हणजे कानांनीं शब्द ऐकतांच उपमाभाव व्यक्त होणारी व आर्थी म्हणजे अर्थावरून उपमाभाव व्यक्त करणारी. यथा, इव, वादि शब्दांनीं श्रौती उपमा होते व तुल्य, सम इत्यादि शब्दांनीं आर्थी उपमा होते. याचीं मराठींत उदाहरणें देतांना 'इव' 'वा' हेच शब्द मिळणें शक्य नाहीं. मराठी काव्यांत उपमा दाखविणारे निराळेच शब्द असणार. यथा—इव या अर्थी जसें—तसें, जेंवि—तेंवि इत्यादि व तुल्य, सम, सदृश या अर्थी हेच शब्द किंवा सा, सम इत्यादि शब्द मराठींत आहेत.

वीची[1] उडूनि तांडव करितां सागर उसळे जैसा ।
फुटुनि उमाळें तिचा प्रस्फुरे अंतःसिंधू तैसा ॥

यांत उपमान, उपमेय, साधारण धर्म व तद्वाचक शब्द हे उपमेचे चारी घटक असल्यानें व केवळ श्रवणानें उपमाभाव कळत असल्यानें ही संपूर्णा वाक्यगा श्रौती उपमा झाली. हिचेंच दुसरें उदाहरणः—

असो[2]; हे निशा दाटली काळी । जेंवी काळ पुरुषाची कांवळी ।
ब्रह्मांड—देवतेवरी सगळी । पांघुरविली आप्तत्वें ॥

२ संपूर्णा आर्थी समासगाः—

धीरे[3]—सत्वाचा—महामेरू । दानी मेघ जैसा उदारू ।
प्रजा—पालनीं कमलावरू । शक्रा—तुल्य प्रतापी ॥

३ तद्धितगा पूर्णा श्रौतीः—

जे[4] आमुचे महामति योद्धे होते प्रसिद्ध सुरकल्प ।
त्यांहीं संप्रति युद्धीं वरिलें विक्रम करूनि शरतल्प ॥

लुप्तोपमाः—१ देहा[5] सहस्र ब्राह्मणोत्तम । भोजनीं तृप्त केले परम ।
हेमपात्रीं अमृतोपम । भक्ष्य भोज्यें वोपिलीं ॥

यांत 'मधुर' हा धर्म उक्त नसल्यानें ही एकलुप्ता झाली.

२ दुग्धाब्धि[6] फेनधवळें स्वयशें कुरुच्या कुळासि धवळील ।

---

१ अनंततनय. २ मु. आदिपर्व ३६ ३ मु. वनपर्व. ४ मो. क. पर्व ७३.
५ मु. ६ मो. आदिपर्व २७.१७.

जसें तसें यांसारखे शब्द येथें नसल्यानें ही वादि-लोपानें एकलुप्ता झाली.

द्विलुप्ताः-अमृत-प्रतीपचरित प्राशावें श्रवण करुनि आर्यांनीं[1]।
गायील रामकरुणाघन भक्तमयूर तेंचि आर्यांनीं ॥

पहिल्या ओळींत अमृत-प्रतीपचरित म्हणण्यानें साधारण धर्म व तद्वाचक शब्द यांच्या लोपानें ही द्विलुप्ता झाली.

दुर्योधनें विषाकुळ मारुति केला निबद्ध वल्लींनीं।
पंकजवद्बुजांतें करिजे तो घात भृंगवल्लींनीं[2] ॥

आतां हीं उदाहरणें पाहिल्यावर पूर्णा उपमेंतील समासगा उपमेचा आर्थी हा जसा भेद होतो, त्याचप्रमाणें श्रौती असा कां होऊं नये हा प्रश्न येतो.

उद्भटः— यथेवशब्दयोगेन सा श्रुत्यान्वयमर्हति[3]।
सदृशादिपदाश्लेषादन्यथेत्युदिता द्विधा ॥

यथा-इव या शब्दांनीं श्रौती उपमा होते असें उद्भट म्हणतो पण 'इवेन नित्य-समासो विभक्त्यलोपः पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं च' असें म्हटल्यावर समासगा उपमेंत 'इव' प्रयोगानें समास होऊन श्रौती उपमा झाली पाहिजे. पण उद्भटानें पूर्णोपमें-तील समासगोपमेंत श्रौती हा भेद केलेला नाहीं. मात्र पुढें मम्मटानें तो दिला आहे. श्रौती व आर्थी उपमा ओळखण्याची खूण ही आहे कीं, यथा या अव्ययाप्रमाणें साम्यदर्शक 'व वा यथा तथा, इव, एवं,' हीं अव्ययें[4] श्रौतींत असतात.

वाच्यलिङ्गाः समतुल्यः सदृक्षः सदृशः सदृक्[5]।
साधारणः समानश्च स्युरुत्तरपदे त्वमी ॥

सम, तुल्य इत्यादि या श्लोकांत दिलेले शब्द आर्थी उपमेंत येतील. उद्भटानें लुप्तोपमेचे जे भेद केले त्यांपेक्षां मम्मटानें अधिक केले आहेत. ते आपण पुढें पाहूं. पण या उपमेवरून हें स्पष्ट दिसून येतें कीं, उपमाभेद हे व्याकरणावर अधिष्ठित करण्याची उद्भटाची प्रवृत्ति होती; व पुढें त्या प्रवृत्तीचा अनुकार इतरांनीं केला.

७. वामनः--उपमानेनोपमेयस्य गुणलेशतः साम्यमुपमा[6] ॥

याची व्याख्या म्हणजे भामहाचा पूर्वार्ध गाळून घेतलेली भामहाची व्याख्याच होय. गुणलेशेन साम्य म्हणून व्यतिरेक किंवा तत्सम इतर अलंकारांची व्यावृत्ति होऊं शकत नाहीं. यानें लौकिकी तसेंच कविकल्पनेनें कल्पिलेली, गुणांचा उत्कर्ष असणारी अशी कल्पितोपमाही केली आहे. त्यानंतर उपमेचे पदार्थवृत्ति व वाक्यार्थवृत्ति असे दोन भेद केले ते म्हणजे उद्भटाचे समासगा व वाक्यगा हे उपमा-भेद होत. व पुनः पूर्णा व लुप्ता हे दोन भेद करून लुप्तोपमेचे गुणशब्द-लोप, द्योतकशब्दलोप, उभयलोप, उपमानोपमेयलोप असे भेद केले आहेत. वाम-

१ मो. आदिपर्व १३·९८ २ मो. आदिपर्व २१·१७. ३ का. सा. स. १·१६.
४ अ. को. १४७४. ५ अ. को. १०३४. ६ का. सू. ४·२·१.

नानें लुप्तोपमेचा शेवटचा उपमानोपमेयलोप हा उपमाप्रपंचांत अनेक अलंकारांच्या वर्णनानें दाखविला आहे. त्यानें उपमा प्रपंचांत प्रतिवस्तु, समासोक्ति, अप्रस्तुतप्रसंशा, अपह्नुति, विरोध, रूपकश्लेष हे अलंकार घातले आहेत. उपमा प्रपंचाशिवाय त्यानें दुसरा प्रपंच मानला नाहीं.अर्थात् त्यानें मानलेले सर्व अलंकार उपमानोपमेयांचा खेळ आहे. उपमा प्रपंचाकरतां एक अध्याय व केवळ उपमा व उपमादोष यांकरितां एक अध्याय वामनानें लिहिला आहे. यानें स्तुति, निंदा तत्त्वाख्यान यावरून उपमा भेद मानले नसले तरी 'स्तुतिनिन्दातत्त्वाख्यानेषु' असें म्हटलें आहे व त्यामुळें उपमा हीं या तीन गोष्टींसाठीं उपयोगी येते असा उघड अर्थ होतो; पण दण्डींत व वामनांत एक मोठें अन्तर आहे कीं वामनानें जेवढे अलंकार मानले तेवढे सर्व अलंकार उपमा प्रपंचांत घातले आहेत; व दण्डीनें सर्व अलंकार उपमाभेद म्हणून मानले नाहींत. उपमाप्रपंचांत घातल्यामुळेंच वामनाची आक्षेप व विशेषोक्ति यांच्या व्याख्या इतरांहून अगदीं भिन्न झाल्या आहेत. यानें भामहानें दिलेल्या उपमेच्या सप्तदोषांपैकीं षड्दोष मानले आहेत. विपर्यय हा दोष त्यानें गाळला आहे. तो गाळण्याचें कारण एवढेंच दिसतें कीं विपर्ययानें उपमानाला उपमेयाचें स्थान मिळत असल्यानें तो दोष न होतां अलंकार म्हणूनच गणला गेला आहे. त्याचप्रमाणें लिंगभेद या दोषाबद्दलही त्यानें अपवाद ठेवला आहे.

'इष्टः पुं-नपुंसकयोः प्रायेण'[1] "लौकिक्यां समासाभिहितायामुपमाप्रपंचे च"

हे वामनाचे शब्द व 'न लिङ्गवचने दोषः' हे दण्डीचे शब्द सारखेच आहेत. लौकिकी उपमेंत लिंगभेद हा दोष कसा होत नाहीं हें दाखविण्यासाठीं 'छायेव स तस्य' 'पुरुष इव स्त्री' हीं उदाहरणें वामनानें दिलीं आहेत. पण याबद्दल दण्डीवर जो आक्षेप घ्यावयाचा तसलाच आक्षेप याच्यवार घ्यावा लागेल असें वाटतें. सुंदर सादृश्य म्हणजेच उपमा होईल. जेथें कोठें उपमावाचक शब्द असेल तेथें उपमा होऊं शकणार नाहीं. व यांत 'अप्रतीतगुणसादृश्यमसादृश्यम्' हा जो वामनानें स्वतःच सांगितलेला दोष तो येतो. यानें 'असादृश्य' दोषाचें वर्णन करतांना अग्निपुराणांतील एका उपमेयाला अनेक उपमानें देण्याच्या पद्धतीची उपपत्ति लावली आहे. तो म्हणतो, 'असादृश्यहता ह्युपमा। तन्निष्ठाश्च कवयः'[2]। "उपमानाधिक्यात्तदपोह इत्येके"[3] "नापुष्टार्थत्वात्"[4] तन्निष्ठाश्च कवयः म्हणजे उपमाननिष्ठाश्च कवयः असें त्यानें आपल्या वृत्तींत म्हटलें आहे. आतां असादृश्यानें हत असलेल्या उपमेंत उपमानें पुष्कळ घातलीं तर असादृश्य नाहींसें होतें असें कित्येक म्हणतात. पण यावर वामन म्हणतो कीं, उपमानें अधिक असण्यानें पौनरुक्त्य दोष किंवा अपुष्टार्थत्व दोष येत नसून तीं उपमानें अर्थ विशेषच सांगतात. यावरून पूर्वी एका उपमेयाला अनेक उपमानें देण्याची

१ का. सू. ४·२·१३. २. ३. ४. का. सू. ४·२·१७।१८।१९.

वहिवाट कां होती याचें कोडें उलगडतें. मैत्र्युपनिषदांत ' सप्तविधेयं तस्योपमा ' असें म्हणून एका गोपालाच्या आवाजाचें सादृश्य सात आवाजांनीं दाखविलें आहे. यामध्यें दोन्ही आवाजांतील असादृश्य नाहींसें करणें हा हेतू नाहीं तर त्यांत असादृश्य आहे हें माहीत असतांही अर्थविशेषानें त्यांमधील सादृश्य प्रतीति करण्यासाठीं एक उपमान पुरेसें होणार नाहीं म्हणून अनेक उपमानें योजिलीं आहेत. हा अर्थविशेष पाहण्यासाठीं, उदाहरण घेऊं.

तो शर[1] गरधर-वरसा पविसा रविसा स्मरारिसायकसा।
पार्थ-भुजांतरि शिरला वल्मीकामाजि नाग-नायकसा॥

यांत शर या उपमेयाला अनेक उपमानें दिलीं असलीं तरी शर व तीं उपमानें यांतील असादृश्य नाहींसें होत नाहीं. उलट प्रत्येक उपमानामुळें अर्थवैशिष्ट्य निर्माण होत आहे. यांत अपुष्टार्थत्व नाहीं; कारण प्रत्येक वेळीं तोच अर्थ पुनरुच्चरित होत नाही. प्रत्येक उपमानानें अर्थनाविन्य दिसत आहे.

८. रुद्रटः—उभयोः समानमेकं गुणादि सिद्धं भवेद्यथैकत्र।
अर्थेऽन्यत्र तथा तत्साध्यत इति सोपमा त्रेधा॥[2]

'निरनिराळ्या दोन अर्थांपैकीं गुणादिकासारख्या धर्मामुळें उपमानार्थ उपमेयार्थाशीं साम्य पावतो तेव्हां उपमा होते.' रुद्रटाची व्याख्या मोघम असल्यानें त्यानें उपमेच्या पाडलेल्या भेदांत इतर अलंकार प्रविष्ट होतात. यानें उपमेचे मुख्य तीन प्रकार केले. त्यांपैकीं पहिली वाक्योपमा होय. हिचे त्यानें सहा उपभेद सांगितले आहेत.

(१) इवादींच्या योगें एक उपमान व एक उपमेय यांतील एक सामान्य धर्म सांगणें.

( २ ) इवादि प्रयोग असून सुप्रसिद्ध सामान्य धर्म गम्य असणें.

( ३ ) तिसऱ्या वस्तूंशीं सदृशत्व नसणाऱ्या दोनच वस्तु क्रमानें उपमानें होणें.

( ४ ) दुसऱ्या वस्तूंशीं असदृश अशा वस्तूनें स्वतःच उपमानोपमेयांचें स्थान घेणें.

( ५ ) ज्या व जेवढ्या विशेषणांनीं उपमेय युक्त त्याच विशेषणांनीं उपमान युक्त असणें.

( ६ ) एखादी वस्तु अनुपम समजून उपमान व त्याचें विशेषण हें असत् अशी कल्पना करण्यासाठीं 'यदि' पदानें उपमान पुढें मांडून उपमेयाशीं साम्य कल्पिणें.

या सहा भेदांत पहिला भेद पूर्णोपमेचा, दुसरा लुप्तोपमेचा, तिसरी उपमेयोपमा, चवथा अनन्वय, पांचवा कांहींच्या मतें उत्प्रेक्षा व सहावा यथार्थी आतिशयोक्ति आहे. तेव्हां हे निराळे आलेले अलंकार वजा केल्यास पूर्णोपमा व लुप्तोपमा हेच भेद शिलक राहतील. याचे हे वाक्योपमेचे सहा भेद म्हणजे वाक्यगा उपमेचे सहा भेद होत. आतां दुसरा मुख्य भेद समासोपमा. तिचे भेद असे—

१ मो. वि. ५६.    २ का. लं. ८.४.

( १ ) उपमान व सामान्यधर्म यांचा इवादि शब्द गुप्त ठेवून समास करणें.

( २ ) उपमान, सामान्यधर्म व उपमेय यांचा समास करणें.

( ३ ) सामान्यधर्म, उपमान व उपमेय यांचा समास करणें.

( ४ ) उपमानाला प्रत्यय लावून साधारण धर्म त्या प्रत्ययाच्या योगेंच सांगणें व इवादि शब्द गुप्त असणें हिला प्रत्ययोपमा म्हणावें. आतां हे भेद पाहिले तर असें दिसेल कीं हे सर्व लुप्तोपमेचे भेद आहेत. चौथा भेद हा क्यच् भेद होय. याशिवाय, कांहीं भेद आहेत ते असेः—

( ३ ) मालोपमाः-एकेक सामान्यगुण असणाऱ्या अनेक उपमानांशीं अनेक सामान्यगुण असणारी वस्तु उपमित करणें. हिचें उदाहरण 'तो शर गरधर' हें होईल.

( ४ ) रशनोपमाः—औपम्यभाव असणाऱ्या पुष्कळ गोष्टींनीं उत्तरोत्तर उपमानोपमेय भाव अनुभवणें.

( ५ ) समस्त वस्तुः—एका वस्तूचें दुसऱ्या वस्तूंशीं अवयवांतही साम्य असणें.

( ६ ) एकदेशिनीः— दोन अवयवीच्या सर्व अवयवांचे बाबतींत साम्य असून त्या अवयवींत मात्र साम्य नसणें.

या शेवटच्या दोन भेदांत अवयवी उपमित असणें व नसणें एवढाच फरक राहातो. म्हणजे त्या दोहोंत दोन भेद मानण्याइतका फरक दिसत नाहीं; व म्हणूनच कदाचित् हे भेद पुढें मानले गेले नसतील. रूपकाचे अवयव—अवयवीवरून पाडलेले भेद पुढेंही स्वीकारले आहेत पण उपमेचे मात्र मानले गेले नाहींत. याच्या समासगोपमेंतही कांहीं भेदांना विशेष स्थान देण्याजोगें त्यांत वैचित्र्य दिसत नाहीं. कारण समास ज्यांचा करावयाचा त्यांच्या केवळ स्थानभेदांवरून त्या भेदांना महत्त्व येणार नाहीं अगर त्यांत वैशिष्ट्यही नाहीं. समासगोपमेंतील दुसरा व तिसरा भेद असेच आहेत. चौथा भेद क्यच् आहे. तेव्हां उरलेल्या समासगोपमाभेदांत इवादि प्रयोग न करणें एवढेंच विशेष आहे. ही समासगोपमा लुप्तोपमाच होऊं शकेल. यावरून उद्भटापेक्षां ग्राह्य असें निराळें रुद्रटांत कांहींच सांपडलें नाहीं.

९. मम्मटः—साधर्म्यमुपमा भेदे[१]।

रा. सोवनी यांनीं History and significance of Upama या निबंधांत असें म्हटलें आहे कीं, "This definition of Upama given by गार्ग्य, is remarkable, as it tallies with the definition given by Mammata. Upama is similarity in defference. It is probable that Mammata gave this definition having in view the definition of Upama by Gargya" रा. सोवनींचें हें म्हणणें खरें असेल पण पुढें ते म्हणतात, "Although in doing so he laid himself to criticism of Jagannath who in his Rasagangadhara complains that Mammata's definition is too wide, as it covers व्यतिरेक figure etc ": जगन्नाथाच्या या आक्षेपाला

१ का. प्र. १०.१२५.

एकटा मम्मटच बळी पडणारा नसून मम्मटापर्यंतचे सर्वच अलंकारशास्त्रज्ञ बळी पडतील, असें दिसतें. कारण गार्ग्यांचें अनुकरण करून मम्मटच फसला असें नसून गार्ग्यांच्या व्याख्येंत रुद्रटापर्यंत शब्दाच्या फरकाशिवाय अर्थामध्यें असा कांहींच पालट झाला नाहीं व तेंच मम्मटानेंही केलें. मात्र मम्मटानें आपली व्याख्या अगदींच त्रोटक केल्यामुळें त्याची व्याख्या थेट आदिमातेच्या वळणावर गेली एवढेंच. व्याख्येला बंधन घालण्याचा प्रयत्न पुष्कळांनीं केला पण तो शब्दमात्र राहिल्यानें निष्फळ झाला. ' भेद असतांना साधर्म्य असणें म्हणजेच उपमा ' असें म्हटल्यानें मम्मटाची व्याख्या मोघम झाली आहे, हें खरें आहे. याचे भेद उद्भटाच्या वळणावर गेले आहेत, एवढेंच नव्हे तर याच्या व्याख्येंतही सादृश्य उद्भटाचेंच दिसतें. साधर्म्य हा शब्द केवळ उद्भट व मम्मट यांनीं वापरला आहे. इतरांनीं साम्य, सादृश्य हे शब्द वापरले आहेत. तेव्हां गार्ग्य गोत्रापेक्षां मम्मटाच्या व्याख्येला उद्भट गोत्रच अधिक जुळतें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मम्मटानें आपल्या उपमाभेदांत विशेष फरक केला असला तर तो हा कीं पूर्णोपमेचें उद्भटानें पांच तर मम्मटानें सहा भेद मानले. उद्भट समासगा उपमा फक्त आर्थीच समजतो पण मम्मट तिला श्रौती व आर्थी समजत असल्यानें त्याचा एक भेद वाढला. लुप्तोपमेचे उद्भटानें बारा भेद केले तर मम्मटानें एकोणीस केले. एकलुप्तेंत उपमान लुप्तेचे दोन, द्विलुप्तेंत धर्मोपमान लुप्तेचे दोन, इवोपमेयलुप्ता एक, धर्मेवादिलुप्ता एक, धर्मलुप्तेंतील एक असे, सात भेद मम्मटाचे वाढले. एकंदरींत मम्मटानें दिलेले २५ भेद असेः—

उपमा

पूर्णा (६) — लुप्ता (१९)

वाक्यगा — समासगा — तद्धितगा | एकलुप्ता

श्रौती — आर्थी श्रौती — आर्थी श्रौती — आर्थी | उपमानलुप्ता — धर्मलुप्ता — वादिलुप्ता

१ २ ३ ४ ५ ६

वाक्यगा — समासगा

१ २

वाक्यगा — समासगा — तद्धितगा

श्रौती — आर्थी श्रौती — आर्थी आर्थी

३ ४ ५ ६ ७

कर्मक्यजूगा — आधारक्यजूगा — क्यङ्गा — कर्तृणमुलगा — कर्मणमुलगा — समासगा

८ ९ १० ११ १२ १३

द्विलुप्ता — त्रिलुप्ता

धर्मोपमानलुप्ता — धर्मेवादिलुप्ता — इवोपमेयलुप्ता उपमानधर्मेवादिलुप्ता

समासगा — वाक्यगा — क्विब्गा — समासगा समासगा समासगा

१४ १५ १६ १७ १८ १९




एकूण विश्वनाथाची उपमा २७ प्रकारची झाली.

अशा रीतीनें व्याकरणांत बुड्या मारण्याबद्दल उद्योतकारांनीं नापसंती दर्शविली आहे. पण भेदाचें खूळ माजलें म्हणजे अभेद होणें फारच कठीण असतें. मम्मटानें उपमेला नखशिखांत व्याकरणानेंच सजविल्यावर पुढील लोकांना या भेदांत आणखी भर टाकण्यास कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. मम्मटानें रुद्रटाच्या मालोपमेचे भिन्न साधारण धर्म व अभिन्न साधारण धर्म यांवरून दोन भेद केले आहेत. तसेंच रशनोपमाही दोन प्रकारें दिली आहे; पण त्यांत वैचित्र्य आहे असें त्याचें मत नाहीं. दण्डीच्या भेदावडंबरांत रशनोपमा हा भेद नाहीं. अग्निपुराणांतील गमनोपमा व रुद्रटाची रशनोपमा सारख्याच आहेत. मध्यंतरीं हा उपमा भेद कोणी मानला नव्हता. तेव्हां उपमेचा प्रपंच हा मम्मटापर्यंत पूर्ण वाढला असें दिसतें.

**रुय्यकः**— 'उपमानोपमेययोः साधर्म्ये भेदाभेदतुल्यत्वे उपमा'[1] मम्मटापेक्षां यानें थोडी दुरुस्ती केली असली तरी त्याच्याही व्याख्येंत अन्य आपत्ति

---

[1] अ. सू. ११.

येतेच. उपमान व उपमेय यांचें साधर्म्य असून भेदाभेदांचा कांटा समतोल असेल तेथें उपमा होते असें रुय्यक म्हणतो. पण व्यतिरेकांतही निषेध–प्रतियोगी सादृश्य असतेंच. रुय्यक भेदप्राधान्य व्यतिरेकांतही असतें असें म्हणतो, पण वस्तुतः व्यतिरेकांत भेदप्राधान्य नसून निषेधप्रतियोगी सादृश्य असतें म्हणून रुय्यकाची व्याख्याही किंचित् सदोषच आहे. रुय्यकानें उपमेच्या व्याख्येंत एक विशेष गोष्ट घातली ती ही कीं उपमानोपमेयांचें साधर्म्य दाखवीत असतांना त्यांतील भेद व अभेद यांचें तुल्यत्व सांगणें. पण याच्या या शब्दांनीं प्रतीपाची व्यावृत्ति झाली नाहीं.

१०. आतां भेदांत भर टाकतां येत नसल्यानें रुय्यकापासून धर्मावर चिकित्सा सुरू झाली. मम्मटानें मानलेले भेद रुय्यकानें अप्रत्यक्षपणें मानून त्यांत साधारण धर्माचें (१) अनुगामित्व (२) बिम्बप्रतिबिम्ब भावत्व (३) वस्तुप्रतिभावत्व असणें यावरून आणखी भेद पडतील असें सांगितलें. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, धर्मांतील वस्तुप्रतिवस्तुभाव हा प्रतिवस्तूपमेंतही असतो. पण प्रतिवस्तूपमेंत दोन वाक्यार्थ असावे लागतात. तसेंच बिंबप्रतिबिंब हा दृष्टांतांतही असतो पण दृष्टान्तांत दोन वाक्यार्थ लागतात. शिवाय प्रतिवस्तूपमा व दृष्टांन्त यांत इवादींचा प्रयोग नसतो.

विश्वनाथः—साम्यं वाच्यमवैधर्म्यं वाक्यैक्य उपमा द्वयोः[१]।

एका वाक्यांत साम्य वाच्य असून वैधर्म्य उक्त नसणें यास उपमा म्हणावें असें विश्वनाथ म्हणतो. पण प्रतीप अलंकारांत उपमान उपमेयाच्या ठिकाणीं ठेऊन दोघांचें साम्य दाखवून वैधर्म्य अनुक्तच असतें, म्हणजे तोही वाच्य साम्याचा एक प्रकार असल्यानें वास्तविक उपमेच्या व्याख्येस त्यामुळें प्रतिकार व्हावयास पाहिजे, तो झालेला नाहीं. विश्वनाथानें पूर्णोपमा सहा प्रकारची व लुप्तोपमा एकवीस प्रकारची मानली आहे. रुय्यकानें साधारण धर्माचे तीन प्रकार दिले. विश्वनाथानें त्या तीन प्रकारांशिवाय शब्दमात्र भिन्नत्वानें असणारा चौथा साधारण धर्म दिला आहे. रुद्रटाची एकदेशवर्तिनी उपमा यानें घेतली आणि साम्याचें वाच्यत्व व गम्यत्व असेल तेव्हां एकदेशवर्तिनी उपमा होते असें म्हटलें. रशनोपमा व मालोपमा हे भेदही यानें मानले आहेत. विश्वनाथानें लुप्तोपमेचें भेददर्शन मम्मटाच्या भेदासारखेंच केलें आहे. अप्पय्यदीक्षित उपमेचें विवेचन करतांना फारसा खोलांत शिरत नाहीं. अप्पय्यदीक्षिताची व्याख्याः—

उपमा यत्र सादृश्यलक्ष्मीरुल्लसति द्वयोः[२]।

"ज्या ठिकाणीं सादृश्य हें आल्हाददायक असतें अशा उपमानोपमेयांच्या मांडणीस उपमा म्हणावयाचें." यानें उपमेचे नऊ भेद केले आहेत. पूर्णोपमा एक व लुप्तोपमा आठ प्रकारची होते. (१) धर्मोपमानलुप्ता (२) धर्मोपमानवाचक-

---

१ सा. द. १०·१४. २ कु. १

लुप्ता ( ३ ) वाचकलुप्ता ( ४ ) धर्मलुप्ता ( ५ ) धर्मवाचकलुप्ता ( ६ ) वाचको-पमेयलुप्ता ( ७ ) उपमानलुप्ता ( ८ ) वाचकोपमानलुप्ता.

११. जगन्नाथानें सर्वांवर वाक्प्रहार करीत आपली व्याख्या केली ती अशीः—

सादृश्यं सुन्दरं वाक्यार्थोपस्कारकमुपमालंकृतिः[1]।

उद्भटानें चेतोहारि साधर्म्य असें म्हणून आपल्या व्याख्येंत नाविन्य आणलें. पण त्याच्या व्याख्येंत कांहीं व्यर्थ शब्दही होते, ते पुढें काढळे गेले. प्रतीपालंकाराचे वेळीं विवेचन केल्याप्रमाणें जगन्नाथ आपल्या उपमेंत, उपमेयोपमा व प्रतीप यांना संग्रहित करतो. पण एका उपमेयोपमेला उपमेंत अंतर्भूत केली तरी प्रतीपांतील सादृश्य अगदीं प्रतियोगी स्वरूपाचें असल्यानें कांहींच्या मतें प्रतीपाला उपमेच्या छायेखालीं न आणणेंच युक्त होईल. 'तो रंक असून राजाप्रमाणें वागतो' व 'तो राजा रंकाप्रमाणें वागतो' हीं दोन वाक्यें अगदीं निराळ्या तऱ्हेचीं आहेत. पहिल्यांत रंकाची बडेजावी तर दुसऱ्यांत राजाचा साधेपणा दिसल्यामुळें अनादर, आदर अशा भिन्न भावना उत्पन्न होतात. तद्वतच या दोन अलंकारांतलि भावना निरनिराळ्या असल्यानें प्रतीपाचें सादृश्य उपमेंत आहे असें कसें म्हणतां येईल ? 'सिंहाप्रमाणें पराक्रमी राजा' व 'राजाप्रमाणें पराक्रमी सिंह' या दोन वाक्यांत उपमेयाचीं स्थानें अगदीं भिन्न स्थितींत असतात. तेव्हां प्रतीप व उपमा यांतील सादृश्य एकच समजून त्यांना एकाच व्याख्येनें बद्ध करतां येणार नाहीं. प्रतीप व व्यतिरेक हे मात्र भिन्न अलंकार मानूं नयेत; पण उपमेची अगदीं कांटेकोर व्याख्या करणें असल्यास त्यांचा उपमेंत प्रवेश करतां येणार नाहीं. तेव्हां उपमेची व्याख्या बदलून 'उपमानोपमेययोरप्रतियोगिसादृश्यं सुन्दरं वाक्यार्थोपस्कारकमुपमालंकृतिः' अशी व्याख्या सुचवावी असें वाटतें. असो. जगन्नाथानें मम्मटाप्रमाणेंच पंचवीस भेद मानले आहेत. या भेदाचें ( १ ) व्यङ्ग्यवस्तूपस्कारिका ( २ ) व्यंग्यालंकारोपस्कारिका ( ३ ) वाच्यवस्तूपकारिका ( ४ ) वाच्यालंकारोपस्कारिका ( ५ ) रसोपस्कारिका असे प्रत्येकीं पांच भेद होऊन एकशें पंचवीस भेद होतील, शिवाय धर्मस्वरूप व अन्य कारणांनीं जगन्नाथानें उपमेचें आनन्त्य दाखविलें आहे. उपमेचा धर्म कसा असावा हें सांगतांना रुय्यकानें धर्माचे तीन प्रकार, विश्वनाथानें चार प्रकार व जगन्नाथानें सात प्रकार सांगितले. ( १ ) अनुगामी ( २ ) बिम्बप्रतिबिंबभाव ( ३ ) उभय ( ४ ) वस्तुप्रतिवस्तुभावानें युक्त बिंबप्रतिबिंबभाव ( करंबित ) ( ५ ) उपचरित ( ६ ) केवलशब्दात्मक ( ७ ) हेतुहेतुमद्भाव.

एकंदरींत ज्या उपमेच्या सादृश्याची नीटशी कल्पनाही एके काळीं नव्हती ती उपमा वैभवाला चढतां चढतां सर्व अलंकारामध्यें राज्ञीपद मिरवूं लागली. सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास उपमेंतूनच बहुतेक अर्थालंकारांचा जन्म झाला. पण उपमेहून

[1] र. गं. १५७.

थोडा भिन्न, किंचित् भिन्न असा एकेक अलंकार होऊन त्यांतही किंचित् फरकानें पुनः उपशाखा फुटल्या. अशा तऱ्हेनें किंचित् फरकानें प्रत्येक अलंकार वाढतां वाढतां मूळ उपमा व तो अलंकार ह्यांचा कधींतरी, कांहीं पिढ्यांपूर्वी संबंध असेल असेंही वाटत नाहींसें झालें. येथें ही एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं उपमेचा कीस काढून अनेक अलंकार व अनेक भेद निर्माण करूनही केवळ उपमेची ह्मणून खास व्याख्या करीत असतां ती शेवटपर्यंत निर्दोष करतां आली नाहीं. वस्तुतः किंचित् फरकानें स्वतंत्र भेद अगर अलंकार मानण्याची प्रवृत्ति काव्यसौंदर्याचे दृष्टीनें गौण असून उपमेंतील 'सुंदर सादृश्य' ह्या एकाच व्यापक विशेषाखालीं जेवढे अलंकार पुनः एकत्रित करतां येतील तितके करणें अवश्य आहे. दण्डीच्या उपमा भेदांत आपण इतर अलंकारांची छाया कशी दिसतें तें पाहिलेंच आहे. दण्डीनें उपमा भेदही केले तसेंच स्वतंत्र अलंकारही मानले. वस्तुतः तसें न करतां अनन्वय, स्मरण, उपमेयोपमा, प्रतीप, व्यतिरेक या-सारखे अलंकार उपमा या एकाच नांवांत समाविष्ट करावे. व सुंदर सादृश्य कशा व किती तऱ्हेनें असूं शकेल एवढें स्पष्टीकरण फार तर द्यावें. असो.

११. उपमेचीं कांहीं उदाहरणें घेऊन उपमाविवेचन संपूर्ण करूं. अभिन्नसाधारणधर्मा मालोपमाः— सौभद्र म्हणे,[1] शिरतों व्यूहीं डोहीं जसा मतंगज वा।
हरिपोत दंतियूथीं कीं दहनीं करुनियां पतंग जवा॥

यांत सर्वांच्या कृतींत सौकर्य हा एक सामान्य धर्म असून उपमांची माला असल्यानें मालोपमा झाली.

पुढें[2] मानस सरोवर। समुद्रप्राय देखिलें थोर।
अमृतातुल्य अति मधुर। शरयू पाट जेथींचा॥

येथें थोरपणा व मधुरता हे भिन्न गुण दाखविले आहेत म्हणून ही भिन्नसाधारण-धर्मा मालोपमा झाली.

रशनोपमाः— एक उपमेय दुसऱ्या वाक्यांत दुसऱ्या उपमेयाचें उपमान होणें, पुनः तें दुसरें उपमेय तिसऱ्या वाक्यांत उपमान होणें, अशा क्रमानें असणाऱ्या उपमेला रशनोपमा म्हणतात. उः—

आकारसदृशी[3] प्रज्ञा प्रज्ञया सदृशागमः।
आगमैः सदृशारंभा आरंभ सदृशोदयः॥

त्रिलोपमाः— सव्य घालुनी[4] मृगनयना। केसरी गेला विशाल वना।

येथें मृगनयना म्हणण्यांत, मृगाच्या नयनाप्रमाणें नयन आहेत जिचे ती स्त्री (दमयंती) असा अर्थ होतो. मृगाचे नयन हें उपमान येथें लुप्त आहे तसेंच साधारण धर्म व तद्वाचकशब्द हेही अनुक्त आहेत. मृगनयना शब्दाचा लक्षणेनें अर्थ काढ-

---

१ मो. २ मु. ३ रघुवंश. ४ मु.

ल्यास मात्र ही त्रिलुप्ता होणार नाहीं; पण वर सांगितल्याप्रमाणें बहुव्रीहि समास सोडविला म्हणजे ही त्रिलुप्ता होते.

नृपाळा ! पाहे धुंडोनी । हंसातुल्य न जनीं ।
तन्ही माझी विनवणी । अव्हेरावी न तुवां ॥[1]

येथें हंसाचें उपमान अगर सामान्य धर्म अनुक्त असल्यानें ही समासगा उपमानधर्मलुप्ता झाली. येथें हंसाशीं तुल्य असा पाठ केल्यास हीच वाक्यगा होईल.

संस्कृताप्रमाणें मराठींत 'सुतीयती' 'विधवति' अशी रूपें आढळत नाहींत; तरीही नामाक्रियापदें करण्याचा कित्येक ठिकाणीं परिपाठ असल्यानें त्याला अनुसरून उदाहरण देतां येईल.

भमि दुर्योधन गदी । हाणिति हारिती शुद्धी ।
शेखीं भमि महातेजी । नक्षत्रला दुर्योधन ॥[2]

दुर्योधन नक्षत्रला म्हणण्यांत धर्म व तद्वाचक शब्द अनुक्त असल्यानें क्विब्गा द्विलुप्ता झाली. उदाहरणः—

गुणैरुत्तुङ्गतां याति नोच्चैरासनं स्थितः ।
प्रासादशिखरस्थोऽपि काकः किं गरुडायते ।[3]

गरुडायते याचा अर्थ गरुड इव आचरति असा असल्यानें क्यङ् वादिलुप्तेचें हें उदाहरण होईल.

मृगं पुत्रीयती तथा कान्तारेऽन्तः पुरीयती ॥[4]

येथें पुत्रीयति याचा अर्थ पुत्रमिव लालयति असा होत आहे; तसेंच अन्तःपुरीयति म्हणजे अन्तःपुरे इव गच्छति असा अर्थ होत असल्यानें हें क्यच् वादिलुप्तेचें उदाहरण झालें.

दुर्मतिं राहुदर्शं ताः पश्यन्ति सकलाः स्त्रियः ।[5]

येथें राहुदर्शं म्हटल्यानें राहुदर्शनाप्रमाणें त्या दुर्मतीला पाहतात असा अर्थ होतो. दर्शं पश्यन्ति म्हणण्यांत णमुल्चा प्रयोग असून येथें कर्मासारखा उपयोग असल्यानें वादिलुप्तेचा कर्मणमुल् हा भेद झाला.

विश्वामित्रैस्तदा दुष्टाचारमाचरति क्रुधा ।[6]

दुष्टाचारमाचरति म्हणण्यांत दुष्टाप्रमाणें वागतो असा अर्थ होतो. आचारं आचरति असें म्हणून होणारें णमुल् हें कर्तृणमुल् असल्यानें हा वादिलुप्तेचा कर्तृणमुल् भेद झाला. असो. इतर भेदांचीं उदाहरणें पूर्वीं आलीं आहेत.

येथें एक वादाचा प्रश्न आहे तो म्हणजे 'सुतीयति' 'विधवति' असें म्हणण्यांत कित्येकांच्या मतें इवादिलुप्त नसून ते निराळ्या स्वरूपांत तेथें हजर असतात. व कित्येकांच्या मतें 'य' 'व' हे जे वर्ण त्यांत येतात ते आचार दाखवितात त्यामुळें इवादि हजर असतात असें म्हणतां येत नाहीं. पण हा वाद प्रारंभीं झाला आहे

---

१ स्वकृत. २ स्वकृत. ३ सुभाषितरत्नभांडार. ४ स्वकृत. ५-६ स्वकृत.

पुढें त्याला कोणी विशेषसें महत्त्व दिलें नाहीं. बहुतेक सर्वांनींच हे भेद मानले आहेत.

## २ अनन्वय.



१२. उपमा ही अलंकारांची जननी आहे. अनन्वय हा अलंकारही उपमेंतून निर्माण झाला असल्यानें त्यांत उपमाभावाचें महत्त्व आहे हें सांगणें नकोच. अन्वय नाहीं ज्याला तो अनन्वय. एखाद्या वस्तूचा संबंधी मिळत नाहीं, तिच्यासारखा दुसरा कोणी नाहीं असें सांगणारा जो तो अनन्वय अलंकार होय. भरतानें या अलंकाराची व्याख्या केली नाहीं, पण याची सदृशी उपमा अनन्वयासारखीच वाटते त्यासाठीं तिचें भरतानें दिलेलें उदाहरण पाहूं:—

यत्त्वयात्र कृतं कर्म परचित्तानुरोधिना ।
सदृशं न तथैव स्यादतिमानुषकर्मणः ॥[1]

येथें ' सदृशं न तथा ' असें म्हणण्यांत अनन्वय झाला.

भामहः—यत्र तेनैव तस्य स्यादुपमानोपमेयता ।
असादृश्यविवक्षातस्तमित्याहुरनन्वयम् ॥[2]

एकाद्या गोष्टीशीं दुसऱ्या कोणाचेंही असादृश्य दाखविण्यासाठीं तीच गोष्ट उपमान व उपमेय होते तेव्हां अनन्वय होतो. यांत दुसरी तुल्य गोष्ट न सांपडल्यानें उपमेयच उपमान होतें म्हणून याला अनन्वय म्हटलें आहे.

झाले बहु[3] होतिल बहु आहेतहि बहु परंतु यासम हा ।
यास महादेवा ! दे जय, पाहिन कधीं धनंजयासम हा ॥

यांत अर्जुनाला दुसरें उपमानच नसल्यानें 'यासम हा' असें म्हणावें लागलें म्हणून हा अनन्वय झाला. दण्डीनें अनन्वय अलंकार सांगितला नाहीं तरी त्याची असाधारणोपमा ही अनन्वयच होय:—

चंद्रारविंदयोः कक्ष्यामतिक्रम्य मुखं तव ।
आत्मनैवाभवत्तुल्यमित्यसाधारणोपमा ॥[4]

यांत दण्डीनें अनन्वयच साधला आहे.

उद्भटः—यत्र तेनैव तस्य स्यादुपमानोपमेयता ।
असादृश्यविवक्षातस्तमित्याहुरनन्वयम्[5] ॥

यानें भामहाचीच व्याख्या घेतली आहे. रुद्रटानें अनन्वय स्वतंत्र न मानतां अनन्वयोपमा हा उपमाभेदच मानला आहे.

सा स्यादनन्वयाख्या[6] यत्रैकं वस्त्वनन्यसदृशमिति ।
स्वस्य स्वयमेव भवेदुपमानं चोपमेयं च ॥

---

१ ना. शा. १६·१२. २ भा. लं. ३·४४. ३ मो. वि. पर्व ४·७५.
४ का. द. २·३७. ५ का. सा.स ६·७११. का. लं. ८·१.

मम्मटः—उपमानोपमेयत्वे एकस्यैवेकवाक्यगे । अनन्वयः[1] ॥

रुय्यकः—एकस्यैवोपमानोपमेयत्वेऽनन्वयः[2] ॥

विद्याधरः—अनुगतिरूपमङ्गनामेकस्मिन्नेव जायते वाक्ये ।
यद्येकस्य तदानीमन्वर्थोऽनन्वयः[3] कथितः ॥

अप्पय्यदीक्षितः—उपमानोपमेयत्वं यदेकस्यैव वस्तुनः[4] ।

विश्वनाथः—उपमानोपमेयत्वमेकस्यैव त्वनन्वयः[5] ॥

जगन्नाथः— द्वितीयसदृशव्यवच्छेदफलकवर्णनविषयीभूतं यदेकोपमानोपमेयकं सादृश्यं तदनन्वयः[6] ॥

जगन्नाथानें अनन्वयही पुष्कळ अंशीं उपमेसारखाच विचारांत घेऊन त्याचे भेद पाडले आहेत. विश्वनाथापर्यंत अनन्वयाचें व्याख्येपेक्षां जास्त विवेचन कोणीच केलें नाहीं. फक्त विश्वनाथ म्हणतो कीं, लाटानुप्रासांत व अनन्वयांत फरक हा कीं उपमेय जेव्हां उपमान होतें तेव्हां उपमेयवाचक शब्द पालटून त्याच अर्थी दुसरा शब्द घातला तरी अनन्वय होतो. तसें लाटानुप्रासांत चालत नाहीं. अनन्वयांत अर्थाला महत्व व लाटानुप्रासांत शब्दसादृश्याला महत्व आहे. जगन्नाथ म्हणतो, अनन्वय हा कधीं उपकारक तर कधीं शुद्ध असतो. यांत धर्म वाच्य अगर व्यङ्ग्य असतो पण प्रतिबिंबभावात्मक धर्म मात्र यांत नसतो. हा अनन्वय दोन प्रकारचा (१) पूर्ण व (२) लुप्त. पूर्णानन्वय हा उपमेप्रमाणेंच सहा प्रकारचा आहे. लुप्तानन्वयांत धर्मलुप्त हा भेद पांच प्रकारचा आहे. (१) श्रौत-वाक्यग (२) श्रौतसमासग (३) आर्थवाक्यग (४) आर्थसमासग (५) तद्धितग शिवाय धर्मवाचकलुप्त व वाचकधर्मोपमानलुप्त हेही अनन्वय भेद आहेत. उपमानलुप्तानन्वय इत्यादि भेद यांत संभवतच नाहींत व ते हृद्यही नाहींत असें जगन्नाथ म्हणतो. अनन्वयाचीं उदाहरणें:—

(१) असो[7] ऐसी सुखाडभरित । सभा निर्मिली अत्यद्भुत ।
उपमे तुळितां गगनांत । स्वर्ग पारुडें वरुतें ॥

(२) असि साधु साधुपतिसीं गांठ पडे ती जशी अया परिसा
यापरि साचा हाचि प्रेमळ याच्याचि या जया परिसा ॥

पहिल्या उदाहरणांत व्यङ्ग्य अनन्वय आहे. व दुसऱ्या उदाहरणांत साधारण धर्म, उपमानोपमेय व वाचक शब्द उक्त आहे म्हणून हा पूर्णान्वय झाला.

(३) परिसोनी नारदाच्या गोष्टी । वशिष्ट सुखावला पोटीं ।
सभे गर्जोनि म्हणे, 'सृष्टी । उपमा त्यासी तो एक' ॥

---

१ का. प्र. १०·१३५. २ अ. सू. १२. ३ ए. ८·४. ४ कु. २. ५ सा. द. १०·२६० ६ र. गं. २०१. ७ मु. स. पर्व २·६. ८ मो. उ. पर्व. ९ मु. हरिश्चंद्राख्यान २५.

## ३ उपमेयोपमा.



१३. उपमेय हेंच एकदां उपमान होतें तेव्हां उपमेयोपमा होते. भामहापूर्वी या अलंकाराची व्याख्या आपणांस पहावयास मिळत नाहीं. भामहः—

उपमानोपमेयत्वं यत्र पर्यायतो भवेत्[1]।
उपमेयोपमां नाम ब्रुवते तां यथोदिताम् ॥

उपमान व उपमेय हीं स्थानें बदलून उपमेय व उपमान अशीं होतात तेव्हां त्याला उपमेयोपमा म्हणतात. उपमेयोपमेंतही अनन्वयाप्रमाणेंच तत्सदृश असें तिसरें कोणीं नाहीं असा भाव असावा लागतो, पण तो भामहानें आपल्या व्याख्येंत गोंविलेला दिसत नाहीं. दण्डीनें अन्योन्योपमा हा उपमाभेद मानला आहे तो उपमेयोपमाच आहे. भामहाच्या उदाहरणांत एक कांहीं विशेष दिसत असेल तर उपमान व उपमेय हीं एकदां ज्या शब्दरूपानें आपणांस दिसतील त्याच शब्दरूपानें पुनः दिसलीं पाहिजेत असें नाहीं; पण त्या शब्दांनीं किंवा पालटलेल्या शब्दरूपानें प्रथमोक्त गोष्टच निदर्शित झाली पाहिजे. असो. दण्डीची अन्योन्योपमा ही 'अन्योन्योत्कर्षशंसिनी' — एकमेकांचा उत्कर्ष वाढविणारी आहे. तिच्यांतही तिसऱ्या वस्तूशीं सदृशताभाव नष्ट झाला नाहीं या दृष्टीनें पाहतां याच्या नियमोपमेंतच उपमेयोपमेचा भास अधिक होतो. नियमोपमेंत उपमान उपमेयांचीं स्थानें पालटलीं नसलीं तरी उपमानोपमेयासारखी तिसरी गोष्ट नाहींच हा जो उपमेयोपमेंतील मुख्य भाग तो तींत दिसतोः—

त्वन्मुखं कमलेनैव तुल्यं नान्येन केनचित्[2] ॥

हें उदाहरण मुख व कमल या दोहोंसारखी तिसरी वस्तु नाहीं असें सांगतें, म्हणून निदान व्यङ्ग्य उपमेयोपमेचें हें उदाहरण होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं.

उद्भटः— अन्योन्यमेव यत्र स्यादुपमानोपमेयता[3] ।
उपमेयोपमामाहुस्तां पक्षान्तरहानिगाम् ॥

उद्भटानेंच प्रथमतः 'पक्षान्तरहानिगाम्' म्हणून स्पष्ट शब्दांत तिसऱ्या गोष्टीला तुलनेला येण्यास प्रतिबंध केला.

वामनः— क्रमेणोपमेयोपमा[4] ॥

"एकाच अर्थाच्या उपमानत्वाचें व उपमेयत्वाचें क्रमानें स्थान पालटणें" उद्भटानें केलेली सुधारणा वामनानें न घेतल्यानें याच्या व्याख्येंत भामह-दण्डीपेक्षां विशेष कांहीं दिसत नाहीं.

रुद्रटानें उपमेंत उपमेयोपमेसारखाच उभयोपमा हा भेद पाडला आहेः—

---

१ भा. लं. ३·३६. २ का. द. २·११. ३ का. सा. सं. ५·६५. ४ का. सू. ४·३·१५.

उभयोरुपमानत्वं सक्रममुभयोपमा सान्या ॥[1]
याच्या व्याख्येंतही उद्भटानें केलेला फरक दिसत नाहीं; कारण यानें अनन्वय हा स्वतंत्र अलंकार मानला नाहीं. वामनाची व्याख्याच पण त्यांच्या टीकेंतील उपमानत्व हा शब्द घेऊन रुद्रटानें स्वतःची म्हणून दिल्यासारखी वाटते.

मम्मटः--विपर्यास उपमेयोपमा तयोः।[2]

मम्मटानें व्याख्येंत जरी नाहीं तरी टीकेंत 'इतरोपमानव्यवच्छेदपरा' असें म्हणून त्या दोहोंतून निराळ्या उपमानाचा व्यवच्छेद केला.

रुय्यकः—द्वयोः पर्यायेण तस्मिन्नुपमेयोपमा।[3]

रुय्यकानें इतर उपमानांचा व्यवच्छेद केला नाहीं. उपमेयोपमेचे त्यानें दोन भेद केलेः—(१) धर्माचें साधारण्य असणारी व (२) वस्तुप्रतिवस्तु निर्देशानें धर्म असणारी किंवा बिम्बप्रतिबिम्बत्व असणारी.

विद्याधरः--यद्युभयोः पर्यायात् स्यादुपमानोपमेयत्वम्।
सन्निहितवाक्यभेदे सत्युपमेयोपमा द्विविधा ॥[4]

विश्वनाथः--पर्यायेण द्वयोरेतदुपमेयोपमा मता।[5]

विद्याधरानें व विश्वनाथानें तृतीयसदृश वस्तु नसणें हेंच उपमेयोपमेंतील वैशिष्ट्य म्हटलें आहे. पण विद्याधरानें उपमेयोपमेचे भेद मात्र रुय्यकापासून जसेचे तसेच घेतले, विश्वनाथानें घेतले नाहींत.

अप्पय्यदीक्षितः-पर्यायेण द्वयोस्तच्चेदुपमेयोपमा मता ॥[6]

जगन्नाथः— तृतीयसदृशव्यवच्छेदबुद्धिफलकवर्णनविषयीभूतं परस्परमुपमानोपमेयभावमापन्नयोरर्थयोः सादृशं सुन्दरमुपमेयोपमा।[7]

रुय्यकाच्या दोन भेदांप्रमाणेंच याचे भेद आहेत. पण(१) व्यक्तधर्मा व(२)उक्तधर्मा. हीं नांवें त्यानें निराळीं दिलीं आहेत. उपमेप्रमाणेंच उपमेयोपमेच्या उक्तधर्माचीं स्थानें व प्रकार जगन्नाथ देतोः- (१) अनुगामी (२) बिम्बप्रतिबिम्बभाव असणारा धर्म (३) उपचरितधर्म. (४) केवल शब्दात्मकधर्म. वरील मुख्य दोन प्रकारांशिवाय व्यंग्या व लक्षणा इत्यादि प्रकारें होणारी उपमेयोपमा जगन्नाथानें वर्णिली आहे. एकूण उपमेप्रमाणें उपमेयोपमेचे सर्व भेद होऊं शकतात. उपमेयोपमेचें उदाहरणः—

(१) द्रोणार्जुन तुल्यक्रिय बिम्बप्रतिबिंबसोचि ते गमती।[8]
(२) रायां तिचें मुख सुधाकर या द्वयाला।
नाहींच वेगळिक हें गमतें मनाला ॥[9]

## ४ स्मरण.

१४. स्मरण अलंकाराचा विचार वामनापर्यंत झाला नाहीं. रुद्रटानें त्याची व्याख्या केली ती अशीः—

वस्तुविशेषं दृष्ट्वा प्रतिपत्ता स्मरति यत्र तत्सदृशम्।
कालांतरानुभूतं वस्त्वन्तरमित्यदः स्मरणम् ॥[10]

---

१ का. लं. ८·९ २ का. प्र. १०·१३६. ३ अ. सू. १३. ४ ए. ८·३. ५ सा. १०·२७. ६ कु. (३) १२. ७ र. गं. १९६. ८ मो. वि. पर्व ५·१७. ९ र. पं. नलदमयंती. १० का. लं. ८·१०८.

" जेव्हां एकादी विशेष गोष्ट पाहून कालांतरीं अनुभविलेली तत्सदृश वस्तु आठवते तेव्हां स्मरण अलंकार होतो." स्मरण अलंकारांत स्मृति होणें एवढ्यालाच महत्व नसून वस्तूंतील सादृश्यामुळें कविप्रतिभेनें उत्पन्न झालेलें स्मरण पाहिजे. "या घरांत गेल्यावर मला चष्मा विसरल्याची आठवण झाली" असें म्हणण्यांत स्मरण अलंकार होणार नाहीं.

मम्मटः— यथानुभवमर्थस्य दृष्टे तत्सदृशे सति । स्मरणम्[1] ॥

रुय्यकः—सदृशानुभवाद्यत्र स्मर्येत तत् स्मरणम्[2] ।

विश्वनाथः--सदृशानुभवाद्वस्तुस्मृति स्मरणमुच्यते[3] ॥

अप्पय्यदीक्षितः—स्यात्स्मृतिभ्रांतिमत्संदेहैस्तदंकालंकृतित्रयम्[4] ॥

जगन्नाथः—सादृश्यज्ञानोद्बुद्धसंस्कारप्रयोज्यं स्मरणं स्मरणालंकारः[5] ॥

मम्मट, रुय्यक, विद्याधर, विश्वनाथ यांनीं सदृशानुभवानें स्मरण होणें असें म्हटलें आहे. जगन्नाथानें सादृश्यज्ञानामुळें पुनः होणारा जो संस्कार यानें स्मरण होऊन स्मरण अलंकार होतो असें म्हटलें आहे. या बाबतींत जगन्नाथाचें म्हणणेंच बरोबर दिसतें. कारण 'स्मरणां'त अनुभवज्ञानाला महत्त्व नाहीं. त्यावेळीं झालेल्या वस्तुज्ञानानें तत्सदृश संस्कार पुनः झाला असतां स्मरण अलंकार होतो. स्मरणांत आलेली गोष्ट तत्सदृश असावी लागते. स्मरणालंकार कधीं व्यङ्ग्यही असेल. उदाहरणासाठीं प्राकृत उदाहरण घेऊं:—

बर्हिणि पइं इअ अब्भत्थिआमि आअक्खहि मं ता ।
इत्थ वण भमन्ते जइ तइ दिट्ठी सा महु कांता ।
णिसम्महि मिअङ्कसरिसवअण्णा हंसगई ।
ए चिण्हे जाणिहिसि आ अक्खिड तुज्झ मई[6] ॥

यांत व्यंग्य स्मृति आहे.

मातें कमलमृणालें विलोकितां स्मराति युवतिच्या सुभुजा ।
प्रणयक्रोधें मजला बद्ध करायासि सर्वथा विभु ज्या ॥
अलि-पुंज देखतां मज सीतेचे केश लक्ष्मणा! स्मरती ।
तत्कबरीसम हे शिखिपिच्छकलाप स्वमानसीं भरती[7] ॥

येथें कमल-मृणाल, अलिपुंज, शिखिपिच्छकलाप पाहून पत्नीचे सुभुज, केश व कबरी यांची आठवण झाली. अर्थात् कमल-मृणाल अलिपुंज इत्यादि वस्तू सुभुज, केश इत्यादिसारखेच असल्यानें कालांतरानेंही त्यांजकडे पाहून तत्सदृश स्मृति झाली, म्हणून हा स्मरणालंकार झाला.

---

१ का. प्र. १०·१९९. २ अ. सू. १४. ३ ए. ८·५. ४ सा. द. १०·२७. ५ कु. ८·९·१०. र. गं. २१६. ६ विक्रमोर्वशीय. ४·२०. ७८ मो.

# प्रकरण १५ वें

## १ संकर.

१. श्लेष प्रकरणांत, श्लेष हा इतर अलंकारांशीं संकीर्ण असतां (१) श्लेष प्रधान मानावा (२) श्लेष व दुसरा अलंकार यांचा संकर समजावा (३) श्लेष हा गौण समजावा, अशीं तीन मतें सांगितलीं होतीं.

हा प्रश्न श्लेषासंबंधीं तसाच अतिशयोक्तीसंबंधीं येणें शक्य आहे. अशा स्थितींत संकर म्हणजे काय याचा विचार करावयास पाहिजे. संकर हा कुलघ्न आहे तो कोणाचेंही एकाचें कुल प्रकाशवीत नाहीं. दोघांचा अगर जेवढे अलंकार सांपडतील तेवढ्यांचा गोंधळ करून टाकतो, म्हणून संकर हें नांव पडलें आहे; मात्र काव्यसृष्टींत संकर हा नवीन चैतन्य आणतो.

भामहानें संकर उल्लेखिला नसला तरी संसृष्टि–प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें दण्डीनें संसृष्टीचा जो प्रथम भेद मानला आहे तो पुढील संकरच होय. उद्भटानें प्रथमच संकराची व्याख्या केली:—

अनेकालंक्रियोल्लेखे समं तद्वृत्तिसंभवे ।
एकस्य च ग्रहे न्यायदोषाभावे च संकरः ॥

एकाहून अधिक अलंकार एके ठिकाणीं असून त्यांचा व्यापार सारख्याच महत्त्वाचा असेल अशा वेळीं कोणता अलंकार स्वीकारावा हें निःपक्षपातित्वानें सांगतां येत नाहीं तेव्हां संकर होतो. उद्भटानें संकराचे चार भेद केले. (१) संदेहसंकर (२) शब्दार्थवर्त्यलंकार संकर (३) एकशब्दाभिधान संकर (४) अनुग्राह्यानुग्राहक संकर. यांपैकीं पहिल्या भेदांत कोणता महत्त्वाचा अलंकार तें ओळखतां येत नाहीं, दुसऱ्या भेदांत शब्दालंकार व अर्थालंकार एका वाक्यांत एकत्र असतात. तिसऱ्या भेदांत दुसऱ्या भेदांतीलच स्थिति पण ती एका वाक्यांशांत असते. चौथ्या भेदांत एकमेकांना उपकारक अशा अलंकाराचें स्वतंत्र अस्तित्व नसतें.

या भेदांवरून असें दिसून येईल कीं दण्डीची संकराची व्याख्या उद्भटानें व्यापक केली आहे. रा. बनहट्टींनीं उद्भटावरील टीकेंत "It will be clear from this that Udbhatta is greatly advanced in ideas about संकर

---

१ का. सा. सं ५-११.

beyond Bhamaha and Dandin. " असें ह्मटलें आहे; पण दण्डीनें संकराची व्याख्या जरी केली नसली तरी संसृष्टीचा पहिला भाग जो 'अङ्गाङ्गि-भावसंस्थानम्' यांत पुढील संकराची स्पष्ट व्याख्याच दिल्यासारखी आहे यांत शंका नाहीं. उद्भटानें वरील चार भेद मानले आहेत असें इन्दुराज, म्हणतो; पण त्या सर्व भेदांचा इत्यर्थ एकच आहे या दृष्टीनें पाहतां संकराचे चार भेद करून त्याला चार नांवें दिलीं आहेत तशीं दिलीं नसतीं तर अधिक चांगलें झालें असतें. त्याऐवजीं वर दिलेल्या चार गोष्टींपैकीं कोणत्याही स्थितीला संकर ह्मणतां येईल असें म्हणणें ठीक झालें असतें. पहिल्या भेदाला संदेह संकर कां म्हणावयाचें तर त्यांत संदेह उत्पन्न होतो म्हणून, तर पुढील तिन्ही स्थितींतही असा संदेहच उत्पन्न होतो मग पहिल्यालाच संदेह संकर कां म्हणावयाचें ! त्याचप्रमाणें वाक्य व वाक्यांश यावरून दोन भेद पाडण्याचेंही कांहीं विशेष कारण दिसत नाहीं, व दोघांना दोन नांवें देण्याचें कारण दिसत नाहीं. असो.

अरुणे[1]-चितारी नभःपटाला रंगवितो काय ।
प्रतिभा--पूरित करी जगाला कीं हा कवि-राय ॥

यांत 'अरुणा'वर 'चिताऱ्या'चा आरोप केल्यानें रूपक होऊन तें प्रथमार्धांत विखुरलें आहे. व त्याच वेळीं संदेह अलंकारही होत आहे. यावेळीं रूपक काढूनही संदेह होऊं शकतो. किंवा संदेह नाहींसा करूनही रूपक वठतें. अशा वेळीं हा अलंकार संदेह कीं रूपक हा प्रश्न पडतो. या दृष्टीनें हें पहिल्या प्रकारचें उदाहरण होईल.

किंवा[2] 'माझी चोरुनि नेली मोत्यांची माला'
म्हणूनि नभःश्री रुसली, आली लाली गालाला ॥

यांत दुसऱ्या चरणांत अनुप्रास आहे. वामनाच्या 'सादृश्याल्लक्षणा वक्रोक्तिः' या नियमानें वक्रोक्तिही आहे किंवा एकंदर संदेह अलंकार आहेच; म्हणून शब्दार्थालंकारांचा संकर झाला आहे. हा दुसरा प्रकार होईल.

परोपकारीं[3] निज जीवनाला वेंचावया अंबुद-राज आला ।
तदादरा इंद्र-धनु-स्वरूप शोभे जणूं तोरण रम्यरूप ॥

पहिल्या ओळींत जीवन या शब्दावर श्लेष आहे व एकंदर रूपक आहे. हेंही दुसऱ्या प्रकारचें उदाहरण होईल.

करी[4] मंगलाचरणा मंजुळ द्विज गुंजारव हा ।
येत्या संसाराची नांदी चाले काय अहा !

---

१ क. र. हा.-बालकवि-अरुण. २ क.र. हा. बालकवि अरुण. ३ क. र. हा. इंद्रधनुष्य. ४ वाघे.-अरुण.

यांत द्विज या वाक्यांशानेंच उपमा अगर श्लेष होतो.

इंद्रें चाप धरुनि मुष्टी रोहिणी मृगांचिया पाठी ।
मेघ धारा-जीवन वृष्टी करीत वेगें पातला ॥[1]

यांत रोहिणी याच मृग ( हरिणें ) किंवा रोहिणी आणि मृग ( नक्षत्रें ) असे दोन अर्थ होत असल्यानें हा वामनाची वक्रोक्ति व रूपक यांचा संकर होत आहे.

जेव्हां बुडे जलधिच्या जलिं अर्ध-काय ।
घेण्या समाश्रय जणूं दिन-राज-काय ॥
दे क्षीण आत्म-कर उन्नत शैल भाळीं ।
उच्चांस उच्च-सहवास रुचेल काळीं ॥[2]

यांत पहिल्या तीन ओळींतील श्लेष शेवटच्या अर्थान्तरन्यासास उपकारक झाला आहे म्हणून हा चौथ्या प्रकारचा संकर झाला.

हे सर्व भेद पाहतां चौथा व पहिला प्रकार यांत फरक आहे असें वाटत नाहीं. प्रत्येकाला स्वतंत्र महत्त्व नसणें ह्मणजेच उपकारिभाव असणें असा अर्थ होतो. या दृष्टीनें दुसऱ्या प्रकारांतील दुसरें उदाहरण चौथ्या प्रकाराचेंही होऊं शकेल. उद्भटानें संकराची रूपरेखा आंखण्याचा प्रयत्न केला हें ठीकच झालें,पण नेहमींप्रमाणें तो सुसंगत व सुव्यवस्थित झाला नाहीं यामुळेंच त्याला श्लेषाला प्राधान्य द्यावें असें वाटूं लागलें असावें.

२. मम्मटानें 'संकीर्ण' हा दोष-वर्णनांत एक काव्यदोष म्हणून घातला आहे. एकाचा पायपोस दुसऱ्याच्या पायांत नाहीं अशी स्थिति पदांचे रचनेंत अगर मांडणींत असल्यानें हा दोष निर्माण होतो असें हा म्हणतो. मम्मटानें संकराची व्याख्या पुढीलप्रमाणें दिली आहेः—

अविश्रान्तजुषामात्मन्यङ्गाङ्गित्वं तु संकरः[4]

उद्भटानें केलेल्या संकराच्या भेदांना मिळून मम्मटानें दण्डीचा अङ्गाङ्गिभाव-संकर घेतला असें दिसतें. स्वतंत्र अस्तित्व नसणाऱ्या अलंकारांत अङ्गाङ्गिभाव उत्पन्न होईल तेव्हां संकर होतो असें मम्मट म्हणतो.

एकस्य[5] च ग्रहे न्यायदोषाभावादनिश्चयः ॥
स्फुटमेकत्र विषये शब्दार्थालंकृतिद्वयम् ।
व्यवस्थितं च तेनाँसौ त्रिरूपः परिकीर्तितः ॥[6]

मम्मटाचें हें विवेचन पाहतां, प्रथम दर्शनीं उद्भट-मम्मटांत भेद नाहीं असेंच वाटेल पण सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास उद्भटाच्या व्याख्येंतील दोष मम्मटानें काढून

१ वाग्वे. अरुण. २ क॰ र. हा. ३ क. र. हा. ४-५-६ का. प्र. ९.२०८|२०९|२१०.

टाकले आहेत. संकराच्या भेदांना दिलेलीं नांवें इन्दुराज म्हणतो त्याप्रमाणें मुळांत उद्भटानें दिलीं असलीं तर मम्मटानें तीं दिलीं नाहींत. तसेंच वाक्य व वाक्यांश यावरून संकराचे दोन प्रकार केले नाहींत. अङ्गाङ्गिभाव हा शब्द मम्मटानें स्पष्टपणें घातल्यानें उद्भटाचा पहिल्या व चौथ्या भेदांत होणारा घोटाळा याच्या त्रिरूप संकरांत होत नाहीं. मम्मटावरील टीकेंत संकराचें पहिलें स्वरूप सांगतांना शब्दालंकार व अर्थालंकार यांत अङ्गाङ्गिभाव असल्याचीं उदाहरणें दिलीं आहेत.

मार्तंड[1] हा तिलक सुंदर कुंकुमाचा ।
गेला गळूनि, घडला क्षय मंगलाचा ॥
सायंप्रभा अनुमृता जणु शोकमग्ना ।
तों जन्म घे जननि कृष्ण-मुखी कुलघ्ना ॥

यांत पहिलें रूपक असून पुढें उत्प्रेक्षा व विषम या सर्वांचा अङ्गाङ्गिभाव आहे.

( १ ) शब्दार्थालंकारांत अङ्गाङ्गिभावाचें उः—

जो[2] धैर्यें धरसा, सहस्र–करसा तेजें, तमा दूरसा ।
जो रत्नाकरसा गभीर, शिरसा भूपां; यशोहारसा ॥
ज्ञातां जो सरसावला नवरसां माझारि शृंगारसा ।
शोभे तामरसाक्ष तो नळ रसा–नाथ स्तवूं फारसा ॥

( २ ) आनिश्चितरूपसंकरः—

गगनें[3]–समुद्रीं मुक्ताफळें । अरूण–चंचूनें कनकमराळें ।
वेंचूनि घेतां कला–कुशळें । नाहींच केलीं नक्षत्रें ॥

यांत श्लेष जितका प्रधान आहे तितकेंच रूपकही प्रधान असल्यानें कोणाला महत्त्व द्यावें हें आनिश्चित आहे, म्हणून याला अनिश्चितरूप संकर म्हणावयाचें.

कृतांतकटकामलध्वज[4] जरा दिसों लागली ।

या एका वाक्यांत यमसेनेचा अमलध्वज हीच जरा असा एक अर्थ व ध्वजाप्रमाणें असणारी जरा असा दुसरा अर्थ होतो. या दोन भिन्न अर्थीं येथें अनुक्रमें रूपक व उपमा होईल व हाही अनिश्चितरूप संकर होईल.

जलजलसद्रम्यमुखी[5], नवनवनीतापरीस मृदुला हे; ।
शिव ! शिव ! मजविण भीरू न वनवसति दुःख भोगणें लाहे ॥

या आर्येंत पहिल्या दोन चरणांत उपमा आणि यमक साधलें आहे. ही शब्दार्थालंकाराची एकत्र रचना असल्यानें हा तिसरा भेद झाला. याप्रमाणें मम्मटानें संकराचें विवेचन केलें आहे. नेहमींप्रमाणें या वेळींही पुढील अलंकारकर्त्यांनीं संकराचें गतानुगतिकत्वानें वर्णन केलें आहे.

---

१ क. र. हा. सायंकालवर्णन १३. २ नवनीत—नलदमयंती. ३ क. र. हा.—मुक्तेश्वर. ४ मो. कोकावली. ५ मों. कुशलव्याख्यान.

रुय्यकः— क्षीरनीरन्यायेन तु सङ्कर[1]।
विद्याधरः— कथितस्तु संकरोयं यः क्षीरनीरवद्भवति ॥
विश्वनाथः—अङ्गाङ्गित्वेऽलंकृतीनां तद्वदेकाश्रयस्थितौ।
संदिग्धे च भवति सङ्करस्त्रिविधः पुनः[3] ॥

रुय्यकाची व्याख्या थोडक्यांत पण चटकदार वाटते. विश्वनाथानें मम्मटाचेंच म्हणणें थोडक्यांत पुढें मांडिलें; रुय्यकाला संसृष्टीच्या अगर संकराच्या व्याख्येंत 'तिलतण्डुल' अगर 'दुग्धजल' हे शब्द रुद्रटावरून सुचलेले दिसतात. रुद्रटानें औपम्य, वास्तव, अतिशय व श्लेष यांवर अधिष्ठित अलंकारांचें वर्णन करून नंतर असें म्हटलें कीं,

> एषां तु चतुर्णामपि संकीर्णानां स्युरगणिता भेदाः।
> तन्नामानस्तेषां लक्षणमंशेषु संयोज्यम् ॥
> योगवशादेतेषां तिलतण्डुलवच्च दुग्धजलवच्च।
> व्यक्ताव्यक्तांशत्वात्संकर उत्पद्यते द्वेधा ॥

औपम्य, वास्तव, अतिशय व श्लेष हे मिश्र झाले असतां त्यांचे अगणित भेद होतात. ते संकीर्ण झाले असतां ज्या अलंकाराचा जो अंश असेल तेंच त्या ठिकाणीं त्याचें लक्षण समजावयाचें. हे अलंकार व्यक्तांशत्वानें अगर अव्यक्तांशत्वानें म्हणजेच तीळ व तांदुळ अगर दूध व पाणी यासारखे एकत्र झाल्यानें दोन प्रकारें संकर होतो." या रुद्रटाच्या वचनावरून हें उघड आहे कीं संसृष्टि व संकर त्यानें एक केला आहे. तिलतण्डुलवत् योग म्हणजे संसृष्टि व दुग्धजलवत् योग म्हणजे संकर. यानें हा अलंकार म्हणून कल्पिला नाहीं.

अशा रीतीनें संकरासंबंधीं विचार केला असतां तो इंद्रधनुष्याप्रमाणें आहे. अनेक रंग असून एकालाही महत्त्व देतां येत नाहीं तरीही त्यांचें मीलन चमत्कृतिपूर्ण असतें. तद्वतच संकरांत अमुक अलंकार म्हणून सांगतां आलें नाहीं तरी सर्वांचें मीळून चमत्कृतिजनक असतें.

## २ संसृष्टि

३. संसृष्टि म्हणजे भागीदारी अगर एकत्र–वास असा अर्थ आहे. अलंकार सृष्टींतही संसृष्टीचा तोच अर्थ आहे. संसृष्टि म्हणजे दोन अगर अधिक अलंकारांचा एकत्र वास असणें. भामहाची संसृष्टीची व्याख्या,

> 'वरा[5] विभूषा संसृष्टिर्बह्वलंकारयोगतः।
> राचिता रत्नमालेव सा चैवमुदिता यथा ॥

---

१ अ. सू. ८५. २ ए. ४·७७ ३ सा. द. १०·९८. ४ का. लं. १०·२४।१०·२५. ५ भा. लं. ३.४८.

पुष्कळ अलंकारांचा योग अगर एकत्र वास असतां सुंदर रत्नमालेप्रमाणें जो अलंकार होतो तो संसृष्टि होय. भामहानें संसृष्टीचीं दोन उदाहरणें देऊन अशी संसृष्टि अनेक अलंकारांची होईल असें म्हटलें आहे.पण यानें संसृष्टीची स्पष्ट व्याख्या केलेली नाहीं.संकर व संसृष्टि अलंकार त्याच्या व्याख्येंत एकच झाले आहेत.

दण्डी– नानालंकारसंसृष्टेः संसृष्टिस्तु निगद्यते[1] ॥
अङ्गाङ्गिभावसंस्थानं सर्वेषां समकक्ष्यता ।
इत्यलंकारसंसृष्टेर्लक्षणीया द्वयी गतिः ॥[2]

अशी संसृष्टीची व्याख्या केली आहे. साहित्यदर्पणाच्या प्रस्तावनेंत काणे म्हणतात, " Dandi calls it संकीर्ण and includes संसृष्टि and संकर in it. " पण दण्डी संसृष्टीला संकर म्हणतो, असें दिसत नाहीं. कारण त्यानें ' इत्य-लंकारसंसृष्टेर्लक्षणीया द्वयी गतिः '[3] असें म्हटलें आहे. म्हणजे निरनिराळ्या अलंकारांचा योग असतां संसृष्टि होते अशी संसृष्टीची व्याख्या करून ( १ ) अलंकारांत अङ्गाङ्गिभाव असणें व ( २ ) सर्व अलंकार एकत्र येऊनही सारख्याच महत्त्वाचे असणें असे दोन भेद केले आहेत.पहिल्या भेदालाच संकर व दुसऱ्याला संसृष्टि अशीं नांवें पुढें पडलीं व ते स्वतंत्र अलंकार मानले गेले. पहिल्या प्रकाराचें उदाहरणः—

कथासुरभि[4] या भल्या स्वजननीहुनी वाटती;
शिशूंसि जरठांसही निरखितां रसें दाटती;
दुहोत भलते सदा, तरि न लेशही आटती;
स्ववत्समल भक्षिती, तरि न सर्वथा चाटती. ॥

यांत पहिल्या ओळींतील रूपक शेवटच्या ओळीपर्यंत पसरलें आहे शिवाय दुसऱ्या ओळींत तुल्ययोगिता, तिसऱ्या व चौथ्या ओळींत विशेषोक्ति व श्लेषाची थोडी संकीर्णता आहेच.पण येथें रूपक महत्त्वाचें नाहीं कारण विशेषोक्तीनें रूपकाला चारुता आली आहे. उलट विशेषोक्ति रूपकामुळें वठली आहे याचें कारण रूपक, तुल्ययोगिता व विशेषोक्ति यांत अंगांगिभाव आहे. दुसऱ्या प्रकाराचें उदाहरणः—

कृष्णें[5] हृदय धवलतेजवळ तें झालें धवल पळीं ।
नवल न धवलाचि बिंब शिशूचें विलसे नील जळीं ॥

यांत पहिल्या ओळींत तद्गुण व दुसरींत दृष्टांत हे स्वतंत्र व सारख्याच महत्त्वाचे अलंकार आहेत. त्यांत अङ्गाङ्गिभाव नाहीं किंवा एक दुसऱ्याहून निराळा करण्यास कठीणही जात नाहीं. अशा रीतीनें दण्डीनें पहिल्या उदाहरणांत संकर व दुसऱ्यांत संसृष्टि सांगितली हें उघड आहे पण संकर व संसृष्टि हीं नांवें त्यानें दिलेलीं नसून त्यानें ते संसृष्टीचे दोन भेद म्हणून मानले आहेत व तें गैरही म्हणतां येत नाहीं.

---

१–२ का. द. २. ३५९. ३६०. ३ का. द. २. ३६०. ४ मो. केकावली ५८.
५ क. र. हा –कृष्णाकुमारी.

दण्डीनें उपमा, रूपक इत्यादि अलंकारांच्या व्याख्या करतांना जे अनेक भेद केले आहेत त्यांतही संकराचा संशय येतो. उदाहरणार्थ त्याची असाधारणोपमा किंवा विरोधोपमा ह्या अनन्वय आणि उपमा व विरोध आणि उपमा यांचा अनुक्रमें संकर आहे उद्भटानें दण्डीचे हे दोन भेद स्वतंत्र अलंकार म्हणून कल्पून पहिल्याला संकर व दुसऱ्याला संसृष्टि अशी नांवें ठेविली. संसृष्टीची त्याची व्याख्याः—

अलंकृतीनां बह्वीनां द्वयोर्वापि समाश्रयः[1] ।
एकत्र निरपेक्षाणां मिथः संसृष्टिरुच्यते ॥

दोन अथवा त्याहून अधिक अलंकारांचा निरपेक्ष, अनवलंबी असा एकत्र आश्रय असल्यास त्यास संसृष्टि म्हणावें. उः—

गमले[2] दोघे हरिसे, मग भुलले पळ ससे समर-सिकते; ।
रक्तें न्हाले, झाले बहु फुलले पळससे, समरसिकते ॥

यांत पहिल्या चरणांत उत्प्रेक्षा, दुसऱ्यांत रूपक, तिसऱ्यांत अतिशयोक्ति, चौथ्यांत उपमा असे अगदीं स्वतंत्र अलंकार आहेत म्हणून ही संसृष्टि झाली.

वामनानें संकर मानलाच नाहीं पण त्यानें, 'अलंकारस्यालंकारयोगित्वं संसृष्टिः[3]' अशी संसृष्टीची व्याख्या करून अलंकाराचा दुसऱ्या अलंकाराशीं संसर्ग अगर मिश्रपणा असेल, तेव्हां संसृष्टि म्हणावें असें सांगितलें. अथात् त्याच्या व्याख्येंत संकरही आलाच.

मम्मट— 'सेष्टा संसृष्टिरेतेषां[4] भेदेन यदिह स्थितिः'

स्वतंत्रपणें, किंवा निरपेक्षपणें अलंकार एकत्र असणें, यास संसृष्टि म्हणावें असें उद्भटाप्रमाणेंच मम्मट म्हणतो. पण मम्मटावरील वृत्तींत (१) शब्दालंकार संसृष्टि (२) अर्थालंकार संसृष्टि व (३) शब्दार्थालंकार संसृष्टि दाखविणारी तीन प्रकारचीं उदाहरणें दिलीं आहेत. पहिला प्रकारः—

मग[5] गगन-ग-नग-भिन्मुख-सुर-मत-गुरुसींहि अनव मुनिनर तो ।
कलह करी कीं इतरीं गुरु-कलहीं यासि जन वमुनि नर तो ॥

यांत अनुप्रास व यमक हीं दोन्ही असल्यानें ही शब्दालंकारसंसृष्टि झाली.

(२) अर्थालंकार-संसृष्टीचें उदाहरणः[6]—

ऐसे बोले प्रबद्धांजलि-नर-पतिला क्षोभ त्या तापसाचा ।
सांगावा काय भासे निज-मणि-हरणें कोपला साप साचा ।
दुर्वासा वज्रिताप-प्रद परि अनिळें वृक्षसा कांपवीला
जेणें तो कोप लज्जा जड-भय-द-बळा त्या न दे कां पवीला ॥

या श्लोकांतील पहिल्या दोन ओळींत उत्प्रेक्षा,व तिसरींत उपमा असून दोन्हीही अलंकार निरपेक्ष [illegible] म्हणून ही संसृष्टि झाली.

---

१ का. सा. सं. ६. २ मोरोपंत-शाल्वपर्व २.७८. ३ का. सू. ४. ३. ३०
४ का. प्र. १०. २०७ ५ मो. विराटपर्व ५०८ ६ मो. अंबरीषाख्यान. २२.

( ३ ) शब्दार्थालंकारसंसृष्टिः—

युवतिदृंगभ्रमरीमधु माधव व्रजसुखार्थ वसे मधु-माधव ।

क्रमि करी करुणा स्वजनावरी, वधु चकोरिं करव्रज नावरी ॥[1]

यांत अनुक्रमें रूपक, उपमा, दीपक, दृष्टान्त व यमक यांची संसृष्टि आहे.

विप्रें तो क्षिप्र तोयासी मीनसा प्रभुच्या पदा ।

कवळी जवळी प्रेमें ज्याच्या श्री मधु-पी सदा ॥[2]

यांत पहिल्या चरणांत अनुप्रास, दुसऱ्या चरणांत उपमा, तिसऱ्यांत अनुप्रास चौथ्यांत रूपक आहे. म्हणून हा तिसरा भेद झाला असो. याप्रमाणें हे तीन भेद झाले.

रुय्यक— एषां[3] तिलतण्डुलन्यायेन मिश्रत्वे संसृष्टिः ॥

तीळ व तांदुळ हे एके ठिकाणीं मिसळूनही निरनिराळे ओळखून काढतां येतात, त्याप्रमाणें संसृष्टि हा अलंकार आहे. पूर्वीच्या व्याख्यांत व यांत फरक नाहीं पण याची व्याख्या अधिक लवकर पटते. यानेंही मम्मटाप्रमाणेंच तीन उदाहरणें दिलीं आहेत.

विद्याधरः—एषां[4] तिलतण्डुलवन्मिश्रत्वेनाभ्यधायि संसृष्टिः ।

विश्वनाथः—यद्येत[5] एवालंकाराः परस्परविमिश्रिताः ।

तदा पृथगलंकारौ संसृष्टिः संकरस्तथा ॥

" मिथोऽनपेक्षयैतेषां स्थितिः संसृष्टिरुच्यते[6] "

अप्पय्यदीक्षित नुसतीं उदाहरणें देतो, व्याख्या देत नाहीं.

विद्याधरानें ( १ ) सजातीय व ( २ ) विजातीय असे संसृष्टीचे दोन भेद केले. सजातीय म्हणजे शब्दालंकार अथवा अर्थालंकार यांची संसृष्टि व विजातीय म्हणजे शब्दालंकार व अर्थालंकार यांची संसृष्टि होय. विश्वनाथानें मम्मटाप्रमाणेंच हिचे तीन भेद केले आहेत.

संसृष्टि म्हणजे गंगायमुनांच्या संगमाप्रमाणें आहे. त्यांच्या संगमांत ही गंगा व ही यमुना असें सांगतां येत असूनही त्यांचा संगम आल्हाददायी असतो त्याचप्रमाणें संसृष्टींत दोन अथवा अधिक अलंकार संगत असतांही निराळे व आल्हादकारक असतात.

---

१ मो. कृष्णाविजय ६५.२३. २ मो. अंबरीषाख्यान ५०. ३ अ. सू. ८४.
४ ए. ८.७६. ५ सा. द. १०-९७. ६ सा. द. १०.९८.

# प्रकरण १६ वें

## रसालंकार

### १ रसवत्

१. रसवत् म्हणजे रसानें युक्त असा अगदीं उघड अर्थ दिसतो. मनुष्याच्या जीविताशीं त्याच्या भावनांचा संबंध अत्यंत निगडित आहे. किंबहुना त्याचें जीवित हेंच निरनिराळ्या भावनांनीं झालेलें असतें. अर्थात् मानवी कृतीच्या मुळाशीं भावना ही येणारच. काव्य हें हृदयहारी आहे. त्यांत बुद्धीपेक्षां हृदय हलविण्याची अत्यद्भुत शक्ति आहे. हृदय हलविण्याला भावनाच कारणीभूत असतात. वर्डस्वर्थच्या शब्दांत सांगावयाचें तर प्रतिभेनें निर्माण होणारें काव्य म्हणजे 'Spotaneous overflow of powerful feelings.' भावनांचा पूर हृदयांत न राहिल्यानें शब्दरूपानें बाहेर आविर्भाव दाखवितो तेंच काव्य होय. काव्याशीं हृदयाची खळबळ व चित्तवृत्तींची चलबिचल यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध आहे. या चित्तवृत्तींना जेव्हां टिकाऊपणा येतो तेव्हां रसनिष्पत्ति होते. 'रसात्मकं काव्यम्' म्हणण्यांतही स्वारस्य हेंच आहे. मनुष्याचें जीवित भावनामय आहे. भावनांनींच रसनिर्मिति होते व काव्य हेंही भावनांचेंच फल अर्थात् काव्याचा आत्मा रस असणें हें योग्यच आहे. काव्यांत रस हा असेल तेव्हांच भावनामय जीविताचा मनुष्यप्राणी काव्याशीं समरस होऊं शकेल.

असो. प्रस्तुत प्रकरणीं आपणास रससंबंधीं विचार करावयाचा नसून रसवत् अलंकारासंबंधीं विचार करावयाचा आहे. तेव्हां रस कोणते व त्यांनीं अलंकार कसा होतो हें थोडक्यांत पाहूं.

विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भाव या सर्वांच्या व्यापारामुळें व्यक्त होणाऱ्या स्थिर चित्तवृत्तींच्या उद्रेकानें रसनिर्मिति होते. सूक्ष्म चित्तवृत्तीला बलवान् करण्याला विभाव कारणीभूत होतात. त्याचप्रमाणें बलवान् चित्तवृत्तींमुळें कायिक अगर वाचिक चेष्टा होतात. या चित्तवृत्तींची त्वरेनें प्रतीति करून देणारे जे भाव त्यांना व्यभिचारी-भाव म्हणतात जेव्हां निरनिराळ्या सूक्ष्म भावना एकादी चित्तवृत्ती बलवान् करतात व त्यामुळें त्या चित्तवृत्तींचे बहिराभाव उत्पन्न होऊन ते चित्तवृत्ती जास्त स्थिर करतात तेव्हां त्या चित्तवृत्तींच्या उद्रेकाला रस म्हणतात. शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत हे आठ रस नाट्कांत दाखविले जातात असें मम्मट म्हणतो. याशिवाय शांत

हा एक रस मानला आहे. मराठी काव्यांत भक्ति व वत्सल हे रस म्हणून मानतात तेव्हां या रसांची संख्या अकरा होते.

नाटकांत शान्त रसाला प्रतिबंध आहे असें दिसून येतें. भरतानें रसांची संख्या आठ दिली आहे तीच मम्मटानें स्वीकारली आहे. उद्भटानें मात्र नवरस सांगितले आहेत. त्यांत शान्त हा नववा रस म्हणून विवेचिला आहे. इतर अलंकार वगैरेसाठीं तो रस मानणें इष्ट असलें तरी नाटकांत शांत रस शोभणार नाहीं या दृष्टीनेंच भरतानें आठ रस दिले आहेत. पण उद्भटानें 'नव नाट्ये रसाः स्मृताः' असें म्हणून नववा शांत रसही नाट्यांत घातलेला दिसतो.

रस किती वगैरे प्रश्न या निबंधांत अप्रस्तुत ठरत असल्यानें आपण भामहाच्या रसवत् अलंकाराच्या व्याख्येकडे वळूं.

२. भामह— [१]रसवद्दर्शितस्पष्टशृङ्गारादि रसं यथा ।

स्पष्टपणें शृंगारादि रसांचें दर्शन झाल्यास रसवत् अलंकार होतो. उदाहरणार्थः-

> दोघे[२] पिटिती पाणि-तळें । जानुमूळें बाहुमूळें ।
> मही ताडितां पाद-तळें । शैल मोळें थरकती ॥
> किरीट काढोनि हस्तकीं । केश आंवळोनि मस्तकीं ।
> चंड गर्जना करिती मुखीं । काळ कांपे चळचळां
> हस्त ओढिती तोडावया । पाय कवळिती मोडावया ।
> डोळे टोंचिती फोडावया । उसणें घे घे म्हणोनी ॥

यांत वीररस स्पष्ट आहे. दण्डीः—[३]रसवद्रसपेशलम् ।

उद्भटः— [४]रसवद्दर्शितस्पष्टशृंगारादिरसादयम् ।
स्वशब्दस्थायिसंचारि विभवाभिनयापदम् ॥
शृंगारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः ।
बीभत्साद्भुतशान्ताश्च नव नाट्ये रसाः स्मृताः ।

ज्या ठिकाणीं शृंगारादि रसांची पूर्ण वाढ होऊन, रस, स्थायीभाव, संचारीभाव, विभाव व अभिनय हे शब्द असतात तेथें रसवत् अलंकार होतो. "

उद्भटानें भामहाची व्याख्या जास्त स्पष्टपणें मांडिली. रुद्रटानें एक सबंध अध्याय रस विवेचनासाठीं लिहिला आहे पण त्यानें रसवत् हा अलंकार मानला नसल्यानें त्यानें दिलेल्या रसांचा विचार करण्याचें कारण नाहीं. मम्मटानेंही रसविवेचनार्थ एक उल्लास लिहिला आहे. त्यानें रसवत् हा अलंकार अर्थालंकारांत घातलेला नाहीं. रसप्रकरणांत तो एवढेंच म्हणतो कीं,

---

१ भा. ल. ३·६. २ मू. जरासंध वध. ३ का. द. २७५. ४ का. सा. सं. ४·४४।४५.

'रसभावतदाभासभावशान्त्यादिरक्रमः।
भिन्नो रसाद्यलंकारादलंकार्यतया स्थितः॥

वस्तुतः ध्वनिविवेचन किंवा अलक्ष्यक्रमव्यङ्ग्य व लक्ष्यक्रमव्यङ्ग्य यांचें विवेचन करीत असतां रस–विवेचन ओघानेंच येऊन त्यांत रस, स्थायीभाव वगैरेंचें वर्णन मम्मटानें केलें आहे. त्यांत मम्मट म्हणतो, वाक्यार्थ प्रधान असून रस हा अङ्गभूत असेल तेव्हां रसवत् अलंकार होईल. ज्या ठिकाणीं रस हाच प्रधान असतो तेव्हां तो अलंकार्य असतो. मम्मट वस्तुतः रसवत् अलंकाराची व्याख्या करीत नाहीं. रस हा काव्याचा आत्माच समजला आहे. तेव्हां आत्मा हा एक अलंकार होऊन आपली सर्वात्मता घालवूं इच्छिणार नाहीं या दृष्टीनें रसवत् हा अलंकार न मानण्याकडे पुष्कळांची प्रवृत्ति आहे. पण जातां जातां रसवत् मानणेंच झाल्यास अङ्गभूत रस असेल तेव्हांच रसवत् अलंकार मानावा असें मम्मट म्हणतो.

उद्भट व भामह रस हा अंगभूत असतां रसवत् होईल असें म्हणत नाहींत. उलट रस स्थायीभाव इत्यादि शब्द असतां रसवत् होतो असें उद्भट म्हणतो. रस–सिद्धांत जसजसा अधिक चिकित्सेनें पाहिला गेला तसतसा रस हा अलंकार होईल की नाहीं या बाबतींत दुमत होऊं लागलें. उद्भटानें रसवत् अलंकाराचें उदाहरण दिलें आहे, त्यांत रस हा अंगभूत नसून प्रधान आहे असें वाटतें.

इति भावयतस्तस्य समस्तान् पार्वतीगुणान् ।
संभृतानलसंकल्पः कन्दर्पः प्रचलोऽभवत् ।
स्विद्यतापि स गात्रेण बभार पुलकोत्करम् ।
कदम्बकलिकाकोशकेसरप्रकरोपमम् ॥

रसवत् अलंकारांत या ठिकाणीं शृंगाररस, स्थायीभाव वगैरे शब्द असून शृंगाररसच प्रधान आहे असें स्पष्ट होत आहे. भामह व उद्भट यांच्या या कल्पनेंत व पुढील लोकांच्या रसवत् अलंकाराच्या कल्पनेंत फरक आहे. पुढील लोकांच्या मतें पुढील उदाहरण रसवत् अलंकाराचें होईल.

मारिन जयद्रथ, करिन यश भुवनीं, विशिखजाळ विततरणीं।
हें न घडतां जळेन ज्वलनीं, होतांचि अस्तमित तरणीं॥

वस्तुतः अभिमन्यूबद्दल अर्जुन शोक करीत असल्यानें यांत करुणरस आहे पण प्रस्तुत आर्येत तो करुणरस वीररसाला अङ्गभूत झाला आहे म्हणून हा 'रसवत्' अलंकार झाला.

रुय्यकः—रसभावतदाभास तत्प्रशमानां निबन्धे रसवत्–प्रेयऊर्जस्विसमाहितानि॥

---

१ का. प्र. ४·४२. २ का. सा. स. पान. ५३. ३ मो. अ. वि. ४ अ. सू. ८२.

उदात्त अलंकारांत ज्याप्रमाणें समृद्धि अगर महापुरुषचरित हें अङ्गभूत म्हणून वर्णन करतात त्याचप्रमाणें "रस हा निर्माण होऊन त्याला गौण स्थिति प्राप्त झालेली असते तेव्हां रसवत् अलंकार होतो" असें रुय्यक म्हणतो. रसवत्‌बरोबर दुसऱ्या अलंकारांच्या व्याख्या आहेत त्या आपण पुढें पाहूं.

विश्वनाथः–[१]रसभावौ तदाभासौ भावस्य प्रशमस्तथा ।
गुणीभूतत्वमायान्ति यदालंकृतयस्तदा ।
रसवत्प्रेय ऊर्जस्वि समाहितमिति क्रमात् ॥

अप्पय्यदीक्षितः–[२]रसभावतदाभास–भावशांन्तिनिबंधनाः ।
चत्वारो रसवत्–प्रेय ऊर्जस्विच्च समाहितम् ॥

३. रुय्यकाच्या व विश्वनाथाच्या व्याख्येंत फरक नाहीं. अप्पय्यदीक्षित टीकेंत म्हणतात, विभाव, अनुभाव आणि व्यभिचारीभाव यांनीं व्यंजनावृत्तीनें हृदयगोचर केलेला व रति, हास, शोक इत्यादि चित्तवृत्तीमुळें निर्माण झालेला जो रस तो दुसऱ्या रसादिकांची अंगभूत म्हणून राहील तेव्हां 'रसवत्' अलंकार होतो. जगन्नाथानें रसवत् हा अलंकार म्हणून दिला नाहीं पण तो दुसऱ्या आननांत रस विवेचन फारच मार्मिकपणें करतो. 'एवं च संक्षेपेण निरूपिता रसाः । एषां प्राधान्ये ध्वनिव्यपदेशहेतुत्वम्, गुणीभावे तु रसालंकारत्वम्' असें जगन्नाथ म्हणतो. कांहीं लोक 'रसवत्' अलंकार हा स्वतंत्र घेऊन विवेचन करणारे नसले तरी त्यांनीं रसवत् केव्हां होऊं शकेल हें मात्र सांगितलें आहे. तरीही रस हा अलंकार नसून अलंकार्य आहे या दृष्टीनें रसाचें स्वतंत्र विवेचन करून त्याला 'अलंकार' म्हणून कमीपणा आणावयाचा नाहीं असाच कांहींचा विचार दिसतो. उदात्ताची व्याख्या करितांना, उद्भट म्हणतो,

"[३]उदात्तमृद्धिमद्वस्तु चरितंच महात्मनाम्
उपलक्षणतां प्राप्तं नेतिवृत्तत्वमागतम् ॥"

महात्म्याचें चरित्र जर प्रधान गोष्ट म्हणून वर्णन केलें तर त्याचें रसवत् अलंकारांत पर्यवसान होईल, कारण रसवत् अलंकारांत स्थायीभाव हे प्रामुख्यानें वास करतात तेव्हां महात्म्याचें चरित इत्यादींचें वर्णन उत्कटत्वानें, प्रधानत्वानें करण्यानें उदात्त होत नसून रसवत् अलंकार होईल असें उद्भट म्हणतो. पण हें उद्भटाचें मत चुकीचें आहे कारण रसवत् अलंकारांतही रस अंगभूत असतो. तसेंच रसप्राधान्य असतांच रसवत् होतो असें उद्भट म्हणतो पण रस प्रधान असतां तो अलंकार म्हणून मानण्याचें कारणच नाहीं. रसवत् अलंकाराची उद्भटाची व्याख्याच निराळी झाल्यानें उदात्त अलंकारांत महाचरिताचें उपलक्षण असलें पाहिजे, नाहींतर तो पूर्णपणें

---

१ सा. द. १०·९५।९६. २ कु. १०१. ३ का. सा. स. ४·४९.

प्रधान होऊन रसवत् अलंकार होईल असें उद्भटाला वाटलें. रसवत् अलंकारांत रसाला गौणता असण्यांत वैशिष्ट्य आहे. रस पूर्णत्वानें, प्राधान्यानें प्रशमावाचून दाखविल्यास तो अलंकार होणार नाहीं म्हणूनच जगन्नाथानें 'गुणीभावे तु रसालंकारत्वम्' असें म्हटलें आहे. रस हा दुसऱ्याच्या अंगत्वानें आल्यास 'रसवत्' होईल.

४. रसवत् हा अलंकार म्हणून मानावा कीं नाहीं याबद्दल मतभेद आहे. रसवत् म्हणजे काव्यांत रस असणें, तें रसयुक्त असणें असा अर्थ होतो. या बाबतींत निरानिराळ्या मतांचें दिग्दर्शन करूं. एक मत असें कीं, शब्द व अर्थ यांयोगें होणाऱ्या अलंकारांनीं रसाची वृद्धि करावयाची असते. रसावर यांनीं उपकार करावयाचा असतो. रसानें अलंकार होऊन उपकारक व्हावयाचें नाहीं.

दुसरें मतः—रसवत् इत्यादि अलंकार हे अलंकार म्हणण्याचें कारण ते रसाचीच वृद्धि करतात, तेव्हां याला रसवत् अलंकार ह्मणावें कीं नाहीं हा प्रश्न गौण समजून, प्राचीनांनीं मानलेला हा रसवत् अलंकार मानावा हें योग्य.

तिसरें मतः—रसवत् याला अलंकार ह्मणणें हें गौण स्वरूपाचें नसून त्याला अलंकार म्हणणें हें रास्तच आहे. इतर शब्दालंकार अथवा अर्थालंकार रसाला वठविण्यासाठीं असतात पण ते शब्द व अर्थ यांच्यातर्फे अप्रत्यक्षपणें रस वठवितात. रसवत् अलंकार रस वठविण्याला कारण होतो पण तो इतर अलंकाराप्रमाणें अप्रत्यक्षपणें नसून प्रत्यक्षपणें वठवितो एवढेंच अंतर इतरांत व 'रसवत्' मध्यें आहे.

चौथें मतः—शब्दांनीं व अर्थांनीं रस उपकृत असतो तो उपकृत रस दुसऱ्या रसाला उपकारी होत असेल तर त्याला अलंकार म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

अशा रीतीनें हीं चार मतें उपलब्ध आहेत, अलंकारांच्या शास्त्रेतिहासाचे प्रकरणांत रस सिद्धांतासंबंधीं विवेचन केलें आहे. रसवत् अलंकार हा अर्थालंकारांच्या पुरस्कारकर्त्यांनीं निर्माण केला पुढें आवड नावड असूनही प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणें तो स्वीकारला गेला. मम्मटानें अलंकार मानला नाहीं तरी रसवत् अलंकार अमुक वेळीं होऊं शकेल असें तो सांगतो हें आपण पाहिलेंच आहे.

## २ प्रेयोलंकार.

५. भामहः—प्रेयो गृहागतं कृष्णमवादीद्विदुरो यथा।
अद्य या मम गोविंद जाता त्वयि गृहागते ॥
कालेनैषा भवेत् प्रीतिस्तवैवागमनात्पुनः ॥[1]

---

१ भा. लं. ३·५.

भामहानें प्रेयाची व्याख्या केली नाहीं. दण्डी मात्र ' प्रेयः[1] प्रियतराख्यानम् ' अशी व्याख्या करतो. त्यानें दिलेल्या उदाहरणांपैकीं एक उदाहरण तसेंच भामहानें दिलेलें आढळतें. भामहाच्या उदाहरणावरून त्याची ' प्रेयः प्रियतराख्यानम् ' अशा तऱ्हेची प्रेयोलंकारासंबंधीं कल्पना असावी. आवडत्याचें गुणवर्णन अगर कथन म्हणजे प्रेयोलंकार होय. ही व्याख्या अगदीं मोघम आहे. उदाहरणः—

> सदैव[2] नमितां जरी पद ललाट केलें किणें !
> नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जांविणें ॥
> नता करुनि मुकही म्हणासि ' मी बुडालों ऋणें ' ॥
> अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ॥

उद्भटः—रत्यादिकानां[3] भावानामनुभावादिसूचनैः ।
यत्काव्यं बध्यते सद्भिस्तत्प्रेयस्वदुदाहृतम् ॥

"अनुभावादिकांनीं भावांचें सूचन करून देणाऱ्या काव्याला प्रेयस्वत् म्हणतात." दण्डीनें प्रियतराख्यान एवढेंच म्हटलें पण उद्भटानें मात्र आपल्या व्याख्येचें वळण पालटलें. विभाव, व्यभिचारीभाव, अनुभाव इत्यादिकांनीं स्थायीभावांचें सूचन म्हणजे प्रेयस्वत् असें तो म्हणतो. स्थायीभाव हे नऊ असून, अनुभाव चार प्रकारचे, विभाव दोन प्रकारचे व व्यभिचारीभाव तेहतीस प्रकारचे आहेत. सात्विक भाव आठ प्रकारचे आहेत. येथें रत्यादि भाव असें म्हणण्यांत रति याचा अर्थ देव, गुरु, नृप, इत्यादि विषयक प्रीति असा घेतला जातो.

"रति, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा, विस्मय, सम हे जे स्थायीभाव ते अनुभावादिकांनीं सूचित होतील तेव्हां ' प्रेयस्वत् ' होतो अशी उद्भट व्याख्या करतो.

रुय्यकः—रसभाव[4] तदाभासतत्प्रशमानां निबन्धे रसवत्प्रेयऊर्जस्वि समाहितानि॥

विश्वनाथः—रसभावौ[5] तदाभासौ भावस्य प्रशमस्तथा ।
गुणीभूतत्वमायान्ति यदालंकृतयस्तदा ।
रसवत्प्रेयऊर्जस्वि समाहितमिति क्रमात् ॥

अप्पय्यदीक्षितः-रसभावतदाभासभावशान्ति निबन्धनाः ।
चत्वारो रसवत्-प्रेय ऊर्जस्विच्च समाहितम् ॥

वामन, रुद्रट, व मम्मट हे या अलंकाराचें वर्णन करीत नाहींत. जगन्नाथ व मम्मट यांनीं याला प्रेयस्वत् म्हणतात असा रसविवेचनाचे वेळीं रसवत् अलंकाराप्रमाणेंच जातां जातां आशीर्वाद दिला आहे. पण ते अलंकार म्हणून त्याला वर्णित नाहींत. प्रेयः अगर प्रेयस्वत् हीं दोन नांवें या अलंकाराला कोणी देतात तसेंच कोणी ' भाव ' असेंही म्हणतात. एकंदरींत प्रेयाचें

---

१ का. द. २·२७५. २ मो. के. का. ३ का. सा. स. ४·४३. ४ अ. सू. ८२.
५ सा. द. १०·९५-९६. ६ कु. ११५

लक्षण हें कीं स्थायीभाव हा इतर अनुभावादिकांनीं प्रशमित केलेला असतो तेव्हां प्रेयोलंकार म्हणावें. रसवत् अलंकारासंबंधीं उद्भट व पुढील शास्त्रज्ञ यांत भेद आहे तद्वतच येथेंही भेद दिसतो. उद्भट 'भावांचा प्रशम' असें म्हणत नाहीं. पण प्रथमतः प्रेय अलंकाराची जवळ जवळ व्याख्या अशी केलेलीच नव्हती या दृष्टीनें या अलंकाराला मध्यम स्वरूप उद्भटानें दिलें व रुय्यकानें त्याला पूर्णतेला नेलें. या अलंकाराचें उदाहरणः—'सदैव–नमितां' हें वर दिलेंच आहे; त्यांत ईश्वरविषयक प्रेम दिग्दर्शित झालें, व ईश्वराशिवाय इतरांना तारकत्व कसें देतां येत नाहीं हेंही सांगितलें आहे. ईश्वराशिवाय इतर ठिकाणीं त्राता नाहीं ही भावना ईश्वराबद्दल वाटलेल्या आत्यंतिक प्रेमानें प्रशमित झाली असल्यानें हा प्रेयोलंकार झाला.

## ३ ऊर्जस्वि.

६. भामहः—[1]ऊर्जस्वि कर्णेन यथा पार्थाय पुनरागतः।
द्विः संदधाति किं कर्णः शल्येत्यहिरपाकृतः॥
दण्डीः—[2]ऊर्जस्वि रूढाहंकारम्।
उद्भटः—[3]अनौचित्यप्रवृत्तानां कामक्रोधादिकारणात्।
भावानां च रसानां च बन्ध ऊर्जस्वि कथ्यते॥

भामहानें या अलंकाराची व्याख्या केली नाहीं पण त्याचें उदाहरण दर्प,अहंकार दाखवितें. दण्डीनें 'अहंकार ज्यांत दिसतो तो ऊर्जस्वि' अशी व्याख्या केली, पण ती अस्पष्ट आहे. रसवत् व प्रेयस्वत् अलंकारांप्रमाणें यालाही उद्भटानेंच दृढता आणण्याचा यत्न केला. "कामक्रोध इत्यादिमुळें अयोग्य प्रवृत्तीला वळलेल्या रसांच्या व भावांच्या काव्यरचनेला ऊर्जस्वि म्हणावयाचें." ऊर्जस् ह्मणजे बल. बल ज्यांत आहे तो ऊर्जस्विन् असा अर्थ आहे. रा. बनहट्टी म्हणतात, "The word ऊर्जस्विन् is a मत्वर्थे निपातन of पाणिनी The termination विन् is irregularly applied to ऊर्जस् for मत् therefore विन् conveys the sense of मत्.

रुय्यकः—[4]रसभावतदाभासतत्प्रशमानां निबन्धे रसवत्प्रेयऊर्जस्विसमाहितानि।
विश्वनाथः—[5]रसभावौ तदाभासौ भावस्य प्रशमस्तथा।
गुणीभूतत्वमायान्ति यदलंकृतयस्तदा।
रसवत्प्रेयऊर्जस्वि समाहितमिति क्रमात्॥
अप्पय्यदीक्षितः—[6]रस-भाव-तदाभासभावशान्तिनिबन्धनाः।
चत्वारो रसवत्प्रेय ऊर्जस्वि च समाहितम्॥

---

१ भा. लं. ३·७. २ का. द. २·२७५. ३ का. सा. सं. ४·४६. ४ अ. सू. ८२.
५ सा. द. १०-९५-९६. ६ कु. ११५.

रुय्यक म्हणतो, 'एवमूर्जो बलं विद्यते यत्र, तदपि निबन्धनमेव।
अनौचित्यप्रवृत्तत्त्वाच्च तत्र बलयोगः।

उद्भटानें रसाभास अगर भावाभास असें म्हटलें नव्हतें. पुढील शास्त्रज्ञांनीं रसाभास व भावाभास हे शब्द वापरले आहेत. पण उद्भटसुद्धां सर्वांचाच उर्जस्वि, रसाभासावर व भावाभासावर अधिष्ठित आहे. उद्भटानें 'अनौचित्यप्रवृत्तीनां' म्हटल्यामुळें त्याला आभास शब्दाची जरूर नव्हती. त्याच्या या पुष्कळ शब्दांचा 'रसाभास' व 'भावा-भास' या लहानशा शब्दांत पुढें समावेश केला असें दिसतें.

रुय्यकानें 'आभासत्वमविषयप्रवृत्त्यानौचित्यात्' असें म्हटलें आहे.

रस अगर भाव अनुचित प्रवृत्तीकडे वळलेले असे वर्णिलेले असतात तेव्हां त्यांस रसाभास व भावाभास म्हणतात. इतर बाबतींत फरक नसला तरी उद्भटांत व पुढील लोकांत 'प्रशमाचा' फरक आहेच. रसाभास अगर भावाभास दुसऱ्याच्या अंगत्वानें येतात तेव्हां रुय्यकादि लोकांचा ऊर्जस्वि होतो. म्हणजे रसाभास व भावाभास अंगत्वानें किंवा गौणतेनें येणें हा विशेष आहे. अयोग्य प्रसंगीं किंवा अयोग्य तऱ्हेनें वर्णिलेले रस अगर भाव ते रसाभास व भावाभास होत. ते इतरांचे अंगभूत म्हणून येतील तेव्हां ऊर्जस्वि अलंकार होतो. असो. ऊर्जस्वि अलंकाराचें उदाहरणः—

> करूनियां[1] निर्धार मनाचा, धरून तलवार,
> गेला कृष्णेजवळ नीच तो करावया वार!
> (करीत होती हार फुलांचा जाईच्या रमणी,
> जणों करी स्वकरें तरुणांचीं हृदयें बद्ध गुणी!
> हिम धवलांगी धवलचंद्रिकाहृदया बाला ती,
> धवल फुलें तीं धवल करानें धवल गुणीं गांठी!
> कृष्ण हृदय धवलतेजवळ तें झालें धवल पळीं.
> नवल न धवलचि बिंब शशीचें विलसे नील जळीं!)
> तिच्या दिव्य तेजानें दिपला भरला कँप करीं,
> उगारलेलें शस्त्र तयाचें गळलें भूमिवरी॥

कंसांत असलेल्या ओळींत निराळे अलंकार आहेत; पण संबद्धतेकरतां त्या ओळी दिल्या आहेत. येथें कृष्णेबद्दल वाटलेल्या पूज्यभावामुळें क्रूर भावनाच अंगभूत असल्यानें हा ऊर्जस्वि अलंकार झाला. किंवा दुसऱ्या शब्दांत, सांगावयाचें तर अनुचित गोष्टीकडे प्रवृत्त झालेल्या भावनेचा पूज्यभावनेनें प्रशम केला म्हणून हा ऊर्जस्वि अलंकार झाला.

---

१ विनायक.

## ४ समाहित.

७. समाधि अलंकाराचें विवेचन करतांना समाधि व समाहित या नांवांचा कसा घोंटाळा झालेला आहे तें आपण पाहिलें आहे. भामह, दण्डी व वामन यांच्या व्याख्या रस अगर भाव यांशीं संबंधी नसल्यानें त्या सोडून दिल्या पाहिजेत. त्यांचें विवेचन ' समाधि ' प्रकरणांत केलें आहे.

उद्भटः[1]— रसभावतदाभासवृत्तेः प्रशमबन्धनम् ।
अन्यानुभावनिःशून्यरूपं यत्तत्समाहितम् ॥

रस, भाव अगर त्यांचे आभास हे दुसरा कोणताही अनुभाव, भाव अगर आभास इत्यादि उत्पन्न न करतां शान्त होतात तेव्हां ' समाहित ' होतो.

रुय्यक, विश्वनाथ व अप्पय्यदीक्षित यांची व्याख्या पाहतां उद्भटांत व त्यांच्यांत फरक नाहीं. त्यांच्या विशेषतः रुय्यकाची व्याख्या अगदीं थोडक्यांत आहे एवढाच फरक आहे. रुय्यकादिकांच्या व्याख्या प्रेय, रसवत्, ऊर्जस्वि या प्रकरणांत दिल्याच असल्यानें पुनः देण्याची जरूर नाहीं. [illegible] कोणत्याही ' भावनेचा प्रशम ' हा विशेष आहे. उदाहरणार्थः—

' मोझें कोण ! ' पुसें, तिनें चढविला स्कंधीं निजीं मत्कर;
' तूझें कोण ! ' म्हणे, तधीं मज तिनें आलिंगिलें सत्वर;
' माझ्याशीं नच बोलशी, तर तुझा मी नाहिं जा ! ' बोललों,
तों अश्रू गळती तिचे टपटपां !—मी फार पस्तावलों ![2]

या ठिकाणीं प्रीति अगर रति हा भाव ' तों अश्रू गळती ' असें म्हटल्यानें शान्त झालेला दाखविला आहे. यांत हा भाव शृंगाररसाचें अंग आहे.

## ५ भावोदय, ६ भावसन्धि, ७ भावशबलता.

८. रुय्यकः[3]—भावोदयसंधिशबलताश्चेते पृथगलंकाराः ॥
विश्वनाथः[4]—भावस्य चोदये सन्धौ मिश्रत्वे च तदाख्यकाः ।
अप्पय्यदीक्षितः[5]—भावस्य चोदयः सन्धिः शबलत्वमिति अर्थः ।

हा अलंकार म्हणून प्रथम रुय्यकानेंच मानलेला दिसतो. वर दिलेल्या तिन्ही व्याख्यांत मतभिन्नत्व नसल्यानें तिन्ही अलंकार एकदमच विचारांत घेतले आहेत. ' भावा 'ची पूर्ण वाढ नव्हे तर नुसता उदय होऊं लागणें याला ' भावोदय ' म्हणावयाचें. दोन विरुद्ध भाव एके ठिकाणीं होऊन स्पर्धेनें वाढूं पाहतात तेव्हां

---

१ का. सा. सं. ४·४८  २ केशवसुत..  ३ अ. सू. ८३  ४ सा. द. १०·७९
५ कु. ११६.

'भावसन्धि' होतो. पुष्कळ भाव क्रमानें एकेकांची जागा घेतात किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर एकामागें एक अनेक भाव दिसतात तेव्हां 'भावशबल' होतो. त्यांचीं क्रमानें उदाहरणें घेऊं. भावोदयः—

> कोणें तुम्ही ? कवणाचें कोठुनि येथें कां आला ? हो !
> काय निमित्तें दिधला मजला हा निज दर्शन लाहो ॥
> संभवला कवणाचें वंशीं सांगा हो ! अकलंकी ।
> उभे असां कां ? भागतसां हो ! या बैसा पर्यंकीं ॥

येथें नलाविषयीं दमयंतीच्या उत्कंठारूप भावाचा उदय असून तो शृंगाररसाचें अंग आहे.

भावसंधिः—घेउनि तलवार बळी । गेला शेजेजवळीं ।
> प्रेमाची ती पुतळी । भंगाया सज्जला ।
> बघतां ती मूर्ति परी । धडकी भरली तदुदरीं ।
> एक चित्त जाय रणीं । एक न सोडी रमणी ।
> एका प्रिय कीर्ति जनीं—एका स्त्री प्रेमला ॥

भावशबलताः—

> चंद्राचा वंश कोठें ? दुरितकृति कुठें ? काय भेटे पुन्हां ती ।
> दोषांच्या शांतिला तें श्रुत, वदनिं कशीं कोप येतांहि कांति ॥
> ज्ञाते ते काय मातें वदतिल सुकृती स्वप्निंही दुर्लभा ते ।
> चित्ता तूं स्वस्थ होई, कवण तरुण त्या प्राशि बिंबाधरातें ॥

येथें तर्क, उत्कंठा, विचार, स्मरण, भय, दीनता, धैर्य व चिंता हे विकार मिश्र झाल्यानें हा 'भावशबल' झाला.

भावसंधीच्या उदाहरणांत प्रेम व प्रतापाची आवड या दोन परस्परविरोधी भावना एकच आल्यानें हा भावसंधि झाला आहे. त्यांत दोन भाव ईर्षेनें वाढूं पाहत आहेत. स्वदेशप्रेमाच्या अंगभूत अशी त्या भावनांची एकत्रता आहे. या प्रमाणें भावोदय, भावसंधि व भावशबलता अलंकार झाले.

---

१ र. पं. नलदमयंती. २ विनायक ३ वा. क्षीरसागर.

# उपसंहार.

प्रस्तुत निबंधांत आपण सुमारें ८० अलंकार पाहिले. ते पहातांना आपणांस असें दिसतें कीं अनेक अलंकारशास्त्रज्ञांनीं आपआपल्या प्रकारें अनेक तऱ्हांनीं अनेक-विध अलंकारांचें विवेचन करून आपल्या बुद्धिवैभवाची साक्ष पटविली आहे. जगन्नाथाच्या प्रतिभाशाली ओजस्वी वाणीनें लिहिलेल्या ग्रंथांतील तर्कशुद्ध विचारसरणीकडे पाहून कोणीही स्तंभितच व्हावें. प्रत्येक अलंकारशास्त्रज्ञानें विलक्षण चिकित्सेनें रेखामात्रही फरक लक्षांत आणून दाखविलेली कुशाग्रबुद्धि पाहून कोणीही कौतुक करीत बसावें. इतके विलक्षण परिश्रम या शास्त्रावर घेतलेले आहेत. पण ते पाहून अरेबीयन नाइट्‌समधील गोष्टीची आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं. तो बिचारा मनुष्य, त्यानें रत्नें कधीं डोळ्यांनीं पाहिलीं नाहींं, केवळ कल्पनासृष्टींतही त्याचे ढीग पाहिलेले नाहीं. असें असतां तो एकदम अशा प्रदेशांत जाऊन पडला कीं, तेथें हिरे किती ! माणकें किती ! पाचू किती ! इन्द्रनील मण्याचे ढीग पडलेले ! आपण स्वप्नांत तर नाहीं असें त्याला वाटलें ! त्याला त्या रत्नांची ओळखही नव्हती. त्या चमचमाटानें तो भांबावून गेला. यांतील रत्नें घेऊं तरी किती, ठेवूं कुठें आणि नेऊं तरी कशीं असें त्याला होऊन गेलें. त्यानें खिसे भरभरून घेतले.

प्रत्येक अलंकारशास्त्रज्ञाला काव्यांतील विविध सौंदर्यानें असेंच भांबावल्यासारखें झालें. या सौंदर्याचा सन्मान करूं तरी कसा व कोणत्या आदरपूर्ण पदवीनें बरें तें सौंदर्य तरी एका तऱ्हेचें थोडेंच! त्याच्या कितीक कला! त्या सौंदर्यकलांचें कौतुक करून प्रत्येकांतील सूक्ष्म विभिन्नता लक्षांत येऊन कौतुकानें सूक्ष्म सौंदर्यकलेचेंही व्यवच्छेदन करून शास्त्रज्ञांनीं तिला एकेक नामपदवी दिली. जगन्नाथापर्यंत सर्वांची हीच स्थिति. जगन्नाथाला मात्र मधून मधून वाटत होतें कीं हें काय ! सौंदर्य आहे ही गोष्ट खरी पण ही पदव्यांची खेगट तरी किती! या भावनेनें कांहीं सौंदर्यस्थलांना 'अः हें तशाच तऱ्हेचें' असें म्हणून त्यानें स्वतंत्र नांव देणें हें गौण ठरविलें. जगन्नाथाला अशा रीतीनें मानलेल्या अनेक स्वतंत्र अलंकारांची अडगळ वाटूं लागली. त्यांच्या मनांत असणारी ही भावना आतां तर फारच बळावलेली आहे.

इंग्रजी भाषेंतील अलंकारशास्त्र हें ग्रीक व लॅटिन् अलंकारशास्त्रांवरून घेतलें आहे. त्या मूळ शास्त्राकडे पाहिलें तर आपल्या अलंकारशास्त्रासारखीच स्थिति झालेली आढळते. प्रथम नेहमीचें साधें बोलणेंही अलंकार म्हणून समजलें जाई, पण साधे व नेहमींपेक्षां निराळे बोल यांत फरक आढळून नेहमींच्या पद्धतीपेक्षां निराळे बोल अधिक आनंददायक असतात हें समजल्यावर मग वक्रोक्ति (Deviation from the ordinary way of speech) म्हणजे अलंकार असें समजूं लागले.

ही प्राचीन स्थिति पाहिल्यावर 'भिन्नं द्विधा स्वभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम्' असें म्हणून वक्रोक्ति ही वाचेचें उत्तम भूषण मानणाऱ्या दंडीची आठवण होते. पण मुळांत सामान्य बोल म्हणजेच अलंकार मानणाऱ्या ग्रीक अलंकारशास्त्रांत शास्त्रज्ञांनीं हरतऱ्हेनें कलाकुसरी करून अलंकाराचें इतकें मोठें भेदजाळ पुढें पुढें पसरलें कीं Quinctilian या ग्रंथकारानें अशा वाढीबद्दल आपल्या इकडील जगन्नाथाप्रमाणें नापसंती दाखविली व तेव्हांपासून भेदांची वाढ पुष्कळच मर्यादित करण्यांत आली. कारण तत्त्व व व्यवहार हीं भिन्न असल्यास दोहोंचेंही महत्त्व कमी होतें. तोच त्या दोहोंचा मेळ बसल्यास महत्त्वाचीं कार्यें घडून येतात. अलंकार शास्त्र व काव्यशास्त्र यांचा असाच संबंध आहे. अलंकारशास्त्र हें काव्याकडे न पाहतां केवळ शास्त्र या दृष्टीनें चर्चेस घेतलें तर त्याचा काव्याला उपयोग होणेंच शक्य नाहीं. तेंच काव्य अगर वाङ्मय पाहून शास्त्र बनविल्यास त्यांची खरी योग्यता पटल्याशिवाय राहणार नाहीं. व्यवहार सुलभ व स्तुत्य करण्यासाठीं तत्त्वप्रतिपादन करावयाचें. ज्या तत्त्वाचा व्यवहारांत कधींही उपयोग होणार नाहीं अशा तत्त्वाचें सूक्ष्म विवेचन कुशाग्र बुद्धीनें केलें तरी तें अव्यवहार्य असल्यानें तत्त्वप्रतिपादकाच्या बुद्धीचें फार तर कांहीं काल कौतुक होईल. पण अशा रीतीनें अनाठायीं बुद्धि चालविल्याबद्दल जरा विषाद वाटेल.

अलंकारशास्त्रज्ञांची बुद्धिकुशाग्रता केव्हांही स्पृहणीय आहे. पण तिचा वाङ्मयाशीं विशेषतः आधुनिक वाङ्मयाशीं सुरेख मेळ अगदींच घातलेला नाहीं. उपमा, उत्प्रेक्षा, दृष्टान्त, अर्थांतरन्यास, यमक, यांसारखे अगदीं थोडे अलंकार सोडल्यास बाकी सर्व अलंकारांबद्दल अनास्था दिसते; ती इतकी कीं, काव्य अगर वाङ्मयसागरांतून उत्तीर्ण होऊन या अलंकारांचीं नांवेंही माहीत असण्याची जरूर भासत नाहीं. वाचतांना सहज लक्षांत येतात व हृदयहारी वाटतात असे वर उल्लेखिलेले कांहीं थोडे अलंकारच आहेत. याचा अर्थच हा कीं, त्यांचा वाङ्मयव्यवहाराशीं मेळ अगर सांगड जुळली आहे. ज्यांचें अस्तित्व भासतें व रुचतें, ज्यांचा व्यापकपणा व महत्त्व चटकन ध्यानांत येतें तेच खरोखर अलंकार. अलंकारांनीं वाङ्मयाचें सौंदर्य वाढलें पाहिजे, विचारांचें आकलन सुलभ झालें पाहिजे, हृदयाच्या भावना छेडल्या पाहिजेत, व वाङ्मय मनावर ठसलें पाहिजे. असे अलंकार भाराभर असण्यापेक्षां मर्यादित असणेंच श्रेयस्कर. अलंकार्य वस्तूचें अस्तित्वच लुप्त करतील इतके अलंकार काय उपयोगाचे व अशा अलंकारांची भरती करून जर काव्याची माती होणार असेल तर त्यांची वाढ व भेदजाल करण्यांत स्वारस्य कोणतें ?

काव्याचा आत्मा रस, व अलंकार हे काव्याला केवळ शोभा आणणारे अशीच समजूत अलंकारशास्त्राच्या इतिहासांत फार प्राचीन कालापासून आहे. रसावांचून काव्य मृत होय. पण अलंकाराशिवायही काव्य सरस होऊं शकेल. ही गोष्ट लक्षांत

घेतल्यास अलंकारांना कांहींच किंमत राहत नाहीं. रससिद्धांताचें महत्त्व सर्वमान्य झालेलें असल्यानें अलकारांना कोण विचारतो! व एकदां काव्याची व अलंकारांची बरीचशी फारकत झाल्यावर अलंकारसृष्टींत वाटेल त्या घडामोडी झाल्या तरी उत्तम काव्य अलंकारांवांचूनही आपल्या सरसत्वानें रसिकास डुलवूं शकतें. यमकाच्या अनेक भेदांच्या आहारीं जाऊन निर्व्याज मनोहर काव्य भलत्या कृत्रिमतेचा कलंक काय म्हणून लावून घेईल ! गोड, सुंदर, सहज कळणारी उपमा असतां व्याकरणा-सारख्या रुक्ष विषयांचा आश्रय घेणाऱ्या उपमेच्या भेदांची रसिक कशाला पर्वा करील ? साधासुधा ‘ उपमा ’ हा एक अलंकार सर्व तऱ्हेच्या सुंदर सादृश्याला पंखाखालीं घेत असतां अनन्वय, स्मरण, उपमेयोपमा, प्रतीप, व्यतिरेक या उपमेच्याच प्रकारांच्या अन्य नामाभिधानांची कोण क्षिति बाळगील !

कल्पनातरंगांत रंगून लिहिलेल्या काव्यांतील सहज कल्पनांवरच अधिष्ठित झालेली उत्प्रेक्षा अव्हेरून तिचें सार घेऊन स्वतःचें अस्तित्व निराळें करूं पाहणारे भ्रांतिमान्, संदेह यासारखे अलंकार तिच्याच इतक्या सन्मानानें कोण लक्षांत ठेवील ? असेंच पुष्कळ अलंकारांसंबंधीं म्हणतां येईल.

अलंकारशास्त्रांत जे विविध अलंकार दिले आहेत त्यांत सौंदर्य नाहीं असें म्हणावयाचें नाहीं. त्यांत सौंदर्य आहे. मुख्य प्रश्न मुळीं त्या शास्त्राच्या अस्तित्वाचा आहे. अलंकार हे रसपरिपोषक असतील अगर विचारांचें पोषण करतील. अशा रीतीनें भावनांचा आणि विचारांचा परिपोष अलंकारांनीं केला तर अलंकाराचें कार्य होईल खरें, परंतु अलंकारांचें सौंदर्यवृद्धीचें कार्य पाहूनही त्यांना शास्त्रांत दिलेले सवते सुभे कितपत द्यावे हा विचारच पडेल.

मराठेशाहींत अनेक पराक्रमी सरदार होते. त्यांनीं आपल्या पराक्रमानें मराठेशाहीचा पाया भरभक्कम केला. पण प्रत्येक सरदाराला मुलुखगिरीला जाऊन आपलें आपलें छोटें राज्य स्थापावें असें मनांत आल्यावर, मराठ्यांच्या मध्यवर्ती सत्तेचीं शकलें झालीं. ‘मी मराठेशाहीचा पाईक’ म्हणून तिची सेवा करणाऱ्या पराक्रमी वीराचे पोवाडे लोकांनीं कमी गाइले नाहींत. ‘पाईक’ म्हणवून घेण्यानें वीराचाही बहुमान होत होता व मराठेशाहीचीही खंबीरता वाढत होती. मराठी राज्याला असा सरदार पदरीं असणें हें भूषण वाटे व मराठा सरदारालाही आपण मराठा राज्यसत्तेचे एक मराठा घटक आहोंत हें म्हणवून घेण्यांत भूषण असे. सवता सुभा करून छोटीं छोटीं स्वराज्यें स्थापण्यापूर्वीं पराक्रमी सरदार व मराठी सत्ता यांचा एकजीव झाला असल्यानेंच मराठ्यांच्या कीर्तीचा डंका भरतखंडभर गाजला, अटकेवर झेंडे लावले व अतुल, बलिष्ट सत्ताधारी म्हणून मराठेशाहीचा लौकिक झाला. सवत्या सुभ्यांबरोबर आपसांत भांडणें, मध्यवर्ती सत्तेशीं भांडणें, कोणांत कांहीं मेळ नाहीं असें होऊन स्वतंत्र बुद्धी चालवून आपलें वर्चस्व स्थाप-

ण्यांत सर्वांच्याच यशाची वाफ झाली व मराठी राज्य मातीला मिळालें व एकेकाळीं मराठेशाही अशी होती असें म्हणून गतकालचें वैभव वर्णन करण्यापलीकडे कांहीं राहिलें नाहीं.

आमच्याकडे अलंकार शास्त्र परिणतावस्थेला गेलें आहे. हे शास्त्रकर्ते बुद्धिमान् होते एवढेंच नव्हे कुशाग्रबुद्धीचे होते. पण वादानें काव्यसौंदर्याचीं शकलें करून प्रत्येक अलंकाराला स्वतंत्र करण्यानें निखालस स्वतंत्र अलंकार असे कोणते झाले नाहींतच. त्या दृष्टीनें असमाधान राहिलें तें राहिलेंच, पण सर्व शास्त्रभर बुद्धिवादानें बेदिली पसरल्यानें या शास्त्राबद्दल अनास्था वाटूं लागली. अलंकारशास्त्र हें निरुपयोगी ठरलें व इतकीं वर्षे बुद्धीनें केलेली घडण मोडावयाचे मार्गात आली. अर्थालंकारांचे अनेक भेद केले व अनेक अलंकार केले तरी सौंदर्याचें दृष्टीनें पाहिल्यास अर्थालंकारांनीं सौंदर्य नाहींसें होत नाहीं, ही गोष्ट खरी; तरीही बुद्धिगम्य अर्थालंकारांची वाढ ही भावनागम्य अलंकाराहून अधिक सरस ठरणार नाहीं व काव्यशास्त्र हें जेवढें सुगम होईल तितकेंच त्याला अधिक महत्त्व चढणार हेंही खोटें नाहीं. काव्यसौंदर्याच्या रेखामात्र भिन्न असणाऱ्या कला एकवटल्यास त्या सौंदर्यकलेची समृद्धि व शक्तिही वाढेल व कमीपणा कोणालाच येणार नाहीं. अलंकारशास्त्राचा पसारा पाहून तें एक अगम्य शास्त्र म्हणून सोडून द्यावें अशी वृत्ति नाहींशी करणें अवश्यक आहे. ह्या अलंकारांना एकत्र करण्यापूर्वी त्यांच्या आतापर्यंत दिलेल्या व्याख्या लक्षांत आणल्या पाहिजेत.

शब्दालंकाराकडे पाहिलें तर तें नांवच असें आहे कीं त्यामुळें त्यांचा निरर्थकपणा मनांत आल्याशिवाय राहात नाहीं. शब्दालंकारांतलि भेद पाहून ही निव्वळ शास्त्रांतील अडगळ आहे असेंच कोणासही वाटेल. एकदां अमुक भेद केले म्हणजे मग असा आणखीही भेद कां पडणार नाहीं असें म्हणून अर्थशून्य शब्दांनीं इतके शब्दालंकारांचे भेद बनविले कीं शेवटीं चित्रासारखे हीन अलंकारही निर्माण केले व काव्याचा आत्मा जो रस त्यांत व शब्दालंकारांत तट पडला. शब्द व अर्थ याची फारकत करून चालणार नाहीं. रस व शब्दार्थ यांचेंही महत्त्वाचें नातें आहे त्यायोगेंच रसपरिपोष होतो हें विसरून चालणार नाहीं. पण अलंकारशास्त्रांत शब्दालंकार अर्थापासून विभक्त करून त्यांना निःसत्व व त्याज्य करून टाकले आहेत. त्यांना सत्त्व आणावयाचें असल्यास चित्र अलंकार काढून टाकावा. यमक, अनुप्रास यांच्यायोगें अर्थहानि न होईल इतकेंच त्यांना महत्त्व द्यावें. पदार्थाला रुचि आणण्यास मीठ ज्या प्रमाणांत त्याच प्रमाणांत वर्णांच्या पुनरुच्चारावर अधिष्ठित असलेले हे अलंकार उपयोगांत आणावे.

कोणतीही गोष्ट पटवून देण्यास अगर मनावर ठसविण्यास तिचें दुसऱ्या एकाद्या गोष्टीशीं साम्य, भेद आणि विरोध दाखवावा लागतो व तो नेहमींपेक्षां विशेष शब्दांत दाखवावा लागतो. ते शब्दच असे असावे कीं त्यांतून स्पष्ट केलेले विचार मनावर ठसण्याइतकी शक्ति किंवा मधुरता त्या शब्दांत असावी. मनुष्याची आकलनशक्ति जागृत करण्यास ज्याप्रमाणें साम्य, भेद, विरोध दाखविणें जरूर असतें त्याप्रमाणें आकलन केलेलें ज्ञान कायम रहावें म्हणून धारणा शक्तीला जोरकस करावी लागते. धारणा शक्तीला जोरकस करण्यास शब्दांचा फार उपयोग होतो. पुनः पुनः योग्य निरनिराळ्या तऱ्हेनें सुंदर शब्दांत तीच ती गोष्ट सांगितल्यास प्रत्येक वेळीं तिच्यांत नवीनपणा वाटून ती मनावर अधिक कायम ठसून राहते.

शब्दालंकारांची रचना करतांना अर्थात् मनुष्याच्या या मानसशास्त्राचा विचार केला पाहिजे. अलंकाराचें कार्य काव्याला पोषक असलें पाहिजे हें मुख्य धोरण धरून आपल्या बोजडपणानें व भलत्या कृत्रिमतेनें जर कोणता अलंकार काव्याची माती करीत असेल तर त्याला अलंकारांचे यादींत बसूं देतां उपयोगी नाहीं. या दृष्टीनेंच शब्दालंकारांतील यमक, अनुप्रास या अलंकारांना अलंकार म्हणून गणावें; पण त्यांत शब्दांच्या आहारीं अर्थ न जातां अर्थाच्या आहारीं शब्द अगर वर्ण गेले पाहिजेत. शब्दांचा पुनरुच्चार हा हेतुपूर्वक अर्थपोषण करणारा परिणामकारक व भावनांच्या तारा छेडणारा असला पाहिजे. त्या पुनरुच्चारानें अर्थाला निरर्थकत्व येतां उपयोगी नाहीं. या दृष्टीनें यमक व अनुप्रासाचा उपयोग जपून क्वचित् केवळ रुचीसाठीं करावा. पुनरुक्तवदाभास हा वस्तुतः अलंकार म्हणून मानण्याचेंही कारण नाहीं, इतका तो सामान्य आहे. वक्रोक्ति ही श्लेषांत सामील करण्यास हरकत नाहीं, कारण ती बहुतांशीं श्लेषाच्याच आधारावर आहे.

काव्यांतील सौंदर्य पाहून मग अलंकारशास्त्र झालें आहे. अलंकारशास्त्र निर्माण करून त्याच्यासाठीं काव्य निर्माण करावयाचें नाहीं. पण शब्दालंकाराचे भेद व प्रकार करतांना शास्त्रज्ञ ही मुख्य गोष्ट विसरलेलेच दिसतात व अलंकारांच्या भेदासाठीं काव्य केलेलें दिसतें तें रसज्ञांना आवडणें शक्यच नाहीं. अर्थालंकारांतही भिन्न छाया दिसून स्वतंत्र अलंकार करतांना शास्त्रज्ञ प्रत्येकाची कांटेकोर सीमा घालूं पहातांना दिसतात. पण अशा रीतीनें चोख व्याख्याही होत नाहीं. व चोख व्याख्या करण्याच्या अट्टाहासांत आणखी एक अलंकार अगर भेद मात्र वाढतो. भेद मानूं लागल्यावर तेवढ्याच भेदानें येणारी मर्यादा ही अयुक्त वाटल्यानें आणखी भेदांचा समावेश करावासें वाटतें व मग भेद संपतच नाहींत. तेव्हां भेदांच्या शृंखलांनीं जखडण्यापेक्षां अलंकाराची व्याख्या व्यापक करणें इष्ट आहे. शास्त्र हें सुगम व व्यवहार्य केल्यास त्याचें महत्त्व राहतें. उपमेचे, उत्प्रेक्षेचे शेंकडों भेद पाहून शास्त्रज्ञांनीं पे-

पशाची व्यवस्था पहाण्यासाठीं कारकुनी आंव आणलेला दिसतो. त्यामुळें अलंकार शास्त्रासंबंधीं अनास्था झालेली आहे. प्रत्येक अलंकारासाठीं भलती घासाघीस करूनही पुनः मनाजोगा अलंकार घडत नाहींच मग हे भेदजाल पाहिजे कशाला ? व त्यांना विचारतो कोण ? अभेदानें जितके अलंकार एक छत्री अंमलाखालीं आणतां येतील तितके आणणें इष्ट आहे. अलंकारांना एकत्र करावयाचें याचा अर्थ त्या त्या अलंकारांचें सौंदर्य नष्ट करावयाचें असें नसून अनेक अलंकारांच्या अनेक तऱ्हेच्या सौंदर्यांतील सामान्यपणें आढळणारी विशेष गोष्ट पाहून त्यांना एका नांवानें संबोधावयाचें, विविध सौंदर्यांचा एका नांवांत समावेश करावयाचा एवढेंच.

अलंकारांचे सादृश्य गर्भ, विरोधगर्भ, शृंखलाबन्ध, वाक्यन्यायमूल, लोकन्याय-मूल, गूढार्थ प्रतीतिमूल, असे सात वर्ग पडलेले असून अलंकाराची सूक्ष्म दृष्टीनें परीक्षा केल्यास ही वर्गवारी सदोष कशी आहे हें आपण तिसऱ्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. अलंकारांच्या व्याख्या करतांनाही निर्दोष व निर्मळ व्याख्या करण्याचा प्रत्येक शास्त्रज्ञानें अटोकाट प्रयत्न करूनही मनाजोग्या व्याख्या झाल्या नाहींत. हेंही आपण पाहिलें. त्यांपैकीं अनेकांत दुसऱ्या अलंकाराचा छाया पडलेली दिसते. तेव्हां अशा रीतीनें काटेकोर व्याख्या करणें अनेक दृष्टीनें गौण आहे. सादृश्यगर्भ अलंकाराची भेदसंख्या व नानसंख्या फार वाढलेली आहे. ती कमी करणें झाल्यास सादृश्यांतील मुख्य अवस्था लक्षांत घेतल्या पाहिजेत. पहिल्या अवस्थेंत उपमान व उपमेय यांचे भेद असतांही साधर्म्य सांगितलें जातें. दुसऱ्या अवस्थेंत तें साधर्म्य इतकें बळावतें कीं, उपमान व उपमेय हीं एकाच दर्जाचीं होऊन बसतात. यानंतर आत्यंतिक सादृश्यामुळें उपमेय हेंच उपमान तर नाहीं असें वाटूं लागतें व शेवटीं अंतिम सादृश्यानें उपमेय उपमानांत पूर्णपणें विरून जातें.

उपमा. उपमेयोपमा, अनन्वय, स्मरण, प्रतीप व व्यतिरेक या सर्व अलंकारांस भेद असूनही सादृश्यदर्शन हीच मुख्य गोष्ट असते. प्रतीप व व्यतिरेक अलंका-रांत तें सादृश्य प्रतियोगी स्वरूपाचें व इतरांत अप्रतियोगी स्वरूपाचें असतें. कोण-त्याही तऱ्हेचें सादृश्य असलें तरी मुख्य गोष्ट हीच कीं तें सादृश्य ठसण्यासाठीं उपमान व उपमेय हीं निरनिराळ्या तऱ्हेनें एकत्र आणलीं जातात. उपमेयोपमेंत दोनच वस्तूंत तुलना करतात, अनन्वयांत वस्तूचें एकमेवत्व दाखवितात, स्मर-णांत एक गोष्ट पाहून दुसरीची आठवण होऊन त्या दोहोंतील सादृश्य दाखवितात. प्रतीप व्यतिरेकांतही सादृश्यदर्शनच असतें. उपमेयाचा समानगुण किंवा गुणो-त्कर्ष दाखविला तरी उपमान व उपमेय यांना जवळ आणून त्यांच्यांत विशिष्ट तऱ्हेचें धर्मसाम्य आहे हेंच सांगावयाचें असतें. या सर्व अलंकारांचा औपम्य हाच

प्राण आहे. बाकी उपलक्षणें औपम्यापुढें गौणच असल्यानें हे सर्व अलंकार उपमा या नांवानें ओळखिले जावे. त्यांत प्रत्येकीं असणारें वैलक्षण्य हें उपमेच्या पंखा-खालीं गेल्यास नष्ट होणारें नाहीं तसेंच तें उपमेला बाधही आणणार नाहीं. तेव्हां चेतोहारि सादृश्य एकत्र करून उपमा विविध सौंदर्यानें विलसणेंच बरें.

यापुढें सादृश्याची दुसरी अवस्था लागते. ती म्हणजे उपमेय हेंच उपमान मानणें. ही अवस्था दर्शविणारे अलंकार, रूपक, परिणाम, उल्लेख अपह्नुति समासोक्ति हे होत. रूपकांत मुख्य क्रिया ही कीं उपमानाचा उपमेयावर आरोप करावयाचा असतो. परिणाम अलंकारांत तो आरोप उपमेयाला उपयोगी होतो. उल्लेखांत अनेक गृहीतें एकाच वस्तूला निरनिराळ्या दृष्टीनें पाहून त्यावर अन्य वस्तूचा आरोप करीत असतात. समासोक्तींत विशेषणाच्या समतेनें अगर श्लिष्ट विशेषणांनीं वर्ण्य वस्तूवर व्यवहार समारोप केलेला असतो म्हणजे त्या वस्तूवर गम्य आरोप असतो व त्यायोगें उपमान उपमेय सूचित होतें; अपह्नुतींत निह्नवानें आरोपच असतो तेव्हां आरोप करणें, रूप देणें या मुख्य तत्त्वानें हे अलंकार रूपक म्हणवून घेण्यास योग्य ठरतात.

उपमेयावर उपमानाचा आरोप करून झाल्यावर उपमेयाचा लोप करण्यास सुरवात होते. संदेहांत उपमेयाचे ठिकाणीं उपमानाचा संशय येतो. भ्रांतिमानांत तशी भ्रांति होते, उत्प्रेक्षेंत उपमेयाचे ठिकाणीं उपमानाची कल्पना करावीशी वाटते. या तीनही अलंकारांत उपमेयाचा ग्रास होऊं लागणें ही मुख्य गोष्ट असल्यानें त्या तिन्ही अलंकारांना उत्प्रेक्षा म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्यनीक अलंकार हाही वाच्योत्प्रेक्षेसारखाच असल्यानें तोही यांत येईल. मीलित, सामान्य व तद्गुण हे अलंकार दोन वस्तूंतील गुणसाम्यावर अवलंबून असल्यानें तेही ‘ सामान्य ’ या नांवाखालीं एक करण्यास हरकत नाहीं.

उपमेयाचा उपमानानें सर्वस्वी ग्रास केल्यावर ही वस्तु अमुकच आहे असें म्हणून उपमेयाचे ठिकाणीं उपमान पुढें आणलें जातें. अतिशयोक्तींत लपंडाव नाहीसा होऊन केवळ उपमानच दिसतें. उपमेयाचा ग्रास सर्वस्वी झाल्यामुळें अतिशयोक्ति होते. अतिशयोक्तीची ही व्याख्या अव्याप्त आहे. कोणतेंही अतिशयानें केलेलें वर्णन ती अतिशयोक्ति असें म्हटल्यास उपमेयाचा ग्रासही त्यांत येऊन शिवाय कार्यकारण एकदम घडणें, कार्य आधीं व नंतर कार्य घडणें, संबंध असतां तो नाहीं असें दाखविणें, दोन वस्तूंत संबंध नसतां तो जोडणें या सर्व गोष्टी लोकसीमातिवर्ति असल्यानें अतिशयोक्ति म्हणून गणण्यास हरकत नाही.

दृष्टान्त, निदर्शना, प्रतिवस्तूपमा हे तीन अलंकारही दृष्टान्त या नांवाखाली एकत्र होऊं शकतील. दृष्टान्तांत एका वाक्यांतील धर्म, उपमेय व इवादि यांचें दुसऱ्या वाक्यांत प्रतिबिंब असावें लागतें. प्रतिवस्तूपमेंत सामान्य धर्माचें कथन दोन वाक्यांत असतें; पण बाकीचे

उपमेचे घटक अनुक्त असतात. दृष्टान्तांत त्याचप्रमाणें अर्थांतरन्यासांत एका विधानाचें दुसऱ्या विधानानें समर्थन केलेलें असतें. दृष्टान्तांत तें समर्थन प्रतिबिंब भावानें दोन सामान्य अर्थांत अगर दोन विशेष अर्थांत करतात. अर्थांतरन्यासांत प्रतिबिंबन नसून समर्थन हें सामान्याचें विशेषानें अगर विशेषाचें सामान्यानें करतात. या दोन्ही अलंकारांत मुख्य गोष्ट समर्थन व दोन अर्थांत सादृश्य हीच असल्यानें बाकी तपशीलाकरतां त्यांना दोन भिन्न अलंकार मानणें योग्य नाहीं, असें वाटलें तरी पण अर्थांतरन्यास हा सुभाषित म्हणून इतका उपयोगांत येतो कीं त्याला स्वतंत्र मानणेंच योग्य आहे. तसेंच दृष्टान्तही इतका रूढ झाला आहे व त्याचें स्वरूप इतकें ठसलें आहे कीं तो स्वतंत्र नांवानें ओळखणें योग्य होईल. मात्र प्रतिवस्तूपमेंत व दृष्टान्त अलंकारांत विशेषसा फरक नाहीं. निदर्शनेंत एका वाक्याचा अगर पदाचा अर्थ दुसऱ्या वाक्यांत अगर पदांत निःशेष दिसतो. म्हणजे त्या दोहोंत औपम्य आलेंच. दृष्टान्त व निदर्शना यांत अनुक्रमें बिंब-प्रतिबिंबभाव व औपम्यभाव हाच विशेष असा फरक असला, तरी निदर्शना, प्रतिवस्तूपमा, दृष्टान्त, या सर्वांत सदृश अर्थ ठेवणें, तो दोन वाक्यांत ठेवणें व एका अर्थाचें स्पष्टीकरण दुसऱ्या वाक्यार्थांत मिळणें ह्या सामान्य गोष्टी असल्यानें हे अलंकार दृष्टान्त या नांवात समाविष्ट करण्यास हरकत नाहीं. निदर्शनेंत दोन वाक्यार्थांप्रमाणेंच दोन पदार्थांतही निःशेषदर्शन योजिलेलें असतें. पण अनेक सामान्य पण मुख्य असणारीं तत्त्वें पहातां हे तीन अलंकार एक करणें योग्य होईल. यासाठीं भोज व हेमचंद्र यांनीं केलेलें या अलंकारांचें विवेचन पहाण्यासारखें आहे.

सादृश्यगर्भांत नसणारे असेही कांहीं अलंकार आहेत, कीं ज्यांत सादृश्यापेक्षांही अनेकांनी एकत्र येऊन माला करणें हीच गोष्ट महत्त्वाची आहे; एकत्र गुंफन हें महत्त्वाचें आहे. असे अलंकार तुल्ययोगिता व दीपक हे आहेत. शृंखलाबंधमूल अलंकारांतील मालादीपक, तुल्ययोगिता व दीपक हे अलंकार दीपक अगर तुल्ययोगिता या एकाच नांवानें संयोजणें इष्ट कसें होईल हें त्या त्या अलंकारांच्या विवेचनावरून दिसून येईल.

येथपर्यंत उपमान व उपमेय यांचें सादृश्य विविध तऱ्हेनें दाखविणारे निरनिराळे अलंकार झाले. यापुढें प्रस्तुतार्थ व अप्रस्तुतार्थ यांत सादृश्य दाखविणारे अलंकार पाहिल्यास असें दिसतें कीं, त्यांत सहेतुकपणें अथवा अहेतुकपणें वर्णन केलेल्या प्रस्तुत अगर अप्रस्तुत अर्थांतून तत्सदृश असा प्रस्तुत अर्थ निर्माण होऊन तो उक्त अगर गम्य असतो. अप्रस्तुतप्रशंसा अगर व्याजस्तुति यांत सहेतुकपणें अप्रस्तुताचें वर्णन अगर स्तुतिनिंदा असून प्रस्तुतार्थ गम्य असतो. पर्यायोक्तांत सहेतुकपणें सरळपणें वर्णन न करतां. वळणें घेत बोलतात म्हणजे

अप्रस्तुत बोलून प्रस्तुत अर्थ सुचविला जातो, प्रस्तुत गोष्ट बोलण्यास सुरवात करून व प्रस्तुताचाच निषेध करून अप्रस्तुत बोलावयास सुरवात करावयाची व पुनः प्रस्तुत अर्थच त्यांतून ध्वनित करावयाचा अशी आक्षेपांत स्थिति असते. तऱ्हा कोणतीही असली तरी प्रस्तुतार्थ सांगणें हीच एक विशेष गोष्ट असल्यानें हे अलंकार एक करावे. श्लेषांत सुद्धां प्रस्तुतांतून अप्रस्तुत अगर प्रस्तुत अर्थ निर्माण होतो तोही सहेतुक अगर अहेतुक असूं शकतो. पण पर्यायानें बोलणें ही गोष्ट मात्र श्लेषांत नसते, व दुसरी गोष्ट म्हणजे श्लेष हा सर्वगामी असल्यानें अतिशयोक्तीप्रमाणें त्याला स्वतंत्र मानणें युक्त होईल. पण बाकी वर उल्लेखिलेल्या तीन अलंकारांत प्रस्तुत हें पर्यायानेंच सुचविलें जात असल्यानें त्यांना पर्यायोक्त म्हणून ओळखावें. किंवा फार तर अप्रस्तुतप्रशंसा व व्याजस्तुति अन्योक्ति या नांवानें संबोधून आक्षेप व पर्यायोक्त यांस पर्यायोक्त म्हणून ओळखावे. परिकरांतही साभिप्राय विशेषणांची योजना करून पर्यायानें खरें म्हणावयाचें तें सुचविलेलें असतें म्हणून त्याचा यांत अंतर्भाव करावा.

शृंखलाबंधमूलांतील कारणमाला व एकावली हे दोन अलंकार पाहिले तर कारणमालेंत पूर्वपूर्वी उल्लेखिलेल्या गोष्टीचें कारण दिलेलें असतें व एकावलींत पूर्वपूर्वी अगर उत्तरोत्तर विशेषणें जोडून स्थापनेनें अगर निषेधानें विधानाची आवली निर्माण केलेली असते. एकांत कारणें देणें व दुसऱ्यांत विशेषणें जोडून विधानें करणें ही विशेष गोष्ट आहे खरी; परंतु पूर्वपूर्वांच्यपेक्षित्व ही दोन्ही अलंकारांत सामान्यत्वानें असणारी विशेष महत्वाची गोष्ट आहे. तेव्हां एकावली या नांवानें संबोधून या दोन्ही अलंकारांच्या विशेष गोष्टी एकत्र करतां येतील.

तर्कन्यायमूलांतील काव्यलिङ्ग, अनुमान ह्या दोहोंत हेतु ही मुख्य गोष्ट असते. काव्यलिङ्गांत हेतु ध्वनित असतो व अनुमानांत तो स्पष्ट असतो. हाच फरक दोहोंत आहे. तेवढ्यावरून हे दोन अलंकार भिन्न न करतां एकत्र करतां येतील.

विरोधगर्भ अलंकारांचें अवलोकन केल्यास त्यांत दोन मुख्य भाग पडलेले दिसतात. विरोधी गोष्टी एकत्र येणें व कार्यकारणांची विसंगति असणें. विरोध नांवानें ओळखल्या जाणाऱ्या अलंकारांत कार्यकारणांत संगति असते. पण सदैव भिन्न ठिकाणीं असलेल्या गोष्टी एकत्र येतांना दिसतात. विरोधांत ( १ ) जाति ( २ ) गुण ( ३ ) क्रिया ( ४ ) द्रव्य यावरून अनेक भेद होतात विरोध ज्यांत दाखवावयाचा त्यांत खरा विरोध नसून त्या एकत्र आणल्यामुळे विरोध दिसतो. अधिक अलंकारांत आश्रय व आश्रयी यांत असलेल्या अशाच तऱ्हेच्या विरोधामुळें अधिक अलंकाराचाही विरोध या नांवानेंच उल्लेख करावा.

कार्यकारणांची विसंगति निरनिराळ्या तऱ्हेनें असूं शकते. कारण एकीकडे त्याचें कार्य दुसरीकडेच दिसणें; ज्या कारणामुळें नेहमीं जें घडणारें कार्य तें न होता भलतेंच कार्य घडणें अगर कोणतेंच कार्य न घडणें; कारणावांचूनही कार्य घडणें

नेहमीं ज्या कारणानें जें कार्य घडत नाहीं त्याच कारणानें तेंच कार्य घडवून आणणें, एकच कारण असून त्यापासून विरोधी दोन क्रिया निर्माण होणें. कारण आधीं व नंतर कार्य असा नियम असतां कारणाचे आधीं कार्य अगर कारणाबरोबरच कार्य घडलेसें दाखविणें ही कार्यकारणांत आढळणारी विविध तऱ्हेची विसंगति होय. कार्यकारणांची विसंगति ज्या निरनिराळ्या तऱ्हेनें निरनिराळ्या अलंकारांत दिसतें तें सर्व विषम या नांवानें एकत्र करण्यास हरकत नाहीं. म्हणूनच विभावना, विशेषोक्ति, असंगति, विषम, विचित्र, विशेष व व्याघात हे विषम म्हणून ओळखावे. विशेष अलंकारांत आश्रय आवश्यक असतां निराधार स्थितींत गोष्ट राहाणें हा एक भेद आहे तो ' विरोध ' अलंकारांत घालावा व एकच वस्तू एकाच वेळीं अनेक ठिकाणीं असणें हा भेद पर्यायांत घालावा. थोडक्यांत सांगावयाचें तर विषम या नांवानें कार्यकारणांत जी हरतऱ्हेची विसंगति दिसेल ती ओळखली जावी. अर्थात् विषमांत अतिवैधर्म्यामुळें दोन वस्तूंत संबंध जुळणें अशक्य असें दाखविणारा जो भेद तो विरोधांत जाईल. विरोधगर्भ अलंकारांतील कार्यकारण विरोध अगर विसंगति ही विषम या नांवानें व तदितर गोष्टींत असणारी विसंगति अथवा विरोध हा विरोध या नांवानें ओळखल्यास अतद्गुण विकल्प व विनोक्ति अलंकारही विरोधांत येतील, कारण त्यांतही एक प्रकारच्या विरोधाचा आभास उत्पन्न होतोच.

पर्याय, परिवृत्ति या दोन अलंकारांत आधार आधेयांचा अविरोधी संबंध ही सामान्य गोष्ट असल्यानें अशा तऱ्हेचा संबंध विषम अगर दुसऱ्या ज्या कोणत्या अलंकारांत आलेला असेल तो पर्याय या नांवानें ओळखावा.

समाधि अलंकारांत एक कारण दुसऱ्या कारणाला सौकर्य आणतें. समुच्चयांत सिद्धीसाठीं अनेक कारणें एकत्र होतात. एकाला अनेक कारण जुळणें ही सामान्य गोष्ट धरून हे दोन अलंकार एकत्र करावे. कारण एकाच क्रियेला सहाय्य करणें किंवा सौकर्य आणणें ही गोष्ट दोहोंतही आहे. अन्योन्य अलंकारांतही एक वस्तू क्रियेनें अथवा गुणांनीं दुसरीला उपकारी होत असते. तसेंच सम अलंकारांत समसमान गोष्टी एकत्र येऊन सद्योग अगर असद्योग निर्माण होत असल्यानें, एकाच गोष्टीच्या सिद्धीसाठीं अनेक कारणें अथवा वस्तू एकत्र येणें अथवा आणणें या सामान्य तत्त्वानें समाधि, समुच्चय, अन्योन्य व सम हे अलंकार समुच्चय या नांवानें ओळखितां येतील.

प्रश्नोत्तरांच्या विशेषामुळें परिसंख्या व उत्तर एक करावे. या दोन्ही अलंकारांत प्रश्नोत्तरें यथाक्रम देत जाणें ही एक सामान्य गोष्ट धरून यथासंख्यांत उद्दिष्टांचा यथाक्रम पुनः उल्लेख येणें हें वैशिष्ट्य कदाचित् त्यांत जमा करतां येईल.

संसृष्टि व संकर हे अलंकारांच्या मिश्र अगर विभक्त योगामुळें होत असल्यानें यांस संसृष्टि म्हणण्यास हरकत नाहीं.

अशा रीतीनें अलंकारांची केवळ नामसंख्या कमी करण्याचे हेतूनें यमक, अनुप्रास, उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति, दृष्टान्त, पर्यायोक्त, अन्योक्ति, श्लेष, विरोध, विषम, एकावली, हेतु, पर्याय, समुच्चय, उत्तर, स्वभावोक्ति, संसृष्टि हे अलंकार शिल्लक ठेवावे. रसालंकार न मानणेंच इष्ट. कारण 'अलंकार' या पदवीपेक्षां रस ही पदवीच त्यांना श्रेष्ठ आहे. रसाला उपकारी असतांही रसाला रस म्हणतां येणार नाहीं असें थोडेंच !

अलंकारांतील ज्या एकेका रेखामात्र फरकाकरितां अलंकारशास्त्रांत इतकी घासाघीस झाली आहे तेथें उपसंहाराच्या केवळ सात आठ पानांत सर्व प्रश्नांचा एकदम निकाल लावून कोणाचेंही समाधान होणार नाहीं. सुचविलेला फरक स्थूलमानानें व कमकुवत बुद्धीनें केल्यानें तो सर्वस्वी पटणें कोणास शक्यही नाहीं, हें खरें, परंतु मनांत आलेली एकत्रीकरणाची दिशा म्हणूनच ही सूचना पुढें मांडली आहे. अलंकारशास्त्रज्ञांच्या कुशाग्रबुद्धीपुढें अप्रगल्भ लेखिकेनें तुलनेसही उभें राहणें शोभणार नाहीं. मग त्यांच्या शास्त्रांत केलेली ही फिरवाफिरव शास्त्राभिमानी लोकांना कशी आवडेल ! पण आपले विचार, आचार व संस्कृतीही पालटली तेथें शास्त्रेंही बदलण्याची वेळ इच्छा नसतां आली आहे यांत शंका नाहीं. मग मोहक व वेचक दागिन्यांच्या आवडीनें मौल्यवान् अलंकारांची अवहेलना जर या नव्या काळच्या लेखिकेनें केली व ती जरी रोषाला पात्र झाली तरी अधिक स्पष्टीकरण करण्याचा दुसरा प्रमाद पदरीं न घेतां एवढेंच म्हणतें,

परि आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें ।
साइखडियानें काई प्रार्थावें । सूत्रधारातें ॥




*

# परिशिष्ट १

## रुय्यकाचें कोष्टक.

अर्थालंकार

१ सादृश्यगर्भ  २ विरोधगर्भ  ३ शृंखलाबंध  ४ तर्कन्यायमूल  ५ वाक्यन्यायमूल  ६ लोकन्यायमूल  ७ गूढार्थप्रतीतिमूल.

**१ सादृश्यगर्भ**

भेदाभेदप्रधान——अभेदप्रधान——गम्यौपम्याश्रय.

उपमा——उपमेयोपमा——अनन्वय——स्मरण  आरोपमूलक——अध्यवसायमूल

रूपक——परिणाम——सन्देह——भ्रान्तिमान——उल्लेख——अपह्नुति  उत्प्रेक्षा——अतिशयोक्ति

पदार्थगत——वाक्यार्थगत——भेदप्रधान——विशेषण विच्छित्त्याश्रय——विशेषण विच्छित्त्याश्रय

तुल्ययोगिता——दीपक  प्रतिवस्तूपमा——दृष्टान्त——निदर्शना  व्यतिरेक——सहोक्ति——विनोक्ति  समासोक्ति——परिकर  श्लेष

अप्रस्तुतप्रशंसा——अर्थान्तरन्यास——पर्यायोक्त——व्याजस्तुति——आक्षेप

**२ विरोधगर्भ**

विरोध——विभावना——विशेषोक्ति——अतिशयोक्ति——( कार्यकारण पौर्वापर्यविपर्यया )——असंगति——विषम——सम——विचित्र——अधिक——अन्योन्य——विशेष——व्याघात

**३ शृंखलाबन्धमूल**

कारणमाला——एकावली——मालादीपक——सार

**४ तर्कन्याय**

काव्यलिङ्ग——अनुमान

**संश्लेषमूल**

संसृष्टि——संकर

**५ काव्यन्यायमूल**

यथासंख्य——पर्याय——परिवृत्ति——परिसंख्या——अर्थापत्ति——विकल्प——समुच्चय——समाधि

**६ लोकन्यायमूल**

प्रत्यनीक——प्रतीप——मीलित——सामान्य——तद्गुण——अतद्गुण——उत्तर

# परिशिष्ट २

लोकन्यायमूल

प्रत्यनीक—मीलित—सामान्य—तद्गुण—परिवृत्ति—अर्थापत्ति—समाधि—सम—अन्योन्य—पर्याय—व्याजस्तुति—आक्षेप

तर्कन्यायमूल

काव्यलिङ्ग—अर्थान्तरन्यास—अनुमान.

मालामूल

कारणमाला—एकावली—मालादीपक—दीपक—तुल्ययोगिता—सार—यथासंख्य—पर्याय—परिसंख्या—उत्तर—समुच्चय

विरोधगर्भ

विरोध—विभावना—विशेषोक्ति—असंगति—विषम—विचित्र—अधिक—विशेष—व्याघात—विकल्प—अतद्गुण

गम्योपम्याश्रयांतील रुय्यकाप्रमाणेंच सर्व पाडून त्यांत व्यतिरेकाजवळ प्रतीप घालून पर्यायोक्त, व्याजस्तुति व आक्षेप हीं काढून लोकन्यायमूलांत घातलीं. काव्यन्यायमूल हें सदर अजिबात काढावें; म्हणजे वर दिलेल्या फरकाशिवाय रुय्यकाचें बाकीचें कोष्टक बरोबर वाटतें.

( रुय्यकाच्या कोष्टकांत जेवढा फरक पाहिजे तेवढा दाखविण्यापुरतेंच हें कोष्टक आहे. )

## ग्रंथांतील मराठी अर्ध अगर पूर्ण उदाहरणांची सूची.